# A HIGHER MARATHI GRAMMAR

# प्रौढबोध मराठी व्याकरण

ग्रंथकार

## रामचंद्र भिकाजी जोशी.

पुणें न्यू इंग्लिश स्कुलांतील मराठी भाषेचे माजी शिक्षक,
'मराठी भाषेची घटना,' 'बालबोध व्याकरण' पुस्तक १ आणि २
'मराठी शब्दसिद्धि,' 'मराठी वाङ्मयविवेचन'
इत्यादि पुस्तकांचे कर्ते.

---

आवृत्ति सातवी.

---



---

सन १९२५

---

किंमत दीड रुपया.

हें पुस्तक पुणें, पेठ शनवार, घ नं. ४९५-४९६ येथे **गणेश काशिनाथ गोखले** सेक्रेटरी, यांनीं **श्री गणेश प्रिंटिंग वर्क्स** मध्यें छापिलें. ते **माधव रामचंद्र जोशी**, यांनीं पुणें, पेठ नारायण, येथें प्रसिद्ध केलें.

---

# प्रस्तावना.

या पुस्तकाची प्रथमावृत्ति सन १८८९ सालांत निघाली. त्यानंतर १८९५ सालीं दुसरी आवृत्ति निघाली. या आवृत्तींत पुष्कळ सुधारणा केली होती. पुढे सन १९०० सालीं तिसरी इंग्रजी आवृत्ति काढली. युनिव्हर्सिटीची प्रवेश-परीक्षा आणि स्कूलफायनल परीक्षा यांना बसणाऱ्या विद्यार्थ्यांना प्रश्नांचीं उत्तरें इंग्रजीमध्ये लिहावीं लागत. याकरितां ही इंग्रजी आवृत्ति तयार केली होती. हींत सर्व प्रकरणांमध्यें पुष्कळ सुधारणा केली होती. चौथी आवृत्ति सन १९११ सालीं काढली. निरनिराळ्या प्रकरणांची व्यवस्था आणि मांडणी यांच्या संबंधानें ही आवृत्ति इंग्रजी आवृत्तीप्रमाणे होती. मात्र प्रत्येक प्रकरणांत जास्त माहिती घालून पुष्कळ सुधारणा केली होती. इंग्रजी आवृत्तींत मराठी वृत्तें आणि अलंकार यांवर निराळीं दोन प्रकरणें आहेत. परंतु मराठींत त्या विषयांवर स्वतंत्र पुस्तकें असल्यामुळें तीं प्रकरणें त्या आवृत्तींत घातलीं नाहीत. या पुस्तकाची सन १९१७ सालीं पांचवी व १९२३ सालीं सहावी आवृत्ति काढली.

व्याकरणाचे मुख्य विभाग शब्दसिद्धि, पदसिद्धि आणि वाक्यसिद्धि असे तीन होत. शब्दसिद्धीमध्यें भाषेंतील शब्द कसे सिद्ध झाले हें सांगितलेलें असतें. या प्रकरणाचा कांहीं भाग व्याकरणांत येऊन कांहीं भागाचें स्वतंत्र पुस्तक असते. ही व्यवस्था विद्यार्थी आणि शिक्षक यांना गैरसोयीची आहे, असें जाणून **शब्दसिद्धि** या विभागाचें निराळें पुस्तक तयार केलें आहे. याचीं बारीक टाइपांत छापलेलीं १८६ पृष्ठें असून त्यांत शब्दव्युत्पत्ति पूर्णपणें सांगितली आहे. तसेच भाषेची पूर्वपीठिका आणि भाषेच्या वाढीचा इतिहास या गोष्टीही याच पुस्तकांत सांगितल्या आहेत. यामुळें शब्दसिद्धि हें प्रकरण प्रस्तुत पुस्तकांत आलें नाहीं. सामासिक शब्द हें प्रकरण वास्तविक

शब्दसिद्धीचा भाग आहे. परंतु त्याचा व्याकरणाशीं निकट संबंध असता, यासाठीं तें प्रकरण आणि केवळ व्याकरणांतच सांगितले पाहिजेत असे कित्येक धातुसाधित शब्द वगैरे, हीं प्रकरणें या पुस्तकांत आलीं आहेत. '**मराठी शब्दसिद्धि**' हें पुस्तक म्हणजे वास्तविक प्रस्तुत व्याकरणाचाच भाग होय.

मराठींत इसवी सनाच्या बाराव्या शतकापासून ग्रंथरचना होऊं लागली. परंतु मराठीचें व्याकरण इंग्रजी अंमल होईपर्यंत झालें नाहीं. मानभावी पंथाच्या लोकांनीं मराठी ही आपल्या धर्मपंथाची भाषा ठरविली, आणि त्य लोकांत भाषेच्या शिक्षणास पुष्कळ उत्तेजन आहे. यामुळें आपल्या विद्यार्थ्यांस शब्दांचीं रूपें, वाक्यरचना, समास वगैरे शिकविण्यासाठीं संस्कृताच्या धर्तीवर त्यांनीं लहानसें व्याकरण रचलेलें आहे. तें अगदीं संक्षिप्त असून त्याची समग्र प्रतही पाहाण्यास मिळत नाहीं. त्यांत त्या पंथाच्या लोकांच्या धर्मग्रंथांतून उदाहरणें वगैरे दिलेलीं असल्यामुळें आणि ते लोक आपल्या धर्मग्रंथांस प्रसिद्धि देत नाहींत, यामुळें हें व्याकरण अगदीं अप्रसिद्ध राहिलें आहे. इंग्रजी अंमल सुरू झाल्यावर मिशनरी लोकांच्या आणि सरकारच्या मराठी शाळा झाल्या, तेव्हां शास्त्री मंडळीकडून एक लहानसें प्रश्नोत्तररूपी व्याकरण तयार करवून त्याच्या हस्तलिखित प्रती प्रत्येक शाळेंत ठेविल्या होत्या. त्यांवरून मुलांना व्याकरण शिकवीत. पुढे सन १८३५ सालीं गंगाधरशास्त्री फडके यांनीं एक लहानसें व्याकरण छापविलें. याच सुमारास बाळ गंगाधर शास्त्री जांभेकर यांनीं आपलें प्रश्नोत्तररूप बालव्याकरण लिहिलें. तें पुष्कळ दिवस शाळांत चालू होतें. या व्याकरणांत नामांचीं व क्रियापदांचीं रूपें आणि वाक्यरचनेचे कांहीं त्रोटक नियम असत; आणि त्यांतील विवेचन संस्कृत भाषेच्या व्याकरणास जुळेसें असे. मराठी भाषेची स्थिति किंवा प्रघात यांचा कोणी कधीं विचार केला नव्हता.

मराठीचें व्यवस्थित मोठें व्याकरण लिहिण्याचा चांगला प्रयत्न कै० दादोबा पांडुरंग तर्खडकर यांनीं केला. त्याचें व्याकरण प्रथमतः सन १८३५ सालांत छापलें. त्यांनीं इंग्लिश भाषेच्या व्याकरणाच्या पद्धतीवर सर्व भिन्न भिन्न प्रकरणांस नियमित स्वरूप देऊन व्यवस्थित ग्रंथ तयार केला. त्याच्या कित्येक आवृत्ति निघून त्यांत उत्तरोत्तर पुष्कळ सुधारणाही झाली. तरी त्यांत

व्याकरणाचा ऐतिहासिक दृष्ट्या विचार केलेला नाहीं, यामुळें बहुतेक प्रकरणें अपुरीं आणि सदोष राहिलीं आहेत. तसेंच गेल्या शतकाच्या शेवटच्या पंचवीस वर्षांत मराठी भाषेंत झपाट्यानें सुधारणा होत गेली; आणि विद्यार्थ्यांस शिकविण्याचें व्याकरण लिहिण्याच्या पद्धतीमध्येंही पाश्चात्य देशांत पुष्कळ फेरफार झाले. परंतु दादोबांच्या व्याकरणांत कांहीं नवीन झालें नाहीं. पुढें ते ग्रंथकारही परलोकवासी झाले. दादोबांच्या व्याकरणानें मराठीस शास्त्रीय वळण लागून व्यवस्थितपणा आला, हें मात्र खरें आहे. या दृष्टीनें त्या ग्रंथाची योग्यता फार मोठी आहे. परंतु चालू भाषा म्हटली म्हणजे तिच्यामध्यें जसजसा बदल होत जाईल, तसतसा तिच्या व्याकरणव्यवस्थेंतही फेरफार होत गेला पाहिजे. मराठी भाषेचें स्वरूप तर अलीकडे फार त्वरेनें बदलत आहे. यासाठीं तिच्या व्याकरणांतही सुधारणा होणें अगदीं अगत्याचें होतें.

दादोबांचें व्याकरण मोठें होते, यासाठीं त्यावरून विद्यार्थ्यांस व्याकरण शिकविणें अशक्य होतें. गंगाधर रामचंद्र टिळक यांनीं दादोबांचीच पद्धत घेऊन " लघु व्याकरण " तयार केलें. तें बरींच वर्षें शाळांत चालू होतें. पुढें सरकारनें दादोबांकडून " लघु व्याकरण " तयार करविलें. तें सांप्रत विद्यमान आहे.

या सुमारास प्रख्यात मराठी पंडित कृष्णशास्त्री चिपळूणकर हे पुणें ट्रेनिंग-कॉलेजचे प्रिन्सिपाल होते. ते विद्यार्थ्यांस मराठी व्याकरण शिकवीत असत. त्यांनीं वर्गांत शिकवितांना दादोबांच्या व्याकरणावर टीका करून ती टीका माजी शालापत्रकांत निबंधरूपानें छापिली. या व्याकरणावरील निबंधांत दादोबांच्या पद्धतीचीं दोषस्थळें सप्रमाण दाखविलीं आहेत. हे निबंध टीकारूप आहेत. तथापि यांत मराठी व्याकरणाच्या बहुतेक सर्व प्रकरणांचा मार्मिक विचार आलेला आहे. यांत दादोबांच्या व्याकरणाचे दोष जरी दाखविले आहेत तरी व्यवस्था कशी असावी हें स्पष्टपणें सांगितलेलें नाहीं. याच सुमारास मराठी भाषा संस्कृतापासून कशी झाली, याचा ज्यांत ऐतिहासिक दृष्ट्या विचार केला आहे, असें व्याकरण तयार करण्यासाठीं दक्षिणा प्राईज कमेटीनें बक्षिस लाविलें. त्यावरून कृष्णशास्त्री गोडबोले यांनीं ' नवीन मराठी व्याकरण ' तयार केलें. गोडबोले यांनीं बरीच व्यवस्था चिपळूणकर यांच्या निबंधांस

अनुसरून केलेली ' आहे. तसेंच यांत ऐतिहासिक दृष्ट्या विचार केला आहे, तो शब्दव्युत्पत्तीच्या संबंधानें केला आहे. मराठी भाषेंतील नामांचीं व पदांचीं रूपें आणि प्रयोगरचना यांचे ऐतिहासिक दृष्ट्या मूळ काय आहे, याचा समग्र विचार यांत नाहीं. तथापि चिपळूणकरकृत निबंध आणि गोडबोलेकृत ' नवीन व्याकरण ' यांच्या योगानें व्याकरणपद्धतीस नवीन वळण लागलें.

गोडबोले यांच्या व्याकरणापर्यंत जी व्याकरणें झालीं त्यांमध्यें उपपत्तीच्या दृष्टीने व्याकरणविषयाचा पुष्कळ विचार केलेला आहे. परंतु त्याच सुमारास नवीनच उत्पन्न झालेली शास्त्रीय विषय शिकविण्याची जी पृथक्करणपद्धति ती आमच्या इकडे नव्हती. या पद्धतीप्रमाणें प्रथमतः भाषेची मुख्य गोष्ट जें वाक्य, तें घेऊन त्यावर व्याकरणदृष्ट्या भाषेची रचना कशी असते, हें सांगावयाचें असतें. अलीकडील नवीन मराठी इयत्तांमध्यें तर प्रथमतः वाक्य घेऊन मग त्याच्या निरनिराळ्या भागांच्या संबंधाचा विचार करावयाचा, अशी व्याकरण शिकविण्याची पद्धत घालून दिलेली आहे. या पद्धतीप्रमाणें शिकविण्यासाठीं आरंभीं शिकणाराकरितां " बालबोध व्याकरण, पुस्तक पहिलें " आणि पुढील इयत्तांसाठीं " बालबोध व्याकरण, पुस्तक दुसरें " हीं पुस्तकें प्रस्तुत ग्रंथकर्त्यानें तयार केलीं आहेत व तीं सांप्रत शाळांमधून चालू आहेत.

सन १८४० सालीं रे० बर्जेस नांवाच्या एका मिशनरीनें इंग्रजी भाषेंत मराठी भाषेचें एक व्याकरण लिहिलें. यांत मराठी नामांचें सामान्यरूपाच्या अन्त्यांवरून वर्गीकरण करण्याचा चांगला प्रयत्न केलेला आहे. या वर्गीकरणाचा मला फार उपयोग झाला. रे० मि० नवलकर यांनींही इंग्रजी भाषेत एक मराठी भाषेचें व्याकरण लिहिलें आहे, त्याचा मराठी भाषा आणि व्याकरण हीं शिकणारे मिशनरी आणि इतर युरोपियन लोक यांना फार उपयोग होतो. हें पुस्तक याच दृष्टीनें लिहिलें आहे; आणि त्यामुळें यांत वाक्यरचनेच्या संबंधानें विवेचन विशेष चांगलें केलेलें आहे.

विविधज्ञानविस्तार या मासिक पुस्तकांत कै० गुंजीकर यांनीं निरनिराळ्या व्याकरणांवर परीक्षणरूपानें कांहीं निबंध लिहिले होते, ते फार चांगले होते. परंतु त्यांत सरासरी नामविचाराच्या अंत्यापर्यंत विचार झालेला आहे. हे निबंध मार्मिक रितीनें लिहिलेले आहेत. त्यांचा मला फार चांगला उपयोग झाला.

याप्रमाणें मराठी व्याकरणावर ग्रंथादि लिहिण्याचे प्रयत्न आजपर्यंत झाले आहेत. यानंतर तत्संबंधाचे स्वतंत्र किंवा नवीन प्रकारचे प्रयत्न झाले नाहीत. अगदी अलीकडेही मराठी व्याकरणावर कित्येक लहान मोठे ग्रंथ झाले आहेत, परंतु त्यांमध्ये नवीन असें कांहीं नाही. यांतले कित्येक प्रयत्न केवळ विद्यार्थ्यांस परीक्षेची तयारी करण्यास साह्य करण्याच्या उद्देशाने आणि कित्येक निरनिराळया दुसऱ्या व्याकरणांतील गोष्टींचा एकत्र गोंधळ करून झालेले आहेत.

मराठी व्याकरण लिहिण्याची कल्पना प्रथमतः माझ्या मनांत चिपळूणकरांचे निबंध वाचल्यावरून उत्पन्न झाली. या निबंधांत दादोबांच्या व्याकरण-पद्धतीचे जे दोष दाखविले होते, ते लक्षांत घेऊन व योग्य त्या आणखी सुधारणा करून व्याकरण लिहिण्याचा मी बेत केला. चिपळूणकर यांनीं दादोबांचे दोष सांगितले आहेत, परंतु ते दोष टाळून काय व्यवस्था करावी, हें फारसें सांगितलें नाही. तथापि त्यांच्या निबंधांवरून नवीन व्यवस्था काय करावी, याचा निर्णय ठरवितां येतो. तसेंच अलीकडे इंग्रजी भाषेची बरीचशीं नवीन व सुधारलेल्या पद्धतीने लिहिलेलीं व्याकरणेंहि झालेलीं पाहण्यांत आली. तेव्हां मराठींत माझ्या पुस्तकाच्या पूर्वी झालेलीं व्याकरणें, चिपळूणकर आणि गुंजीकर यांचें व्याकरणावरील निबंध आणि इंग्रजी भाषेचीं सर्व मुख्य मुख्य व्याकरणें हे ग्रंथ पाहून प्रस्तुतचें व्याकरण तयार केलें आहे.

या व्याकरणाच्या संबंधानें असा लोकापवाद ऐकूं येतो कीं यांत सर्व इंग्रजी व्याकरणाची तऱ्हा आहे. हा अपवाद ऐकून मला फार आश्चर्य वाटलें. कारण माझ्या व्याकरणामध्यें आजपर्यंत मराठींत झालेल्या सर्व व्याकरणांपेक्षां इंग्रजी व्याकरण पद्धतीचे अनुकरण फार कमी असून, मराठी व्याकरणांतील सर्व गोष्टींचा संबंध मूळ संस्कृताशीं लावून देण्याचा विशेष प्रयत्न केलेला आहे लक्षपूर्वक पाहिलें असतां असे दिसून येईल कीं, दादोबांचे व्याकरण हें केवळ इंग्रजी व्याकरणाचे पद्धतीवर लिहिलें आहे. त्यांत विभक्तींचीं आणि क्रियापदांची रूपे यांची व्यवस्था इंग्रजीच्या धोरणावर केलेली आहे. यामुळें घोटाळ्याचे प्रकारही पुष्कळ झाले आहेत. यासंबंधाने स्पष्टपणें असें म्हणणें भाग आहे कीं पुष्कळांना वस्तुस्थिति मुळींच न पाहतां केवळ वाटेल तें मत ठोकून देण्याची संवय असते, त्यांतलाच हा प्रकार आहे. मराठी भाषेचें

व्याकरण लिहिण्याचे ठरविले कीं तें संस्कृताच्या पद्धतीवर लिहावें, कीं इंग्रजीच्या पद्धतीवर लिहावें हे प्रश्न अर्थात् पुढें येतात. संस्कृत भाषा ही चालू भाषा नाहीं. तिचें व्याकरण जरी एवढें परिपूर्ण आहे, तरी त्यांत वाक्यरचनेचा विचार अगदींच मर्यादित आहे. तसेंच संस्कृत-व्याकरणांत वाक्यपरिच्छेदाचा विचारही येत नाहीं. यासाठीं मराठींसारख्या चालू भाषेचें व्याकरण लिहावयाचें म्हणजे उपपत्ति आणि पदसिद्धि या गोष्टींचा विचार संस्कृतभाषेच्या व्याकरणाच्या पद्धतीच्या अनुकरणानें करावयाचा, आणि व्याकरणाची ग्रंथरचना आणि निरनिराळ्या प्रकाराची मांडणी चालू अशी जी इंग्रजी भाषा तिच्या नमुन्यावर करावयाची, हें अगदीं उघड आहे. हाच मार्ग प्रस्तुत व्याकरणांत स्वीकारला आहे. दादोबांचें व्याकरण बहुतेक इंग्रजी व्याकरणाच्या तऱ्हेवर रचलेलें आहे. चिपळूणकर यानी आपल्या निबंधांत दादोबांचे व्याकरणावर जे आक्षेप काढले आहेत, ते याच कारणाने काढले आहेत. प्रौढबोध व्याकरण हें उपपत्तीच्या आणि ऐतिहासिक दृष्टीने सर्वस्वी संस्कृत व्याकरणाच्या पायावर रचलेलें आहे. त्याची ग्रंथरचना मात्र इंग्रजी व्याकरणाच्या तऱ्हेवर केली आहे. ही गोष्ट हे व्याकरण जो कोणी नीटपणें वाचून पाहील त्याच्या तेव्हांच लक्षांत येईल.

प्रस्तुत व्याकरणाची चौथी आवृत्ति तयार करतांना दादोबा आणि गोडबोले यांचीं व्याकरणे, आणि चिपळूणकर व गुंजीकर यांचें निबंध हे पाया-भूत घेतले आहेत. त्यानंतर अलीकडे व्याकरणाच्या संबंधानें सुधारणा झाल्या, नवीन गोष्टी कळून आल्या, आणि भाषेचें स्वरूप बदललें, हे प्रकार लक्षांत घेऊन पुष्कळ सुधारणा आणि नवीन व्यवस्था केल्या आहेत. चालू भाषेचें व्याकरण म्हटलें म्हणजे त्यांत उत्तरोत्तर सुधारणा होत गेल्याच पाहिजेत. वर सांगितलेलें ग्रंथकार विद्यमान असते, तर त्यांना ज्या नवीन व्यवस्था करणें उक्त वाटलें असतें असें मला दिसून आलें, त्याच नवीन व्यवस्था मीं आपल्या मतें केल्या आहेत. व्याकरणाच्या निरनिराळ्या गोष्टींचें विवरण करितांना भाषेचें मूळ किंवा आपल्या बोलण्याचें जीवित किंवा आत्मा असें जें 'वाक्य' तेंच आरंभीं घेतलें आहे. नंतर त्याचें स्वरूप सांगत असतांना एकेक प्रकार जसा पुढें येत गेला, तसें त्याचें विवरण केलें आहे. हें सर्व विवरण ऐतिहासिक दृष्टीनें केलें आहे. नामाचें सामान्यरूप हें काय आहे, तें भाषेंत आलें

कसें, विभक्ति कशा आल्या, त्यांच्या प्रत्ययांची व्युत्पत्ति कशी होते, मराठींत आख्यातविभक्ति म्हणजे क्रियापदांचा रूपे कोणतीं आहेत, तीं मूळारंभीं कशीं उत्पन्न झाली, त्यांचे प्रत्यय कसे बनले, मराठी आख्यातविभक्तींपैकीं कांहींनाच लिंगभेद कां व कसा आला, मराठींतल्याकर्मणिप्रयोगाचें स्वरूप काय आहे, कर्तरि व कर्मणि हे प्रकार मराठीं भाषेत सार्वत्रिक कां नाहीत, भूतकाळीं आणि विध्यर्थी मात्र कर्मणि आणि भावी प्रयोग कां होतात, कृदन्तांचें मूळ काय आहे, वगैरे गोष्टींचा पूर्ण विचार पदसिद्धीमध्ये केला आहे. वाक्यविचारांत सर्व प्रकारच्या शब्दांचे आणि वाक्यांचे बोलण्यामध्ये तऱ्हेतऱ्हेने उपयोग कसे होतात, हे विस्तृत रितीनें सांगितले आहे. कारक आणि प्रयोग या प्रकरणांत अगदीं पूर्ण असें विवरण करण्याचा प्रयत्न केला आहे. कोणत्याही जुन्या व्याकरणांत मराठी वाक्यांची मीमांसा आणि पृथक्करण यांचा विचार केलेला नाहीं. गोडबोले यांनी आपल्या पुस्तकांत त्यांचा थोडा उपक्रम मात्र केलेला आहे. प्रस्तुत पुस्तक पृथक्करणपद्धतीनेंच लिहिलेले असल्यामुळें त्यांत त्यांचा विचार पूर्ण आला आहे. वाक्यविचारांत वाक्यपृथक्करण यथासाङ्ग सांगितलें आहे. जुन्या व्याकरणांत कित्येक गोष्टींचा निर्णय ठरविलेला नसल्यामुळें 'व्याकरण करणे' यासंबंधाने अनेक अडचणी राहून गेलेल्या होत्या. प्रस्तुत पुस्तकांत ' व्याकरण चालविणें ' याचा विचार परिपूर्ण करण्याचा प्रयत्न केला आहे. यासंबंधानें खात्रीपूर्वक असें म्हणतां येईल कीं, या व्याकरणाच्या साह्याने व्याकरण चालवितां येणार नाहीं, अशी वाक्यरचना खचित सांगतां येणार नाहीं. अशा प्रकारे हे व्याकरण सर्वांगपरिपूर्ण करण्याचा मी यथामति प्रयत्न केला आहे. यासंबंधाने मतभेदाचे प्रकार असतील. तसें होणें साहजिक आहे परंतु अमुक विचार पुस्तकांत यावयास पाहिजे असून तो आलेला नाही, असें बहुतेक झालेले नाहीं. ही गोष्ट मी डौलानें सांगत नाहीं, तर या पुस्तकांत काय केलें आहे, हेंच सांगत आहें. तसेंच यामध्यें अगदीं नवीन असें मी कांहींच केलें नाहीं. तर मागें जे चार सर्वमान्य ग्रंथकार सांगितले त्यांनीं आणि इतर कित्येकांनीं आजपर्यंत जें कांहीं केलें, तेंच मीं पुढें चालवून त्यांत यथामति आणि यथाशक्ति भर घातली आहे. थोडक्यांत इतकेंच सांगावयाचें कीं, पूर्वव्याकरणकारांचे प्रयत्न आधारभूत धरून त्यांच्यावर मीं आपली इमारत रचली आहे. त्यांचीं व्याकरणें माझेपुढें असून त्यांतले गुण

घेण्यास व दोषस्थळीं सुधारणा करण्यास सवड सांपडली म्हणूनच मला हें काम वाईट बरें करितां आलें आहे. कविकुलगुरु कालिदास यांच्या—

" मणौ वज्रसमुत्कीर्णे सूत्रस्येवास्ति मे गतिः "

या रघुवंशांतील उक्तीप्रमाणें रंध्र पाडलेल्या रत्नामध्यें जसा सूत्राचा सहज प्रवेश होतो, त्याप्रमाणेंच पूर्वीच्या ग्रंथकारांनीं व्याकरणाचा कठीण मार्ग चोखाळून ठेविल्यावर मी त्यांत सुखप्रवेश करीत आहें.

या पुस्तकाच्या तिसऱ्या आवृत्तींत वाक्यांतील मुख्य शब्द, ज्याच्या योगानें वाक्यांत ज्याबद्दल आपण बोलतों तो पदार्थ प्रदर्शित होतो, आणि ज्याला अनुलक्षून क्रियापदाचें रूप असतें, त्याला ' कर्ता ' असा शब्द योजिला होता. परंतु ही व्यवस्था पुष्कळांस नापसंत आहे असें दिसून आल्यामुळें अगोदर बराचसा उपयोगांत असलेला शब्द जो ' उद्देश्य ' तोच या आवृत्तींत कायम ठेविला आहे. तसेंच वाक्यांत कर्मपद प्रथमेप्रमाणें असतां म्हणजे त्याचें रूप प्रत्यय लागून बदललें नसतां त्यास कर्माणि प्रथमा म्हणावें असा जुना प्रघात होता. ही चाल अशुद्ध व अशास्त्रीय आहे. ही बदलण्याचा गोडबोले यांनीं आपल्या व्याकरणांत प्रयत्न केला आहे. हल्लीं माझ्या व्याकरणाचीं लहान पुस्तकें शाळांत चालत असल्यामुळें त्यांचे द्वारें ही रीत बदलण्याची इष्ट सुधारणा घडून आलीच आहे. या एका गोष्टीशिवाय माझ्या व्याकरणांत केवळ नवीन असें कांहीं नाहीं. सुधारणा मात्र पुष्कळ आहेत. त्या सुधारणांचीं कारणें वगैरे पुस्तकांत जेथच्या तेथें सांगितली असल्यामुळें येथे पुन्हां कांहीं सांगण्याची गरज नाहीं. ' भाषेच्या उत्पत्तीचा इतिहास ' हें प्रकरण या पुस्तकाचा निराळा भाग जो ' शब्दसिद्धि ' त्यांत आहे, हें मागें सांगण्यांत आलेंच आहे.

# अनुक्रमणिका.

# प्रौढबोध व्याकरण

## भाग पहिला

## वर्णविचार

### प्रकरण १

#### वर्णमाला.

(१) आपण बोलतांना शब्दांचा उपयोग करितों. हे शब्द आपल्या मुखांतील नादोत्पादक भागांपासून जे ध्वनि निघतात, त्यांचे झालेले असतात. हे ध्वनि भाषेचे मूलभूत होत. हे ध्वनि दर्शवितां यावे म्हणून त्यांच्या खुणा किंवा चिन्हें ठरविलीं आहेत. त्यांना **वर्ण** किंवा **अक्षरें** असें म्हणतात.

(२) वर्ण दोन प्रकारचे आहेत. कांहीं असे आहेत कीं, ते आपल्या तोंडांतून आपल्या इच्छेप्रमाणें निघतात. जसें,—अ, आ, ऊ, ए, इत्यादि. यांना **स्वर** असें म्हणतात.

(३) कित्येक वर्ण असे आहेत कीं, ते आपल्या तोंडांत उत्पन्न होतात, परंतु ते आपोआप त्यांचे तेच बाहेर येऊं शकत नाहींत. तसें होण्यास त्यांस स्वरांचें साह्य लागतें. जसें—क्, ग्, प्, र्, ल्. यांच्या अगोदर स्वर असेल तेव्हां, अथवा यांना स्वरांपैकीं एकादा स्वर जोडावा तेव्हां, यांचा उच्चार तोंडाबाहेर येतो. असें,—अक्, अद्, अत्, क, गे, पी, रू, लू, इत्यादि. यांना **व्यंजनें** असें म्हणतात.

(४) याप्रमाणें वर्ण दोन प्रकारचे आहेत.—**स्वर** आणि **व्यंजनें**.

**(५) ज्या वर्णांचा उच्चार आपल्या इच्छेप्रमाणें स्पष्ट होतो, त्यांस स्वर असें म्हणतात; आणि ज्या वर्णांचा उच्चार स्पष्ट होण्याला स्वरांचें साह्य लागतें, त्यांस व्यंजन असें म्हणतात.**

( ६ ) **स्वरः**—मराठी भाषेंत स्वर असे आहेतः—

| | |
|---|---|
| ऱ्हस्व स्वर—अ, इ, उ, ऋ, ऌ. | संयुक्त स्वर—ए, ऐ, ओ, औ. |
| दीर्घ स्वर—आ, ई, ऊ, ॠ. | मिळून एकंदर तेरा. |

( अ ) ऱ्हस्व म्हणजे आंखूड. दीर्घ म्हणजे लांब. हीं नांवें उच्चारावरून पडलीं आहेत. वास्तविक मूळचे स्वर पांच. अ, इ, उ, ऋ, आणि ऌ. यांचा लांब म्हणजे दीर्घ उच्चार केला, म्हणजे आ, ई, ऊ, ॠ आणि ॡ असे आणखी पांच होतात. यांपैकीं दीर्घ ॡ कोठें येत नाहीं. संयुक्त स्वर यांच्या जुळणीनें होतात. ते असे—अ किंवा आ आणि इ किंवा ई मिळून ए; अ किंवा आ आणि उ किंवा ऊ मिळून ओ; अ किंवा आ आणि ए मिळून ऐ आणि अ किंवा आ आणि ओ मिळून औ. संयुक्त स्वर हे दीर्घ स्वरच आहेत.

( आ ) ऱ्हस्व आणि दीर्घ यांच्या उच्चारासंबंधानें संस्कृत व्याकरणांत असा नियम दिला आहे कीं, कोंबडा आरवतो तेव्हा 'कु—कू—कुऊ' असा तिहेरी आवाज ऐकूं येतो. त्यांतला पहिला 'कु' याचा जो उच्चार तो ऱ्हस्व, दुसऱ्या 'कू' चा दीर्घ आणि शेवटचा प्लुत. हा प्लुत उच्चार प्राचीन संस्कृतांत आहे.

( इ ) या स्वरांपैकीं ऋ, ॠ आणि ऌ हे शुद्ध मराठी शब्दांत येत नाहींत. आणि ऐ आणि औ यांबद्दल पुष्कळ वेळां अइ, अय; अऊ, अव; असे उच्चार करितात. उदाहरणार्थ,—चैन, चइन; सवै, सवई, सवय; कौल, कऊल; लौकर, लवकर; इत्यादि.

( ई ) अ हा मूळचा ऱ्हस्व स्वर आणि आ हा त्याचाच दीर्घ स्वर अशी संस्कृतांतील मूळची व्यवस्था आहे. मराठींतील उच्चार पाहिला, तर याचेही ऱ्हस्व अ, दीर्घ अ, ऱ्हस्व आ, दीर्घ आ, असे भेद मानिले पाहिजेत. उदाहरणार्थ, गॅ वँ त, यांत 'ग' चा अ ऱ्हस्व आणि 'व' चा दीर्घ परंतु 'गॅ वॅ ताँ स' यांत ग आणि व दोन्हीं ऱ्हस्व. 'दीर' याचें 'दिरास' असें झाल्यावर जसें 'दी' हें अक्षर ऱ्हस्व झालें, तसाच हा प्रकार आहे. 'ए' आणि 'ओ' यांचेही ऱ्हस्व आणि दीर्घ उच्चार आहेत.

(उ) त्याचप्रमाणें दो रें यामध्यें 'दा' यांतील आ दीर्घ आहे. परंतु दोरास यामध्यें 'दा' यांतील आ ऱ्हस्व व 'रा' यांतील दीर्घ असें झालें आहे.

(ऊ) हे अ आणि आ यांचे ऱ्हस्व आणि दीर्घ असे उच्चाराचे भेद शब्दांचें सामान्यरूप व इतर रूपें होतांना चांगले लक्षांत येतील.

(ए) अ याचा मूळचा उच्चार सांप्रत आपण करितों तसा तोकडा नसून थोडासा आ—सारखा आहे. ऋग्वेदांत तसा उच्चार करावा लागतो. ह्याच उच्चार दीर्घ झाला म्हणजे आ होतो.

( ७ ) व्यंजनें चौतीस आहेत. तीं अशीः—

| | |
|---|---|
| क्, ख्, ग्, घ्, ङ्—कवर्ग | त्, थ्, द्, ध्, न्—तवर्ग. |
| च्, छ्, ज्, झ्, ञ्—चवर्ग. | प्, फ्, ब्, भ्, म्-पवर्ग. |
| ट्, ठ्, ड्, ढ्, ण्—टवर्ग. | य्, व्, र्, ल्,—अर्धस्वर. |

स्, श्, ष्,—सकारयुक्त किंवा ऊष्मवर्ण. ह् आणि ळ्.

(अ) यांतलीं य् वगैरे व्यंजनें उच्चाराला कांहींशीं **स्वरां**सारखीं आहेत, म्हणून त्यांना अर्धस्वर असें म्हणतात. आणि ह् याचा उच्चार करण्यास जोर लागतो, म्हणून त्यास **महाप्राण** असें म्हणतात.

( ८ ) व्यंजनांत स्वर मिळविला नसला, म्हणजे तीं क्, ख्, ग्, घ्, अशीं त्यांच्या खालीं ( ् ) अशी खूण करून लिहितात. भेद लक्षांत यावा म्हणून स्वर आणि नुसतीं व्यंजनें यांना **वर्ण** म्हणतात; आणि व्यंजनांत स्वर मिळून पूर्ण उच्चार झाला, म्हणजे **अक्षर** असें म्हणतात. स्वरास नेहमी अक्षरें असेंच म्हणतां येईल.

(अ) व्यंजनाचा उच्चार पूर्ण होण्यास त्यांत कोणता तरी स्वर मिळवून त्याचें अक्षर करावें लागतें. उदाहरणार्थ, क, का, कि, की, कु, कू, इत्यादि. अ इत्यादि स्वर आणि अनुस्वार व विसर्ग मिळून कोणत्याही व्यंजनाची **बाराखडी** ( बाराक्षरी ) करितात. ती अशीः—क, का, कि, की, कु, कू, के, कै, को, कौ. कं, कः. यांत आणखी संस्कृतातले स्वर ऋ, ॠ आणि ऌ मिळवून कृ, कॄ, आणि क्ऌ, अशीही अक्षरें करितां येतील.

( ९ ) व्यंजनांच्या प्रत्येक वर्गापैकी पहिलें आणि दुसरें यांचा उच्चार कठोर होतो, आणि बाकीच्यांचा मृदु होतो. त्याचप्रमाणें सकारयुक्त व्यंजनें

यांचाहा उच्चार कठोर होतो. म्हणून प्रत्येक वर्गांतलीं पहिलीं दोन आणि स्, श्, ष्. यांस **कठोर** किंवा **अघोषवर्ण**, आणि बाकीचीं सर्व व्यंजनें आणि स्वर यांस **मृदु** किंवा **घोषवर्ण** असें म्हणतात. यासंबंधानें कोष्टकः—

| व्यंजनें. | | | | | | | स्वर. | | | | स्थान. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अघांपवर्ण. | | | घोषवर्ण. | | | | | | | | |
| क् | ख् | | ग् | घ् | ङ् | ह् | अ | आ | | | कंठ |
| च् | छ् | श् | ज् | झ् | ञ् | य् | इ | ई | ए | ऐ | तालु |
| ट् | ठ् | ष्, ळ् | ड् | ढ् | ण् | र् | ऋ | ॠ | | | मूर्धा |
| त् | थ् | स् | द् | ध् | न् | ल् | ऌ | ॡ | ओ | औ | दंत |
| प् | फ् | | ब् | भ् | म् | व् | उ | ऊ | | | ओष्ठ |

( १० ) व्यंजनांचा उच्चार केला असतां आणखी असें दिसून येईल कीं, पहिल्या पांच वर्गांपैकीं पहिल्या आणि तिसऱ्या व्यंजनांत 'ह्' मिळून दुसरीं आणि चौथीं व्यंजनें झालीं आहेत. जसें—क्+ह्=ख; ग्+ह्=घ; प्+ह्=फ; ब्+ह्=भ; इत्यादि. 'ह्' यास **महाप्राण** म्हणतात. म्हणून प्रत्येक वर्गांतलीं दुसरीं आणि चौथीं व्यंजनें आणि 'ह्' यास **महाप्राण** असें म्हणावें आणि बाकीच्यांस **अल्पप्राण** असें म्हणावें.

( ११ ) अक्षरांचा आकार पाहिला असतांही हें चांगलें लक्षांत येईल. महाप्राण वर्णांचे मूळचे आकार जरी फिरले आहेत, तरी ते वर्ण मूळारंभीं अल्पप्राण आणि 'ह' मिळून बनविलेले दिसतात. उदाहरणार्थ, पुढलि अक्षरें पहाः—

क् + ह = क्ह = ख; ग् + ह = ग्ह = घ; च् + ह = च्ह = छ; ज् + ह = ज्ह = झ; ट् + ह = ट्ह = ठ; त् + ह = त्ह किंवा त्ह = थ; प् + ह = प्ह = फ; ब् + ह = ब्ह = भ; इत्यादि.

( १२ ) पहिल्या पांच वर्गांतलि शेवटचीं व्यंजनें ङ्, ञ्, ण्, न्, म्, यांचा उच्चार नाकांतून होतो, म्हणून यांना अनुनासिक व्यंजनें असें म्हणतात.

(अ) वास्तविक म् हें मूळचें एकच अनुनासिक व्यंजन आहे. त्याचेपुढें कवर्गाचें अक्षर आलें असतां त्याचा उच्चार ङ् असा होतो. (उदा०–तङ्ग); चवर्गाचें आलें असतां ञ् उच्चार होतो. (उदा०–सञ्चार); टवर्गाचें आलें असतां उच्चार ण् होतो. (उदा०–तण्टा); तवर्गाचें आलें असतां न्–सारखा होतो. (उदा०–पन्त); आणि पवर्गाचें आलें असतां मूळचा उच्चार होतो. (उदा०–सम्प); याप्रमाणें एका अनुनासिकाचे पांच प्रकार झाले आहेत.

(आ) कचा उच्चार मृदु होऊन ग होतो. क्मध्यें ह आणि ग्मध्यें ह मिळून ख आणि घ होतात. टवर्गांतील अक्षरांना मृदुत्व येऊन तवर्गांतील अक्षरें बनलीं आहेत. य्, व्, र्, ल्, हीं अक्षरें मूळच्या स्वरांवरून झालीं आहेत. ळ् हें लचें अन्यस्वरूप आहे. आणि श्, ष्, स्, हे सचेच भिन्न प्रकार आहेत. तेव्हां वास्तविक मूळचीं अक्षरें अशीं आहेतः—स्वर–अ, इ, उ, ऋ, ऌ. व्यंजनें–क्, च्, ट्, प्, म्, स्, आणि ह्.

या मूळ स्वरांच्या जुळणीनें बाकीचे स्वर होतात; आणि या मूळ व्यंजनांचे जुळणीनें बाकीचीं व्यंजनें होतात.

(१३) स्वर आणि व्यंजनें यांशिवाय **अनुस्वार** आणि **विसर्ग** असे दोन वर्णोच्चार आहेत.

(१४) **अनुस्वार** म्हणजे अनुनासिकाचा उच्चार; मागें जीं पांच अनुनासिक व्यंजनें सांगितलीं, त्यांचा दोन अक्षरांच्या मध्यें किंवा शब्दाचे शेवटीं उच्चार झाला, म्हणजे त्यास **अनुस्वार** म्हणतात. हा उच्चार मागील अक्षरावर ( ं ) असें टिंब देऊन दाखवितात. किंवा तो दोन अक्षरांच्या मध्यें असल्यास अथवा त्याच्या पुढें व्यंजन आलें असल्यास, त्या व्यंजनाच्या वर्गांतील शेवटचें जें अनुनासिक तें लिहून तो दाखवितात. जसें,—जंव, तंव, तळें, जों, अन्त, रङ्ग, शङ्ख (अंत, रंग, शंख,) इत्यादि.

**टीप**—अनुस्वार न देतां त्याबद्दल अनुनासिक लिहणें ही संस्कृतांतली चाल आहे. यास 'परसवर्ण' असें म्हणतात. संस्कृतांत अनुस्वाराचा स्पष्ट उच्चार होत असतां अनुनासिक लिहितात. मराठींत विशेष जरूर असतां मात्र लिहितात. जसें–स्वरांत=स्वरामध्यें; स्वरान्त=स्वर अंतीं आहे असें.

(१५) हा अनुस्वाराचा उच्चार दोन प्रकारचा आहे. एक थोडकाच उच्चार;

जंव, तंव, जों, तों, आंत, यांमध्यें होतो तसा. आणि दुसरा स्पष्ट असा उच्चार; घंटा, तंटा, पंथ, रंग यांत होतो तसा. स्पष्ट उच्चार हा संस्कृतांतला उच्चार आहे. मराठींत आलेल्या सर्व शब्दांत आणि कित्येक शुद्ध मराठी शब्दांत हा उच्चार होतो. पहिला हा शुद्ध मराठी शब्दांतला उच्चार आहे. स्पष्ट उच्चारास **अनुस्वार** आणि मराठी उच्चारास **अनुनासिक** असें म्हणावें. दोहोंनाही साधारणतः **अनुस्वार** असें नांव देतात.

( १६ ) अनुस्वाराचा संस्कृताप्रमाणें उच्चार करण्याच्या संबंधाचे नियम असे आहेतः—( १ ) शब्दामध्यें अनुस्वारापुढें पहिल्या पांच वर्गांपैकीं व्यंजन असल्यास त्याच्या वर्गांतील शेवटल्या अनुनासिकाप्रमाणें त्याचा उच्चार करावा. जसें,—रंग ( रङ्ग ), चचू ( चञ्चू ), तंटा ( तण्टा ), पंत ( पन्त ), पिंपळ ( पिम्पळ ), इत्यादि. ( २ ) अनुस्वारापुढें य् अथवा ल् असल्यास त्या अक्षरांचा उच्चार द्वित्त होऊन त्याचे अगोदर अनुस्वाराचा उच्चार होतो. उदाहरणें,—संल्लग्न ( संलग्न ), संय्यमन ( संयमन ), इत्यादि. ( ३ ) अनुस्वारापुढें र, व, श, ष, स, ह, यांपैकीं कोणचेंही अक्षर असल्यास त्याचा उच्चार सानुस्वार 'व' सारखा होतो. उदा०—संसार ( संव्‌सार ); संशय ( संव्‌शय ); संहार ( संव्‌हार ), संरक्षण ( संव्‌रक्षण ) इत्यादि. अनुस्वारापुढें ळ् आहे, असें उदाहरण नाहीं.

**टीप**—उच्चारावरून दिसून येईल कीं, अनुस्वाराचा शुद्ध मराठी उच्चार हा स्वर आहे, आणि संस्कृत उच्चार हा व्यंजन आहे.

( १७ ) **विसर्ग** म्हणजे दोन अक्षरांमध्यें किंवा शब्दाचे शेवटीं स् किंवा ह् सारखा उच्चार होतो तो. हा संस्कृत शब्दांत असतो. मराठींत तो संस्कृतामधून आलेल्या शब्दांत आणि शुद्ध मराठी अशा अगदीं थोड्या शब्दांत आढळतो. उदा०—अधःपतन, निःसार, दुःख, निःपात, छिः, थुः, अंः, अंशतः, विशेषतः, इत्यादि.

**टीप**—अनुस्वार आणि विसर्ग हे स्वतंत्र उच्चार नाहींत. ते दुसऱ्या अक्षरांच्या मध्यें येतात. यासाठीं ते स्वर किंवा व्यंजन यांसारखे स्वतंत्र ध्वनि नव्हत. तथापि ते वर्णांबरोबर येण्याची चाल आहे.

( १८ ) वर्णांचा उच्चार तोंडाच्या निरनिराळ्या भागांपासून होतो. त्याव-

ह्न वर्णांचीं निरनिराळीं स्थानें मानिलीं आहेत. आणि त्यांचे वर्ग केले आहेत. ही व्यवस्था अशी आहे.—

| अनुक्रम | स्वर | व्यंजनें | स्थान आणि वर्ण |
|---|---|---|---|
| १ | अ, आ, ( विसर्ग ) | क-वर्ग, आणि ह् | कंठस्थान; कंठ्य वर्ण. |
| २ | इ, ई, | च-वर्ग, य, श् | तालुस्थान; तालव्य वर्ण. |
| ३ | ऋ, ॠ | ट-वर्ग, र, ष्, ळ् | मूर्धास्थान; मूर्धन्य वर्ण. |
| ४ | ऌ | त-वर्ग, ल्, स् | दंतस्थान; दंत्य वर्ण. |
| ५ | उ, ऊ | प-वर्ग | ओष्ठस्थान; ओष्ठ्य वर्ण. |
| ६ | ए, ऐ | | कंठ आणि तालु; कंठतालव्य |
| ७ | ओ, औ | | कंठ आणि ओष्ठ; कंठौष्ठ्य |
| ८ | | व् | दंतौष्ठस्थान; दंतौष्ठ्यवर्ण. |

( १९ ) चवर्गांतील अक्षरें च, ज आणि झ यांचा उच्चार दोन प्रकारचा होतो. एक तालव्य उच्चार—चमत्कार, जाकीट, जन, झंझावात, यांत होतो तसा. हा संस्कृत उच्चार; आणि दुसरा चवाठा, जहाज, झपाटा, यांत होतो तसा; हा दंततालव्य उच्चार आहे. मराठींत आलेल्या सर्व संस्कृत शब्दांत पहिल्या प्रकारचा उच्चार होतो. शुद्ध मराठी शब्दांत दुसऱ्या प्रकारचा उच्चार होतो. तथापि कित्येक मराठी शब्दांमध्यें हा संस्कृतासारखा उच्चार आढळतो; जसें,—चंग, जंगल, इत्यादि.

**टीप**—स्वर आणि व्यंजनें यांच्याविषयीं, विशेषत: निरनिराळ्या अक्षरांचे तऱ्हेतऱ्हेचे उच्चार वगैरे गोष्टींच्या संबंधानें पुष्कळ जास्त माहिती सांगण्याची चाल आहे, आणि ती सांगण्यासारखीही आहे. परंतु असली माहिती विद्यार्थ्यांस तादृश उपयोगाची नाहीं, यासाठीं येथें पाल्हाळ केला नाहीं.

---

# प्रकरण २.

## कांहीं पारिभाषिक शब्द.

(२०) व्याकरणामध्यें पुढें कित्येक ठरींव शब्दांचा उपयोग आलेला आहे. त्यांचा अर्थ येथें सांगतों. यांना पारिभाषिक शब्द असें म्हणतात.

(अ) **गुण** आणि **वृद्धि**—उ, इ, ऋ, आणि ऌ, ऱ्हस्व किंवा दीर्घ, यांबद्दल अनुक्रमें ए, ओ, अर् आणि अल् होणें, याला **गुण** असें म्हणतात. तसेंच अ, इ, उ, ऋ, आणि ऌ, ऱ्हस्व किंवा दीर्घ, यांबद्दल अनुक्रमें, आ, ऐ, औ, आर् आणि आल् होणें, यास **वृद्धि** म्हणतात.

(आ) **संप्रसारण** य्, व्, र्, ल्, या अंतस्थ वर्णांबद्दल इ, उ, ऋ आणि ऌ हे स्वर होणें यास **संप्रसारण** असें म्हणतात.

(इ) **अन्त्य** म्हणजे शेवटचें अक्षर; अन्त्य स्वर म्हणजे शेवटच्या अक्षरांत जो स्वर असेल तो. उपान्त्य म्हणजे अन्त्याचे मागलें अक्षर. उपान्त्य स्वर म्हणजे उपान्त्य अक्षरांत जो स्वर असेल तो. उदाहरणार्थ—तसबिर, यांत 'र' हें अन्त्याक्षर, व 'अ' हा अन्त्य स्वर; आणि 'बी' हें उपान्त्याक्षर, व 'ई' हा उपान्त्यस्वर.

(ई) **आगम**—शब्दाचें रूप होतांना केव्हां केव्हां मध्यें एकादें अक्षर (बहुधा स्वर) घालावें लागतें, त्यांस **आगम** असें म्हणतात. उदाहरणार्थ— 'कर' धातु यास 'तो' प्रत्यय लावावयाचा आहे. तर मध्यें 'इ' हें अक्षर येऊन 'करितो' असें झालें आहे: यांत इ हा **आगम** होय.

(उ) **आदेश**—एकादें अक्षर जाऊन त्याच्याबद्दल दुसरें अक्षर येणें, यास **आदेश** असें म्हणतात. उदाहरणार्थ—गुर्वन्य. यांत गुरु+अन्य असे शब्द असून संधि करतांना 'रु' यांतील 'उ' हें अक्षर जाऊन 'व' हें अक्षर आलें. हा **आदेश** होय.

# प्रकरण ३.

## संधिविचार.

(२१) संस्कृत भाषेत असा नियम आहे कीं, दोन स्वर अथवा दोन व्यंजनें जवळ जवळ आलीं असतां एकांत एक मिळून जावीं, अथवा पुढल्यांत किंवा मागल्यांत कांहीं फेरफार व्हावा. असें होण्याचें कारण, उच्चार करण्यास सोपें जावें, हें आहे. उदाहरणार्थ, 'राम+आश्रय' असें जर म्हणावयाचें आहे, तर **उच्चार** चटदिशीं आणि सुलभपणें करण्यास 'म' यांतील 'अ' आणि 'आश्रय' यांतील आरंभींचा 'आ' हे एकत्र मिळाले तर बरें. यासाठीं 'रामाश्रय' असें एकदम म्हणण्याची चाल पडली. त्याचप्रमाणें आपणांस शुद्ध मराठी शब्दांत 'खिडकी+आंत' असें म्हणावयाचें आहे; येथें आपण 'की' यांतला 'ई' स्वर कायम ठेवून 'आंत' यांतला 'आ' गाळतों, आणि 'खिडकींत' असें म्हणतों. त्याचप्रमाणें 'पाखरूं + एँ' याबद्दल 'पाखरें' असें म्हणतों. तसेंच 'सत् + जन' यामध्यें त् आणि ज यांचा उच्चार एकदम करितांना त् चा ज् झाला तर बरें, म्हणून आपण 'सज्जन' असें म्हणतों. असा जो हा फेरफार होतो, त्यास **संधि** असें म्हणतात.

(२२) शब्दामध्यें दोन वर्ण एकापुढें एक आले असतां दोहोंबद्दल एक वर्ण करितात, अथवा दोहोंबद्दल तिसराच वर्ण करितात, अथवा दोहोंपैकी एक गाळून दुसरा कायम ठेवितात. या प्रकारास **संधि** असें म्हणतात.

(२३) दोन स्वर एकत्र येऊन जो संधि होतो, त्यास **स्वरसंधि** असें म्हणतात; आणि दोन व्यंजनें अथवा एक व्यंजन आणि एक स्वर मिळून जो संधि होतो, त्यास **व्यंजनसंधि** असें म्हणतात.

**टीप**—हे संधि संस्कृत शब्दांत होतात. मराठी शब्दांत अगदीं क्वचित् होतात. तथापि संस्कृत शब्द मराठींत फार येतात, म्हणून संधींची संक्षिप्त माहिती येथें दिली आहे. संस्कृतांत संधिनियम, त्यांचे अपवाद वगैरे पुष्कळ आहेत; त्यांपैकीं मुख्य मुख्य नियम येथें सांगितले आहेत.

## (१) स्वरसंधि.

(२४) स्वरसंधीचे मुख्य नियम असे आहेतः—

(१) संयुक्त स्वरांखेरीज कोणत्याही एकाद्या (ऱ्हस्व किंवा दीर्घ) स्वरापुढें तोच (ऱ्हस्व किंवा दीर्घ) स्वर आला, तर दोहोंबद्दल तोच स्वर दीर्घ होतो. उदाहरणें:—अ किंवा आ + अ किंवा आ = आ. जसें,—

| | |
|---|---|
| सिंह + आसन = सिंहासन. | जा + आवें = जावें. |
| घर + अनघर = घरानघर. | कुंभ + आर = कुंभार. |

विद्यार्थी; भाषांतर; क्रीडारंभ; रामार्थ.

इ किंवा ई + इ किंवा ई = ई. जसें,—

| | |
|---|---|
| हरि + इच्छा = हरीच्छा. | कवि + ईश्वर = कवीश्वर. |

उ किंवा ऊ + उ किंवा ऊ = ऊ. जसें,—

| | |
|---|---|
| भानु + उदय = भानूदय. | गुरु + उत्कंठा = गुरूत्कंठा. |

ऋ किंवा ॠ + ऋ किंवा ॠ = ॠ (विकल्पानें) जसें,—पितृ + ऋण = पितॄण.

(२) अ किंवा आ यापुढें इ, उ, ऋ हे (ऱ्हस्व किंवा दीर्घ) स्वर आल्यास दोहोंबद्दल दुसऱ्याचा गुण होतो. उदाहरणें:—अ किंवा आ + इ किंवा ई = ए. जसें,—

| | |
|---|---|
| गज + इंद्र = गजेंद्र. | राम + ईश्वर = रामेश्वर. |
| सुर + ईश्वर = सुरेश्वर. | ब्रह्मा + इंद्र = ब्रह्मेंद्र. |

अ किंवा आ + उ किंवा ऊ = ओ. जसें,—

| | |
|---|---|
| गंगा + उद्गम = गंगोद्गम. | सूर्य + उदय = सूर्योदय. |

अ किंवा आ + ऋ = अर्. जसें,—

| | |
|---|---|
| देव + ऋषि = देवर्षि. | ब्रह्मा + ऋषि = ब्रह्मर्षि. |

(३) अ किंवा आ यांचे पुढें ए, ऐ आले तर दोहोंबद्दल ऐ होतो; आणि ओ, औ आले तर औ होतो. उदाहरणें:—

| | |
|---|---|
| सर्वथा + एव = सर्वथैव. | रक्त + ओष्ठ = रक्तौष्ठ. |
| देव + ऐश्वर्य = देवैश्वर्य. | मम + औदार्य = ममौदार्य. |
| गंगा + ओघ = गंगौघ. | |

( ४ ) इ, उ, ऋ ( ऱ्हस्व किंवा दीर्घ ) यांपुढें कोणताही विजातीय स्वर आला असतां त्यांबद्दल अनुक्रमें य्, व्, र्, असे आदेश होऊन मग त्यांत पुढला स्वर मिळतो. जसें,—

| | |
|---|---|
| प्रीति + अर्थ = प्रीत्यर्थ. | मातृ + आशा = मात्राशा. |
| प्रति + उत्तर = प्रत्युत्तर. | मातृ + इच्छा = मात्रिच्छा. |
| इति + आदि = इत्यादि. | सासू + आंनीं = सास्वांनीं. |
| भानु + अस्त = भान्वस्त. | भी + आवें = भ्यावें. |
| पितृ + आज्ञा = पित्राज्ञा. | नदी + आंनीं = नद्यांनीं. |

( ५ ) ए, ऐ, ओ आणि औ, ह्यांच्यापुढें कोणताही स्वर आला असतां त्यांच्याबद्दल अनुक्रमें अय्, आय्, अव्, आव्, होऊन मग त्यांत पुढील स्वर मिळतो. जसें,—

| | |
|---|---|
| ने + अन = नयन. | गो + ईश्वर = गवीश्वर. |
| गै + अन = गायन. | नौ + इक = नाविक. |
| क्रे + अ = क्रय. | ग्लौ + आगमन = ग्लावागमन. |

**टीप**—हे सर्व संस्कृत संधि आहेत. यांत क्वचित् शुद्ध मराठी शब्दांत झालेले कांहीं संधिही दिले आहेत.

( ६ ) शुद्ध मराठी शब्दांत प्रत्यय वगैरे लागतांना कित्येक संधि होत असतात, ते असेः—

( अ ) केव्हां अगोदरचा स्वर राहून पुढील जातो; यास **पूर्वरूप संधि** म्हणतात. जसें,—

| | |
|---|---|
| विहिरी + आंत = विहिरींत. | घे + ई = घे. |
| सिमे + आंत = सिमेंत. | केलें + असें = केलेंसें. |
| खिडकी + आंतून = खिडकींतून. | करितो + आहे = करितोहे. |

कितीं + एक = कितीक.

( आ ) केव्हां अगोदरचा स्वर जाऊन पुढील राहतो; यास **पररूप संधि** असें म्हणावें. जसें—

| | |
|---|---|
| घर = ईं = घरीं. | जन + एँ = जनें. |
| कर + ऊन = करून. | पाखरूं + एँ = पाखरें. |

चांगला, चांगला + ई = चांगली.

( २५ ) कित्येक अपवादक संधि झालेले असे शब्द मराठींत बरेच येतात, म्हणून ते पुढें दिले आहेतः—

| | |
|---|---|
| अक्ष + ऊहिनी = अक्षौहिणी. | गो + आजिन = गवाजिन. |
| प्र + ऊढ = प्रौढ. | कुल + अट, अटा = कुलट, कुलटा. |
| स्व = इर, इरिणी=स्वैर, स्वैरिणी. | सार + अंग = सारंग. |
| सुख + ऋत = सुखार्त. | सीमा (सीमन्) + अंत = सीमंत. |
| गो + अक्ष = गवाक्ष. | मन (मनस्) + ईषा = मनीषा. |
| गो + इंद्र = गवेंद्र. | रामा + ओष्ठ = रामोष्ठ, रामौष्ठ. |

## ( २ ) व्यंजनविधि.

( २६ ) व्यंजनसंधीचे नियम असे आहेतः—

( १ ) अनुनासिकाशिवाय कोणत्याही व्यंजनापुढें कठोर व्यंजन आलें असतां पूर्व व्यंजनाबद्दल त्याच्या वर्गांतलें पहिलें व्यंजन येतें. जसें,—

| | |
|---|---|
| शरद् + काल = शरत्काल. | ककुभ् + प्रांत = ककुप्प्रांत. |

क्षुद् + तृषा = क्षुत्तृषा.

(२) अनुनासिकाशिवाय कोणत्याही व्यंजनापुढें मृदु व्यंजन किंवा शब्दाच्या आरंभींचा स्वर * आला असतां पूर्व व्यंजनाबद्दल त्याच्या वर्गांतलें तिसरें व्यंजन येतें. जसें—

| | |
|---|---|
| अच् + अन्त = अजन्त. | सरित् + भवन = सरिद्भवन. |
| तत् + आश्रय = तदाश्रय. | क्षुध् + भय क्षुद्भय. |

( ३ ) च्, श्, ह् यांबद्दल क् होऊन आणि ज्, झ्, यांबद्दल ग् होऊन मग हे दोन्ही नियम लागतात. जसें,—

| | |
|---|---|
| वाच् + पति = वाक्पति. | दिश् + अंबर दिगंबर. |
| वाच् + गुरु = वाग्गुरु. | दिश् + पाल = दिक्पाल. |
| ऋत्विज् + पंक्ति = ऋत्विक्पंक्ति. | मुह् + गर्व = मुग्गर्व. |

* हा स्वर प्रत्ययाच्या आरंभींचा नसावा. ' पत्+अन्ति ' यांत पुढें आलेला 'अ' स्वर शब्दाच्या आरंभींचा नसून प्रत्ययाच्या आरंभींचा आहे. म्हणून संधि ' पतन्ति ' असा झाला. असा प्रकार शुद्ध मराठींत होण्याचा संभव नाहीं.

( ४ ) कोणत्याही व्यंजनापुढें अनुनासिक व्यंजन आलें असतां पहिल्याचें जागीं त्याच वर्गांतलें अनुनासिक येतें, किंवा तिसरें व्यंजन येतें. परंतु पुढील येणारें अनुनासिक प्रत्ययाचा भाग असल्यास पूर्व व्यंजनाचें अनुनासिकच होतें. जसें,—

| | |
|---|---|
| वाच् + मन = वाक् + मन = वाङ्मन किंवा वाग्मन. | तत् + नयन = तद्नयन, तन्नयन. |
| | मृत् + मय = मृन्मय. |
| जगत् + नाथ = जगद्नाथ, जगन्नाथ. | अप् + मय = अम्मय. |

( ५ ) स् अथवा तवर्ग यांतील वर्णाच्या अगोदर अथवा पुढें ल्, श् किंवा चवर्ग यांतला वर्ण आला असतां पहिल्या वर्णाबद्दल ल्, श् किंवा यथानुक्रम चवर्गांतले वर्ण होतात. त्याचप्रमाणें स् किवा तवर्ग यांतील वर्णांच्या अगोदर किंवा पुढें ष् किवा [टवर्ग यांपैकीं कोणताही वर्ण आल्यास पहिल्या वर्णाबद्दल किवा ष्] यथानुक्रम टवर्गांतले वर्ण येतात. यथानुक्रम म्हणजे त् बद्दल च् किंवा ट्; द् बद्दल ज् किंवा ड्; इत्यादि. उदाहरणः—

| | |
|---|---|
| सत्+जन = सज्जन. | तद्+छत्र = तच्छत्र. |
| तत्+टीका = तट्टीका. | तद्+लीला = तल्लीला. |
| भगवत्+डमरु = भगवड्डमरु. | शरद्+झंझावात = शरज्झंझावात. |

( ६ ) संस्कृत शब्दांत विसर्गाचे संधि होतात, ते असेः—

( अ ) शब्दाच्या शेवटीं स् किंवा र् आल्यास त्याचा प्रथमतः विसर्ग होतो. जसें,—

पुनर्, पुनः; अधस्, अधः; इ०.

( आ ) विसर्गापूर्वीं अ असून पुढें अ किंवा मृदु व्यंजन आलें असतां विसर्गाचा उ होतो; आणि मग मागला अ आणि उ मिळून ओ होतो. जसें,—

| | |
|---|---|
| मनस् ( मनः )+राज्य = मनोराज्य. | अधः+मुख = अधोमुख. |

मनः+वृत्ति = मनोवृत्ति.

( इ ) विसर्गाच्या पूर्वीं अ, आ, यांखेरीज स्वर असून पुढें स्वर किंवा मृदु व्यंजन आल्यास विसर्गाचा र् होतो. उदा०—

| | |
|---|---|
| निः+अंतर = निरंतर. | बहिः+द्वार = बहिर्द्वार. |

( ६ ) विसर्गाच्या पुढें च्, छ्, आल्यास त्यांचा श् होतो; ट्, ठ्, आल्यास ष् होतो; त्, थ् आल्यास स् होतो. उदा०—

| | |
|---|---|
| शनैः+चर = शनैश्चर. | रामः+टीकते = रामष्टीकते. |

अधः+तल=अधस्तल.

( ७ ) संस्कृतांत एकाच शब्दामध्यें ऋ, र्, किंवा ष् यांच्यापुढें न् आला तर त्याचा ण् होतो. असें होतांना ऋ, र्, ष्, आणि न् यांच्यामध्यें स्वर, ह्, य्, व्, र्, कवर्गाचीं किंवा पवर्गाचीं अक्षरें, विसर्ग किंवा न्, म् यांपासून झालेला अनुस्वार, हीं आलीं तरी चालतात; मात्र न् च्यापुढें एकादा स्वर अथवा न्, म्, य्, व्, यांपैकीं अक्षर असावें लागतें. उदा०—

| | |
|---|---|
| भाष् + अन = भाषण. | रम् + अनें = रमणें. |
| चर्व् + अन = चर्वण. | ऋ + न = ऋण. |

( ८ ) अ, आ, यांखेरीज कोणताही, स्वर, कवर्ग, अंतस्थ ( अर्धस्वर ) आणि ह् यांतील कोणत्याही वर्णापुढें प्रत्ययाचा किंवा ष् बद्दल आलेला स् असल्यास त्याचा ष् होतो. जसें,—

| | |
|---|---|
| प्रति + संग = प्रतिषंग. | नि + सिद्ध = निषिद्ध. |

वि + सम = विषम.

**टीप**—संधींच्या संबंधाचे हे अगदीं ठोकळ नियम संस्कृत व्याकरणाच्या आधारें सांगितले आहेत. संस्कृतांत तयार झालेले पुष्कळ शब्द आपण घेतों. त्यांची रचना नीट कळावी, यासाठीं हे संधिनियम येथें सांगितले आहेत. यांशिवाय कित्येक किरकोळ संधिनियम आणि अपवाद नियम संस्कृतांत आहेत. त्यांच्या संबंधानें येथें पाल्हाळ करण्याची गरज दिसत नाहीं. त्यांची जरूर लागल्यास ते संस्कृत व्याकरणांत पाहावे.

# भाग दुसरा.



## प्रकरण ४.

———:———

### व्याख्या आणि विभाग.

१. मनुष्यें आपल्या मनांतील अभिप्राय शब्द बोलून दुसऱ्यास समजावितात. या बोलण्यास भाषा असें म्हणतात.

(अ) **शब्द** म्हणजे संकेतानें किंवा रूढीनें अर्थ दाखविणारा एक वर्ण किंवा वर्णसमुदाय.

(आ) असे शब्द व्यवस्थित रीतीनें जुळून कांहीं तरी अर्थ उत्पन्न झाला, म्हणजे तें आपलें बोलणें किंवा **भाषण**. अशी जी बोलण्याची पद्धत तिला, **भाषा** असें म्हणतात. आपल्या एकेका बोलण्याला **वाक्य** असें म्हणतात.

(इ) 'भाषा' हा शब्द 'भाष्' म्हणजे 'बोलणें' या धातूपासून झाला आहे. म्हणून आपल्या मनांतील भाव खुणांनीं सांगणें याला 'भाषा' असें म्हणतां येणार नाहीं. तथापि खुणांनाही **भाषा** म्हणण्याची वहिवाट आहे. जसें, 'करपल्लवी अथवा नेत्रपल्लवी भाषा' इत्यादि. वास्तविक पाहिलें तर भाषा ही शब्दांचीच झाली पाहिजे.

२. भाषा ही मनुष्यांना अनुकरणानें बोलतां येते. व्यवहारांत ती बोलण्यासाठीं मुद्दाम शिकावें लागत नाहीं. परंतु पाहिजे त्यानें पाहिजे तसें बोलूं नये, आणि भाषाव्यवहार व्यवस्थित चालावा, म्हणून विवक्षित भाषा बोलणारे जे प्रमुख लोक असतात, त्यांच्या बोलण्याच्या रीतीवरून भाषेचे नियम ठरवितात, आणि त्यांचें **शास्त्र** बनवितात याला **व्याकरण** असें म्हणतात.

(**अ**) 'व्याकरण' या शब्दाचा मूळ अर्थ स्पष्टीकरण अथवा फोड. कोणत्याही विषयाच्या स्पष्टीकरणास **व्याकरण** असें म्हणतां येईल; परंतु हा शब्द विशेषतः भाषेच्या स्पष्टीकरणास लावितात, आणि एकंदर भाषाशास्त्रास **व्याकरण** असें नांव देतात.

(**आ**) कोणतीही भाषा बोलणारे पुष्कळ लोक असतात. तसेंच ती भाषा ज्या प्रदेशांत बोलतात, तो प्रदेशही विस्तृत असतो. यामुळें एकच भाषा जरी असली, तरी निरनिराळे लोक आणि एकाच प्रांतांतले निरनिराळे भाग यांतील भाषेमध्यें फरक पडतो. 'बारा कोसांवर भाषा बदलते,' अशी मराठींत म्हण आहे. तथापि कोणतीही एकच भाषा बोलणाऱ्या लोकांपैकीं प्रमुख लोक जी भाषा बोलतात, किंवा ते जी भाषा ग्रंथांत अगर लेखांत वापरतात, ती मुख्य भाषा समजतात; आणि प्रांतोप्रांतीं किंवा भिन्न जातींच्या आणि धंद्यांच्या लोकांत जे तिचे प्रकार आढळतात, यांना प्रांतिकभाषा किंवा पोटभाषा असें म्हणतात. उदाहरणार्थ, सांप्रत पुणें, मुंबई, वगैरे प्रांतात प्रमुख लोक ज्या मराठी भाषेंत बोलतात आणि लेखनव्यवहार चालावितात, ती मुख्य मराठी; आणि चित्तपावनी, परभी, कोंकणी, मालवणी, गोमांतकी, वऱ्हाडी, नागपुरी, खानदेशी वगैरे हे तिचे प्रकार, तसेंच कालांतरानेंही भाषा बदलते. त्यावरून जुनी भाषा, नवी भाषा, असे प्रकार होतात.

**व्याकरण** हें मुख्य भाषेंतील चालू प्रघात पाहून त्यांवर रचिलेलें असतें; आणि मग प्रांतिक किंवा भिन्न प्रकार आणि जुन्यानव्या पद्धती या गोष्टी तुलनेकरितां किंवा विकल्प म्हणून सांगितलेल्या असतात.

**टीप**—भाषा बोलतात आणि लिहितात. यामुळें भाषेचे **भाषण** आणि **लेखन** असे दोन प्रकार होतात. व्याकरण हें दोहोंचेंही नियामक आहे.

**व्याख्या—व्याकरण म्हणजे भाषेचें शास्त्र.**

३. व्याकरणांत सांगितलेल्या गोष्टी दोन प्रकारच्या असतात. एक, अमुक अमुक होतें असा नियम; आणि दुसरा प्रकार, त्या नियमाप्रमाणें योग्य प्रकारें शब्दांचा उपयोग करणें. पहिल्या प्रकारास **व्याकरणशास्त्र** आणि दुसऱ्यास **व्याकरणव्यवहार** असें म्हणावें.

४. आपण जें बोलतों, तें वाक्य. [‘ वाक्य ’ म्हणजे बोललेलें.] वाक्य भाषेंतल्या पद्धतीप्रमाणें जुळविलेल्या शब्दांचें झालेलें असतें. हे **शब्द** प्रत्ययादि लावून आणि रूपें करून कसे बनवावे, हें व्याकरणांत सांगितलेलें असतें. तसेंच त्या शब्दांचें वाक्य कसें बनवावें, हेंही सांगितलेलें असतें. यावरून व्याकरणशास्त्राचे **शब्द-विचार** आणि **वाक्यविचार** असे दोन भाग होतात. तसेंच शब्द लिहिण्याचे जे वर्ण, तत्संबंधाचे जे नियम असतात, त्यांना **वर्ण-विचार** असें म्हणतात. हा वर्णविचार वास्तविक शब्दविचारांतच येईल; परंतु कोणी निराळा समजतात.

शब्दविचारांत दोन प्रकार येतातः—( १ ) मूळचे शब्द कसे बनले आहेत हें सांगणें; याला **शब्दसिद्धि** असें म्हणतात. ( २ ) भाषेंत जे शब्द उपयोगांत येतात, ते नेहमीं जसेच्या तसेच येतात असें नाहीं. त्यांचीं विवक्षित रूपें करावीं लागतात. असें जें भाषेंत उपयोग करावयाचें शब्दाचें रूप त्याला **पद** असें म्हणतात. शब्द विचाराच्या या प्रकारास **पदसिद्धि** असें म्हणतात.

तेव्हां व्याकरणशास्त्राचे विभाग ( १ ) **वर्णविचार** ( २ ) **शब्दविचार** आणि ( ३ ) **वाक्यविचार**, असे तीन आहेत. शब्द-विचाराचे ( १ ) **शब्दसिद्धि** आणि ( २ ) **पदसिद्धि** असे दोन विभाग होतात. **शब्दसिद्धीचा** विचार निराळ्या पुस्तकांत केला आहे. प्रस्तुत पुस्तकांत **पदसिद्धि** आणि **वाक्यविचार** अथवा **वाक्यसिद्धि** यांचा विचार केला आहे.

---

# प्रकरण ५.

## शब्दविचार-पदसिद्धि.

### शब्दांच्या जाती.

५. आपलें बोलणें म्हणजे **वाक्य** हें शब्दांचें झालेलें असतें. **ज्याला रूढीनें किंवा संकेतानें अर्थ आला आहे, असें एक अक्षर किंवा अनेक अक्षरांचा समुदाय यास शब्द म्हणावें.** उदा०—रामा, मुलगा, बाप, मनी, वाघ, पाटी, दौत, चांगला, बरा, चार, उंच, मी, तूं, तो, हा गेला, आहे, बसेल, वर, छे, व, जरी, तरी, इत्यादि.

***टीप***—अक्षरें एका जागीं आलीं पण त्यांचा अर्थ अमुक, असें समजण्याची रूढि पडली नसली, किंवा तसा संकेत ठरला नसला तर त्यांस शब्द असें म्हणतां येणार नाहीं. उदाहरणार्थ—'क म न र त' 'वि ना पा' या अक्षर-समुदायांना कांहीं अर्थ नाहीं; तेव्हां हे शब्द नव्हत.

६ बोलतांना शब्दांचा निरनिराळ्या तऱ्हेचा उपयोग होतो. त्यावरून शब्दांचे निरनिराळे प्रकार किंवा जाती झाल्या आहेत. त्या अशाः—

( १ ) कांहीं शब्द पदार्थांचीं नांवें असतात. जसें,—रामा, मुलगा, मनी, मुलगी, भाऊ, बाप, पाटी, लेखणी, हौद, दौत, राग, मन, उजेड, पुस्तक, इत्यादि यांना **नामें** म्हणतात.

( २ ) कांहीं शब्द या नांवांबद्दल येतात. ते शब्द म्हणजे केवळ संज्ञा असतात. त्यांना त्यांचा स्वतांचा अर्थ नसून बोलणाराच्या इच्छेप्रमाणें त्या वेळे-पुरता अर्थ आलेला असतो. जसें,—मी ( जो बोलतो तो मनुष्य ), तूं (ज्यापाशीं बोलावयाचें तो ), तो ( मनुष्य ), हा ( मुलगा ), हें ( जनावर ), इत्यादि. यांना **सर्वनामें** म्हणतात.

( ३ ) कांहीं शब्द पदार्थांविषयीं कसा, किती, असें विशेष कांहीं सांगतात. जसें,-बरा, वाईट, काळा. गोरा, उंच, चार, पांच, केवढा, कसा, इत्यादि. यांना **विशेषणें** असें म्हणतात.

( ४ ) कांहीं शब्दांवरून पदार्थांचें असणें किंवा करणें म्हणजे व्यापार याविषयीं समजतें. जसें,–असतो, बसेल, वाचील, गेला, लिहिलें, द्यावें, इत्यादि. यांना **क्रियापदें** असें म्हणतात.

( ५ ) कांहीं शब्दांवरून पदार्थ वगैरे कांहीं कळत नाहीं ते शब्द वाक्यांत केव्हां, कोठें, कशा प्रकारें असा कांहीं कमज्यास्त अर्थ दाखवितात, अथवा शब्द आणि वाक्यें जोडतात. जसें:–काल, आज, लौकर, फार, जेव्हां, वर, खालीं, पुढें, आंत, ( त्या– ) कडे, ( हरी– ) मुळें, आणि, आणखी, इत्यादि. यांना **अव्ययें** असें म्हणतात.

**टीप**— या नामादिकांच्या व्याख्या नसून केवळ हें समजुतीकरितां केलेलें विवरण आहे.

७. याप्रमाणें शब्दांच्या पांच जाती आहेत:–( १ ) **नामें**, ( २ ) **सर्वनामें**, ( ३ ) **विशेषणें**, ( ४ ) **क्रियापदें**, आणि ( ५ ) **अव्ययें**.

८. यांपैकीं नामें, सर्वनामें आणि विशेषणें यांपासून प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष पदार्थ दाखविण्याचें एकच काम होतें. तसेंच त्यांच्यावरून पदार्थांची स्त्रीपुरुष· जात, संख्या, इत्यादि प्रकारांचा बोध होतो. यावरून यांस **प्रातिपदिकें** असें एकच नांव देतात.

**९. ज्या शब्दांनीं संख्या किंवा लिंग, म्हणजे स्त्रीत्व किंवा पुरुषत्व, यांनीं युक्त अशा वस्तूंचा बोध होतो, त्यांस प्रातिपदिकें असें म्हणतात.**

१०. अशा रीतीनें शब्दांचे ( १ ) **प्रातिपदिकें**, ( २ ) **क्रियापदें**, आणि ( ३ ) **अव्ययें** असे तीन भेद होतील, आणि मग प्रातिपदिकांचे ( १ ) **नामें** ( २ ) **विशेषणें** आणि ( ३ ) **सर्वनामें** असे तीन भेद होतील.

---

# प्रकरण ६.

## वाक्य आणि वाक्यांगें.

११. शब्दांची नीट जुळणी करून आपण आपला एकेक विचार प्रगट केला, म्हणजे त्यांचें एकेक **वाक्य** होतें.

**टीप**—वाक्यविचार पुढें व्हावयाचा. परंतु शब्दांचे भेद नीट कळावे, आणि शब्दांचा योग्य उपयोग समजावा, म्हणून वाक्याची थोडी माहिती आरंभीं दिली पाहिजे.

१२. आपल्या बोलण्यांत प्रथमतः एखादा पदार्थ, त्याचें नांव घेऊन दर्शविला असतो, मग त्याचा व्यापार क्रियापदानें सांगितलेला असतो. जसें,—' आई बोलते. ' ' पक्षी उडाला ' ' आज सुटी आहे. ' ' वांसरें पळतात. ' ' सांज झाली. ' ' पाऊस पडेल. ' ' तो बसला. ' ' हा येईल. ' ' शाहाणे खरें बोलतात. ' इत्यादि.

१३. तेव्हां आपलें बोलणें नीट समण्यास पदार्थदर्शक शब्द म्हणजे प्रातिपदिक, आणि व्यापार म्हणजे क्रिया दाखविणारा शब्द म्हणजे **क्रियापद**. हीं आपल्या बोलण्यांत असलीं पाहिजेत. एरव्हीं आपलें बोलणें, अथवा म्हणणें **वाक्य** होणार नाहीं.

१४. तसेंच, जे शब्द बोलावयाचे, त्यांवरून अर्थ पुरा समजला पाहिजे. ' आई जातां–' ' हरी निघून–' ' पक्षी उडतां–' असें नुसतें म्हटलें, तर अर्थ पुरा होत नाहीं. तर, ' आई गेली. ' 'हरी निघेल. ' ' पक्षी उडतात. ' असें म्हणावयास पाहिजे.

१५. तेव्हां यावरून दिसून येईल कीं, वाक्य होण्यास एक पदार्थदर्शक आणि दुसरा क्रियादर्शक असे निदान दोन तरी शब्द पाहिजेत, आणि क्रियादर्शक शब्दावरून व्यापार पुरा कळला पाहिजे.

**१६. बोलण्यामध्यें शब्दांचा परस्परांशीं नीट संबंध जुळून पूर्ण अर्थ झाला, म्हणजे त्या बोलण्यास वाक्य असें म्हणतात.**

१७. वाक्यांत पदार्थदर्शक जो शब्द असतो, त्याला अनुलक्षून म्हणजे **उद्देशून** आपण बोलतों; म्हणून त्यास **उद्देश्य** असें म्हणावें; आणि त्यास उद्देशून आपण त्याची कृति किंवा स्थिति सांगतों, म्हणजे तत्संबंधानें **विधान** करितों; म्हणून त्यास **विधेय** असें म्हणावें. उदाहरणार्थ, ' ईश्वर आहे. ' ' रामा बोलतो. ' ' पक्षी उडाले. ' ' मुलगे लिहितील. ' ' पत्रें पाठविलीं. ' ' पानें वाढावीं. ' या वाक्यांत आपण ' ईश्वर, ' ' रामा, ' ' पक्षी, ' ' मुलगे, '

'पत्रें,' 'पानें,' यांस उद्देशून अनुक्रमें 'आहे,' बोलतो,' 'उडाले,' 'लिहितील,' 'पाठविलीं,' आणि 'वाढावीं,' हीं विधानें केलीं; यासाठीं 'ईश्वर,' 'रामा,' 'पक्षी,' 'मुलगे,' 'पत्रें,' आणि 'पानें,' हे शब्द **उद्देश्य**; आणि 'आहे,' 'बोलतो,' 'उडाले,' 'लिहितील,' 'पाठविलीं,' 'वाढावीं,' यांस प्रत्येकीं त्या त्या उद्देश्याचें **विधेय** असें म्हणावें.

१८. उद्देश्य एकच शब्द असतो आणि तो पदार्थ दर्शवितो; अथवा त्याच्या बरोबर आणखी शब्द घालून त्यासंबंधानें विशेष कांहीं सांगितलेलें असतें. उदाहरणार्थ, 'विद्यार्थी अभ्यास करतो.' यांत 'विद्यार्थी' याला उद्देशून 'करितो' असें विधान केलें आहे. उद्देश्याबरोबर आणखी असे शब्द घालितां येतील:— 'हुषार विद्यार्थी,' 'तो विद्यार्थी' 'आमच्या शाळेतला विद्यार्थी,' 'माझ्या ओळखीचा विद्यार्थी,' इत्यादि. या शब्दांच्या योगानें उद्देश्याचा अर्थ वाढला आहे. म्हणजे विस्तार पावला आहे, म्हणून यांस **उद्देश्य-विस्तार** असें म्हणावें.

१९. त्याचप्रमाणें 'करितो' हें जें विधेय, याबरोबर 'अभ्यास' असा शब्द घातला आहे. त्यायोगें 'काय करितो' तें आपण सांगितलें.

२०. 'आहे,' 'बसतो,' 'गेला,' 'उडाला,' अशा कांहीं क्रियापदांबरोबर 'आहे' काय, 'बसतो' काय, वगैरे सांगावें लागत नाहीं. परंतु 'करितो' काय?—अभ्यास. 'लिहितो' काय?—पुस्ती. 'पाठवितो' काय?—पत्र. असें कांहीं सांगावें लागतें, त्यांस **स-कर्मक** म्हणजे ज्यांस कर्म पाहिजे अशीं क्रियापदें, व असें ज्या क्रियापदांबरोबर सांगावें लागत नाहीं, त्यांस **अ-कर्मक** म्हणजे ज्यांस कर्म नको अशीं क्रियापदें म्हणतात.

२१. यावरून क्रियापदें दोन प्रकारचीं असतात. (१) **सकर्मक** आणि (२) **अकर्मक.**

२२. सकर्मक क्रियापदांच्या संबंधानें करावयाचें किंवा केलें **काय,** असें जें सांगावें लागतें, तें **कर्म.**

२३. ज्या क्रियापदांचा अर्थ पूर्ण होण्यास कर्म हवें असतें, तीं **सकर्मक**; आणि ज्यांना कर्म नको असतें, म्हणजे ज्यांचा अर्थ त्यांच्यामध्येंच पूर्ण असतो. तीं **अकर्मक.**

२४. कर्म पदार्थदर्शक असतें, म्हणून तें **प्रातिपदिक** असतें. तसेंच उद्देश्यदर्शक शब्दाबरोबर जसे आणखी शब्द घालितां येतात, तसे कर्मदर्शक शब्दाबरोबरही घालितां येतात. उदाहरणार्थ, 'विद्यार्थी धडा करितो,' यांत **धडा**

याबरोबर आणखीं शब्द घालून 'हा धडा,' 'सोपा धडा' 'नेमून दिलेला धडा,' असें आपल्यास हवें असेल तें म्हणतां येईल.

२५. विधेय हें बहुधा क्रियापद असतें. परंतु केव्हां 'अस्,' 'हो' 'इत्यादि कित्येक नियमित क्रियापदें आहेत, त्यांतलीं विधेयाच्या जागीं असतां त्यांच्या-बरोबर नाम, विशेषण, वगैरे येतें; तेव्हां क्रियापद आणि तो शब्द मिळून विधेय समजावें लागतें. उदा०—'ईश्वर परम दयाळू आहे.' 'हरी गोविंद-रावांचा वडील मुलगा होय.' 'अकबर हिंदुस्थानचा बादशहा होता.' 'हा विद्यार्थी हुषार आहे.' 'विठू दुखण्यांतून बरा झाला.' 'ह्या दांड्या तिरप्यां बसल्या.' खेकडे उलटे चालतात.' इत्यादि.

२६. क्रियापदाचा अर्थविस्तार करावयाचा असतो, म्हणजे क्रियेच्या सब-धानें कधीं, कोठें, कसें, किती, कशा प्रकारें, वगैरे सांगावयाचें असल्यास जास्त शब्द घालून आपल्यास सांगतां येतें. उदाहरणार्थ, 'पक्षी उडतो.' यांत 'उडतो' हें 'रोज सकाळीं आकाशांत त्वरेनें फार उंच उडतो,' असें हवें तर म्हणतां येईल. असे जे शब्द घालितात, ते अव्ययें अथवा अव्ययरूप असतात. त्यांस **विधेय-विस्तार** असें म्हणावें.

२७. यावरून वाक्याचे मुख्य भाग दोनः—(१) **उद्देश** आणि (२) **विधेय.** उद्देश्य नामरूप असतें आणि विधेय क्रियापद असतें.

२८. उद्देश्य आणि त्याचा परिवार मिळून वाक्याचें एक अंग होतें; आणि विधेय व त्याचा परिवार मिळून वाक्याचें दुसरें अंग होतें. तेव्हां वाक्याचे भाग किंवा अंगें दोनः—

(१) **उद्देश्यांग** आणि (२) **विधेयांग.**

२९. उद्देश्यांगाचे भाग दोन—(१) **उद्देश्य** आणि (२) **उद्देश्य-विस्तार.**

३०. विधेयांगाचे भाग तीन—(१) **विधेय** (२) **कर्म** आणि (३) **विधेय-विस्तार.**

३१. हे सर्व प्रकार नीट कळावे म्हणून कांहीं वाक्यें घेऊन तीं एका कोष्टका-मध्यें मांडून दाखवितों. वाक्यें:—

(१) पारधी सशाच्यामागें धांवतो.
(२) हुशार मुलगा आपले धडे मन लावून करील.
(३) आमचा चाकर आज गांवाला गेला.
(४) एक प्रचंड पक्षी आकाशांत फार उंच उडाला.
(५) माझा भाऊ आतां उदाहरण करीत असेल.

( ६ ) मुलांनीं आपल्या पुस्त्या लिहिल्या.
( ७ ) पंतोजींनीं आम्हांस आमचा धडा नीट समजावून सांगितला.
( ८ ) मी काल कुत्र्यामागें धांवतांना शेतांत पडलों.
( ९ ) मुलांप्रमाणें मुलींनीं अभ्यास करावा.
( १० ) ईश्वर परम दयाळू आहे.
( ११ ) तुझे शिक्षक तुझ्या वडिलांना पत्र लिहितील.
( १२ ) आजारी मनुष्य सकाळींच थोडा भात जेवला.

## कोष्टक.

| वाक्यांक. | उद्देश्यांग. | | विधेयांग. | | |
|---|---|---|---|---|---|
| | उद्देश्य | उद्देश्य-विस्तार | विधेय | कर्म | विधेय-विस्तार |
| १ | पारधी | | धांवतो | | सशाच्या मागें |
| २ | मुलगा | हुशार | करील | आपले धडे | मन लावून |
| ३ | चाकर | आमचा | गेला | | आज; गांवाला |
| ४ | पक्षी | एक प्रचंड | उडाला | | आकाशांत; फार उंच |
| ५ | भाऊ | माझा | करीत असेल | उदाहरण | आतां |
| ६ | पुस्त्या | | लिहिल्या | | मुलांनीं |
| ७ | धडा | आमचा | सांगितला | | पंतोजींनीं; आम्हांस; नीट समजावून |

| वाक्यांक. | उद्देश्यांग. | | विधेयांग. | | |
|---|---|---|---|---|---|
| | उद्देश्य | उद्देश्य-विस्तार | विधेय | कर्म | विधेय-विस्तार |
| ८ | मी | | पडलों | | काल; शेतांत; कुत्र्यामागें धांवतांना |
| ९ | अभ्यास | | करावा | | मुलींनीं; मुलांप्रमाणें |
| १० | ईश्वर | | परम दयाळू आहे. | | |
| ११ | शिक्षक | तुझे | लिहितील | पत्र | तुझ्या वडिलांना |
| १२ | मनुष्य | आजारी | जेवला | थोडा भात | सकाळींच |

# प्रकरण ७.



## नामविचार.

३२. प्रातिपदिक म्हणजे पदार्थदर्शक शब्द. त्यापासून संख्या, लिंग [ म्हणजे स्त्रीपुरुषभेद ], इत्यादिकांनीं युक्त अशा पदार्थाचा बोध होतो. तसेंच, त्याचा वाक्यांत क्रियापदाशीं संबंध जुळावा, म्हणून त्याचीं रूपें वगैरे होऊन त्यास विभक्त्यादि कार्यें होतात.

३३. कित्येक प्रातिपदिकें प्रत्यक्ष रीतीनें पदार्थ दाखवितात. म्हणजे तीं पदार्थांचींच नांवें असतात; तीं **नामें**.

३४. कित्येक प्रातिपदिकें अप्रत्यक्षपणें पदार्थ दर्शवितात; तीं **सर्वनामें**, आणि जीं विशिष्ट गुणांनीं पदार्थ दर्शवितात, तीं **विशेषणें**.

## ३५. नाम म्हणजे पदार्थाचें नांव.

३६. **पदार्थ** किंवा **वस्तू** म्हणजे जें कांहींतरी अमुक म्हणून सांगतां येतें, किंवा ज्याचें नांव घेतलें कीं, आपल्या मनांत त्याची कांहीं तरी आकृति उत्पन्न होते, किंवा ज्याची आपल्या कोणत्या तरी इंद्रियशक्तीस कल्पना बांधितां येते, तें; त्याचें जें नांव तें **नाम**. उदाहरणार्थ,—मनुष्य, पोथी, लेखणी, झाड, जनावर. या शब्दांपासून आपणांस त्या त्या पदार्थांचा बोध झाला. व ते पदार्थ आपणांस दिसतातही. मन, राग, लोभ, आकर्षण, उंची, जडपणा, करणें, बोलणें, नातें, न्याय, अन्याय, हीं जरी आपणांस डोळ्यांनीं प्रत्यक्ष न दिसलीं, तरी त्यांचा आपल्या मनास बोध होतो. तेव्हां हे पदार्थ होत. परंतु चांगला, बरा, उंच, काळा, गोरा, यांनीं प्रत्यक्ष कोणताच पदार्थ कळला नाहीं. उंच ( पदार्थ ), यानें पर्यायेंकरून अमुक प्रकारचा पदार्थ असें मनांत आलें. येथें **उंच** हें नाम नव्हे व पदार्थही नव्हे. तर उंच असें जें कांहीं तें नाम यांत **उंच** यानें पदार्थदर्शक अर्थ होत नाहीं. तर ' उंच असें जें कांहीं तें, ' इतक्यामध्यें पदार्थदर्शक अर्थ आहे. तसेंच तो ( आंबा ), ती ( पुस्ती, ) तें ( मन ), यांत तो, ती, तें, यांनीं केवळ तेवढ्या वेळापुरते संकेतानें आंबा, पुस्ती, मन, हे पदार्थ मनांत आले. यामध्यें ' आंबा ' हा पदार्थ आहे. पण ' तो ' पदार्थ नव्हे, तर त्याबद्दल घातलेला संज्ञिक शब्द आहे. हा अन्य ठिकाणीं आपल्यास जशाचा तसाच अन्य पदार्थांबद्दलही पाहिजे तर घालितां येईल. तेव्हां पदार्थ दाखविणारे शब्द ते मात्र **नामें** होत.

**३७. नामांचीं उदाहरणेंः—**

( १ ) माणसांचीं नांवें:—रामा, विठू, हरी, शिक्षक, विद्यार्थी, चाकर, राजा, प्रजा, मूल, बाई, पाटील, कुळकरणी, शिपाई, सरदार, देशमुख, मामलेदार, इत्यादि.

( २ ) इतर प्राण्यांचीं नांवें:—वाघ, सिंह, डुक्कर, मांजर, गरूड, पोपट, मोर, सरडा, मुंगी, घोडा, सर्प, विंचू, मासे, घूस, उंदीर, मुंगूस, पिसू, इत्यादि.

( ३ ) देशांचीं, गांवांचीं, स्थळांचीं नांवें:—गुजराथ, पंजाब, इंग्लंड, बंगाल, पुणें, मुंबई, हिमालय, सातपुडा, पंचवटी, पर्वती इत्यादि.

( ४ ) झाडें, फळें, व तसे इतर पदार्थ यांचीं नांवें:—पिंपळ, वड, आंबा, नारळ, लिंबू, बदाम, गुलाब, आई, पाट, लेखणी, शाई, कागद, पान, पत्रावळ, फणस, डाळिंब, पाटी, बूक, इत्यादि.

( ५ ) दिसत नाहींत अशा वस्तूंचीं नांवें:—राग, मन, उंची, लोभ, आनंद, दुःख, गोडी, उन्हाळा, थंडी, करणें, कांडण, दळण, गमन, उड्डाण, जळणें, कृति, रडणें, पित्त, वारा, उष्णता, इत्यादि.

याप्रमाणें जेवढीं म्हणून नांवें त्यांस व्याकरणांत **नामें** असें म्हणावयाचें.

## नामांच्या जाती.

३८. उपयोगावरून नामाचे प्रकार होतात. ( १ ) कित्येक नामें अशीं असतात कीं, त्यांवरून कोणत्या तरी जातीचा किंवा विवक्षित गुणाचा बोध होऊन तीं एकसारख्या, एकाच प्रकारच्या, जातीच्या, किंवा एकाच गुणाच्या सर्व पदार्थांस आणि त्यांपैकीं प्रत्येकास,—किंवा एकाच पदार्थास किंवा त्याच्या भागास देतां येतात. जसें,—गाय, घोडा, माणूस, घर, गांव, आंबा, पेरू, मन, राग, हवा, ढग, उंची, गोडपणा, लांकूड, गहूं, तांदूळ, पाणी, माती, इत्यादि.

( अ ) अशा रीतीनें हीं नामें **सामान्येंकरून** एका जातीच्या सर्व पदार्थांस, आणि त्या जातीच्या प्रत्येक पदार्थास, किंवा त्याच्या भागास देतां येतात, म्हणून त्यांस **सामान्यनामें** असें म्हणतात.

३९. कित्येक नामें अशीं असतात कीं, तीं ज्या पदार्थांस किंवा व्यक्तींस लावितात, त्यांचीं मात्र तीं असतात तीं कोणत्याही पदार्थास किंवा व्यक्तींस, त्याच्या किंवा तिच्या जातीवरून किंवा गुणावरून दिलेलीं नसतात. असें एकादें नांव एका पदार्थास दिलें, तर तशा दुसऱ्या पदार्थास तेंच नांव दिलें पाहिजे असें नाहीं, अशीं नांवें ज्यांचीं त्यांसच **विशेषेंकरून** दिलेलीं असतात. म्हणून त्यांस **विशेषनामें** असें म्हणतात, उदाहरणें,—रामा, गोविंदा, कर्ण, चंद्र, काशी, गंगा, मुंबई, लंडन, इंग्लंड, अमेरिका, देशपांडे, जोशी, आगरकर, ढवळे, नगर, सोलापूर, वाघ्या, सांवळ्या, पिऱ्या, विठू, इ.

४०. तेव्हां नामांच्या दोन जाती आहेतः—( १ ) **सामान्यनामें** आणि ( २ ) **विशेषनामें.**

**( १ ) एकाच जातीच्या पदार्थांस सामान्येंकरून दिलेलीं जीं नांवें, तीं सामान्यनामें.**

**( २ ) नियमित पदार्थांस त्यांचीं त्यांसच विशेषेंकरून दिलेलीं जीं नांवें, तीं विशेषनामें.**

४१. ( अ ) सामान्यनामें आणि विशेषनामें यांतला मुख्य भेद हा आहे कीं, सामान्यनाम जाति किंवा धर्म दाखवितें; व ती जाति किंवा धर्म अनेकांवर लागू पडत असल्यामुळें तें त्या त्या व्यक्तीस लागतें. जसें–**गाय** हा शब्द **गोत्व** जाति दाखवितो; व **चाकर** हा शब्द सेवा करणें, हा सामान्य धर्म दाखवितो; आणि ती जाति किंवा धर्म तो तो शब्द प्रवृत्त होण्यास नियामक होतो. यामुळें त्या त्या जातीस किंवा सामान्यधर्मास त्या त्या शब्दाचें **प्रवृत्तिनिमित्त** म्हणतात. परंतु **विशेषनाम** कोणत्याही जातीच्या अगर सामान्यधर्माच्या योगानें प्रवृत्त होत नाहीं, तर तें साक्षात् केवळ व्यक्तीचा बोध करितें. रामा, खंडू, गोंदू, इत्यादि नामें कोणत्याही जातीच्या किंवा गुणाच्या योगानें त्या त्या व्यक्तीस लागत नसतात; म्हणजे त्या शब्दांचें **प्रवृत्तिनिमित्त** जाति किंवा धर्म असत नाहीं. यावरूनच रामा, गोविंदा इत्यादि कित्येक विशेषनामें अनेक व्यक्तींच्याही संज्ञा असतात; तथापि त्यांस सामान्यनामाचें लक्षण येत नाहीं. कारण त्या शब्दांत जाति किंवा सामान्यधर्म **प्रवृत्तिनिमित्त** असत नाहीं. म्हणजे कोणतेही विशेष जातिधर्म किंवा सामान्यधर्म त्यांवर असल्यामुळें त्या त्या व्यक्तींस तीं नामें लागतात, असें म्हणतां येत नाहीं.

( **आ** ) "ठेविलेलीं जितकीं नामें तितकीं **विशेषनामें**, असें कोणी विशेषनामाचें लक्षण करितात. परंतु विशेषनामें जशीं ठेविलेलीं असतात, त्याचप्रमाणें सामान्यनामेंही ठेविलेलीं असतात. दोन्हींमध्यें तफावत इतकीच कीं, सामान्यनामें जातिविशिष्टांस किंवा सामान्यधर्मविशिष्टांस ठेविलेलीं असतात, व विशेषनामें व्यक्तींसमात्र ठेविलेलीं असतात."

—कृ. शा. चिपळूणकर.

( इ ) वास्तविक पाहिलें तर भाषेंतील एकंदर नांवें माणसांनीं **ठेवलेलींच** आहेत. प्रथमतः एकाद्या पदार्थास 'अमुक' म्हणून नांव ठेवलें. पुढें तसाच असा दुसरा पदार्थ दिसला, तेव्हां त्याला तेंच नांव दिलें. अशा रीतीनें एकाच प्रकारच्या अनेक पदार्थांस एकच नांव पडलें, तें सामान्यनाम झालें. परंतु एकादा पदार्थ असा असतो कीं, अगदीं तसाच असा दुसरा पदार्थ नसतो; किंवा असला तरी दुसऱ्या कांहीं तरी कारणानें त्याला तेंच नांव आपण देत नाहीं. यामुळें त्या पदार्थास त्याचें नांव विशेषेंकरून चिकटून राहातें तें विशेषनाम होतें. तेव्हां प्रथमारंभीं सर्व नामें विशेषनामेंच असून, मग तीं अर्थावरून आणि उपयोगावरून सामान्यनामें झालीं.

( ई ) "कधीं कधीं विशेषनामांचा प्रयोग त्या त्या नामांनीं दर्शित ज्या व्यक्ति त्यांचे विशेष गुण घेऊन त्या गुणांच्या संबंधानें करितात. जसें,—'तो केवळ **जमदग्नि** आहे.' 'त्या **यमापुढें** कोणीं जावें?' 'तो कोण असा **रुस्तुम** लागून गेला आहे?' 'त्या **कैकेयीच्या** तोंडास कोण लागेल?' इत्यादि वाक्यांत जमदग्नि, यम, रुस्तुम, कैकेयी इत्यादि शब्द खरोखरी विशेषनामें आहेत. तरी त्यांचा प्रयोग तापटपणा, निर्दयत्व, बल, कर्कशपणा, इत्यादि गुणांच्या संबंधानें केला आहे, म्हणून त्या वाक्यांत तीं सामान्यनामें झालीं, असें समजावें. तसेंच कांहीं शब्द वास्तविकपणें सामान्यनामें असतांही विशेषनामें होतात. जसें,— हिमालय, पंचवटी, चक्रपाणी, देवेंद्र, इत्यादि शब्द त्यांनीं प्रदर्शित पदार्थांच्या त्या त्या विवक्षित गुणांवरून मूळचे उत्पन्न झाले असून सांप्रत ते मूळचा व्यापक अर्थ सोडून रूढीनें केवळ नियमित व्यक्तीचाच बोध करितात; आणि त्यामुळें ते शब्द विशेषनामें झाले आहेत."

—कृ. शा. चिपळूणकर.

( उ ) अर्थावरून विशेषनामें झालेलीं सामान्यनामें;—पंचवटी, हिमालय, पंजाब, मध्यप्रांत, महानदी, संयुक्त संस्थानें ( अमेरिकेंतील ), इत्यादि.

( ऊ ) अर्थावरून सामान्यनामें झालेलीं विशेषनामें;—'तो केवळ **कर्ण** ( मोठा दाता ) आहे.' 'हे आपले **धर्मराजच** ( भोळे, गरीब ) आहेत.' त्याचप्रमाणें जमदग्नि, कैकेयी, बाजीराव, रावण, भीम, बृहस्पति, कुंभकर्ण इत्यादि.

४२. कित्येक सामान्यनामांवरून एकाच जातीच्या पदार्थांचा स्वभाव, गुण किंवा **धर्म** यांचा बोध होतो. उदाहरणार्थ,—**धैर्य** यापासून धीट मनुष्याचा गुण कळतो, **मैत्री** यापासून **मित्राचा धर्म** कळतो, **गोड** यापासून गोड पदार्थाचा गुण कळतो; इत्यादि. या प्रकारच्या नामांस **भाव-वाचकनामें** असें म्हणतात.

(अ) **एकाच जातीच्या पदार्थांमध्यें असणारा गुण, स्वभाव किंवा धर्म यांचीं जीं नांवें, त्यांस भाववाचकनामें असें म्हणतात.** उदाहरणें:—मनुष्यपण, भलेपण, नीचपण, चांगलेपण, चांगलेपणा, शत्रुत्व, मित्रत्व, भलाई, जडत्व, जडता, गुलामगिरी, पाटिलकी, मधुकरी, गरीबी, लुच्चेगिरी, श्रीमंती, चपळाई, मोवाळी, शांतता, शांति, धिटाई, माधुर्य, उष्णता, इ.

**टीप १**—या उदाहरणांवरून दिसून येईल कीं, भाववाचकनामें हीं भावदर्शक किंवा गुणदर्शक शब्द जे विशेषणें त्यांस कोणता तरी प्रत्यय लागून होतात. जसें,–शांत विशेषण. यापासून भाववाचक नामें—शांतता, शांतपणा, शांति इत्यादि.

**टीप २**—एकेका धर्मास एकेकच नांव असतें. जसें,–मनुष्यपण, लांबी, यामुळें भाववाचक नामें हा विशेषनामांचा प्रकार असें प्रथमतः वाटतें. पण मनुष्यपण हा धर्म सामान्येंकरून सर्व माणसांत सांपडतो. यासाठीं हीं वास्तविक सामान्येंनामेंच होत.

४३. नामें पदार्थ दर्शवितात. यामुळें त्यांचेवरून पदार्थांची पुरुष, स्त्री, अशी जात असल्यास तिचा बोध होतो. उदाहरणार्थ,—वाघ, पुरुष, वाघीण, स्त्री.

४४. त्याचप्रमाणें नामांवरून एक पदार्थ किंवा अनेक पदार्थ असा संख्येचा बोध होतो. उदाहरणार्थ,—आंबा, एक; आंबे, अनेक.

४५. तसेंच भाषेंतील वाक्यें जुळवितांना नामांचा दुसऱ्या शब्दांशीं संबंध दाखवाययाचा असतो. उदाहरणार्थ,–‘ **त्यांस** पुस्तक दिलें. ’ ‘ **घरांत** मनुष्यें आहेत. ’ **त्याचा** भाऊ. ’ ‘ **मानानें** मोठा. ’ इत्यादि.

४६. वरील तीन गोष्टींस अनुक्रमें **लिंगें**, **वचनें** आणि **विभक्ति** असें म्हणतात. हीं होण्यासाठीं नामांस बहुधा विकार होऊन त्यांचीं रूपें होतात. याचा विचार पुढें करूं.

---

# प्रकरण ८.

## लिंगविचार.

४७. लिंग या शब्दाचा मूलार्थ खूण अगर चिन्ह म्हणजे कांहीं विशेष लक्षण, असा आहे. पण व्याकरणांत या शब्दावरून पुरुष अगर स्त्री असा जातीचा बोध होतो. कोणतेंही नाम पुरुषवाचक आहे, कीं स्त्रीवाचक आहे, हें त्यावरून समजतें.

४८. मराठी व्याकरणांत लिंगें तीन मानिलीं आहेत:—( १ ) **पुल्लिंग**, ( २ ) **स्त्रीलिंग** आणि ( ३ ) **नपुंसकलिंग**.

४९. जे शब्द पुरुषवाचक असतात, किंवा ज्यांवरून मानीव पुरुषत्वाचा बोध होतो, ते पुल्लिंगी होत. जसें—रामा, बाबा, वाघ, दादा, लक्ष्मीकांत, सुरेंद्रनाथ, चांगला, असा, तो, बाळा, खांब, कागद, इ.

५०. जे शब्द स्त्रीवाचक असतात, किंवा ज्यांवरून मानीव स्त्रीत्वाचा बोध होतो, तें स्त्रीलिंग समजावें. जसें—रमा, आई, वाघीण, ताई, लक्ष्मी, बाई, चांगली, अशी, ती बाळी, काठी, दौत, पाटी, इ०

**टीप—हा** जो पुरुष—स्त्रीजातीचा बोध होतो, तो बहुधा प्रातिपदिकाच्या रूपावरून—विशेषतः अन्त्य स्वरावरून—होतो. तेव्हां व्याकरणांत ही लिंगभेदाची गोष्ट रूपावरून जाणावयाची असते.

५१. ज्या शब्दांवरून पुरुषत्वाचा अगर स्त्रीत्वाचा बोध होत नाहीं, ते नपुंसकलिंगी मानावे. जसें—घोडें, बकरें, कुत्रें, मांजर, मनुष्य, जनावर, चांगलें, असें, तें, लांकूड, पत्र, पुस्तक, इ०.

**टीप**—' नपुंसक ' या संस्कृत शब्दाचा अर्थ, पुरुषही नव्हे, व स्त्रीही नव्हे, असा आहे. तेव्हां नपुंसकलिंग हें प्रत्यक्ष कांहीं नसून तें पुल्लिंग आणि स्त्रीलिंग यांचें अभावात्मक आहे.

५२. प्राण्यांमध्यें पुरुष व स्त्री अशा दोन निरनिराळ्या जाती असतात. त्यांवरून अर्थात् त्यांच्यासंबंधानें लिंगानिर्णय करणें सोपें असतें. म्हणजे पुरुषांचीं जेवढीं नांवें तेवढीं पुल्लिंगी, व स्त्रियांचीं नांवें तीं स्त्रीलिंगी. परंतु निर्जीव पदार्थांच्या ठिकाणीं स्त्रीपुरुषभाव संभवत नाहीं, तेव्हां त्या पदार्थांचे वाचक जेवढे शब्द तेवढे नपुंसकलिंगी, म्हणजे पुल्लिंगीही नाहींत, व स्त्रीलिंगीही नाहींत, असे मानावे.

५३. ही जी लिंगांसंबंधानें व्यवस्था सांगितली, ती अगदीं स्वाभाविक आहे. तशीच वास्तविक प्रत्येक भाषेंत असावी, पुष्कळ भाषांत तशी आहेही. इंग्रजी, कानडी, वगैरे बऱ्याच भाषांत केवळ स्त्रीपुरुष–भेदावरून लिंगानिर्णय करण्याची वहिवाट आहे. म्हणजे ज्या शब्दांवरून पुरुष–जातीच्या प्राण्यांचा बोध होतो ते पुल्लिंगी, ज्यांवरून स्त्री–जातीच्या प्राण्यांचा बोध होतो ते स्त्रीलिंगी, व ज्या शब्दांवरून निर्जीव पदार्थांचा बोध होतो ते नपुंसकलिंगी. क्षुद्र प्राण्यांस स्त्रीपुरुषभेद करणें कठीण असल्यामुळें तद्वाचक शब्दही नपुंसकलिंगीच मानितात. परंतु संस्कृत, मराठी, व संस्कृतापासून निघालेल्या इतर भाषा यांत या स्वाभाविक भेदान्वयें लिंगनिर्णय करीत नाहींत. त्यांची पद्धत केवळ अनियंत्रित किंवा स्वैर आहे. सामान्यपणें जीं सजीव प्राण्यांचीं नांवें पुरुषवाचक असतात तीं पुल्लिंगी, जीं स्त्रीवाचक असतात तीं स्त्रीलिंगी, व ज्या प्राण्यांच्या बाबतींत स्त्रीपुरुषभेद करीत नाहींत, किंवा तसा भेद करणें शक्य नाहीं, त्या प्राण्यांचीं नांवें पुल्लिंगी, किंवा नपुंसकलिंग यांपैकीं रूढीप्रमाणें कोणत्या तरी लिंगाचीं असतात.

५४. या भाषांत निर्जीव पदार्थांसंबंधानें लिंगनिर्णय करण्याची पद्धति तर चमत्कारिक आहे. उदाहरणार्थ—खांब, सोटा, वांसा, पतंग, हे शब्द पुल्लिंगी आहेत; तुळई, काठी, वावडी, हे स्त्रीलिंगी आहेत; आणि घर, पुस्तक, हे नपुंसकलिंगी मानिले आहेत. अशा प्रकारें मानीव लिंगपद्धति आहे.

**टीप**—उत्तर हिंदुस्थानांतील देशी भाषांत नपुंसकलिंग मानीत नाहींत. निर्जीव पदार्थांचीं नांवें केवळ वहिवाटीप्रमाणें पुल्लिंगी किंवा स्त्रीलिंगी मानितात.

५५. निर्जीव पदार्थवाचक शब्दांचें लिंग ठरवितांना त्यांच्या अर्थापेक्षां त्यांच्या रूपाकडेच, विशेषेंकरून त्यांच्या अन्त्य स्वराकडेच, ज्यास्त लक्ष पुरविलेलें असतें. सस्कृतांत पुल्लिंगी, स्त्रीलिंगी व नपुंसकलिंगी नामांचे अंत्यवर्ण कांहींसे नियमित आहेत, पण मराठींत तसा प्रकार नाहीं.

५६. कोणी सामान्यलिंग म्हणून एक चवथें लिंग मानितात. ज्या प्राणि-वाचक शब्दांना पुल्लिंगी अगर स्त्रीलिंगी असें म्हणतां येत नाहीं, त्यांना सामान्य लिंगी मानावें, असें त्यांचें म्हणणें आहे. परंतु संस्कृतांत, त्याचप्रमाणें मराठींतही नपुंसकलिंग म्हणजेच सामान्यलिंग आहे. ज्या नामावरून स्त्री अगर पुरुष जातीचा बोध होत नाहीं, तेंच नपुंसकलिंगी होय. जेव्हां आपल्यास पुरुष किंवा स्त्री यांपैकीं कोण आहे हें नाम ठाऊक नसतें, तेव्हां आपण 'कोण तें ?' असें म्हणतों. जेव्हां ' घोडा किंवा घोडी ' याचा निर्णय करावयाचा नसतो, तेव्हां सामान्यतः ' घोडें ' असें म्हणतों. मराठींत नामांना लागणारे निरनिराळ्या लिंगाचे वाचक असे प्रत्यय आहेत; त्याचप्रमाणें कांहीं मराठी लिंगभेदाप्रमाणें निरनिराळे प्रत्यय लागतात. हे नामांना व क्रियापदांना लागणारे प्रत्यय पुल्लिंगी, स्त्रीलिंगी, व नपुंसकलिंगी असे तीनच प्रकारचे आहेत. सामा-न्यलिंगाचे असे निराळे चौथे प्रत्यय नाहींत. तेव्हां मराठींत लिंगाचा चवथा भेद मानण्यास जागाच नाहीं.

५७. स्त्रीपुरुषभेदानुरूप जेव्हां एखाद्या नामाचें लिंग ठरवितां येत नाहीं, तेव्हां तें भाषेंतील रूढीवरून ठरवितात. मग त्याला काय प्रत्यय वगैरे लागा-वयाचे असतील, ते त्याच्या ठराविक लिंगाप्रमाणें, पुल्लिंगी, स्त्रीलिंगी, अगर नपुंसकलिंगी लावितात. उदाहरणार्थ,—लोक, मूल, पोर, या शब्दांचें लिंग समजणें कठीण आहे. कारण त्यांवरून स्त्री अगर पुरुष असा कांहीं बोध होत नाहीं. परंतु लोक हा शब्द पुल्लिंगी व मूल आणि पोर हे शब्द नपुंसकलिंगी मानण्याची वहिवाट आहे. मूल व पोर या शब्दांवरून मुलगा अगर मुलगी असा जेव्हां स्पष्ट अर्थ होतो, तेव्हां ते शब्द पुल्लिंगी अगर स्त्रीलिंगी मानितात. या दिशेनें विचार केला, म्हणजेही मराठींत चवथें लिंग अनवश्यक आहे, हें सहज लक्षांत येईल.

५८. निर्जीव पदार्थवाचक शब्दांचीं लिंगें फक्त कोशावरूनच कळणारीं

आहेत. त्याला दुसरा कांहीं ठरींव मार्ग नाहीं. तथापि शब्दांच्या अंत्यवर्णावरून त्या शब्दांचें लिंग ओळखण्यास विद्यार्थ्यांस कांहींसें साह्य व्हावें, म्हणून थोडे ठोकळ नियम पुढें दिले आहेत. हें वर्गीकरण पूर्ण आहे असें मात्र समजूं नये.

५९. प्राणिवाचक शब्दांचें लिंग ओळखणें साधारणपणें सोपें असतें. पुरुषांचीं नांवें पुल्लिंगी, स्त्रियांचीं नांवें स्त्रीलिंगी, व ज्या नामांवरून या दोहोंपैकीं एकाचाही बोध होत नाहीं, तीं नपुंसकलिंगी असतात. उदाहरणार्थ,—देव, राजा, घोडा, गाढव, कुत्रा, बकरा, हे शब्द पुल्लिंगी आहेत; देवी, राज्ञी, घोडी, गाढवी, कुत्री, शेळी, हे स्त्रीलिंगी आहेत; व दैवत, घोडें, गाढव, कुत्रें, बकरें हे नपुंसकलिंगी आहेत.

६०. जे संस्कृतांतील शब्द मराठींत आलेले आहेत, त्यांचीं मूळचीं लिंगें बहुधा कायम राहिलीं आहेत, किंवा त्याच अर्थाच्या मराठी शब्दांचीं लिंगें त्यांस प्राप्त झालीं आहेत. संस्कृतांत सामान्यपणें असा नियम आहे कीं, अकारान्त नामें बहुधा पुल्लिंगी अगर नपुंसकलिंगी असतात; व आकारान्त, उकारान्त आणि ईकारान्त नामें साधारणपणें स्त्रीलिंगी असतात.

६१. हिंदी, फारशी, आरबी व इंग्रजी या भाषांतून जे शब्द मराठींत आले आहेत, त्यांचीं मूळचीं लिंगें बहुधा तशींच मानतात. कांहीं शब्दांना त्याच अर्थाच्या मराठी शब्दांचीं लिंगें लागू केलेलीं आहेत. इंग्रजींत निर्जीव पदार्थदर्शक शब्द नपुंसकलिंगी समजतात. पण ते मराठींत आले असतां तशा अर्थाच्या शब्दांच्या साम्यावरून अथवा इतर कारणांनीं त्यांचीं हवीं तशीं लिंगें मानितात.

६२. निर्जीवपदार्थवाचक शब्दांचीं लिंगें ओळखण्याचे सामान्य नियम असे आहेतः—

(१) आकारान्त मराठी नामें, आकारान्त हिंदुस्थानी नामें व मूळ संस्कृतांत ज्यांच्या शेवटीं 'न्' आहे, पण मराठींत जीं आकारान्त झालीं आहेत, अशीं नामें, हीं बहुधा पुल्लिंगी आहेत. जसें,—सोटा, गडवा, लोटा, बटाटा, आत्मा, पेशा, बाजा, कारखाना, रोजनामा, दिवा, डोळा, तांब्या, लखोटा, नाडा, पत्ता, अणिमा, लघिमा, गरिमा, पंथा, तर्जुमा, खलिता, इ०.

**अपवाद**—हवा, रजा, मजा, इजा, दवा, निशा, पर्वा, इत्यादि शब्द स्त्रीलिंगी आहेत. दवा हा शब्द पुल्लिंगीही आहे.

( २ ) ज्यांच्या शेवटीं आकारान्त धातु आहेत, असे संस्कृत शब्द पुल्लिंगी मानितात. जसें,—गोपा, सोमपा शंखध्मा, इ०.

( ३ ) अवनी तरुणी, भेरी, रात्री, वापी, राजी, वगैरे जीं संस्कृत ईकारान्त नामें आहेत, तीं स्त्रीलिंगी आहेत; व तशाच शब्दांवरून मराठींत जीं ईकारान्त व अकारान्त नामें बनलीं आहेत, तींही स्त्रीलिंगीच आहेत. जसें,—रात्र, बाव, बोर, पोर, इ०.

( ४ ) आकारान्त संस्कृत नामांवरून मराठींत जीं अकारान्त अथवा आकारान्त नामें झालीं आहेत, तींही स्त्रीलिंगी आहेत. जसें,—जिव्हा, जीभ; मुद्रा, मोहोर; माता, माय; दंष्ट्रा, दाढ; यात्रा, जत्रा; इ०.

( ५ ) ईकारान्त किंवा ऊकारान्त संस्कृत एकाक्षरी शब्द स्त्रीलिंगी असतात. जसें,—श्री, धी, भू, ऱ्ही, इ०.

( ६ ) इकारान्त किंवा ईकारान्त व उकारान्त अगर ऊकारान्त संस्कृत स्त्रीलिंगी नामांपासून मराठींत जीं अकारान्त नामें झालीं आहेत, तीं स्त्रीलिंगी आहेत. जसें,—रीत, गत, कूस, कंड, प्रीत, भिंत, इ०.

( ७ ) 'ति'—प्रत्ययान्त क्रियावाचक धातुसाधित संस्कृत नामें स्त्रीलिंगी असतात. जसें,—कृति, गति, स्थिति, भक्ति, व्यक्ति, प्रीति, सिद्धि, बुद्धि, मति, युति, इ०.

( ८ ) निर्जीव पदार्थवाचक ईकारान्त नामें स्त्रीलिंगी असतात. जसें,—भाकरी, भाजी, पेटी, लोटी, काठी, वाटी, दाटी, सरी, दोरी, छत्री, गोणी, इ०.

**टीप**—मोतीं, मिरीं, कुणीं, पाणीं, लोणीं, चिचवणीं, हे शब्द अपवाद आहेत. हे शब्द नपुंसकलिंगी मानून अंतीं अनुस्वार देतात.

( ९ ) ज्यांच्या शेवटीं 'त्र' आहे असे संस्कृत शब्द सामान्यतः नपुंसकलिंगी असतात. जसें,—वक्त्र, शस्त्र, सूत्र, गोत्र ( कुटुंब ), यंत्र, खनित्र, चित्र, मूत्र, पत्र, अस्त्र, चरित्र, क्षेत्र, कलत्र, नक्षत्र, मित्र, ( स्नेही ), नेत्र, इ.

( १० ) पण पुत्र, मित्र ( सूर्य ), गोत्र ( पर्वत ), पौत्र हे शब्द पुल्लिंगी आहेत; मराठींत नेत्र व मित्र हे शब्द पुल्लिंगी मानिले आहेत.

(११) 'अन' आणि 'त' प्रत्यय लागून बनलेलीं धातुसाधित नामें नपुंसकलिंगी असतात. जसें,—गायन, श्रवण, पूरण, भ्रमण, नयन, स्नान, दान, व्याख्यान, गत (गमन), आचरित, स्खलित, इ०.

(१२) ज्यांच्या शेवटीं 'य' किंवा 'त्य' आहे, अशीं संस्कृत धातुसाधित नामें नपुंसकलिंगी असतात. जसें,—कार्य, कृत्य, पेय, इ०.

(१३) कर्तृत्ववाचक ईकारान्त नामें पुल्लिंगी असतात. जसें,—बिगारी, वाटाडी, कामकरी, भाडेकरी, व्यापारी, शेतकरी, इ०.

(१४) ज्यांच्या शेवटीं 'ए' किंवा 'ऐ' आहे, अशीं नामें स्त्रीलिंगी असतात. जसें,—आते, सवे, विल्हे, सै, तिवै, कटै, इ०.

(१५) ओकारान्त, नामांमध्यें टाहो, डोहो, लाहो, इ० हीं पुल्लिंगी, आणि बायको, बयो, बायो, हीं स्त्रीलिंगी आहेत.

(१६) पण, य, त्व आणि अ हे प्रत्यय लागून झालेलीं भाववाचकनामें नपुंसकलिंगी असतात. जसें—मनुष्यपण, देवपण, क्रौर्य, शौर्य, माधुर्य, धैर्य, धीरत्व, मार्दव, गौरव, लाघव, इ०. 'पणा' प्रत्यय लागून झालेलीं पुल्लिंगी असतात. जसें.—मनुष्यपणा, निर्दयपणा, कोंवळेपणा, इ०. आणि की, ता, गिरी, आई, किंवा ई, हे लागून झालेलीं भाववाचकनामें स्त्रीलिंगी असतात. जसें,—पाटीलकी, महारकी, मधुरता, कोमलता, दृढता, लुच्चेगिरी, जादुगिरी, भलाई, ढिलाई, मोंगलाई, गोडी, माधुरी, इ०.

(१७) 'आट' प्रत्यय लागून जे आधिक्यदर्शक शब्द झालेले आहेत, ते पुल्लिंगी आहेत. हे शब्द द्विरक्त असतात. जसें,—फडफडाट, कडकडाट, चकचकाट, सुळसुळाट, दणदणाट, झिणझिणाट, फुणफुणाट, इ०.

अपवाद—भरभराट हा शब्द स्त्रीलिंगी आहे.

(१८) मूळ धातूची द्विरुक्ति होऊन किंवा विरुद्धार्थी अगर समानार्थी अशा कोणत्याही दोन धातूंचा संयोग होऊन बनलेलीं धातुसाधित नामें, त्याचप्रमाणें घाई, गोंधळ, त्रास, इत्यादींचें आधिक्य दाखविणारीं अनुकरणवाचक नामें हीं स्त्रीलिंगी असतात. यांचा अंत्यवर्ण बहुधा 'अ' असतो, किंवा क्वचित् विकल्पेंकरून 'ई' असतो. जसें,—मारामार,—री; पळापळ,—ळी; धराधर,—री;

ओढाओढ,–ढी; खेंचाखेच,–ची; रेंटारेंट–टी; आटपाआटप, जळाजळ, उठाऊठ, बसाबस, निजानीज, उठाबस, उठाठेव, ओढाताण, फडफड, फुणफूण, मिणमीण, झिरझीर, चिरचीर, सुळसूळ, मुळमूळ, पिरपीर, धाकधूक, लटपट, खटपट, कटकट, चटपट, झटपट, धडपड, जळफळ, गुणगूण, कुणकूण, इ०.

( १९ ) णकारान्त किंवा नकारान्त क्रियावाचक नामें नपुंसकलिंगी असतात. जसें,–दळण, कांडण, पोषण, कंदन, भूषण, रंजन, भंजन, भांडण, नेसण, गमन, इ०.

अपवाद–गाळण, लोळवण, सोडवण, नागवण, बोळवण, वीण, वैरण, इ० हीं नामें स्त्रीलिंगी आहेत. चाळण, चढण व गोठण हींसुद्धां स्त्रीलिंगी आहेत. परंतु त्यांवरून क्रियेचा बोध होत नाहीं. पहिला शब्द क्रियेचें साधन दाखवितो. व शेवटच्या दोन शब्दांवरून क्रियेच्या स्थानांचा बोध होतो.

( २० ) 'णी' किंवा 'णूक' प्रत्यय लागून झालेलीं धातुसाधित नामें स्त्रीलिंगी असतात. जसें,–भाजणी, कापणी, करणी, पेरणी, लावणी, ओढणी, चालणूक, वर्तणूक, अडणूक, नांदणूक, इ०.

( २१ ) आकारान्त धातुसाधित नामें पुल्लिंगी असतात. जसें,–ठेवा, ठचा, वेंचा, सांठा, भरडा, ओयरा, रांधा, हिसका, आंसडा, इ०.

( २२ ) 'णावळ' हा प्रत्यय लागून झालेलीं धातुसाधित नामें स्त्रीलिंगी असतात. त्यांवरून मूळ धातूवरून होणारी क्रिया केल्याबद्दल मोल किंवा मोबदला दाखविला जातो. जसें,—धुणावळ, दळणावळ, करणावळ, शिवणावळ, खाणावळ, लिहिणावळ, छापणावळ. इ०.

( २३ ) धातुवाचक नामें नपुंसकलिंगी असतात. जसें–सोनें, रुपें, कांसें, तांबें, शिसें, जस्त, लोखंड, पितळ, इ०.

**टीप**—पितळ शब्द स्त्रीलिंगीही आहे. पारा पुल्लिंगी.

( २४ ) ज्या शब्दांचा अंत्यस्वर 'ऊं' किंवा 'ईं' असतो, ते नपुंसकलिंगी असतात. 'रूं' प्रत्यय लागून झालेल्या अशाच शब्दांवरून कधीं कधीं तिरस्काराचा बोध होतो. जसें,—रेडकूं, करडूं, पांखरूं, तारूं, आगरूं, वासरूं, शिंगरूं, जिवाणूं, उठाणूं, गळूं, आवाळूं, रांडरूं, गायरूं, म्हसरूं, वाघरूं, कुर्णीमिरीं, इ०.

**टीप**—ज्यांच्या शेवटीं अनुनासिक आहे, अशीं नामें मराठींत बहुधा नपुंसकलिंगी असतात. गहूं शब्द मात्र पुल्लिंगी आहे.

( २५ ) प्रवाही पदार्थांचीं पुढील नांवें नपुंसकालिंगी आहेत. जसें,—तेल, तूप, दूध, ताक, दहीं, उदक, इ०. परंतु मध पुल्लिंगी किंवा स्त्रीलिंगी; दारू, ताडी, माडी, आमटी, खीर, हे शब्द स्त्रीलिंगी; व रस, घोटा हे पुल्लिंगी.

( २६ ) किडे, पक्षी व इतर क्षुद्र प्राणी यांच्यांत स्त्रीपुरुष, नरमादी असा भेद करणें शक्य नसतें; म्हणून तद्वाचक शब्दाचें लिंग रूढीप्रमाणें कोणतें तरी ठराविक असतें. यासंबंधानें कांहीं विशेष नियम घालून देतां येणार नाहींत. रूढीप्रमाणें असले कांहीं शब्द अनेकलिंगीही आहेत. पुल्लिंगी—सर्प, गरुड, ससाणा, पोपट, ससा, उंदीर, बेडूक, ढेकूण, गोचीड, वानर, इ०. स्त्रीलिंगी—घार, मैना, कीड, घूस, पिसू, सुसर, घोरपड, गोचडी, खार, मण्यार, चिमणी, इ०. नपुंसकलिंगी—वाघूळ, चिलट, घुंगरूट, बदक, माकड, गिधाड, घुबड, झुरळ, कांसव, मुंगूस, इ०

**टीप**—कांसव व मुंगूस हे शब्द पुल्लिंगीही मानितात; त्याचप्रमाणें वानर शब्द नपुंसकलिंगीही उपयोगांत आहे.

( २७ ) निर्जीव पदार्थवाचक शब्दांचें लिंग ओळखण्याचे हे सामान्य नियम सांगितले. हे पूर्ण व निर्दोष आहेत असें नाहीं. तसे व्यापक नियम बांधणें कठीण आहे. प्रांतिक मराठींत लिंगासंबंधानें वैचित्र्यही फार आहे. तेव्हां निर्जीवपदार्थवाचक शब्दांच्या लिंगाचा निर्णय स्थानिक रूढीवरून किंवा कोशावरून केला पाहिजे.

६३. कांहीं मनुष्यवाचक शब्दांचीं लिंगें विलक्षण प्रकारें मानिलीं आहेत; कुटुंब व कलत्र या दोन्ही शब्दांचा अर्थ पत्नी असा असून ते नपुंसकलिंगी आहेत. दार ( पत्नी ) हा शब्द पुल्लिंगी असून नेहमीं अनेकवचनी असतो. त्याचा उपयोग नपुंसकलिंगीही करितास. जसें,—

‘ आमंत्रुनि सत्येनें सर्व श्रीकृष्णदार जेवविले ’—पुल्लिंगी.

‘ छळिलें दशाननें परि झालें प्रभुदार काय कातर तें ’—नपुं०.

हा प्रघात संस्कृतांतला आहे.

६४. त्याचप्रमाणें कबिला ( स्त्री ) हा शब्द अर्थानें स्त्रीवाचक आहे; पण वहिवाटींत पुल्लिंगी आहे. लांडोर व बटकूर ( बटीक ) हे शब्द पुल्लिंगी व नपुंसकलिंगी आहेत. रांडरूं ( तिरस्करणीय स्त्री ) नपुंसकलिंगी आहे.

६५. संस्कृतांतला ' वस्तु ' हा शब्द नपुंसकलिंगी आहे, आणि ' शपथ ' व **' स्वप्न '** हे शब्द पुल्लिंगी आहेत. पण मराठींत पहिले दोन स्त्रीलिंगी व तिसरा नपुंसकलिंगी मानितात. तसेंच ' मित्र ' हा शब्द संस्कृतांत नपुंसकलिंगी असून मराठींत पुल्लिंगी आहे. मूल, पोर, वगैरे शब्द तिन्ही लिंगी मानितात.

६६. संस्कृत शब्दांचें मूळचें लिंग मराठी कवितेंत पुष्कळ ठिकाणीं कायम ठेविलेलें असतें. अशी तऱ्हा मोरोपंताच्या कवितेंत फार. त्याचीं कांहीं उदाहरणें:—

' ऐसा **स्वप्न** ( पु० ) विलोकुनि तो श्रीमान् कर्ण जाहला जागा. '
' वीर सरस आंत नीरस मद्भाषण **मित्र** ( नपुं० ) जाण फेंसाचें.'
' संपन्न **मित्र** असतें, तरि येतें संकटांत कामास. '
' **सन्मित्राचि** न व्यसनीं, अन्याखिल-**मित्र** संकटीं पडतें. '
' [ परमात्मा ] **आकाश** जसा [ पु० ] घटांत, तेविं वसे. '
' तों ये तेथ पहावयासि उदरीं ज्याचें तिच्या **जन्म** ( नपुं० ) ती. '
' माझा **शपथ** ( पु० ) तुज असे, जें सत्ये सत्य तेंवि सांग मला. '
' कीं याचकांसि देतां सरले चारीहि मुक्ति-घन-**राशि** ( पु० ) ? '
' हा **विघ्न** योगिहृदया सहसा सावधपणांतही मळवी. '
' ग्रथिली **उपनिषद्** ( स्त्री० ) प्राकृता कशी पशो कवनांत ? '[ दोहारामा० ]
' राज्यच्युतसंगें श्रमपात्र करिशि दिव्य**देह** कां गे हें ? '

## प्रातिपदिकाचें स्त्रीलिंगी रूप करणें.

६७. नामाच्या पुल्लिंगी रूपाला प्रत्यय लावून त्या नामाचें स्त्रीलिंगी रूप करितात.

६८. शब्दांचें रूप तयार करण्याकरितां त्या शब्दाच्यापुढें जें अक्षर किंवा अक्षरें जोडतात, त्यास किंवा त्यांस **प्रत्यय** असें म्हणतात. उदाहरणार्थ,—

'बुरूड' या शब्दाला 'ईण' हीं अक्षरें जोडून 'बुरडीण' असें रूप तयार होतें. म्हणून 'ईण,' हा प्रत्यय झाला.

६९. शब्दांला प्रत्यय लागतांना मराठींत संधीचें वगैरे जे विकार होतात, त्यासंबंधाचे सामान्य नियम पुढें दिले आहेत. हे नियम प्रत्यय लागतांना सर्वत्र लागू होणारे आहेत.

( १ ) स्वरादि प्रत्यय जेव्हां शब्दाला लावावयाचा असतो, तेव्हां पररूप-संधि होतो. जसें,–परभू + ईण = परभीण, घर + ई = घरीं, इ०.

( २ ) शब्द जर एकाक्षरी असला, तर प्रत्यय लागतांना कांहीं विकार होत नाहीं. जसें.—घे-ऊन, जा-ईन, इ०.

( ३ ) व्यंजनादि प्रत्यय लागतांनाही कांहीं विकार होत नाहीं. जसें,—मार+ला = मारला, द्वाड + पणा = द्वाडपणा, इ०.

( ४ ) आकारान्त नामांचा उपान्त्य वर्ण जर 'ई' किंवा 'ऊ' असेल, तर त्याला प्रत्यय लागतांना तो ऱ्हस्व होतो, किंवा त्याच्या जागीं 'अ' येतो. जसें,—बुरूड+ईण=बुरुडिण किंवा बुरडीण; उंदीर+स=उंदिरास किंवा उंदरास; 'स' विभक्तिप्रत्यय असल्यामुळें त्याच्यापूर्वी उंदिरा किंवा उंदरा असें सामान्य-रूप झालें.

( ५ ) 'ई' किंवा 'ऊ' यांच्या जागीं विकल्पेंकरून 'आ' येतो, म्हणून वर सांगितलें; पण कधीं कधीं 'अ' न येतां ईच्या जागीं 'य' व ऊच्या जागीं 'व' येतो. जसें,—ताईत, ताइतास, तायतास; देऊळ, देउळास, देवळास; इ०.

**टीप**—शब्दाच्या उपान्त्य वर्णाला जे विकार होतात त्यांचें पूर्ण विवेचन पुढें स्वतंत्र प्रकरणांत केलें आहे.

७०. 'आ' आणि 'ई' हे संस्कृतांत स्त्रीलिंगाचे प्रत्यय आहेत. मराठींत प्रचलित असलेल्या संस्कृत शब्दांचीं स्त्रीलिंगी रूपें संस्कृताप्रमाणेंच होतात. संस्कृत पुल्लिंगी नामांचीं स्त्रीलिंगी रूपें करण्यासंबंधानें सामान्य नियम असे आहेत:—

( १ ) अकारान्त पुल्लिंगी नामाचें स्त्रीलिंगी रूप 'आ' प्रत्यय लागून होतें. जसें,—अज, अजा; कोकिल, कोकिला; कृष्ण, कृष्णा; इ०.

( २ ) कांहीं अकारान्त नामांना ' ई ' प्रत्यय लागतो. जसें,—नद–नदी, तरुण–तरुणी, गौर–गौरी, पंचम–पंचमी, पुत्र–पुत्री, इ०.

( ३ ) ज्या नामांवरून मनुष्येतर प्राण्यांच्या जातीचा बोध होतो किंवा ज्यांवरून मनुष्यप्राण्यांच्या जातीचा, वर्णाचा, किंवा कुलाचा बोध होतो, त्यांचें स्त्रीलिंगी रूप ' ई ' लागून होतें. जसें,–व्याघ्र–व्याघ्री, ब्राह्मण–ब्राह्मणी, गौतम–गौतमी, इत्यादि. पण अशा नामांचा अन्त्य स्वर ' अ ' असून त्याच्या मागें ' य् ' असला तर त्यांचें स्त्रीलिंगी रूप ' आ ' लागून होतें; जसें,–क्षत्रिय-क्षत्रिया; इ०.

( ४ ) इकारान्त नामांचें व विशेषणाचें स्त्रीलिंगी रूप शब्दाच्या मूळ रूपा-सारखेंच असतें. जसें,–सुरभि–सुरभि; इ०.

( ५ ) उकारान्त पुल्लिंगी नामांचें व विशेषणाचें स्त्रीलिंगी रूप दोन प्रकारचें होतें. एक शब्दाच्या मूळ रूपासारखेंच; दुसरें, ' ई ' लागून. जसें, बहु—बहु किंवा बव्ही; साधु–साधु किंवा साध्वी.

( ६ ) ऋकारान्त नामाचें व विशेषणाचें, त्याचप्रमाणें व्यंजनान्त नामाचें स्त्रीलिंगी रूप ' ई ' लागून होतें. जसें–कर्तृ–कर्त्री, विद्वस्–विदुषी, इ०.

**टीप**—दुसरे पुष्कळ बारीकसारीक नियम आहेत; तसेच अपवादही पुष्कळ आहेत; पण ते सर्व येथें नमूद करण्याची जरूर दिसत नाहीं.

७१. मराठींत स्त्रीलिंगी प्रत्यय म्हटले म्हणजे ' ई ' व ' ईण ' हे आहेत. 'ई' हा संस्कृतांतीलच प्रत्यय आहे. संस्कृतांत शेवटीं ' इन् ' आहे अशा शब्दांच्या स्त्रीलिंगी रूपांतील शेवटल्या इनी ( इन् + ई ) या अक्षरावरून मराठींत '**ईण**' हा प्रत्यय झाला आहे. ' इन् ' यांतील मागील ' इ ' स्वरित असल्यामुळें म्हणजे शब्दाचा उच्चार करितांना ' ई ' वर आघात होत असल्यामुळें, तो स्वर दीर्घ झाला व शेवटल्या ' ई 'चा लोप झाला.

७२. मनुष्याशिवाय इतर प्राण्यांचे वाचक बरेच शब्द व नात्याचे वाचक शब्द यांचें आणि ज्यांना लिंगाकार होतो, अशा विशेषणांचें स्त्रीलिंगी रूप ' ई ' हा प्रत्यय लागून होतें. जसें–नामें:—

| पु० | स्त्री० | पु० | स्त्री० |
|---|---|---|---|
| घोडा | घोडी | मुलगा | मुलगी |
| कुत्रा | कुत्री | पोरगा | पोरगी |
| कोल्हा | कोल्ही | चुलता | चुलती |
| बकरा | बकरी | काका | काकी |
| गाढव | गाढवी | मामा | मामी |
| हरिण | हरिणी, हरणी | भाचा | भाची |
| वानर | वानरी | पुतण्या | पुतणी |
| कोंबडा | कोंबडी | पणजा | पणजी |
| चिमणा | चिमणी | मेव्हणा | मेव्हणी |
| कावळा | कावळी | आजा | आजी |

विशेषणें:—

| पु० | स्त्री० | पु० | स्त्री० |
|---|---|---|---|
| काळा | काळी | बरा | बरी |
| पांढरा | पांढरी | आंधळा | आंधळी |
| गोरा | गोरी | शाहाणा | शाहाणी |

**टीप** १—कांहीं प्राणिवाचक नामांचें स्त्रीलिंग 'ईण' प्रत्यय लागून होतें; कांहींना दोन्ही प्रत्यय लागतात. जसें,—वाघ—वाघीण; सिंह—सिंहीण; हत्ती—हत्तीण; उंट—उंटीण (किंवा सांड); वानर—वानरीण—वानरी; उंदीर—उंदरीण—उंदरी; डुकर—डुकरीण—डुकरी; इ०.

**टीप** २—कित्येक नात्याच्या वाचक शब्दांचें स्त्रीलिंग निराळ्या शब्दांनीं दाखविलें जातें. अशांचीं उदाहरणें पुढें दिलीं आहेत.

**टीप** ३—साधारणपणें भाषेंत पुल्लिंगी शब्दांवरून स्त्रीलिंगी शब्द बनलेले पुष्कळ असतात; पण कांहीं पुल्लिंगी शब्द मूळ स्त्रीलिंगी शब्दांवरूनही प्रचारांत येतात. जसें,—मावशी—मावसा; इ०.

**टीप** ४—कांहीं शब्दांच्या स्त्रीलिंगी रूपांवरून नुसत्या लघुत्वाचा बोध होतो. तेव्हां तीं पुल्लिंगी शब्दांचीं स्त्रीलिंगी रूपें आहेत असें समजूं नये. ते केवळ जातिवाचक शब्द असतात. जसें,—गोचीड (मोठा), गोचीड (लहान);

बेडूक ( मोठा ), बेडकी ( लहान ); इ०. जसा घूस हा शब्द व्यवहारांत फक्त स्त्रीलिंगीच आपण वापरतों, तसेंच गोचीड, बेडूक, वगैरे बरेच शब्द भाषेंत एकलिंगीच आहेत. ( कलम ६२, पोटकलम २६ पहा. )

७३. मनुष्यांतील जातिवाचक नामें, धंद्यावरून वगैरे पडलेलीं नामें व आडनांवें, यांचें स्त्रीलिंग ' इण ' लागून होतें. जसें,—

| पु० | स्त्री० | पु० | स्त्री० |
|---|---|---|---|
| अतीत | अतितीण | शाहीर | शाहिरीण, शाहरीण |
| वकील | वकिलीण | शाईर | शाइरीण, शायरीण |
| मास्तर | मास्तरीण | गवळी | गवळीण (व्यवहारांत गवळण ) |
| फकीर | फकिरीण | | |
| पंतोजी | पंतोजीण | गाडगीळ | गाडगिळीण |
| सुतार | सुतारीण | जोशी | जोशीण |
| रजपूत | रजपुतीण | देशपांडे | देशपांडीण |
| भट | भटीण | शेट्या | शेटीण |
| अहीर | अहिरिण, अहिरीण | गोसावी | गोसावीण: |
| माहुत | माहुतीण | मामलेदार | मामलेदारीण |

**टीप**–कोणताहि स्वरादि प्रत्यय शब्दास लावावयाचा म्हणजे त्या शब्दाच्या अन्त्य स्वराचा लोप करून मग प्रत्ययाचा स्वर त्या शब्दांतील शेवटच्या व्यंजनांत मिळवावयाचा किंवा शब्दाच्या अन्त्यस्वराच्या जागीं ' आ, ' ' ई ' किंवा दुसऱ्या स्वरादि प्रत्ययाचा प्रथम वर्ण घालावयाचा, अशी मराठीची रीत आहे. म्हणजे असे प्रत्यय लागतांना पररूप संधि होतो.

७४. मराठींत ज्या विशेषणांचीं रूपें लिंगाप्रमाणें फिरतात, किंवा ज्यांना लिंगविकार होतो, त्यांचें पुल्लिंग, ' आ ' लागून, स्त्रीलिंग ' ई ' लागून, व नपुंसकलिंग ' ऍं ' लागून होतें. त्याचप्रमाणें प्राणिवाचक नामांचीं तिन्ही लिंगांचीं रूपें अनुक्रमें ' आ, ' ' ई, ' ' ऍं ' लागून होतात. जसें,—

| पु० | स्त्री० | न० |
|---|---|---|
| पांढरा | पांढरी | पांढरें |
| काळा | काळी | काळें |

| | | |
|---|---|---|
| शाहाणा | शाहाणी | शाहाणें |
| वांकडा | वांकडी | वांकडें |
| घोडा | घोडी | घोडें |
| कोल्हा | कोल्ही | कोल्हें |
| बकरा | बकरी | बकरें |
| मुलगा | मुलगी | मुलगें |
| पोरगा | पोरगी | पोरगें इ०. |

७५ वरील रूपांवरून ही गोष्ट सहज लक्षांत येईल कीं, पांढरा, काळा, शहाणा, वांकडा, घोडा, कुतरा, वगैरे शब्द मूळचे आकारान्त नसून ते अकारान्त म्हणजे पांढर, काळ, शाहाण, वांकड, घोड, कुतर, असे आहेत. आकारांन्त रूपें हीं त्यांचीं पुल्लिंगरूपें आहेत. त्यांचीं पुल्लिंगाचीं जीं आकारान्त रूपें तींच मूळचीं रूपें असें मानण्याची वहिवाट आहे; पण ती शास्त्रीयदृष्ट्या चुकीची आहे. त्यांचीं मूळचीं अकारान्त रूपें समासांत दृष्टीस पडतात. जसें,—पांढरपेशे, घोडमुख्या, काळमांजर, वांकडमान्या, बकरखाद, कुतरओढ, इ०.

**टीप**—संस्कृतांतील 'क' या स्वार्थी प्रत्ययापासून मराठींतील पुल्लिंगाचा 'आ' प्रत्यय निघाला आहे. याविषयीं मराठी शब्दसिद्धींत चर्चा आहे. [प्र० २, क० २४ ते २९]

७६. कांहीं नामांचीं स्त्रीलिंगी रूपें पुल्लिंगी रूपांवरून सिद्ध होत नाहींत; तीं स्वतंत्र शब्दच असतात. जसें,—

| पु० | स्त्री० | पु० | स्त्री० |
|---|---|---|---|
| पुरुष | स्त्री, बायको | खोंड | कालवड |
| नवरा | बायको | बैल | गाय |
| दीर | जाऊ | एडका | मेंढी |
| भाऊ | बहीण, भावजय | बोकड | शेळी, शेरडी |
| बाप | आई | काळवीट | हरिणी |
| साहेब | मडम, (साहेबा, जुनें.) | वडील | मातोश्री |
| मोर | लांडोर | नर | मादी |
| पाडा | पाडी, पारडी | बोका | भाटी, मांजरी |
| गोऱ्हा | गोजी | वाघ्या | मुरळी |

| | | | |
|---|---|---|---|
| राजा | राणी | उंट | सांड ( उंटीण ) |
| सर्प | नागीण | रेडा | म्हैस |
| ब्राह्मण | सवाशीण, सवाष्ण | सासरा | सासू |
| पिता | माता | विधुर | विधवा |

७७. प्राणिवाचक नामाचें एकवचन किंवा अनेकवचन घालून सामान्यतः त्या प्राण्यांच्या सर्व जातीचा समुच्चयेंकरून बोध करितात. हे जातिवाचक शब्द ज्या लिंगाचे असतील, त्या लिंगाचें एकवचन किंवा अनेकवचन योजावयाचें. जातिवाचक शब्द पुल्लिंगी असून त्याचें नपुंसकलिंगी रूप होत असल्यास सर्व जातीचा बोध होण्याकरितां पुल्लिंगी किंवा नपुंसकलिंगी रूप योजितात. जसें,– कुत्रा प्रामाणिक असतो, कुत्रे प्रामाणिक असतात; कुत्रें प्रामाणिक असतें, कुत्रीं प्रामाणिक असतात; घोडा उमदा असतो, घोडें उमदें असतें; घूस खादाड असते, घुशी खादाड असतात; वाघ क्रूर असतो, वाघ क्रूर असतात; माकड लबाड असतें, माकडें लबाड असतात; इ०.

---

# प्रकरण ९.



## विभक्तिविचार.

### ( १ ) सामान्यविवेचन.

७८. वाक्यांत प्रातिपादिकाचा क्रियापदाशीं किंवा इतर कोणत्या तरी शब्दाशीं संबंध दाखविण्याकरितां त्याचें जें रूप तयार करितात, त्यास **विभक्ति** असें म्हणतात; व या विभक्तिसंबंधास **कारक** असें म्हणतात. उदा०—‘ सूर्य उगवला. ’ ‘ तो हरीस बोलावितो. ’ ‘ रामा मुंबईहून आला. ’ ‘ चाकरास पगार दे. ’ या वाक्यांत निरनिराळ्या नामांचा त्या त्या क्रियापदाशीं जो संबंध आहे त्याला **कारक** असें म्हणावें; व तो संबंध दाखविण्यासाठीं ‘ सूर्य, ’‘ हरीस, ’ ‘ मुंबईहून, ’ ‘ चाकरास ’ इत्यादि जीं रूपें झालीं, त्यांस **विभक्ति** किंवा **विभक्तिरूपें** असें म्हणावें.

७९. प्रातिपदिकांचा विभक्तिसंबंध जसा क्रियापदाशीं असतो, तसाच तो दुसऱ्या एखाद्या शब्दाशींही असतो. उदा०,—'तो **मनानें** मोकळा आहे.' 'साखर **चवीला** गोड असते,' या वाक्यांत 'मनानें,' व 'चवीला' हीं रूपें विभक्तिच होत; पण त्यांचा संबंध क्रियपदाशीं नसून 'मोकळा' व 'गोड' या-विशेषणांशीं आहे.

८०. विभक्ति हा शब्द 'भंज्' धातूस 'वि' हा उपसर्ग लागून झाला आहे या धातूचा अर्थ 'वेगळें करणें' असा आहे. तेव्हां **विभक्ति** या शब्दाचा मूळचा अर्थ, 'दुसऱ्या कोणत्याही रूपापासून भिन्न करितां येईल, असें व्याकरणांतलें कोणतेंही रूप,' असा आहे. म्हणून प्रातिपदिकें, धातु व अव्ययें यांच्या भिन्न भिन्न रूपांस **विभक्ति** ही संज्ञा देतां येईल. परंतु व्याकरण-शास्त्रांत प्रातिपदिकांचे रूपांस मात्र **विभक्ति** असें नांव देण्याची चाल पडली आहे. आपण सोईकरितां प्रातिपदिकांच्या रूपांस **नामांच्या विभक्ति** किंवा फक्त **विभक्ति** व क्रियापदांच्या रूपांस **आख्यात-विभक्ति** असें म्हणूं.

८१. विभक्तीचें रूप म्हटलें, म्हणजे तें पूर्ण असलें पाहिजे. त्यास मग आणखी प्रत्ययादि लागून त्यापासून दुसरीं रूपें होतां कामा नयेत. उदा०,— रामास, हरीनें, मुंबईहून, हीं विभक्तीचीं रूपें आहेत. तीं पूर्ण आहेत; कारण त्यांवरून दुसरीं रूपें साधितां येणार नाहींत; म्हणजे त्यांस आणखी कांहीं विकार होत नाहीं. पण **रामाचा** ही विभक्ति नव्हे; कारण या रूपाला पुढें आणखी विकार होतात. त्याचीं **रामाच्यानें, रामाच्या**, इत्यादि रूपें होत असल्या-मुळें त्या रूपांचे ठिकाणीं पूर्णत्व नाहीं.

**टीप**—क्वचित् आणखी कांहीं रूपांना एकदां विभक्ति प्रत्यय लागून पुन्हां आणखी प्रत्यय लागतात. त्यांचे विवरण पुढें योग्य स्थळीं केलें आहे.

८२. (अ) प्रादिपदिकाच्या* मूळच्या रूपाला विकार होऊन व प्रत्यय

---

* या विवरणांत 'प्रातिपदिक' आणि 'नाम' या शब्दांचा एकाच अर्थानें उपयोग केला आहे, असें समजावें. कारण येथें सांगितलेल्या बऱ्याच गोष्टी नाम, सर्वनाम, आणि विशेषण, या तिहींसही लागू पडणाऱ्या आहेत. फरक असलेला ठिकठिकाणीं सांगण्यांत येईलच.

लागून विभक्तींची रूपें होतात, असा साधारण नियम आहे. क्वचित् विकार होत नाहीं, अथवा प्रत्ययही लागत नाहीं. त्याचें विवरण पुढें होईल.

[ आ ] विभक्तिप्रत्यय लावण्यापूर्वी बहुधा नामाच्या मूळच्या रूपांत बदल होतो. असा नामाच्या मूळ रूपांत बदल होऊन जें सर्व विभक्तींस सामान्य, म्हणजे एकच असणारें, असें रूप बनतें, त्यास **सामान्यरूप** असें म्हणतात.

**टीप**—विभक्तिरूपें प्रत्यय लागून आणि त्याचप्रमाणें कित्येक अव्ययें लागून होतात. याविषयीं विवरण पुढें होईल. येथें विभक्तिरूपाचा संबंध आला असतां प्रत्यय व अव्यय, दोन्ही लक्षांत घ्यावीं.

[ इ ] विभक्तिप्रत्यय लागण्यापूर्वी प्रातिपदिकास जो विकार होतो, त्यास **विभक्तिकार्य** असें म्हणावें; आणि असा विकार होऊन बनलेलें जें रूप त्यास **सामान्यरूप** असें म्हणावें. उदा०—घोड्या-स, कोशिंबिरी-मध्यें, कउलां-वर, गव्हा-शीं, क्षुधे-मुळें, इत्यादि शब्दांत घोड्या-, कोशिंबिरी-, कउलां-, गव्हां-, आणि क्षुधे- हीं **सामान्यरूपें** आहेत.

( ई ) नामांचीं विभक्तिरूपें पाहिलीं, तर असें लक्षांत येईल कीं, प्रत्यय लागण्यापूर्वी कांहीं नामांच्या मूळच्या रूपांत बदल झालेला नसतो. जसें,—बाबा, बाबास ( च० ए०; ) बाबांस ( च० अने० ) येथें एकवचनी रूपापेक्षां अनेकवचनी रूपांत अनुस्वार मात्र ज्यास्ती आला आहे. कांहीं नामें अनेकवचनांत मात्र बदलतात. जसें,—नदी, नदीस, नद्यांस. कांहीं दोन्ही वचनीं बदलतात. असें,—वीट, विटेस, विटांस. कांहीं नामांत विकल्पेंकरून बदल होतो. जसें,—सासू, सासूस, सास्वेस; सासूंस, सास्वांस. कांहींचीं अनेक रूपें होतात. जसें,—सुकाणूं—सुकाणूस, सुकाणास, सुकाण्वास, सुकाणवास; पिसू—पिसूस, पिसेस, पिस्वेस, पिसूंस, पिस्वांस, पिसवांस, इ०.

( उ ) हा बदल शब्दाच्या अन्त्याक्षरांत किंवा उपान्त्याक्षरांत किंवा दोन्ही ठिकाणीं होतो. जसें,—घोडा, घोड्यांस; विहीर, विहिरींत; वीट, विटेस; इ०

अन्त्य स्वर जो असेल त्याप्रमाणें नामांचीं निरनिराळीं रूपें होतात. जसें,— विहीर, विहिरीस; टीका, टिकेस; गादी, गाद्यांस; सासू, सासूनें सास्वेनें; इ०.

---

## ( २ ) सामान्यरूपविचार.

८३. आतां हें सामान्यरूप कां करावें लागतें तें पाहूं. कोणतेंही विभक्तिरूप सिद्ध झालें, म्हणजे तें कोणतें रूप आहे, आणि त्यास प्रत्यय किंवा शब्दयोगी कोणतें लागलें आहे, हें बोलणारास स्पष्ट उच्चारण्याची आणि ऐकणारास नीट ऐकूं येण्याची जरूरी असते. शब्दांचा उच्चार स्पष्ट व्हावा, म्हणून भाषेंमध्यें स्वराघात म्हणून असतात. म्हणजे शब्दामधील विवक्षित अक्षराचा उच्चार आपण जास्त जोरानें करितों. मराठी शब्दांमध्यें हा स्वराघात साधारणतः उपान्त्य अक्षरावर असतो. आणि पुष्कळ नामांमध्यें या उपान्त्याचा स्वर नेहमीं दीर्घ असतो. प्रत्यय लागला म्हणजे तो प्रत्यय नीटपणें उच्चारतां यावा, म्हणून बोलणारा मूळ शब्दाच्या अन्त्याक्षराचा उच्चार जोरानें करितो. यामुळें अन्त्याक्षर ऱ्हस्व असल्यास तें दीर्घ करावें लागतें. तें मूळचेंच दीर्घ असल्यास पुष्कळदां त्यावर आणखी जोर येईल, असें करावें लागतें. असें करितांना उपान्त्याक्षर मूळचें स्वरित अतएव दीर्घ असेल, तर तें अर्थात् अस्वरित होऊन ऱ्हस्व होतें. हें कसें तें पुढील उदाहरणांत पहाः—

| नाम | सामान्यरूप* | नाम | सामान्यरूप | |
|---|---|---|---|---|
| हात | हाता- | वीज | विजे- | |
| घोडा | घोड्या- | सासू | सास्वे- | |
| भिंत | भिंती- | जीभ | जीभे- | |
| विद्यार्थी | विद्यार्थ्या- | स्त्री | स्त्रिये- | इत्यादि. |

**टीप**—शब्दांतील स्वराघात, आणि अन्त्य व उपान्त्य यांत होणारे फेरफार यासंबंधानें पुढील प्रकरणांत विस्तृत विचार केला आहे.

८४. यावरून सामान्यरूप कां करावें लागतें, हें कळेलच. मुख्य गोष्ट उच्चार स्पष्ट व्हावा व ऐकूं यावा, हा आहेच. परंतु पुष्कळ वेळां कित्येक शब्दांच्या अन्तीं सामान्यरूपासारखें कांहीं न करितां प्रत्ययादि लाविले, तर

---

*येथें एकवचनी सामान्यरूपाचाच उल्लेख केला आहे हें लक्षांत ठेवावें.

उच्चार करितांही येणार नाहीं. उदाहरणार्थ,—राम+स, जीभ+ला, वीज+तें, विद्यार्थी+आंत या शब्दांचे तसेच्या तसेच जोडशब्द करावयाचें मनांत आणलें तर ते उच्चारतांहि येणार नाहींत. उच्चार स्पष्ट न होणें व उच्चार करितां न येणें या गोष्टी जवळ जवळ एकच आहेत. बोलणारा हा, शब्द बोलतांना, उच्चारसौकर्य शोधीत असतो. कठीण उच्चार असल्यास, ते त्यास आवडत नाहींत. नाइलाजास्तव आपण कठीण उच्चार करितों; परंतु सवड सांपडतांच उच्चाराला सोपेपणा आणण्याचा प्रयत्न करितों. या प्रयत्नाच्या योगानें हें सामान्यरूप उत्पन्न होऊन उपयोगांत आलें.

८५. आतां हें सामान्यरूप मूळचें काय आहे, हें पाहूं. विभक्तींचीं रूपें करितांना आपण जे प्रत्यय म्हणून लावितों, ते प्रथमारंभीं स्वतंत्र शब्द होते. पण त्यांमध्यें फेरफार व संक्षेप होऊन व त्यांचें स्वातंत्र्य जाऊन ते आतां शब्दखंड म्हणून राहिले आहेत. तसेंच विभक्तिरूपें करण्यासाठीं लावावयाचीं अव्ययें हे मूळचे स्वतंत्र शब्दच आहेत. यांतल्या कित्येकांचाहि आतां शब्दपणा जाऊन ते प्रत्यय झाल्यासारखेच आहेत. [ उदाहरणार्थ,—स्तव, पाशीं, पेक्षां, कडून, करवीं, साठीं, पासाव, इत्यादि. ] हे प्रत्यय आणि शब्दयोगी अव्ययें नामादिकांस जोडतांना मूळचें नाम आणि हे प्रत्यय किंवा शब्दयोगी हीं नीट जुळवून घेऊन त्यांचा एकजीव करावयाचा असतो. हा सांधा पक्का जुळविण्यासाठीं सामान्यरूपाची जरूर लागते.

८६. सर्व शब्दयोगी अव्ययांच्या मागें सामान्यरूप होतेंच. प्रत्ययांपैकीं जे व्यंजनानें आरंभ होणारे आहेत, त्यांच्या अगोदर सामान्यरूप करावें लागतें. स्वरादि प्रत्ययांच्या अगोदर तें करावें लागत नाहीं. याचें कारण असें दिसतें कीं, हे स्वरादि प्रत्यय आणि तें लागून होणारीं रूपें हीं फार जुनीं, संस्कृतातून आलेलीं आहेत. तीं फारा दिवसांपासून जशीं उपयोगांत आहेत तशीं आहेत. त्यांत फेरफार झाला असला, तरी थोडा झाला आहे. परंतु व्यंजनादि प्रत्यय हे नवीन उत्पन्न झालेले आहेत. शब्दयोगी अव्ययें हे तर स्वतंत्र शब्द आहेत. त्यांची जुळणी करण्यासाठीं सामान्यरूपाची जरूर पडते. सर्व प्रत्यय पाहिले असतां लक्षांत येईल कीं, स्वरादि प्रत्यय फार थोडे आहेत. त्यांतले कांहीं तर केवळ जुन्या भाषेंत व कवितेंत मात्र येतात. कांहीं कित्येक नियमित

नामांस मात्र लागतात, व ते भाषेंतून जात चालले आहेत. [ जसें,—सप्तमीचा ' ई ' उदा०हातीं, पायीं, इत्यादि ]. तेव्हां व्यंजनादि प्रत्ययांच्या आणि शब्द-योगी अव्ययांच्या पूर्वी ही सामान्यरूपाची भानगड करावयाची असते.

८७. सामान्यरूपाचे अन्त्य एकवचनीं आ, ई, ऊ, ए, आणि ओ असे पांच प्रकारचे असतात. अनेकवचनीं याच अन्त्यावर अनुस्वार येतो, अथवा त्यांत क्वचित् थोडा फेरफार होऊन मग अनुस्वार येतो. एकंदर नामांच्या अनेकवचनी सामान्यरूपाच्या अन्तीं अनुस्वार येणें ही गोष्ट मात्र अगदीं ठरलेली आहे.

८८. हे अन्त्याचे फेरकार मूळ नामाच्या अन्त्य स्वराच्या धोरणानें होतात. त्यांचें मूळ शोधून काढण्यास भाषेच्या इतिहासाकडे लक्ष पोंचविलें पाहिजे. एखाद्या जुन्या गोष्टीचा शोध करावयाचा असतां सांप्रत तशा प्रकारची गोष्ट करावयाची असल्यास आपण काय करितों, हें प्रथमतः पाहिलें असतां तर्क सुचतो. सामान्यरूप करावयाचें तें मूळचा शब्द आणि प्रत्यय किंवा शब्दयोगी हीं एके जागीं जुळविण्यासाठीं करावयाचें. तर आपण असें पाहूं कीं, सध्यां जर भाषेमध्यें दोन शब्द जोडावयाचे असले, तर आपण काय करितों ? शब्द जोडावयाच्या रिती भाषेमध्यें निरनिराळ्या असतील; पण नेहमींच्या वहिवाटींतली रीत कोणती आहे, हें आपण पाहूं. अशी रीत म्हटली म्हणजे आपण एकाद्या नामाला, ' चा, ची, चें ' हे प्रत्यय लावितों, म्हणजे नामाची* षष्ठी करितों; आणि मग त्याच्यापुढें तो जोडावयाचा शब्द वगैरे ठेवितों. उदाहरणार्थ, रामा आणि त्याचें पुस्तक यांचा संबंध जोडावयाचा असल्यास आपण ' रामाचें पुस्तक ' असें म्हणतों. ' घर ' आणि ' कडे ' हे शब्द जोडावयाचे, तर ' घराच्याकडे ' असें म्हणतों. ' गांव ' आणि ' मध्यें ' हीं जोडावयाचीं असतां ' गांवाच्यामध्यें ' अशी जुळणी करितों. अशा प्रकारें या षष्ठीच्या रूपांना बहुधा हवा तो प्रत्यय किंवा शब्दयोगी जोडून त्यांचा दुसऱ्या शब्दांशीं संबंध जोडून द्यावा, अशी भाषेची रीत आहे. याचीं आणखीं उदाहरणें:—

' रामाच्या-कडून हें काम होणार नाहीं. '

*चा, ची, चें, हे प्रत्यय लागून सिद्ध होणारीं रूपें विशेषणें आहेत, त्यांना विभक्तिरूपें म्हणणें बरोबर नाहीं हें पुढें कळून येईल.

‘ वैद्याच्या-पासून औषध आण. ’

‘ हरीच्या-मध्यें किंवा हरीच्यां-त कांहीं पाणी नाहीं. ’

‘ माझ्या-पेक्षां त्याच्या-जवळ हरीचें चांगलें जुळतें. ’

‘ आमच्या-जवळ किंवा आमच्या-शीं असल्या गमजा चालावयाच्या नाहींत. ’

‘ दगडाच्या-पेक्षां वीट बरीच मऊ असते. ’

‘ घराच्या-पुढें झाड आहे. ’

‘ तिहींच्या-आंत आलास तर माझी भेट होईल. ’ इत्यादि.

८९. यानंतर बोलण्याचें सौकर्य साधण्यासाठीं आपण मधला ‘ चा ’ प्रत्यय किंवा त्याचें रूप काढून टाकून रामा-कडून वैद्या-पासून, घरा-मध्यें, हरीं-त, [ हरी-च्या आंत ], मज-पेक्षां, त्याच्या-जवळ, [ त्याज-जवळ, त्या-जवळ ] त्या-नें [ त्याच्या-नें ], दगडा-पेक्षां अशीं रूपें करितों.

९०. तेव्हां अशा रितीनें षष्ठीच्या रूपांच्या साह्यानें शब्द जोडण्याची पद्धत भाषेंत आज आहे. या पद्धतीचा माग दुसऱ्या भाषेंत आपणांस लागतोसा पाहूं. यासाठीं मुख्यतः असें पाहावयाचें कीं, जुन्या भाषेंत अशा रितीनें षष्ठीचा उपयोग करीत कीं काय ? आणि सांप्रत सामान्यरूपाचे मुख्य अन्त्य जे एक-वचनी ‘ आ ’ आणि अनेकवचनी ‘ आं ’ त्यांचा षष्ठीशीं कांहीं संबंध आहे कीं नाहीं ? प्राकृतभाषेंत ‘ मम ’ या प्रथमपुरुषी सर्वनामाच्या षष्ठीच्या रूपाला सर्व विभक्तींचे प्रत्यय लावून रूपें करीत. जसें,—ममं, द्वितीया; ममाई, तृतीया; ममादो, ममादु, ममाहि, पंचमी; ममम्मी, सप्तमी; तसेंच तुम्म, षष्ठी; तुमं, द्वितीया; तुमे तृतीया; तुमादी, तुमादु, षष्ठी; तुम्मम्मि, सप्तमी; इत्यादि. याचप्रमाणें षष्ठीच्या रूपाला शब्दयोगी जोडल्याचीं उदाहरणेंही प्राकृतांत पुष्कळ आहेत. ‘ केहिं ’ ‘रेसि’ म्हणजे ‘करितां,’ ‘साठीं’ तउं-केहिं=तुझ्यासाठीं; अन्नहरेसि=अन्याकरितां; इत्यादि.

९१. ‘ घर ’ या शब्दाचा ‘ मध्यें ’ याशीं संबंध जोडावयाचा आहे, असें समजा. ‘ मध्यें ’ हें आतां शब्दयोगी झालें आहे. पण तें मूळचें ‘ मध्य ’ याचें सप्तमीचें रूप आहे, आणि त्याचा अर्थ ‘ मध्यस्थानीं ’ असा आहे. तो शब्द ‘ घर ’ याला प्रथमतः ‘ घराच्यामध्यें ’ असा आणि नंतर संक्षेप करून ‘घरा-मध्यें’ असा जोडून दिला. ‘घरामध्यें’ म्हणजे ‘घराचें जें मध्यस्थान तेथें.’

९२. प्रत्यय हे मूळचे शब्दांचा संक्षेप होऊन बनले आहेत. 'ई' ह्या सप्तमीच्या प्रत्ययाचा अर्थ वास्तविक, 'मध्यें,' 'आंत,' असाच असला पाहिजे. हा जोडावयाचा असतां, जसें, 'मम+म्मि=ममम्मि' असें केलें, त्याचप्रमाणें घरा+ई घरीं, म्हणजे 'घराचें जें मध्यस्थान तेथें' असें केलें. 'आ' आणि 'ई' यांचा संधि होतांना 'घराई' असें प्रथमतः होऊन उच्चाराला सोपें असें घरीं हें रूप पररूपसंधीनें झालें.

९३ आतां 'घरा'–हें रूप षष्ठीचें आहे कीं काय हें पाहूं. प्राकृतांत षष्ठीचे एकवचनी प्रत्यय 'स' आणि 'ह' असे आहेत. 'स' चा 'ह' होतो, आणि 'ह' चा 'अ' होतो, या गोष्टी कोणास सांगावयास नकोत. तेव्हां 'ह' चा 'अ' आणि त्याचा दीर्घ स्वार 'आ' हे होणें स्वाभाविकच आहे. अशा प्रकारें षष्ठीच्या एकवचनाच्या अन्ती 'आ' स्वर आला. षष्ठीचे अनेकवचनाचे प्रत्यय 'हं' 'अं' 'णं' ('नाम्'–चा संक्षेप) असे आहेत. त्यांचा 'आं' असा प्रत्यय बनला आहे. याप्रमाणें प्राकृतांतली षष्ठी एकवचनी 'आ' आणि अनेकवचनी 'आं' हे प्रत्यय लागून होत असे. हाच प्रकार जुन्या मराठींत आला. जुन्या काळीं मराठी भाषा जेव्हां प्राकृतामधून 'मराठी' बनत होती, तेव्हां तिचें स्वरूप स्थिर नव्हतें. तिच्यामध्यें फार चलबिचल होती; प्रत्येक विभक्तीचीं रूपें आणि प्रत्यय जेव्हां धडपणें ठरले नव्हते, तेव्हां मराठीमध्यें षष्ठी आकारान्त होती. ज्ञानेश्वरीमध्यें आकारान्त षष्ठीचीं रूपें अनेक आहेत. अशा थोड्या ओंव्या मासल्यासाठीं पुढें देतोंः—

'हें शब्देंवीण संवादिजे। इंद्रियां नेणतां भोगिजे।
**बोला–आदि** झोंबिजे। प्रमेयासि'।
'बोलाच्या आदि' १–५८

'भरूनि **प्रपंच घोंटु**। कीजे देखतांचि देखतया दृष्टु।
आनंदसाम्राज्य-पाट्ट। बांधिजे जीवा'।
'प्रपंचाचा घोटु' १६–५

'तैसेंचि इया शरीरा। कर्म तंव **देह संसारा**।
आणि देह तंव व्यापारा। ना म्हणोंचि नये'॥
'देहाच्या संसारा' १५–१८५

'नाना वाग्देवता मानावी । तें वाचाचि लागे कामवावी ।
कां **वेदां** वेदेंचि बोलावी । प्रतिष्ठा जेवीं' ॥
'वेदांची प्रतिष्ठा वेदेंचि बोलावी.' १८–३६४
'या कारणें गा तुवां इया । सर्व कर्मा **आपुलिया** ।
माझ्या स्वरूपीं धनंजया । संन्यासु कीजे' ॥
'आपुल्या सर्व कर्माचा.' १८–१२६०

९४. अशा रितीनें प्रथमतः षष्ठीचें एकवचनी आकारान्त आणि अनेक-वचनी ओकारान्त रूप जुन्या मराठींत होतें. हें उघड उघड संस्कृतांतल्या मूळच्या षष्ठीचें प्राकृतांत झालेलें रूप होय, हें वर दर्शविलेंच आहे. संस्कृतां-तल्या मूळच्या षष्ठीच्या स्य-प्रत्ययाचा प्राकृतांत 'स्स' झाला. नंतर मूळच्या चतुर्थीचा मुळींच लोप होऊन षष्ठीचा तिच्या जागीं उपयोग होऊं लागला, असें पुढें प्रत्ययप्रकरणीं सांगितलें आहे. तर षष्ठीची एकदां चतुर्थी होऊन तिचेंच आणखी मग सामान्यरूप झालें कीं काय, अशी शंका येईल. तर त्यासंबंधाचा विचार असा आहे की, प्राकृतांत तरी प्रथमतः चतुर्थी झाली नाहीं. तर चतुर्थीचा लोप होऊन तिचें कारक दाखविण्यासाठीं षष्ठीच्या रूपांचा **उपयोग** होऊं लागला. शिवाय संस्कृतांत होणारा षष्ठीचा सार्वत्रिक उपयोग पुढें सांगितलाच आहे. नंतर षष्ठीच्या 'स्य' प्रत्ययावरून प्राकृतांत व मराठींत अनुक्रमें 'स्स' आणि 'स' असे प्रत्यय येऊन, त्यांच्या योगानें चतुर्थीचा अर्थ दाखविणारीं रूपें झालीं. त्यांना 'चतुर्थी विभक्ति' हें नांव शास्त्रकारांनीं पुढें व्याकरण केल्यावर दिलें. याशिवाय षष्ठीच्या मूळस्वभावाप्रमाणें तिचा उप-योग हवा तिथें होतच होता. ही जी सर्वसाधारण सांपडणारी षष्ठी तिचें रूप प्राकृतांत व पुढें अगदीं आरंभींच्या मराठींत आकारान्त असें ठाम बनलें; आणि मागें दाखविल्याप्रमाणें बोलणारांच्या संवईप्रमाणें त्याच्यापुढें जोडावयाचे शब्द (शब्दयोगी) अथवा शब्दखंड (प्रत्यय) येऊं लागले; याला 'सामान्य-रूप' हें नांव देण्याचें काम भाषा बोलणारांचें नव्हे, तर व्याकरणशास्त्रकारांचें आहे. बोलणारे तसा **उपयोग**मात्र करूं लागले.

९५. या कालानंतर हें जें आकारान्त सामान्यरूप त्याला विभक्तीचा प्रत्यय जोडून अथवा शब्दयोगी जोडून इतर विभक्तींचीं रूपें करण्याचा प्रघात हळू हळू पडला. इतकेंच नाहीं, तर हें षष्ठीचें आकारान्त रूप घालून प्रथमे-

शिवाय हवी ती विभक्ति करण्याची चाल पडली. केवळ सामान्यरूप घालून हवी ती विभक्ति जुन्या भाषेंत कवितेंत आणि क्वचित् चालू भाषेंतही येते, हें पुढें कारकप्रकरणीं सांगण्यांत येईलच.

९६. या ठिकाणीं लक्षांत ठेवावें कीं, ही जी षष्ठी इतका वेळ सांगितली, ती 'चा-ची-चें' प्रत्यय लागून होणारी भाषेंतली सांप्रतची षष्ठी नव्हे. ही जुनी संस्कृतांतला 'स्य' व प्राकृतांतला स्स, स, ह, असे प्रत्यय लागून जुन्या मराठींत आलेली षष्ठी जाणावी. पुढें ही षष्ठी आहे याचा विसर पडून, हें एक विभक्ति बनविण्यासाठीं केलेलें रूप, **सामान्यरूप** आहे, अशी समजूत झाली.

९७. हें जुनें षष्ठीचें रूप आकारान्त आहे. सगळ्या नामांचें सामान्यरूप आकारान्त नसतें. असा प्रकार कसा झाला, हें पाहूं.

(अ) सामान्यरूपाचे अन्त्य आ, ई, ऊ, ए, ओ, हे आहेत.

(आ) सामान्यरूप करणें म्हणजे नामाचा अन्त आणि प्रत्ययाचा आरंभ यांच्यामध्यें संधि वगैरे करून एक शब्द बनविणें. हा प्रकार देशभाषा जुन्या आर्यभाषेंतून किंवा संस्कृतांतून तयार होऊन बाहेर पडत असते, तेव्हां फार सुरू असतो. एकादी भाषा पूर्ण तयार झाल्यानंतर तींत असल्या भानगडी फारशा असत नाहींत. हिंदी, गुजराथी, पंजाबी, बंगाली, या जुन्या भाषांत सामान्यरूप अगदीं सोपें आणि सर्वत्र सारखें आहे. मराठी आणि सिंधी या नव्या भाषांत तें गुंतागुंतीचें आहे. ह्या भाषा संस्कृतांतलें संधिप्रकरण अजून विसरल्या नाहींत. वरील नियमाप्रमाणें मराठींत अगदीं अलिकडे घेतलेले जे संस्कृत शब्द त्यांचें सामान्यरूप अगदीं साधें असतें. म्हणजे प्रथमेचें एकवचन तेंच एकवचनी सामान्यरूप मानितात. अनेकवचनी फक्त अनुस्वार ज्यास्त येतो. उदाहरणार्थ,—कवि, कवी, कवीं; साधु, साधू, साधूं; इत्यादि. ओकारान्त सामान्यरूप हें बहुतेक अशांतलेंच आहे.

(इ) मराठींत पुष्कळ नामें आकारान्त आहेत. तेव्हां त्यांचें आकारान्त सामान्यरूप रितीप्रमाणेंच होतें. शिवाय साधारणतः असा नियम आहे कीं, पुष्कळशा शब्दांच्या संबंधानें जी रीत भाषेंत उत्पन्न होते, ती सादृश्यानें बहुतेक शब्दांस लागते. अशा प्रकारें मराठींत बहुतेक नामांचें आकारान्त सामान्यरूप झालें.

( ई ) प्राकृत भाषांत सामान्यरूपाचे फार जुने प्रत्यय ‘ आहि ’ ‘ ईहि ’ ‘ऊहि’ असे होते. वास्तविक ‘हि’ हा एकच प्रत्यय असून, मागें सांगितल्याप्रमाणें तो षष्ठीवरून झाला आहे. आकारान्त नामांना ‘ आहि ’ लागत होता. पुढें त्यांतलें ‘ हि ’ हें अक्षर जाऊन केवळ ‘ आ ’ हा प्रत्यय राहिला. ‘ इहि ’आणि त्याचेंच दुसरें रूप ‘ ऊहि ’ हे प्रत्यय इतर अन्ताच्या नामांस लागत. ‘ ईहि ’ यांतला ‘ ह् ’ गेल्यावर बाकी ‘ ईइ ’ असें राहिलें, या दोन स्वरांचा संधि होऊन ‘ए’ असा प्रत्यय उत्पन्न झाला. प्राकृतामध्यें सरते शेवटीं ‘आ’ आणि ‘ए’ असे सामान्यरूपाचे दोन प्रत्यय असलेले आढळून येतात. संस्कृतांतून नवीन आलेलीं जीं ( ऱ्हस्व ) इकारान्त व उकारान्त ( तत्सम ) नामें, तीं जुन्या काळीं घेत-लेल्या तशा ( तद्भव ) नामांहून भिन्न राखण्यासाठीं त्यांच्या अन्त्य स्वरांची विशेष काळजी घेतली गेली असें दिसतें. कारण अन्य भाषेंतून नवीनच घेत-लेल्या शब्दांचा असा बोज राखण्याची मराठीची नेहमींचीच चाल आहे. पारशी, आरबी, इंग्रजी, वगैरे शब्द भाषेंत नवीनच घेतले असतां, आपण त्यांचें सामान्य रूप न करितां केवळ प्रत्यय त्यांचेपुढें ठेवितों, या कारणानें मराठींत अन्त्य स्वर गाळण्याचा प्रघात असतां, हे अन्त्य स्वर कायम राहिले आहेत. यामुळें ते स्वरित मानले गेले. तसें झालें नसतें, तर यांतले पुष्कळ शब्द भाषेच्या पद्धती-प्रमाणें अकारान्त बनते. बरेच शब्द तसे बनलेही आहेत. जसें,—पद्धत, रीत, जात, प्रत, प्रीत, नीत, उदयभान, इत्यादि. तेव्हां यांचा अन्त्य स्वरित मानला गेला म्हणून तो टिकला असें म्हणणेंच योग्य दिसतें. याप्रमाणें अन्त्य स्वर जोरदार असल्यामुळें तो कायम राहून सामान्यरूपाचा स्वर गेला. जसें,— कवी + ई; मती + ई; भानू + ई; इत्यादि. या नामांचे अन्त्य स्वर स्वरित, अतएव दीर्घ आहेत; ऱ्हस्व केव्हांही नव्हत. प्रथमेच्या एकवचनींही ते दीर्घच होत हें लक्षांत ठेवावें.

( उ ) यावर असा प्रश्न येईल कीं, कवी + ई यांत सवर्ण संधि झाला, असें कां म्हणूं नये ? तर याचें कारण असें कीं, यथें मराठीच्या रितीप्रमाणें सवर्ण संधि झाला नसता. कवी + ई + स= कव्यास झालें असतें. जुन्या शब्दांमध्यें सामान्यरूप असेंच होतें. उदाहरण—माळी + आ + स=माळ्यास इत्यादि. तसेंच भानू + ई येथें पूर्वरूप संधि झालेला दिसून येईलच. तेव्हां अन्तींचा स्वरित अक्षराचा स्वर व पुढील सामान्यरूपाचा स्वर यांचा पूर्वरूप संधिच

व्हावयाचा. अशा प्रकारें झालेल्या जुन्या सामान्यरूपांचीं आणखी उदाहरणें:-- भाऊ + आ = भावा; गहूं + आ, गह्व् + आ = गव्हा; सासू+ए=सास्व्+ए=सास्वे; स्त्री + ए = स्त्रिये; इत्यादि. शास्त्री, विद्यार्थी, आचारी, माधुकरी, हे जुने शब्द असल्यामुळें सामान्यरूपें शास्त्र्यास, विद्यार्थ्यास, आचाऱ्यास, माधुकऱ्यास, अशी होतात. परंतु यति, बंदी, हे संस्कृत आणि मोची, काजी हे परकी शब्द नवीन असल्यामुळें सामान्यरूपें ईकारान्त होतात. कित्येक शब्दांचीं दुहेरीही रूपें होतात.

(ऊ) जीं मूळचीं आकारान्त, ईकारान्त व ऊकारान्त स्त्रीलिंगी नामें भाषेंत जुन्या काळीं येऊन प्रथमैकवचनी आकारान्त झाली आहेत, त्यांतलीं जीं मूळचीं ईकारान्त त्यांचा, सामान्यरूप होतांना ' ई ' स्वर कायम राहातो. परंतु इतरांचें सामान्यरूप एकारान्त होतें, हें पुढें दिसून येईल.

(ए) याशिवाय दोन किंवा अधिक प्रकारचीं सामान्यरूपें होणें, किंवा थोड्याच शब्दांचीं कांहीं निराळ्या तऱ्हेनें रूपें होणें, हे प्रकार भाषेंत अनेक कारणांनीं आले. त्याचा बारीक विचार करीत बसण्याची जरूर नाहीं. एकारान्त षष्ठीचीं रूपें जुन्या भाषेंत होतीं. ज्ञानेश्वरींत अशीं कांहीं रूपें आलेलीं आहेत. उदाहरणें:—

' कां **पृथ्वीये** परमाणूंचा उगाणा घेवावा. '
' पथ्वीयेच्या परमाणूंचा. ' १०–२६०
' जें **सोयरिके** बाधु नेणे । पदार्थीं निषेधु न म्हणे '।
' सोयरिकेचा बाधु. ' १८–५५२
' तैसे पहिले सरते । श्लोक न म्हणावे **गीते** '।
' गीतेचे श्लोक. '

९८. आणखी असा प्रश्न उद्भवेल कीं, सर्व विभक्तींपैकीं षष्ठीच्याच रूपाचा असा उपयोग कां होऊं लागला ? तर याचें कारण असें दिसतें कीं, संस्कृतांत षष्ठीचा उपयोग हव्या त्या विभक्तीच्या अर्थी करण्याची चाल फार जुनी आहे. विद्वानांच्या आणि ग्रंथांच्या भाषेंत म्हणजे व्यवस्थित अशा संस्कृतांत जर अशी रीत जारी सुरू होती, तर ती अनियंत्रित लोकभाषांत फारच असली पाहिजे. यामुळें ती प्राकृत भाषेंत आली आणि मराठीच्या आरंभींच्या कालीं तसा प्रघात पडला.

( अ ) संस्कृत व्याकरणांत तर असा एक साधारण नियम सांगितलेला आहे कीं, अमुक एक कारकसंबंध दाखविण्यासाठीं अमुकच विभक्ति घालावी, अशी जेथें विवक्षा नसेल, तेथें षष्ठी घालावी. या कारणानें प्रथमतः षष्ठीचा उपयोग हव्या त्या विभक्तीबद्दल होऊं लागला. पुढें मराठींत जेव्हां नवीन प्रत्यय लावण्याची चाल पडली, तेव्हां ते या षष्ठीच्या रूपापुढें जोडूं लागले. संस्कृतांत शब्दयोगी अव्ययांच्या अगोदर कोणती तरी ठरींव विभक्ति असण्याची चाल आहे. प्राकृतांत व पुढें मराठींतही शब्दयोगी अव्ययांच्या मागें षष्ठी विभक्तीच घालण्याची चाल पडली. अशा रितीनें मराठींतले नवीन जे व्यंजनादि विभक्तिप्रत्यय त्यांच्या आणि शब्दयोगी अव्ययांच्या मागें जुन्या षष्ठीचें रूप येऊं लागलें; आणि त्यालाच मग **सामान्यरूप** असें नांव पडलें.

टीप—सामान्यरूप कसें झालें, याचें हें अगदीं थोडक्यांत विवरण केलें आहे. जास्त माहिती पाहिजे असल्यास "मराठी भाषेची घटना" या पुस्तकांत पहावी.

**व्यंजनादि विभक्तिप्रत्यय आणि शब्दयोगी अव्ययें हीं लावण्यापूर्वी प्रातिपदिकाचें जें रूप करितात, त्यास सामान्यरूप असें म्हणतात.**

## ( ३ ) सामान्यरूपाचे प्रकार.

९९. विभक्ति आठ आहेतः—प्रथमा, द्वितीया, तृतीया, चतुर्थी, पंचमी, षष्ठी, सप्तमी आणि संबोधन. ह्या विभक्ति, नामाचें सामान्यरूप होण्याची जरूर असल्यास तें होऊन व मग पुढें ठरींव प्रत्यय लागून होतात.

१००. नामांचे अन्त्य स्वरांवरून निरनिराळ्या नामांचीं निरनिराळीं सामान्यरूपें होतात. प्रथमा व अंशतः द्वितीया या विभक्तींच्या एकवचनीं नामाचें भाषेंतलें मूळ रूप कायम असतें. क्वचित् निराळें होतें, तें पुढें प्रथमा विभक्तीचा विचार करितांना सांगितलें आहे. प्रथमा व अंशतः द्वितीया यांचें अनेकवचन व मूळ नामाचें अनेकवचनी रूप हीं एकच आहेत. तेव्हां त्यांचाही विचार वचनविचारांत केला आहे. इतर विभक्तींचे प्रत्यय लावण्यासाठीं जें सामान्यरूप होतें तें करितांना बहुधा अन्त्य स्वर व कधीं कधीं उपान्त्य स्वर ( उपान्त्य अक्षराचा स्वर ) हे बदलतात; म्हणजे अन्त्य स्वरांवरून सामान्यरूपें निरनिराळीं होतात. कोणत्या नामाचें कोणतें सामान्यरूप होतें हें समजण्यास

सोपें जावें म्हणून सगळ्या नामांचे निरनिराळे वर्ग बांधले आहेत. सामान्यरूपाचे अन्त्य स्वर आ, ई, ऊ, ए व ओ असे पांच असतात; व आकारान्त सामान्यरूपाचे सोईकरितां आणखी 'आ' बद्दल 'या' आणि 'वा' असे आदेश होणाऱ्या नामांचे दोन निराळे भेद केले असतां बरें पडतें; अशा रितीनें सामान्यरूपें सात प्रकारचीं होतात. म्हणून सामान्यरूपांवरून नामांचे वर्ग किंवा गण सात मानिले आहेत. ते असेः—

( १ ) पहिला वर्ग—यांत नामांचे सामान्यरूपाचे अन्तीं 'आ' हा स्वर असतो. जसें,–बाप, बापा-चा; यांतील मुख्य शब्द **बाप**, म्हणून यास **बापाचा गण** असें म्हणावें.

( २ ) दुसरा वर्ग—यांत सामान्यरूप आकारान्तच होतें; पण 'आ-'च्या अगोदर संयुक्त व्यंजन असून त्यांत शेवटीं 'य्' असतो; किंवा सामान्यरूपाचे शेवटीं 'या' असतो. जसें,–घोडा, घोड्या; मुख्य नाम **घोडा**, म्हणून यास **घोड्याचा गण** असें म्हणावें.

( ३ ) तिसरा वर्ग—यांतही सामान्यरूप आकारान्तच असतें; पण 'आ'–च्या मागें संयुक्त व्यंजन असून त्यांत शेवटीं 'व्' असतो; किंवा मूळ नामाच्या अन्त्य 'ऊ' च्या जागीं सामान्यरूप होतांना 'वा' होतो. जसें,—**गहूं**, गव्हास, गव्हानें. या वर्गाला **गव्हाचा गण** असें म्हणावें.

( ४ ) चौथा वर्ग—यांत सामान्यरूप ईकारान्त होतें. जसें,—कवि, कवीस. मुख्य नाम **कवि** याला **कवीचा गण** म्हणावें.

( ५ ) पांचवा वर्ग—यांत सामान्यरूप ऊकारान्त होतें. जसें,–साधु, साधूस, मुख्य नाम **साधु**. याला **साधूचा गण** म्हणावें.

( ६ ) सहावा वर्ग—यांत सामान्यरूप एकारान्त होतें. जसें,—माता, मातेस. मुख्य नाम **माता**. याला **मातेचा गण** म्हणावें.

( ७ ) सातवा वर्ग—यांत सामान्यरूप ओकारान्त होतें. जसें,—बायको, बायकोस मुख्य नाम **बायको**. याला **बायकोचा गण** म्हणावें.

**टीप १**—पहिल्या तीन गणांतील नामांचें सामान्यरूप आकारान्तच असल्यामुळें त्या नामांचा एकच गण केला तरी चिंता नाहीं. परंतु एका गणांतील नामाच्या सामान्यरूपाचें अन्त्य अक्षर, दुसऱ्या दोहोंतील नामांचे सामान्य-

रूपांचे अन्त्य अक्षरापेक्षां बरेंच भिन्न असल्यामुळें सोईसाठीं त्यांचे वेगळे वर्ग केले आहे.

**टीप २**—हे गण फक्त एकवचनी सामान्यरूपापुरतेच आहेत; अनेकवचनी सामान्यरूपाचा विचार ' वचन–विचारांत ' केला आहे.

**टीप ३**—विशेषनामें व सामान्यनामें या दोहोंच्या सामान्यरूपांत बराच भेद असतो. म्हणून विशेषनामांच्या सामान्यरूपांचा विचार पुढें केला आहे.

१०१. आतां या सात गणांत येणारीं नामें सांगतोंः—

## पहिला वर्ग–बापाचा गण.

१०२. या गणांतील नामांच्या सामान्यरूपाचे अन्तीं 'आ' हा स्वर असतो, जसें,–बाप, बापानें; खांब, खांबास; दादा, दादाला; चमचा, चमचाला; इ०.

१०३. या गणांत नामें येतात तींः—

(१) सर्व अकरान्त पुल्लिंगी व नपुंसकलिंगी नामें. जसें–बाप, वाघ, खांब, सुतार, पिंपळ, शेण, पाप, धन, इत्यादि. यांच्या अन्त्य ' अ- ' चा ' आ ' होतो.

**टीप १**—भगवान्, विद्वान्, श्रीमान्, बुद्धिमान्, शक्तिमान्, भक्तिमान्, धनवान्, वगैरे संस्कृत व्यंजनान्त शब्द याच गणांत येतात. मराठींत व्यंजनान्त शब्द नाहींत. परंतु हे शब्द मूळ संस्कृताप्रमाणें व्यंजनान्त लिहिण्याची चाल पडली आहे. शुद्ध मराठींत अकारान्त शब्द आणि व्यंजनान्त शब्द यांच्या अन्त्याच्या उच्चारांत बिलकूल फरक पडत नाहीं. लिहिण्यामध्यें मात्र हा कृत्रिम फरक आहे. येथें हे शब्द अकारान्तच समजावे.

(अ) या नामांचें सामान्यरूप कवितेंत कधीं कधीं एकारान्तही होतें. उदा०—

' तेथ **गुणेशीं** उपमा उपडे । **भेदेशीं** वाद बुडे,
**मुळेशीं** अज्ञान खुडे । चोहोंकडेची आनंदू, ' एकनाथ
तनु मन–**धनेशीं** अनन्य । स्वामी तुज आलों शरण. श्रीधर.

**टीप १**—सर्वनामें व विशेषनामें यांचीं सामान्यरूपें विकल्पेंकरून एकारान्त होतात. उदा०–त्यानें, तेणें; यानें, येणें; ज्यानें, जेणें; चांगले किंवा चांगल्या माणसानें इत्यादि. [ यासंबंधानें मागील क० ९७ पहा. ]

**टीप २**—अकारान्त व आकारान्त नामांचें, त्याचप्रमाणें सर्वनामांचें सामान्यरूप भाषेमध्यें एकारान्त होत असावें असें यावरून दिसतें. चित्पावनी भाषेंत अद्याप तें तसेंच होतें. उदा०,—घोडेवर, घोडेचो, त्येचो, तेणन्, इ०. मालवणी व गोमांतकी भाषांत घोड्येक (एकवचन), घोड्यांक (अनेकवचन) साड्येक (एकवचन), साड्यांक (अनेकवचन) अशीं रूपें होतात. जुन्या मराठी शिलालेखांत, तेच्या (त्याच्या,) तेहाचा (त्याचा) अशी रूपें आढळतात.

(अ) अपवाद–अकारान्त एकाक्षरी शब्द व मुळाक्षरांतील अकारान्त अक्षरें यांचें सामान्यरूप अकारान्तच होत. जसें,—'क-ला कान्हा दे.' 'अनें ब-ला पांच रुपये दिले.' त्याला ग.ची पीडा फार आहे.' 'या ढ-ला कांहीं येणार नाहीं.' इ०.

(२) कित्येक आकारान्त पुल्लिंगी नामें; यांचा अन्त्य स्वर *तसाच राहातो. यांत पुढें लिहिलेलीं नामें येतातः—

(अ) आदरार्थी नामें. जसें,–दादा, बाबा, अप्पा, तात्या, अण्णा, आबा, नाना, इ०. त्याचप्रमाणें 'बा' प्रत्यय लागून झालेलीं नामें:—दाजीबा, हरबा, पणजोबा, आजोबा, काकोबा, राघोबा, म्हसोबा, आयतोबा, होयबा, इ०.

(आ) काका व मामा हे नात्याचे वाचक दोन शब्द.

(इ) ज्यांचा उपान्त वर्ण 'च्' किंवा 'ज्' आहे अशीं आकारान्त नामें. जसें,—चमचा, राजा, माचा, भाचा, आजा, कुंचा, इ०.

**टीप**—या नामांचें सामान्यरूप झाल्यावर 'च' व 'ज' यांचा मूळचा दंततालव्य उच्चार जाऊन संस्कृताप्रमाणें तालव्य उच्चार होतो.

---

* अन्त्य स्वर तसाच राहाणें म्हणजे काय, याचें थोडे स्पष्टीकरण येथें केलें पाहिजे. मराठी व्याकरणांत मूळचें नाम म्हणजे प्रातिपदिक आणि प्रथमेचें एकवचन यांतला भेद नीटपणें मानिला जात नाहीं; दोहोंना एकच समजतात. तीं वास्तविक एक नाहींत, त्यांच्यामध्यें पुष्कळदां मोठा भेद असतो, हें योग्य स्थळीं सांगितलेंच आहे. सामान्यरूपीं अन्त्य स्वर तसाच राहातो, याचा अर्थ सामान्यरूप प्रथमेच्या एकवचनाप्रमाणेंच असतें, असें समजावें. [मागील कलम १७ पाहा.]

( ई ) ज्यांचा उपान्त्य ‘ स् ’ आहे अशीं आकारान्त नामें. या ‘ स ’ चा ‘ श ’ होतो. जसें,—ससा–सशास, फांसा–फांशाचा, आरसा–आरशानें, खासा–खाशांची, पैसा–पैशाला, इ०.

**टीप**—( इ ) आणि ( ई ) यांतील नामांच्या रूपांस कोणी यकार जोडून तीं चमच्यास, ’ ‘ राज्यानें, ’ ‘ माश्यास ’ अशीं लिहितात. पण तसें करणें बरोबर नाहीं. तालव्य उच्चारांत यकाराचा भास होतो. पण तो खरा ‘ य ’ चा उच्चार नव्हे; तेव्हां वरील नामें यकार जोडून लिहिणें चूक होय. ‘ राज्यानें हें रूप ‘ राज्य ’ शब्दांचें होईल.

( उ ) पण, पणा आणि त्व हे प्रत्यय लागून झालेलीं भाववावाचक नामें. जसें,–भलेपण–भलेपणास; चांगलेपणा–चांगलेपणास, मित्रत्व-मित्रत्वास, इ०.

( ऊ ) णार आणि णारा हे प्रत्यय ज्यांच्या शेवटीं आहेत अशीं धातुसाधित नामें. जसें,–करणार, करणारा, करणारास, इत्यादि.

**टीप**—क्वचित् ‘ करणाऱ्यास ’ असेंही म्हणतात. हें रूप ‘ करणारा ’ याचें समजावें; आणि ‘ करणार ’ याचें ‘करणारास ’ असें रूप करावें.

( ए ) ज्यांचें शेवटचें अक्षर जोडाक्षर असून अन्तीं ‘ या ’आहे अशीं नामें. जसें,—वाटाड्या, नांगऱ्या, जोत्या, म्होरक्या, म्हश्या, तान्या, इ०.

( ३ ) कित्येक ऊकारान्त पुल्लिंगी नामें व ऊकारान्त नपुंसकलिंगी नामें; यांचें सामान्यरूप याच रितीनें होतें. तीं नामें येणेंप्रमाणेः—

( अ ) ऊकारान्त पुल्लिंगी;—तट्टू, भट्टू, परभू, वाटसरू, इ०. यांचीं रूपें विकल्पेंकरून पांचव्या गणाप्रमाणें ( साधु शब्दाप्रमाणें ) होतात.

( आ ) ऊंकारान्त नपुंसकलिंगीः—करडूं, गुरूं, घुंगरूं, निंबूं, परसूं, मांजरूं, मेंढरूं, म्हसरूं, वाघरूं, रांडरूं, लेंकरूं, वांसरूं, शिंगरूं, शेरडूं, रेडकूं. इ.

( इ ) पाचेरूं, फालेटूं, सुकाणूं या नपुंसकलिंगी नामांचें सामान्यरूप विकल्पेंकरून आकारान्त होतें. यांचीं दुसरीं रूपें साधूच्या गणाप्रमाणें होतात.

**टीप**—सुकाणूं याचें रूप तिसऱ्या गणाप्रमाणेंही होतें. म्हणजे सुकाणूं याची अशीं रूपें होतातः—सुकाणा,–सुकाणूं,–सुकाण्वा,–सुकाणवा.

## दुसरा वर्ग—घोड्याचा गण.

१०४. या गणांतील नामांचें सामान्यरूप आकारान्तच असतें, पण 'आ'च्या मागें संयुक्त व्यंजन असून त्यांत शेवटीं 'य्' असतो; किंवा सामान्यरूपाचे शेवटीं 'या' असतो. जसें,–घोडा–घोड्या, गडी–गड्या, इ०.

**टीप**—या नामांचे अन्त्य स्वरित असल्यामुळें सामान्यरूपाचा प्रत्यय प्रथमतः 'ए' होऊन मग 'या' झाला. (मागील क० ९७ पाहा.) आकारान्त पुल्लिंगी नामांचें सामान्यरूप हिंदी आणि पंजाबी यांत एकारान्त आहे. कोंकणी मराठींतही तें एकारान्त आहे. सिंधींत ओकारान्त आहे.

१०५. याप्रमाणें चालणारीं नामें:—

(१) पहिल्या गणांत येत नाहींत अशीं सर्व आकारान्त पुल्लिंगी नामें. जसें,—घोडा, गोटा, सोटा, लोटा, चुलता, मेहुणा, वाडा, सरडा, उंचवटा, वरवंटा, घोटा, वांटा, वारा, पारा, झारा, वडा, सडा, इ०.

(२) संस्कृत आणि शुद्ध मराठी ईकारान्त पुल्लिंगी नामें. जसें,—शास्त्री, संन्यासी, गोसावी, पुजारी, शेतकरी, वारकरी, बिगारी, गडी, विद्यार्थी, माधुकरी, वाढपी, न्हावी, तेली, वाणी, तांबोळी, धोबी, शिंपी, गोंधळी, साळी, रंगारी, कोष्टी, इ०.

अपवाद—हत्ती, केसरी, मुनशी, काजी, मशालजी [मशालची–शी], कांची, मोची, फिर्यादी, वादी, प्रतिवादी, मौलवी, नगारजी, असामी, पाजी, पंतोजी, जती, बंदी, वगैरे नामें कवीच्या गणांत येतात.

(३) सर्व ईंकारान्त आणि एँकारान्त नपुंसकलिंगी नामें. जसें,—पाणीं, लोणीं, चिंचवणीं, गुळवणीं, गुळीं, कुणीं, मिरीं, मोतीं, नाणें, सोनें, रुपें, केळें, पाळें, जाळें, बकरें, इ०. करणें, बोलणें, इत्यादि धातुसाधित नामें यांतच येतात.

(४) करणारा, बोलणारा, हीं धातुसाधित नामें विकल्पेंकरून या वर्गांत येतात. जसें,—करणारास, करणाऱ्यास, इत्यादि. (बापाचा गण पाहा.)

अपवाद–बीं [नपुं०] याचें बिया–असें होतें.

**टीप**—या रूपांच्या शेवटच्या 'या' बद्दल कवितेंत 'इया' किंवा 'ईया' असें रूप करण्याची वहिवाट आहे. जसें,–घोडियास, मोतियांचे, गडियांना,

इ०. येथें घोडयास, मोत्यास, यांतील जोडाक्षरांत उच्चार सौकर्यासाठीं 'इ' स्वर शिरला असावा. जसें,—श्लोक, शिलोक, वर्ष, वरीस, इत्यादि.

## तिसरा वर्ग—गव्हाचा गण.

१०६. या गणांतील नामांच्या सामान्यरूपाच्या अन्तीं 'आ'च असतो. पण 'आ'—च्या मागें जोडाक्षर असून त्यांतील शेवटला वर्ण 'व' असतो; किंवा यांचे सामान्यरूपाचे शेवटीं 'वा' असतो. जसें,—गव्हा,—विंच्वा—, नात्वा—, इत्यादि.

**टीप**—कलम ९७ आणि क० १०४ ची टीप पाहा.

१०७. या गणांत नामें येतात तीः—

( १ ) ऊकारान्त पुल्लिंगी नामें. जसें,—गहूं, नातू (सामान्यनाम), विस्तू, पू, रू, गू, इ० यांच्या अन्त्य 'ऊ'च्या जागीं विशेषेंकरून 'वा' होतो. पण एकाक्षरी शब्द असला तर त्याचा अन्त्य 'ऊ' ऱ्हस्व होऊन पुढें 'वा' लागतो. जसें,—पू—पुवा—, रू—रुवा—, इत्यादि.

**टीप १**—गहूं हा एकच पुल्लिंगी शब्द अन्तीं अनुस्वारयुक्त आहे. याचा मूळ संस्कृत शब्द 'गोधूम' असून त्याचें प्राकृत रूप 'गोहूंअ' असें आहे. हा अनुस्वार गाळल्यास चिंता नाहीं.

**टीप २**—नातू हें आडनांव असतां त्याचीं रूपें, नातूंस, नातूंचा, अशीं होतात.

( २ ) कांहीं ऊकारान्त पुल्लिंगी नामांचीं सामान्यरूपें अशीं होऊन शिवाय पांचव्या गणांतील नामांप्रमाणें होतात. उदा०,—लाडू, साडू, विंचू, काडू, नारू, पणतू, चादू, वेळू, आणि भाऊ यांचीं लाडूस, लाड्वास, साडूस, साड्वास, अशीं रूपें होतात. भाऊ हा शब्द नात्याचा वाचक असला, तर 'भावास' 'भावाचा,' व आदरार्थी असला, तर 'भाऊंस' 'भाऊंचा' अशीं रूपें होतात. उ०,—हरीच्या भावास, रामभाऊंस, हरिभाऊंस, इ०.

( ३ ) कित्येक ऊंकारान्त नपुंसकलिंगी नामें. यांना विशेषेंकरून 'वा' होतो. जसें,—असूं, गळूं, कुंकूं, कुसूं, जूं, तारूं, राजाळूं, बाळकडूं, इ० यांचीं कुंक्वा-, अस्वा—, गळ्वा—, अशीं रूपें होतात.

( ४ ) ज्यांना विकल्पेंकरून 'वा' होतो अशीं कित्येक ऊंकारान्त नपुंसक-

लिंगी नामें. जसें,—सुकाणूं, जिवाणूं, उठाणूं, इ० यांची एकंदर चार रूपें होतात, तीं:—जिवाणूंस, जिवाण्वास, जिवाणास, जिवाणवास.

( ५ ) अनेकाक्षरी शब्दाच्या सामान्यरूपांत अन्त्य 'आ' च्या पूर्वी जें जोडाक्षर असतें, तें वेगळें करून त्याचे प्रथम व्यंजनांत अकार मिळवून वैकल्पिक रूपें करण्याची चाल आहे. जसें,—लाडवास–लाड्वास, विंचवास–विंच्वास, कुंकवास–कुंक्वास, गळवास–गळ्वास, इ०.

## चवथा वर्ग–कवीचा गण.

१०८. या गणांतील नामांच्या सामान्यरूपाचे शेवटीं 'ई' हा स्वर असतो. जसें—कवी–( स ), बुद्धी-( ला ), मती–( नें ), भानू–( ला ), इत्यादि.

१०९. या गणांत पुढील नामें येतातः—

( १ ) संस्कृतांतून आलेलीं इकारान्त तिन्ही लिंगी नामें. जसें—पु०—कवि, हरि, यति, कलि, पवि; स्त्री०—मति, रीति, भक्ति, स्थिति, युक्ति, बुद्धि; नपुं० वारि, दधि, अस्थि, इ०.

( २ ) दुसऱ्या गणांत न येणारे ईकारान्त पुल्लिंगी शब्द. हे मराठींत फारसे प्रचारांत नाहींत. यांतील बरेच संस्कृतांत 'इन्' प्रत्ययान्त असून मराठींत ते ईकारान्त झालेले आहेत. जसें,—हस्ती, करी, दंडी, केसरी, नंदी, बंदी, आतत्यायी, वज्री, शूली, इ०. हत्ती व जती, हे अनुक्रमें हस्ती व यति यांचे अपभ्रंश असून, तेही असेच चालतात.

( ३ ) परकी भाषेंतील पुल्लिंगी ईकारान्त शब्द. जसें,—वादी, प्रतिवादी, असामी, फिर्यादी, काजी, मौलवी, इ०.

( ४ ) 'जी' प्रत्यय लागून झालेलीं मराठी किंवा परकी भाषेंतील नामें; त्याचप्रमाणें ज्यांच्या शेवटीं 'जी' आहे अशीं नामें. जसें,—पंतोजी, भावोजी, बाबाजी, रावजी, मशालजी, शेटजी, तबलजी, आयतोजी, पाजी, दाजी, यमाजी, मशालजी, कांची, मोची, इ०.

**टीप**—कांची, मोची, यांचीं विकल्पेंकरून कांच्यास, मोच्यास अशीं दुसऱ्या गणाप्रमाणेंही रूपें होतात.

( ५ ) सर्व ईकारान्त स्त्रीलिंगी नामें. जसें,—गाडी, घोडी, पेटी, घोंगडी,

भाजी, माची, विटी, चिठ्ठी, सती, साध्वी, अटवी, कुमारी, श्रीमती, देवी, सौभाग्यवती, चपाटी, चपाती, भाकरी, पुरी, इ०.

**अपवाद**—स्त्री आणि बी ( स्त्री० ) यांचीं सामान्यरूपें विकल्पेंकरून स्त्री-स्त्रिये, बी-बिये, अशीं होतात.

( ६ ) कित्येक अकारान्त स्त्रीलिंगी नामें. जसें,—म्हण, भेट, वांक ( अलंकारविशेष ), केळ, बोर ( झाड ), रीत, जात, ओळख, भाकर, गोष्ट, पोर ( मुलगी ), भिंत, मूठ, चाळण, पोफळ, कुळंबीण, माळीण, माळण, धाबळ, चकमक, विहीर, चूल, इ०.

( अ ) अकारान्त स्त्रीलिंगी नामांचें सामान्यरूप तीन प्रकारांनीं होतें; कांहींचें ईकारान्त होतें. जसें,—भाकर–भाकरी, बोर–बोरी, पोर–पोरी, इ०. आणि कांहींचें एकारान्त होतें. जसें,—वेळ–वेळे, वीट–विटे, इ०. आणि कांहींचें विकल्पेंकरून एकारान्त किंवा ईकारान्त होतें. जसें,–तरवार–तरवारे –तरवारी, परात,–पराते,–पराती, विजार,–विजारे, इ०.

( आ ) या नामांचे सामान्यरूपासंबंधानें भिन्न मत फार आहे. निरनिराळ्या प्रांतांत निरनिराळीं रूपें रूढ आहेत. ज्यांचे सामान्यरूपांचे शेवटीं ' ए '–च येतो, अशीं कित्येक महत्त्वाचीं नामें पुढें सहाव्या गणांत दिलीं आहेत. त्यांशिवाय बाकीच्यांच सामान्यरूप ' ई ' लावून करण्यास चिंता नाहीं.

( इ ) या नामांचे संबंधान साधारण नियम असा आहे कीं, जे संस्कृत शब्द मूळचे इकारान्त किंवा ईकारान्त असून मराठींत अकारान्त झाले आहेत, त्यांचें सामान्यरूप ' ई ' लागून होतें अशा कांहीं नामांची यादीः—

| मूळ शब्द | म० शब्द | मूळ शब्द | म० शब्द |
|---|---|---|---|
| भित्ति | भिंत | गोष्टी | गोष्ट |
| पापिणी | पापीण | खनि | खाण |
| कदली | केळ | पुत्री | पोर |
| कुठारी | कुऱ्हाड | षष्ठी | सठ |
| गति | गत | पूगफली | पोफळ |
| चालनी | चाळण | पुष्करणी | पोखरण |

| | | | |
|---|---|---|---|
| ब्राह्मणी | बामीण | सपत्नी | सवत |
| पंक्ति | पंगत | कर्तरी | कातर |
| बदरी | बोर | जाति | जात |
| मुष्टि | मूठ | तिथि | तीथ इ०. |

(७) स्त्रीलिंगी 'ईण' प्रत्यय लागून झालेलीं नामें. जसें,—वाघीण, सुतारीण, सोनारीण, ब्राह्मणीण, भटीण, सिंहीण, परभीण, इ०.

(८) ज्या स्त्रीलिंगी अकारान्त नामांच्या 'अ'च्या पूर्वी 'य्' असतो, त्या नामांचें सामान्यरूप होतांना संप्रसारण होतें; म्हणजे 'य' बद्दल 'ई' होतें. जसें,—गाय—गाई, चोय—चोई, पोय-पोई, डोय—डोई, सोय—सोई, बय—बई, इ०.

**टीप**—हीं नामें मूळचीं ईकारान्त होत. प्रथमैकवचनीं उच्चारसौकर्याकरितां अंतींच्या 'ई' बद्दल 'य' होतो. पण सामान्यरूप होतांना 'ई' आपल्या वतनावर येते.

(९) ऐकारान्त स्त्रीलिंगी नामें जसें,—तिवै, कटै, सळै, गै, जिलै, इ०. हीं तिवई, कटई, सळई, गई, जिलई, अशींहि लिहितात. हीं वास्तविक ईकारान्तच समजावीं.

(१०) इकारान्त किंवा ईकारान्त स्त्रीलिंगी नामांचें सामान्यरूप कवितेंत क्वचित् 'इये असें आढळतें. जसें—बुद्धि—बुद्धियेस, काशी—काशियेलागीं इ०.

## पांचवा वर्ग—साधूचा गण.

११०. या गणांतील नामांच्या सामान्यरूपांच्या शेवटीं 'ऊ' असतो. जसें,—साधूस, शिशूला, चाकूनें, धेनूला, इ०.

१११. या गणांत येणारीं नामें अशीं आहेतः—

(१) मूळचीं संस्कृत उकारान्त तिन्ही लिंगी नामें. जसें—साधु, वस्तु, धेनु, मधु, बिन्दु, इन्दु, शिशु, पांसु, इ०.

(२) कित्येक ऊकारान्त पुल्लिंगी नामें. यांचें सामान्यरूप विकल्पेंकरून आकारान्त किंवा ऊकारान्त होतें. जसें—तट्टू, भट्टू, परभू, वाटसरू, इ० [ वर्ग १ ला नियम ३ (अ) पहा. ]

( ३ ) कित्येक ऊकारान्त पुल्लिंगी नामें. यांचें सामान्यरूप विकल्पेंकरून वाकारान्त किंवा उकारान्त होतें. जसें—नारू, पणतू, चाटू, वेळू, भाऊ, लाडू, साडू, काडू, विंचू, इ०. [ तिसरा वर्ग, नियम २ पहा. ]

( ४ ) पहिल्या व तिसऱ्या गणांत न येणारे सर्व ऊकारान्त पुल्लिंगी शब्द. जसें,—चाकू, धाकू, टेकू, झकू, इ०.

( ५ ) ऊकारान्त स्त्रीलिंगी नामें. यांतलीं कांहीं मूळचीं संस्कृत असून त्यांचा 'ऊ' तसाच राहातो. जसें,—चमू, भू, भ्रू, श्वश्रू, वधू, इ०. कित्येक शुद्ध मराठी किंवा परकी भाषेंतील असून त्यांचा 'ऊ' कायम असतो. जसें—गेरू, कुरकू, शाडू, कौलू, पाचू, शेपू, शेळू, पाऊ, लू, तराजू, आऊ, माऊ, काकू, तंबाखू, अफू, गुडाखू, अब्रू, इ०. बाकीच्या ऊकारान्त स्त्रीलिंगी शब्दांचीं रूपें वैकल्पिक आहेत; त्यांचे शेवटीं 'ऊ' किंवा 'ए' असतो. [ मातेचा गण पाहा. ]

( ६ ) कित्येक ऊकारान्त नपुंसकलिंगी नामें. यांचें सामान्यरूप विकल्पें-करून ऊकारान्त किंवा आकारान्त होतें. जसें,—पाचेरूं, फालेटूं, सुकाणूं, इ०. [ पहिला वर्ग, नियम ३ ( इ ) पाहा. ]

( ७ ) ज्यांचें सामान्यरूप विकल्पेंकरून ऊकारान्त किंवा वाकारान्त होतें, अशीं कित्येक ऊंकारान्त नपुंसकलिंगी नामें. जसें,—बाळकडूं, सुकाणूं, जिवाणूं, उठाणूं, इ०. शेवटच्या तिहींचीं एकंदर चार रूपें होतात. तीं:—उठाणूंस, उठाण्वास, उठाणास, उठाणवास इ०. [ वर्ग ३ रा, नियम ४ पाहा. ]

( ८ ) सामान्यरूपांत ज्यांचा 'ऊ' विशेषेंकरून कायम राहतो, अशीं ऊंकारान्त नपुंसकलिंगी नामें. जसें,—आगरूं, उठाणूं, छाटूं, माचेरूं, हुंचूं, आवाळूं इत्यादि.

## सहावा वर्ग—मातेचा गण.

११२. या गणांत येणाऱ्या नामाच्या शेवटीं 'ए' स्वर असतो. जसें,—मातेस, जिभेला, भाषेनें इत्यादि.

११३. या वर्गामध्यें येणारीं नामें पुढें लिहिल्याप्रमाणें आहेत:—

( १ ) संस्कृत आकारान्त स्त्रीलिंगी नामें. जसें,—कथा, सिकता, आपगा,

जिव्हा, विद्या, आशा, इच्छा, प्रशंसा, निंदा, शंका, भाषा, निद्रा, सुता, इ०. मराठींत आकारान्त झालेलीं स्त्रीलिंगी नामें. जसें—माता, दुहिता, स्वसा, इत्यादि.

(२) परभाषेंतून मराठींत रूढ झालेलीं आकारान्त स्त्रीलिंगी नामें. जसें,— इजा, मजा, रजा, सजा, हवा, दवा, जमा, जिम्मा, जागा, पागा, इत्यादि.

(३) मूळ संस्कृत आकारान्त किंवा ऊकारान्त स्त्रीलिंगी नामांवरून मराठींत आलेलीं अकारान्त स्त्रीलिंगी नामें. जसें:—

| सं. | मराठी | सं. | मराठी |
|---|---|---|---|
| जिव्हा | जीभ | लालसा | लालूच |
| बुभुक्षा | भूक | वेला | वेळ |
| लज्जा | लाज | पौर्णिमा | पुनव |
| स्नुषा | सून | शय्या | शेज |
| जटा | जट | माला | माळ |
| पाचू | पाच | भाषा | भाक |
| आम्ला | आंब | शर्करा | साखर |
| अमावास्या | अंवस | खर्जू | खाज |
| कक्षा | खाक | विद्युत् (विज्जू) | वीज |
| लाला | लाळ | खट्वा | खाट इ०. |

(४) दुसरीं कित्येक अकारान्त स्त्रीलिंगी नामें. हीं मूळचीं संस्कृत स्त्रीलिंगी नामांवरून झालेलीं नाहींत; पण मराठींत मात्र तीं स्त्रीलिंगी मानलेलीं आहेत. जसें:—

| सं० | | मराठी | सं० | | मराठी |
|---|---|---|---|---|---|
| शाक | (न०) | शाक | प्रभात | (पु०) | पहाट |
| लवंग | (न०) | लवंग | कट | (पु०) | कड |
| उष्मा | (पु०) | ऊब | लशुन | (न०) | लसूण |
| शपथ | (पु०) | शपथ | वाट | (पु०) | वाट |
| वस्तु | (न०) | वस्त | काच | (पु०) | कांच |
| भुज | (न०) | भूज | शाण | (पु०) | साण, सहाण |
| बाष्प | (पु०) | वाफ | कच्छ | (पु०) | कांस |
| व्याम | (न०) | वांव | लोम | (पु०) | लंव |
| सुकाल | (पु०) | सकाळ | कषाय | (पु०) | काव इ०. |

( ५ ) ज्या अकारान्त स्त्रीलिंगी नामांचें सामान्यरूप या गणाप्रमाणें होतें, त्यांतील मुख्य मुख्य नामांची यादः—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| अक्कल | कुळीक | चिंच | ढेंग | धमक |
| अटक | कैद् | चिळस | ढेल | धाप |
| अडक | कोईल | चीज | ढेलज | धांव |
| अवेळ | खच | चीड | तरफ | धार |
| आडज | खडाव | चींप | तलफ | धूर |
| आत | खरूज | चूळ | तह्रान | धोप |
| आंब | खांक | चुणूक | तक्षीम | नणंद |
| ईट | खांच | जट | ताज | नजर |
| ईर | खाचट | जाग | ताजीम | नमाज |
| ईशान्य | खाट | जाणीव | तान | नाव |
| उणीव | खांड | जीभ | तांब | नीज |
| उत्तर | खारीक | झडप | तार | नेणीव |
| ऊब | खाचर | झीज | ताव | नैर्ऋत्य |
| कड | खीज | झीण | तारीख | पश्चिम |
| कणीक | खूण | झूम | तालीम | पत्राज-द |
| कमर | खूप | झूल | तिकूळ | पह्रार |
| कंबर | खेप | झूर | तिडीक | पह्राट |
| करप | खेंस | झोंप | तीज | पाच |
| कव | गप्प | टांग | तीट | पाव |
| कस्तर | गरज | टीच | तूळ | पिंक |
| कांच | गंजीफ | टीक | तेरीज | पुनव |
| काव | गार | टींप | तोफ | पूर्व |
| कांस | गुंज | डांक | थाप | पळव |
| किंक | गुंफ | डाग | थोप | पेंठ |
| किंकर | चटक | डांग | दक्षिण | पैज |
| किळस | चपळ | ढीप | दरज | पोहोंच |
| कुमक | चमक | ढांक | दुरव | फिरंग |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| फौज | मांद | रीझ | वांझ | शेंग |
| फुंक | मांदूस | रीप | वाफ | शेज |
| फूक | मात | रेघ | वायव्य | शेंप |
| बाग | मान | रेव | वांव | शेस |
| बाज | माय | रेंव | विलायत | सकाळ |
| बींज | मांव | रोंथ | विंच | सडक |
| बूज | माषूक | लटक | वीज | सद्र |
| बेरीज | माळ | लगट | वीट | समीध |
| भाज | मेख | लंब | वीळ | साखर |
| भाग | मेंग | लवंग | वेंग | सांज |
| भाक–ष | मोहीम | लाख | वेळ | सांड |
| भीड | मोट | लाट | शक्कल | साण |
| भीक | मोहोर | लांच | शपथ | साद |
| भूक | मौज | लाज | शाक–ख | साहाण |
| भूज | रक्कम | लाथ | शाळ–साळ | सांव |
| भेग | रयत | लाळ | शिऊळ | सीम |
| भेर | राख | लीख | शिंक | सूज |
| भेळ | रांग | वस्त | शिंप | सून |
| भोंवळ | राड | वहाण | शिर | सोंड |
| भोवड | रांड | वळव | शीळ | हाक |
| मजल | रांडमुंड | वळविंच | शींव | हाव |
| मसूर | रोंघ | वाट | शींव | हुरूप |

**टीप**—हे शब्द स्त्रीलिंगी म्हणून जरी दिले आहेत, तरी यांतील कित्येकांचीं प्रांतपरत्वें भिन्न लिंगें मानितात. उदा०,—लांच, जिन्नस, मध, हुरूप, पु०; कस्तर, खाचर, नपुं०; इत्यादि. ते स्त्रीलिंगी असले, तर या गणांतील नामांप्रमाणें चालतील; नसले तर ज्या लिंगाचे असतील, त्या लिंगाच्या सजातीय नामांप्रमाणें चालतील.

( ६ ) ज्यांचें सामान्यरूप विकल्पेंकरून एकारान्त किंवा ईकारान्त होतें, अशीं कित्येक अकारान्त स्त्रीलिंगी नामें. तीं अशीं:—

( अ ) 'णूक' प्रत्ययान्त सर्व नामें. जसें,—वागणूक, वागणुकेस–वागणुकीस; जाचणूक, जाचणुकेस–जाचणुकीस; मिरवणूक, मिरवणुकेस–मिरवणुकीस; इ०.

( ब ) कित्येक शुद्ध मराठी, अथवा परभाषेंतील अथवा संशयित मुळाचे शब्द. जसें,—तरवार, सुरवार, टकमक, झकपक, चकमक, मचमच, तसबीर, तसरीफ, येरजार, अखबार, कबर, उघडीक, कोरडीक, भरताड, खसखस, हुरमूज, खुरनीस, पुरशीस, तजवीज, सोयरीक, बंदूक, संदूक, परात, वरात, विजार, इजार, वखार, बखर, खबर, कटार, आगळीक, शाल, ढाल, पखाल, अह्वाल, ईद, कसर, चीर, लसूण, वीण, ढांक, नथ, टांच, मध, लालूच, सांव, इ०.

टीप—अकारान्त स्त्रीलिंगी नामांत, ज्यांचें सामान्यरूप ईकारान्त किंवा एकारान्त असतें, किंवा ज्यांचें दोन्ही प्रकारचें असतें, त्यांच्या यादी मोलस्वर्थकृत मराठी कोशांत दिल्या आहेत. परंतु अलीकडे पन्नाससाठ वर्षांत तीं नामें चालविण्याचे पद्धतींत बराच फरक पडला आहे. ज्यांचें सामान्यरूप एकारान्त होतें अशा मुख्य मुख्य नामांची याद मागें दिलीच आहे. बाकीच्यांपैकीं कांहींचें सामान्यरूप विकल्पेंकरून होत असलें, तरी तें ईकारान्तही निर्बाधपणें होतेंच; म्हणून त्यासंबंधानें ज्यास्त विवरण करण्याची गरज नाहीं.

( ७ ) 'धू' या स्त्रीलिंगी नामाचें सामान्यरूप 'धुवे' असें होतें.

( ८ ) ज्यांचे सामान्यरूपांचे शेवटीं 'अवे' किंवा 'वे' असतो किंवा विकल्पेंकरून ज्यांचा 'ऊ' कायम राहातो, अशीं कित्येक ऊकारान्त स्त्रीलिंगी नामें. जसें,—ऊ, सू, जळू, दुरू, चिरू, सासू, जाऊ, वाळू, टाळू, ताळू, पेळू, बाजू, दारू, इ०. यांची सामान्यरूपें तीन तीन होतात. जसें—सासू–सासवे–सास्वे; टाळू–टाळवे–टाळ्वे; इ०. ऊ, जाऊ व सू, यांचीं मात्र दोन दोनच होतात. जसें,—ऊस, उवेस; जाऊस, जावेस; सूस, सुवेस. पिसू या शब्दाचीं सामान्यरूपें पिसू, पिसे, पिसवे, आणि पिस्वे, अशीं होतात.

टीपः—या नामांचीं वैकल्पिक रूपें शब्दसिद्धींत सांगितल्याप्रमाणें 'क' हा स्वार्थी प्रत्यय लागल्यानें होतात. [ श. सि. क. २९ पाहा. ]

( ९ ) एकारान्त स्त्रीलिंगी नामें. जसें,—विल्हे, सवे, आते, इ०.

## सातवा वर्ग--बायकोचा गण.

११४. या गणांतील नामांच्या शेवटीं ‘ ओ ’ हा स्वर असतो.

११५. सर्व ओकारान्त नामें या गणांत येतात. जसें,—बायको ( स्त्री० ), टाहो ( पु० ), लाहो ( पु० ), डोहो ( पु० ), ढंबो ( स्त्री० ), ताटको ( स्त्री० ), इत्यादि. हीं अगदीं थोडीं आहेत.

## विशेषनामांचें सामान्यरूप.

११६. विशेषनामांच्या सामान्यरूपांसंबंधाचे नियम वरील नियमांहून थोडे भिन्न आहेत. ते असेः—

( १ ) मनुष्यवाचक विशेषनामांचें सामान्यरूप होतांना त्यांचा अन्त्य स्वर ऱ्हस्व असल्यास तो दीर्घ होतो; व तो दीर्घ असल्यास तसाच राहातो. जसें,— राम, रामा; हरि, हरी; नरसू, नरसू; गंगा, गंगा; इ०.

( २ ) आकारान्त स्त्रीलिंगी विशेषनामांपैकीं जीं संस्कृतांतून मराठींत येऊन विशेष प्रचारांतील झालीं आहेत, त्यांचें सामान्यरूप आकारान्त किंवा एकारान्त असें दोन्ही प्रकारचें होतें. जसें,—रमा, रमा-स, रमे-स; यशोदा, यशोदा-स, यशोदे-स; सीता, सीता-स, सीते-स ( सितास, सितेस ); नर्मदा, नर्मदा-स, नर्मदे-स; इ०.

( ३ ) परंतु जीं अद्याप मराठींत विशेष प्रचारांत आलीं नाहींत, त्यांचें सामान्यरूप एकारान्तच असतें. जसें,—चंद्रकला--चंद्रकलेस; गिरिजा--गिरिजेस; रत्नप्रभा--रत्नप्रभेस; शकुंतला--शकुंतलेस; मेनका--मेनकेस; इ०.

( ४ ) कित्येक आकारान्त स्त्रीलिंगी विशेषनामांवरून मराठींत ईकारान्त व ऊकारान्त नामें होतात. जसें,--गंगा--गंगी, गंगू; दुर्गा--दुर्गी; मथुरा--मथी, मथू; भिमा--भिमी; इ०. यांचीं सामान्यरूपें ईकारान्त व ऊकारान्त स्त्रीलिंगी नामांप्रमाणेंच होतात. हीं नामें व त्यांचीं मूळचीं आकारान्त नामें हीं निरनिराळीं आहेत असें समजावें.

( ५ ) भूगोलांतील देशांचीं, स्थळांचीं, पर्वतांचीं, नद्यांचीं, शहरांचीं, वगैरे नांवें हीं त्यांच्या सजातीय ( अन्त व लिंग यासंबंधानें ) सामान्यनामांप्रमाणेंच चालतात. उदा०--पु०--कर्नाटक-कर्नाटकास; सातारा—साताऱ्यास; सह्याद्रि-सह्याद्रीस; इ०. स्त्री०--मद्रास--मद्रासेस; लंका--लंकेस; काशी--काशीस; पनवेल--

पनवेलीस; इ०. नपुं०—सोलापूर--सोलापुरास; पुणें--पुण्यास; कारलें—कारल्यास; इत्यादि.

## सिंहावलोकन.

११७. नामांच्या सामान्यरूपांच्या संबंधानें आतांपर्यंत जे नियम सांगितले, त्यांचा अन्त्यस्वराला उल्लेखून थोडक्यांत सारांश पुढें देतों:—

( अ ) अकारान्त नामें.—

पुल्लिंगी—सर्व पहिल्या गणाप्रमाणें.

स्त्रीलिंगी—( १ ) कांहीं चवथ्या गणाप्रमाणें विशेषेंकरून. [ कलम १०९, पोटकलमें ६, ७, ८, पाहा. ]

( २ ) कांहीं सहाव्या गणाप्रमाणें विशेषेंकरून. [ कलम ११३, पोटकलमें ३, ४, ५, पाहा. ]

( ३ ) कांहीं विकल्पेंकरून चवथ्या आणि सहाव्या गणाप्रमाणें. [ कलम ११३, पोटकलम ६ पाहा. ]

नपुंसकलिंगी--सर्व पहिल्या गणाप्रमाणें.

( ब ) आकारान्त नामें.—

पुल्लिंगी—( १ ) कांहीं पहिल्या गणाप्रमाणें. [ कलम १०३, पो० क० २ पाहा. ]

( २ ) कांहीं दुसऱ्या गणाप्रमाणें. [ क० १०५, पो० क० १ पाहा. ]

स्त्रीलिंगी—सहाव्या गणाप्रमाणें.

नपुंसकलिंगी—आकारान्त नपुंसकलिंगी नामें नाहींत.

( क ) इकारान्त नामें—

पुल्लिंगी, स्त्रीलिंगी आणि नपुंसकलिंगी-सर्व चवथ्या गणाप्रमाणें.

( ड ) ईकारान्त नामें.—

पुल्लिंगी—( १ ) कांहीं दुसऱ्या गणाप्रमाणें. [ क० १०५ पो० क० २ पाहा. ]

( २ ) कांहीं चवथ्या गणाप्रमाणें. ( क० १०९, पो० क० २, ३, ४, पाहा. )

स्त्रीलिंगी—चवथ्या गणाप्रमाणें. ( क. १०९, पो० क० ५ पाहा. )

अपवाद—स्त्री—स्त्रीस, स्त्रियेस; बी—बीस, बियेस.

नपुंसकलिंगी—(म्हणजे ईंकारान्त ) दुसऱ्या गणाप्रमाणें. ( क० १०५, पो० क० ३ पाहा. )

अपवाद—बीं—बियांस.

( इ ) उकारान्त नामें.—

पुल्लिंगी, स्त्रीलिंगी आणि नपुंसकलिंगी सर्व पांचव्या गणाप्रमाणें. ( क० १११, पो० क० १ पाहा. )

( फ ) ऊकारान्त नामें.—

पुल्लिंगी—( १ ) कांहीं पहिल्या गणाप्रमाणें. [ क० १०३, पो० क० ३ ( अ ) पाहा. ]

( २ ) कांहीं तिसऱ्या गणाप्रमाणें. ( क० १०७, पो० क० १ पाहा. )

( ३ ) कांहीं पांचव्या गणाप्रमाणें. ( क० १११, पो० क० ४ पाहा. )

( ४ ) विकल्पेंकरून पहिल्या किंवा पांचव्या गणाप्रमाणें. [ क० १०३, पो० क० ३ ( अ ), व १११, पो० क० २ पाहा. ]

( ५ ) विकल्पेंकरून तिसऱ्या किंवा पांचव्या गणाप्रमाणें. ( क० १०७, पो० क. १, व क० १११ पो० क० ३ पाहा. )

स्त्रीलिंगी—( १ ) विशेषेंकरून पांचव्या गणाप्रमाणें. ( क० १११, पो० क० ५ पाहा. )

( २ ) विकल्पेंकरून पांचव्या किंवा सहाव्या गणाप्रमाणें. ( क० ११३, पो० क० ८ पाहा. )

नपुंसकलिंगी—( म्हणजे ऊंकारान्त )—( १ ) विशेषेंकरून पहिल्या गणाप्रमाणें. [ क० १०३, पो० क० ३ ( आ ) पाहा. ]

(२) विशेषेंकरून तिसऱ्या गणाप्रमाणें. (क० १०७, पो. क० ३ पाहा.)

(३) विशेषेंकरून पांचव्या गणाप्रमाणें. (क० १११, पो० क० ८ पाहा.)

(४) विकल्पेंकरून पहिल्या किंवा पांचव्या गणाप्रमाणें [क० १०३ पो० क ३ (इ) व क० १११, पो० क० ६ पाहा.]

(५) पहिल्या, तिसऱ्या, किंवा पांचव्या गणाप्रमाणें. [क० १०३, पो० क० ३ (इ) व टीप पाहा.]

(६) विकल्पेंकरून तिसऱ्या किंवा पांचव्या गणाप्रमाणें. (क० १०७, पो० क० ४ व क० १११, पो० क० ७ पाहा.)

(ग) एकारान्त नामें—

पुल्लिंगी—अशीं नामें नाहींत.

स्त्रीलिंगी—सहाव्या गणाप्रमाणें. [क० ११३, पो० क० ९ पाहा.]

नपुंसकलिंगी (ऍकारान्त)—दुसऱ्या गणाप्रमाणें. [क० १०५, पो० क० ३ पाहा.]

(इ) ऐकारान्त नामें—कांहीं थोडीं स्त्रीलिंगी नामें अशा प्रकारचीं आहेत; पण तीं ईकारान्तच मानावयाचीं. उदा०—तिवै, तिवई, इ०. हीं चवथ्या गणाप्रमाणें चालतात. [क० १०९, पो० क० ९ पाहा.]

(य) ओकारान्त नामें—पुल्लिंगी व स्त्रीलिंगी सातव्या गणाप्रमाणें. [क० ११५ पाहा.]

नपुंसकलिंगी—अशीं नामें नाहींत.

---

# प्रकरण १०.



## प्रातिपदिकांचे अन्त्य आणि उपान्त्य.

### (१) अन्त्याक्षराविषयीं.

११८. (अ) संस्कृतांत शब्दांचीं रूपें बहुधा प्रत्यय लावून करितात. सर्व रूपांना प्रत्यय असतात. जेथें प्रत्यय लावीत नाहींत, तेथें त्याचा लोप झाला असें मानितात. ज्याला प्रत्यय लावितात, त्याला शब्दाचें मूळरूप किंवा अंग असें म्हणतात.

(आ) मराठींत अशा प्रकारचें प्रातिपदिकाचें मूळरूप नाहीं. संस्कृतांतून व प्राकृतांतून जो शब्द तयार होऊन येतो, तो प्रथमेचें एकवचन असतो. अमुक शब्द अकारान्त, किंवा इकारान्त आहे, वगैरे आपण म्हणतों, तें त्या शब्दाच्या प्रथमेच्या एकवचनाबद्दल म्हणतों. यालाच हवें तर, 'शब्दांचें मूळरूप' असें म्हणावें.

११९. (अ) संस्कृत शब्दांच्या मूळरूपाच्या अन्तीं ऱ्हस्व स्वर असेल; परंतु त्यांचें विभक्तिक रूप किंवा पद बनल्यावर, दधि, अस्थि, वगैरे थोड्या शब्दांच्या नपुंसकलिंगी शब्दांशिवाय बाकीच्यांच्या अन्तीं अनुस्वार किंवा विसर्ग येऊन, अथवा शेवटीं एकादें व्यंजन किंवा दीर्घ स्वर येऊन ते अन्त्य दीर्घच होतात. अर्थात् संस्कृत भाषेंत नामादिकांचीं रूपें उपयोगाला नेहमीं दीर्घान्तच असतात.

(आ) मराठी भाषेंत शब्दांच्या अन्तीं नेहमीं दीर्घ स्वर असावयाचा. मराठी शब्दांच्या शेवटीं ऱ्हस्व उच्चारच असावयाचा नाहीं. भाषेंत अलीकडेस घेतलेले ऱ्हस्व इकारान्त आणि उकारान्त तत्सम शब्द संस्कृतांत मूळचे ऱ्हस्वान्त आहेत, म्हणून मराठींत ते प्रथमेच्या उभयवचनीं तसेच लिहावे, अशी सांप्रत चाल पडली आहे; पण ती अशास्त्र आहे. संस्कृतांत ते 'कविः,' 'धेनुः', असे विसर्गयुक्त अतएव दीर्घान्त आहेत. ते प्राकृतांतच 'कवी', 'धेनू' असे दीर्घ झाले आहेत. संस्कृतांतला शेवटचा विसर्ग जाऊन मागील ऱ्हस्व स्वर दीर्घ होतो, किंवा त्याचा 'ओ' होतो, असा प्राकृत व्याकरणाचा नियम आहे. तेव्हां ते मराठींत ऱ्हस्वान्त कां लिहावयाचे? खेरीज त्यांचें ऱ्हस्वान्त

रूप हें **मूळरूप** आहे. संस्कृतांतही त्यांचा वाक्यांत उपयोग केला कीं, तें दीर्घान्त बनतात. असें जर स्पष्ट आहे, तर संस्कृतांतले **मूळशब्द** मराठींत **प्रथमैकवचनीं** जसेच्या तसेच लिहावे, हें अगदीं अशुद्ध, अतएव अग्राह्य आहे.

**टीप १**—मराठी भाषेचा असा नियम आहे कीं, अन्तीं स्वर असेल तर तो स्वरित असून दीर्घ असेल तर कायम राहील, नाहीं तर उपान्त्य स्वरित अर्थात् जोरदार होऊन अन्तीं अकार होईल. तेव्हां यावरूनही मराठींत शब्दांच्या अन्तीं ऱ्हस्व इकार किंवा उकार कधींही असावयाचा नाहीं; तर अन्तीं दीर्घ ई–ऊ असेल, अथवा अकार असेल. जसें,—पद्धती, पद्धत; गती, गत; रिती, रीत; प्रीति, प्रीत; नीति, नीत; जाती, जात; मधू, मध; वस्तू, वस्त; इत्यादि.

**टीप २**—संस्कृतांत कित्येक प्रातिपदिकरूपें व्यंजनान्त असतात. परंतु तीं प्राकृतांतच अन्तींचें व्यंजन जाऊन स्वरान्त होतात. यामुळें मराठींत व्यंजनान्त शब्द नाहींत. संस्कृत व्यंजनान्त रूपें मराठींत अकारान्त समजावीं. मात्र मराठींत शब्दाच्या अन्तींच्या ‘ अ ’चा उच्चार करीत नाहींत. तथापि उच्चार होत नाहीं, म्हणून तो ‘ अ ’ स्वर अन्तीं नाहीं, असें म्हणून चालावयाचें नाहीं. कारण रूपें करितांना अडचण पडेल.

१२०. मराठींत प्रथमेच्या रूपाचे अन्त्य असे आहेत:—

( १ ) अकारान्त—तिन्ही लिंगी.

( २ ) आकारान्त—पुल्लिंगी आणि स्त्रीलिंगी.

( ३ ) ऱ्हस्व इकारान्त व उकारान्त—तिन्ही लिंगी. हीं मराठींत नवीन घेतलेलीं तत्सम प्रातिपादिकें आहेत. हीं त्यांना प्रथमेचें स्वरूप आल्यावर, दीर्घच होतात.

( ४ ) दीर्घ ईकारान्त व ऊकारान्त–तिन्ही लिंगी.

( ५ ) एकारान्त—यांची संख्या अगदीं थोडी आहे.

**टीप**—अकारान्त खेरीज सर्व नपुंसकलिंगी नामांच्या अन्तीं अनुस्वार असावयाचा. हें लक्षांत ठेवावें.

( ६ ) ऐकारान्त–हीं वास्तविक ईकारान्त मानावीं. जसें,—तिवै, तिवई, इत्यादि.

( ७ ) ओकारान्त–बायको, लाह्यो, डोह्यो, गोहो, वगैरे अगदीं थोडीं.

( ८ ) व्यंजनांन्त–हीं मूळचीं संस्कृत. मराठींत आल्यावर त्यांचा अन्त जाऊन अथवा त्यांत अ मिळून तीं स्वरान्तच होतात.

१२१. हे अन्त्य कसे बनले, याविषयीं **मराठी शब्दसिद्धि** या पुस्तकांत सविस्तर सांगितलें आहे. येथें त्यांचें व्याकरणापुरतें थोडक्यांत विवरण करूं:–

( १ ) मराठींत प्रत्येक प्रातिपदिक कोणतेंही विशेष कारण नसल्यास संस्कृतांतून किंवा प्राकृतांतून येतांना अकारान्त बनतें. यामुळें या अन्ताचीं तिन्ही लिंगी प्रातिपदिकें फार आहेत. यांना प्रथमेच्या एकवचनाचा प्रत्यय विसर्ग हा लावावयाचा, पण त्याचा प्राकृतांत आणि पुढें मराठींत लोप होतो. जुन्या मराठींत या विसर्गाचा झालेला ' ऊ ' किंवा ' ओ ' प्रथमेच्या एकवचनीं येतो. याबद्दल विभक्तिविचारांत सांगितलें आहे. अशा रितीनें प्रातिपदिक अकारान्त बनल्यावर त्याचे उपान्त्य ई-ऊ असल्यास दीर्घ असावयाचे; आणि अ-आ असल्यास त्यांचा उच्चार दीर्घ असावयाचा.

( २ ) प्रातिपदिकांचा अन्त्य ' आ '–कार अनेक कारणांनीं बनला आहे. यांतलें मुख्य कारण संस्कृतांत आणि प्राकृतांत पुष्कळ शब्दांच्या शेवटीं येणारा ' क ' हें आहे. या ' क ' चा ' अ ' होऊन मागलि अकाराबरोबर ' आ ' होतो. याचीं उदाहरणें,–घोटक, घोडा; कीटक, किडा; भल्लक, भाला; दीपक, दिवा; इत्यादि.

( अ ) स्त्रीलिंगाचा ' आ ' हा, संस्कृतांत ' आ ' हाच स्त्रीलिंगाचा प्रत्यय असल्यामुळें स्वाभाविकच आहे.

( आ ) शेवटीं ' य ' आहे अशीं नामें आकारान्त बनतात. उदा०— आश्रय=आश्रा, विक्रय=विक्रा; हीं क्वचित् अकारन्त आणि ऍंकारान्त नपुंसकलिंगीं बनतात. जसें,–देवालय=देवळ; श्वशुरालय=सासरें, इत्यादि.

( ३ ) संस्कृतांतील बरींच अकारान्त विशेषणें आकारान्त होतात. जसें,– अंध, आंधळा; काल, काळा; उंच, उंचा; बधिर, बहिरा; शुष्क, सुखा; इत्यादि.

(४) कुतरा, घोडा, बकरा, पारवा, ससा, वगैरे प्राणिवाचक नामें मराठींत आकारान्त पुल्लिंगी झालीं आहेत.

**टीप**—मराठींत 'आ' हा पुल्लिंगी प्रत्यय आहे, यामुळें हा अन्तींचा 'आ' उत्पन्न होतो.

(५) दीर्घ ईकारान्त व ऊकारान्त नामें प्राकृताच्या द्वारें मराठींत येतांना त्यांचे उपान्त्य स्वर 'इ' आणि 'उ' (ऱ्हस्व किंवा दीर्घ) होते. ते प्राकृत आणि देशी भाषा यांच्या पद्धतीप्रमाणें जोरदार होऊन त्यांच्यापुढें जे 'अ,' 'इ,' इत्यादि स्वर होते ते गेले, आणि मराठींत ही नामें दीर्घ ईकारान्त आणि ऊकारान्त बनलीं. उदाहरणार्थ,—मौक्तिकं, मोत्तिॕअं=मोतीं; पानीयं, पाणिॕअं=पाणी; वृश्चिक; विंच्छिॕओ=विंचू; वालुका, वालुॕ-आ=वाळू; भ्रातृकः, भाउॕअ=भाऊ; दीपकः, दीवॕअ=दिवा; इत्यादि. अशीं नामें मराठींत पुष्कळ आहेत. [शब्दसिद्धि पृ० १८, क० १९।२० पाहा.] (अ) संस्कृतांतील 'इन्' अन्ताचीं—नामें ईकारान्त बनतात. जसें,—हत्ती, माळी, स्वामी, गोसावी, साक्षी. (आ) 'ऋ' चें ई—जांवई; 'ऋ' चें ऊ—भाऊ, नातू, इ०. (इ) 'इय' किंवा 'ईय' याचें ई=पानीयं—पाणी; क्षत्रिय—खत्री.

(६) एकारान्त नामें मुख्यतः नपुंसकलिंगी (म्हणजे) ऍंकारान्त फार आहेत. हा ऍं—अन्त संस्कृत 'अ'—पासून किंवा शेवटच्या 'क' मुळें झाला. उदा०—करणं, करणिअं=करणअं=करणें; सुवर्ण, सुवर्णकं=सोनेंअं=सोनें; इत्यादि. नपुंसकलिंगी नामाचा अनेकवचनी 'ऍं' स्वर अशाच रितीनें आला.

**टीप**—नामाच्या अन्त्यासंबंधानें सामान्यरूपप्रकरणातील कलम ९७ हें याबरोबर वाचावें.

(७) व्यंजनात शब्दाच्या अन्त्याची व्यवस्था अशी करितातः—

(अ) ज्या शब्दांचे शेवटीं वत्, मत्, वस्, मस्, अन् किंवा इन् हीं अक्षरें असतात, ते मराठींत आले असतां त्याचें संस्कृतांतलि जें प्रथमेचें एकवचन तें मराठींतलें त्या नामाचें मूळरूप समजतात. अशा प्रथमेच्या रूपाच्या शेवटीं जर 'न्' असेल, तर त्याचा पूर्ण 'न' करितात. जसें,—बलवान, बुद्धिमान, श्रीमान, विद्वान, आत्मा, मेधावी, इ०.

( आ ) ज्यांच्या शेवटीं स् आहे अशा संस्कृत शब्दांसही वरील नियम लागेल. जसें,—दुर्वास, चंद्रमा, कृत्तिवासा, ( कृत्तिवासा गरा । न पी तरि कसें घडे हितकरा दयासागरा.--मोरोपंत. ) इ०. परंतु अन्तींच्या ' स '--चा लोप करूनही यांचीं मराठी रूपें करितात. जसें,--दुर्वास, कृतिवास, चंद्रम, नभ, इ०.

( इ ) इतर अन्तांचे व्यजनान्त शब्द मराठींत आले असतां त्यांच्या अन्त्य व्यंजनांत ' अ ' ( अनुच्चारित ) मिळवून त्यांस स्वरान्त करून घेतात. जसें,—उपानह, शरद, इ०.

१२२. वरील विवेचनावरून दिसून आलेंच असेल कीं, मराठी भाषेंत प्रातिपदिकांच्या अन्तीं ऱ्हस्व स्वर असणार नाहीं. परंतु संस्कृतांतून आलेलीं जीं ऱ्हस्व इकारान्त व उकारान्त नामें, त्यांचे अन्तींचा स्वर प्रथमेच्या दोन्ही वचनीं ऱ्हस्वच लिहितात. जसें,—रवि, कवि, मति, बुद्धि, भानु, धेनु, इ०.

( अ ) त्याचप्रमाणें विद्वान्, बुद्धिमान्, श्रीमान्, वगैरे संस्कृतांतले व्यंजनान्त शब्दहि मराठींत तसेच लिहिण्याची चाल पडली आहे.

**टीप**—ही गोष्ट केवळ प्रघात पडला आहे, म्हणून करावयाची आहे. या चमत्कारिक नियमानें भाषा शुद्ध लिहूं इच्छिणारांना आणि विशेषतः विद्यार्थ्यांना फार त्रास पडतो. यासाठीं विद्वान लोकांनीं विचार करून योग्य व्यवस्था लौकर करावी हें बरें.

१२३. मराठींत शब्दाच्या शेवटीं 'अ' असेल, तर त्याचा उच्चार तीन प्रकारांनीं होतोः—

( १ ) संस्कृतांतल्याप्रमाणें पूर्ण ' अ. ' जसें,—गृह, बुध, शुभ, रात्र, गात्र, पात्र, स्थिर, नृप, इ०.

**टीप**—हा उच्चार मराठींत विशेष प्रचारांत आले नाहींत अशा थोड्या संस्कृत शब्दांत मात्र होतो. या वेळीं त्यांचा उपान्त्य अस्वरित मानितात.

( २ ) शुद्ध मराठी शब्दांत तो तितका पूर्ण होत नाहीं; बराच तोकडा होतो. याला अर्धोच्चरित ' अ ' म्हणावें. जसें,—काम, घर, धाम, चाल, हाल, नगर, मगर, विटाळ, किटाळ, इ०.

( ३ ) परभाषेंतून आलेल्या शब्दांच्या शेवटल्या ' अ ' चा उच्चार बहुधा

मुळींच करीत नाहींत. याला अनुच्चारित. ' अ ' म्हणावें. जसें,—सरकार्, दरबार्, जमीन्, वस्ताद्, इ०.

१२४. शब्दाच्या अन्तींचे स, श, च, ज आणि झ यांविषयीं:—

( अ ) ' स् ' च्या पुढें इ किंवा ई स्वर आला असतां त्याचा श् होतो. जसें,--असा, अशी, कसा, कशी; जसा, जशी; इ०. विभक्तिप्रत्यय लावून पुल्लिंगी आणि नपुंसकलिंगी रूपें करितांना 'सा'--चा शा होतो. जसें,---कशाला, अशाला, सशानें, फांशानें, माशास, इ०.

**टीप**—ससे, मासे, फांसे यांचा उच्चार क्वचित् सशे, माशे, फांशे असाही करितात.

( आ ) च्, ज्, आणि झ् यांचे तालव्य [ संस्कृताप्रमाणें ] व दंततालव्य [ मराठीप्रमाणें ] असे दोन उच्चार मराठींत चालू आहेत. हे उच्चार करण्याचे सामान्य नियम असे आहेत:—

( १ ) च्, ज्, व झ् यांचेपुढें इ, ई हे स्वर आले असतां किंवा य आला असतां त्यांचा तालव्या उच्चार होतो. जसें,--चिखल, चीत, चिपाड, चिपळूण, चिमणी, चिटपांखरूं, जिवाणूं, जिना, जिनगर, झिरपणें, झिंगणें, त्याच्या, माझ्या, इ०.

( २ ) त्यांच्यापुढें ए हा स्वर आला असतां त्यांचा दोन्ही प्रकारचा उच्चार होतो. परंतु साधारण नियम असा कीं, ते शब्दाच्या आरंभीं आले असतां त्यांचा उच्चार तालव्य, व मध्यें किंवा अन्तीं आले असतां तो दंततालव्य होतो. उदा०—चेकाळणें, जेवण, झेलणें, इत्यादि यांत तालव्य; आणि रजेवर, टांचेशीं आमचें, माझें, त्याचें, इत्यादि यांत दंततालव्य.

( ३ ) ' जे ' या कर्मणि प्रत्ययाचा उच्चार तालव्य होतो. जसें,—करिजे, पाहिजे, इ०.

( ४ ) च्, ज्, झ्, यांच्यापुढें वरच्याशिवाय दुसरा कोणताही स्वर असतां त्यांचा दंततालव्य उच्चार होतो. जसें,—चढाव, चूल, चुना, चूक, चाल, चोर, चोपडी, जोर, जूग, जोडा, चौरंग, चौफेर, इ०.

(५) च्, ज्, झ्, हे जर शब्दांच्या शेवटीं असले, तर त्यांचा उच्चार दंततालव्य असतो, हें वर सांगितलेंच आहे; पण त्या शब्दांचें सामान्यरूप झालें म्हणजे तो तालव्य होतो. जसें,–चमचा, राजा, माचा, इत्यादि, यांचा दंततालव्य; चमचास, राजास, माचास, इत्यादि, यांचा तालव्य.

**टीप**—'छ्' या अक्षराचा मराठींत दंततालव्य उच्चार करीत नाहींत; कारण तसा उच्चार करणें थोडेंसें अवघड जातें. ज्यांत 'छ' आहे असा संस्कृत शब्द मराठींत आणतांना 'छ' चा 'स' करितात. **उदा०**— कच्छप–कांसव.

१२५. अकारान्त शब्दांशिवाय बाकीच्या सर्व शुद्ध मराठी नपुंसकलिंगी शब्दांच्या अन्त्याक्षरावर अनुस्वार द्यावा. जसें,—सोनें, दहीं, मोतीं, करडूं, इ०. पाणी, लोणी, चिंचवणी, इत्यादि कांहीं शब्दांचे अन्त्यांवर आपण अनुस्वार देत नाहीं; परंतु सर्व नपुंसकलिंगी नामांचे संबंधानें जो सामान्य नियम दिसतो, त्याला हेच तीन शब्द अपवादक मानण्यास कांहीं योग्य कारण दिसत नाहीं, व ऐतिहासिकदृष्ट्या तो अनुस्वार योग्य दिसतो. यासाठीं ते शब्द लिहितांना सानुस्वार लिहावे हें बरें. हा नियम शुद्ध संस्कृत शब्दांना लागू नाहीं. जसें,– दधि, वारि, अस्थि, इ०.

**१२६. अन्तींचा अनुस्वारः**—(१) मराठींत अकारान्त शिवाय करून बाकी सर्व नपुंसकलिंगी शब्दांचे शेवटच्या अक्षरावर अनुस्वार असतो. त्याचप्रमाणें पुष्कळ नामांच्या व क्रियापदांच्या रूपांत अन्त्याक्षरावर आपण अनुस्वार देतों. उदा०—हरीनें, रामानें, घरीं, होतों, करीं, जाईं, बोलूं, इ०. हा अनुस्वार काढून टाकावा, असें म्हणणारे कांहीं लोक आहेत; कारण, त्यांचें म्हणणें असें कीं, त्या अनुस्वाराचा चांगला उच्चार होत नाहीं.

(२) आतां यांपैकीं बरेच अनुस्वार मूळ संस्कृतामधून आलेले आहेत. व बरेच प्राकृतांतून मराठींत आलेले आहेत. म्हणून ते नाहींतसे करितां येणार नाहींत. जर कांहीं लोक अनुस्वाराचा उच्चार करीत नसतील, किंवा त्यांना तो नीट करितां येत नसेल, तर तो कांहीं भाषेचा दोष नव्हे. भाषेच्या व्यवस्थे-करितां जर त्यांची आवश्यकता आहे, तर जरी कांहीं लोकांना त्यांचा उच्चार करितां येत नसला, तरी ते कायम ठेवले पाहिजेत.

( ३ ) आतां असा प्रश्न उभा राहतो कीं, या अन्त्य अनुस्वारानें काय कार्य होतें? कांहीं विशेष कार्याकरितां तो घातलेला आहे किंवा काय? कीं कांहीं लोकांना वेळीं अवेळीं त्याचा उपयोग करण्याची खोड लागलेली आहे, एवढेंच याच्या अस्तित्वाला कारण आहे? अकलुषित मनानें जर आपण या गोष्टीचा विचार केला, तर आपल्या असें लक्षांत येईल कीं, निदान अन्त्य अनुस्वार हा निष्कारण नाहीं.

( ४ ) उपान्त्य अक्षर साघात उच्चारण्याची प्राकृत भाषेची व त्याचप्रमाणें देशी भाषांचीही वहिवाट आहे. अशा स्थितींत शब्दाच्या अन्तीं जर स्वर असेल, तर तो गाळतात, आणि मग मूळचें उपान्त्याक्षर अन्त्य होतें. किंवा कधीं कधीं अन्त्य स्वराचा अनुच्चारित ‘ अ ’ होतो.

( ५ ) अन्त्य स्वरांत बदल होण्याचा हा क्रम जर अव्याहत चालू असता, तर मराठींतील सर्व शब्द, मग ते पुल्लिंगी, स्त्रीलिंगी किंवा नपुंसकलिंगी असोत, अकारान्त झाले असते. असें होणें अर्थात् कोणत्याही दृष्टीनें इष्ट नाहीं. बोलणाराच्या मनांत निदान नपुंसकलिंगी नामांचें तरी भिन्नत्व दाखवावयाचें असतें. म्हणजे इतर नामांपासून तीं चटकन ओळखतां यावीं, असा त्याचा हेतु असतो. पुष्कळ स्त्रीलिंगी नामांसंबंधानें असेंच झालें आहे. मराठींत अकारान्त स्त्रीलिंगी नामें सुमारें २७०० आहेत. त्यांतलीं बरींच मूळचीं इ–ईकारान्त, उ–ऊकारान्त किंवा आकारान्त होतीं. सामान्यरूपासाठीं या शब्दांचें वर्गीकरण करणें फार कठीण जातें. कारण कांहींचें सामान्यरूप ईकारान्त होतें, कांहींचें एकारान्त होतें व कांहींचें दोन्ही प्रकारांनीं होतें. हे शब्द जरी हल्लीं अकारान्त आहेत, तरी सामान्यरूप होतांना त्यांचा मूळचा अन्त्य स्वर पुन्हां परत येतो, व त्याप्रमाणें त्यांचें रूप होतें.

( ६ ) संस्कृतांत नपुंसकलिंगी नामाच्या प्रथमेच्या एकवचनाच्या शेवटीं बहुधा अनुस्वार असतो. तो प्राकृतांतही कायम राहातो. प्रथमेच्या अनेक वचनाचा संस्कृतांतील प्रत्यय ‘ आनि ’ हा आहे. तो प्राकृतांत ‘ आइं ’ असा होतो. म्हणून नपुंसकलिंगी नामांत अन्त्य अनुस्वार स्वाभाविक रीतीनें येतोच; व अन्त्य स्वराला स्थैर्य यावें म्हणून तो कायम ठेविलेला आहे. तेव्हां ही गोष्ट स्पष्ट होते कीं, मराठी शब्दांतील अन्त्य अनुस्वार हा, त्या शब्दाच्या अन्त्य

स्वराला स्थैर्य आणण्याकरितां ठेविलेला असतो, व म्हणून तो फार उपयोगी आहे.

( ७ ) याच कारणासाठीं प्राकृतांत क्रियापदांच्या कांहीं रूपांवर अनुस्वार दिलेला असतो, व तो देशी भाषांतही आलेला आहे. हा अनुस्वार निरनिराळीं रूपें ओळखण्याला फार उपयोगी पडतो. उदा०—करितों, प्रथम पुरुषाचें एकवचन; करितो, तृतीय पुरुषाचें एकवचन; करीं, प्र० पु० ए० व०; करी, तृ० पु० ए० व०; गेलें, तृ. पु. ए. व. ( नपुंसकलिंगी ); गेले, तृ. पु. अ. व. ( पुल्लिंगी ); इ.

( ८ ) अन्त्य स्वर नाहींसा करण्याची देशी भाषांची प्रवृत्ति पुढील उदाहरणावरून दिसून येईल. 'हरीनें' 'केलें' अशा रूपांतलि 'ए' काढून टाकण्याचा प्रयत्न कोंकणी लोकांत दिसून येतो. ते "हरीन् काम केलन् किंवा केलान् ," असें म्हणतात. हा अनुस्वार जर नसता तर हींच रूपें 'हरीन्' व 'केलन्' अशीं केव्हांच कायम होऊन बसलीं असतीं. देशावरलि लोक अनुस्वाराचा उच्चार नीट करीत नाहींत. 'हरीनें' व 'केलें' हे शब्द त्यांच्या बोलण्यांत 'हरीनं' व केलं' असे येतात. याचें कारण 'ए' चा उच्चार तर झाला पाहिजे, आणि अनुस्वाराचा उच्चार नीट साधत नाहीं. पण अनुस्वार अगदीं विसरून जाणें फार कठीण असल्यामुळें ते शब्दाच्या शेवटचा 'न' चा व 'ल' चा सानुनासिक पण फार तोकडा उच्चार करितात. आणि मग ते शब्द, 'हरीनं' व 'केलं,' असे लिहितात. नाटकांतील पात्रांच्या तोंडीं जी व्यावहारिक म्हणून भाषा घातलेली असते, तींत अशीं रूपें लिहितात.

( ९ ) ज्या रूपाच्या शेवटीं अनुस्वार आहे अशा रूपाला आणखी एखादा प्रत्यय जोडावयाचा असला, म्हणजे अनुस्वार काढून टाकतात. यावरून अनुस्वाराचा उपयोग अन्त्य स्वर कायम ठेवण्याकडेस होतो हें सिद्ध होतें. उदा०-धोत्रांनीं, धोत्रांनिशीं; मी करीं, मी करीन; इ०.

( १० ) अनेक शब्दांच्या शेवटचे ई, ऊ, ए आणि ओ हे स्वर सोईकरितां भाषेंत पाहिजे आहेत; पण ते नाहींतसे होण्याचा संभव असतो. तेव्हां जणूं काय, त्यांच्यावर नजर ठेवण्याकारितांच अनुस्वार हा एक पहारेकरी ठेविलेला आहे.

## ( २ ) उपान्त्य अक्षराविषयीं.

१२७. मराठींत उपान्त्याक्षराच्या स्वराविषयीं असा सामान्य नियम आहे कीं, शब्दाच्या अन्तीं 'अ' असून उपान्त्यक्षरांत इकार किंवा उकार असल्यास तो दीर्घ असतो. उदा०—मीठ, पीठ, धीट, चीट, वीट, रीत, चूल, फूल, कूळ, मूल, पीर, तारीख, उदीम, कापूर, तपकीर, कऊल, देऊळ, कोशिंबीर, कोथिंबीर, इ.

१२८. या मराठींतल्या नियमाप्रमाणें संस्कृतांतून घेतलेले मराठी शब्द यांचे अन्तीं 'अ' असतां त्यांचा उपान्त्य 'इ' किंवा 'उ' दीर्घच समजला पाहिजे. परंतु ते स्वर संस्कृताप्रमाणें ऱ्हस्व लिहिण्याची चाल पडली आहे. ही मराठींतल्या पद्धतीला आणि उच्चाराला विरुद्ध असल्यामुळें पुष्कळ लोक अशा शब्दांतील उपान्त्य इ–उ मराठींतल्या उच्चाराप्रमाणें दीर्घ लिहितात. अशा शब्दांचीं उदाहरणें,—गुण, हित, विहित, स्मित, प्रिय, प्रचुर, पुरुष, विपुल, पुर, वरुण, विष, मिष, आमिष, विदुर, सन्निध, हरिण, मंदिर, चतुर, गरुड, शकुन, अंकुर, इत्यादि.

१२९. संस्कृत भाषेत 'अ' हा ऱ्हस्व स्वर व 'आ' हा त्याचा दीर्घ स्वर आहे, असें मानितात. पण 'ई' आणि 'उ' या स्वरांना जसे ऱ्हस्व व दीर्घ असे दोन उच्चार आहेत, तसेच 'अ' या स्वराचे मराठींत दोन उच्चार होतात. उदा० कागॅद, गवॅत, खबॅर, बखॅर, जवॅळ, परॅत, इत्यादि. या शब्दांतील उपान्त्य 'अ' चा उच्चार दीर्घ आहे. तथापि या शब्दांना विभक्तिप्रत्यय लागून अन्त्य 'अ' दीर्घ झाल्यास उपान्त्य 'अ' च्या उच्चारास ऱ्हस्वत्व येतें. उदा०—गॅवतास, कॅागदानें, पॅरतून, जवळॅचा, इ०.

१३०. शब्दाच्या अन्तींचा स्वर जर दीर्घ असला, किंवा अन्तीं संयुक्त अक्षर असलें, किंवा उपान्याक्षर सानुनासिक असलें, तर उपान्त्य इकार किंवा उकार ऱ्हस्व असतो. व उपान्त्य स्वर जर 'अ' असेल तर त्याचा उच्चार ऱ्हस्व होतो. उदा०—चुली, कोशिंबिरी, समजुती, सोयरिका, मुरकुटें, पुष्ट, गुद्दा, चिंच ( चिन्च ), खुंट ( खुण्ट ), बंब ( बम्ब ), मिंधा ( मिन्धा ), गलबतें, सक्त, इ०.

१३१. मराठींत नामाला कोणताही प्रत्यय लावतांना त्याच्या अन्त्य स्वराला

दीर्घत्व येतें; मग उपान्त्य स्वर ऱ्हस्व करावा लागतो. विशेषेंकरून उपान्त्य ‘ ई ’ आणि ‘ ऊ ’ हे स्वर अशा रीतीनें ऱ्हस्व होतात. उदा०—कापूर, कापुरास, कापरास; बटीक, बटिकीस, बटकीस; मीठ, मिठास; समजूत, समजुतीस; उदीम, उदिमाचा; तारीख, तारिखेस, तारखेस; इ०.

१३२. या उपान्त्याच्या फेरफारसंबंधाचे साधारण नियम असे आहेतः—

( १ ) अकारान्त शब्दाचें उपान्त्य अक्षर जर ईकारयुक्त किंवा ऊकारयुक्त असेल, तर अन्त्य अकाराला दीर्घत्व आलें असतां किंवा त्याचे जागीं कोणताही दीर्घ स्वर आला असतां उपान्याचा स्वर ऱ्हस्व होतो किंवा त्याचे जागीं ‘ अ ’ येतो; आणि उपान्त्य वर्ण जर फक्त ‘ ई ’ किंवा ‘ ऊ ’ असेल तर त्याचे जागीं अनुक्रमें ‘ य ’ किंवा ‘ व ’ होतो. उदा०—उंदीर, उंदिरास, उंदरास; कोशिंबीर, कोशिंबिरीस, कोशिंबरीस; ताईत, ताइतास, तायतास; कऊल, कउलास, कवलास; इ०.

( २ ) दोन अक्षरी शब्द असेल, तर त्याचा उपान्त्य ‘ ई ’ किंवा ‘ ऊ ’ हा स्वर फक्त ऱ्हस्वच होतो. उदा०—मीठ, मिठास; चूल, चुलीस; पीठ, पिठास; धूर, धुराचा; इ०.

( ३ ) त्र्यक्षरी शब्द असून उपान्त्य ‘ ई ’ किंवा ‘ ऊ ’ याच्यापूर्वी जोडाक्षर किंवा हकार असेल, तर तेथेंहि उपान्त्य स्वर ऱ्हस्वच होतो. उदा०—भक्तीण, भाक्तिणीनें; विहीण, विहिणीचा; विहीर, विहिरीचा; बहिण, बहिणीला; माहूत, माहुतास; इ०.

( ४ ) पण अशा शब्दांतील उपान्त्य ‘ ई ’ किंवा ‘ ऊ ’ यांच्यापूर्वी जर जोडाक्षर किंवा हकार नसेल, तर तो उपान्त्य स्वर ऱ्हस्व होतो किंवा त्याचे जागीं ‘ अ ’ येतो. उदा०—परीट परिटास, परटास; लांकूड, लांकुडानें, लांकडानें; कणीक, कणिकेचा, कणकेचा; इ०.

**टीप**—चाळीस, पापीण, गांधीण, जरूर, वकूब, वसूल, हे शब्द अपवादक आहेत. हे तिसऱ्या नियमाप्रमाणें चालतात. पण ‘ चाळीस ’ याचीं ‘चाळशी’ व ‘चाळिशी’ अशींही रूपें होतात.

( ५ ) शब्द चार किंवा अधिक अक्षरांचा असून त्यांतील उपान्त्य अक्षराचे पूर्वीचें म्हणजे शेवटाकडून तिसरें अक्षर जर ऱ्हस्व असलें, तर उपान्त्य ‘ ई ’

किंवा 'ऊ' ऱ्हस्व होतो. उदा०—परटीण, परटिणीस; परभीण, परभिणीचें; जांचणूक, जांचणुकीनें; इ०. परंतु उपान्त्य अक्षराचे मागील म्हणजे शेवटाकडून तिसरें अक्षर जर दीर्घ असेल, तर चार किंवा अधिक अक्षरांचें शब्दामध्यें उपान्त्य 'ई' चा 'अ' होतो, व उपान्त्य 'ऊ' ऱ्हस्व होतो. उदा०—मराठीण, मराठणीस; सुतारीण, सुतारणीनें; धुमाकूळ, धूमाकुळींत; इ०.

**टीप**—जुन्या ग्रंथांत व कवितेंत या नियमांविरुद्ध रूपें आढळतील, परंतु चालू भाषेत हे नियम पाळलेले दिसून येतात.

१३३. या नियमांचीं आणखी उदाहरणें पुढें दिलीं आहेतः—

( १ ) ज्यांचा उपान्त्य 'ई' ऱ्हस्व होतो किंवा त्या 'ई'-बद्दल 'य' होतो अशीं नामें:—

आईन ( आइनास–आयनास ).

| | | |
|---|---|---|
| आईस | कुईट | बाईल |
| कवाईत | शाईर | सुईण |
| काईल | ताईत | हिमाईत |
| कुईरी | बिछाईत | पंचाईत इ०. |

( २ ) ज्यांचा उपान्त्य 'ई' स्वर ऱ्हस्व होतो, किंवा त्या 'ई'–चा 'अ' होतो अशीं नामें:—

उदीम ( उदिमास–उदमास. )

| | | | |
|---|---|---|---|
| आठीळ | उडीद | उंडीण | उंदीर |
| कणीक | कणीस | कथील | कमळीण |
| कार्मीण | कावीळ | कांतीण | कांबीट |
| काळीज | कुसळीण | कुंटीण | कोथिंबीर |
| कोशिंबीर | खारीक | खोगीर | गोचीड |
| जिलीब | जोखीम | तखील | ताजीम |
| तारीख | तालीम | तिडीक | तिरीप |
| बटीक | भरीत | भावीण | भोरीप |
| रेशीम | लेजीम | शेतीक | सुगरीण |

( ३ ) ज्यांचा उपान्त्य 'ऊ' ऱ्हस्व होतो ते शब्द:—

अंकूर—( अंकुरास )

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अमसूल | असूड | गारूड | चाहूर | चिरूट | जागरूक |
| बकूळ | मजूर | माजूम | माहूत | वारूळ | विभूत |

( ४ ) ज्यांचा उपान्त्य ऊ ' ऱ्हस्व होतो किंवा त्याबद्दल ' व ' होतो, असे शब्दः—

अऊत—( अउतास, अवतास ),

| | | | | |
|---|---|---|---|---|
| कऊल | देऊळ | पाऊस | बाऊल | शिऊळ |
| दऊत | पाऊल | बाऊट | राऊळ | साऊळ |

( ५ ) ज्यांचा उपान्त्य ' ऊ ' ऱ्हस्व होतो किंवा त्याबद्दल ' अ ' होतो, असे शब्दः—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| इटकूर | काहूक | कापूर | कुडूक | कुलूप | कुसरूड |
| खरूज | खांडूक | घुंगरूड | चुणूक | चेटूक | जांबूळ |
| जुगूळ | जुलूम | झुडूप | टेंगूळ | ठाकूर | ढेंकूण |
| तादूक | तांदूळ | निंबूळ | परूस | पुरूळ | पेटूल |
| पेंडूक | बाटूक | बापूस | बाभूळ | बुडूख | बुरूज |
| बुरूम | बेडूक | बोटूक | बोंडूक | भोरूप | माणूस |
| मुंगूस | मुरूम | मेडूक | मेकूड | रेडूक | लसूण |
| लांकूड | लालूच | लेंडूक | वाघूळ | वालूक | शेंदूर |
| शेंपूट | शेंबूड | साबूण | हडूक | हुकूम | खजूर |

**टीप**—मराठींत आलेले संस्कृत व परभाषेंतील शब्द यांना हे नियम लागू होत नाहींत. त्या शब्दांपैकीं जे भाषेंत विशेषसे प्रचारांत नाहींत, त्यांचें उपान्त्याक्षर जसेंच्या तसेंच राहातें. उदा०—गीत, गीतें; सूत्र, सूत्रें; मयूर, मयूरास; भीम, भीमास; मीन, मीनास; दीन, दीनाला; अमीर, अमीरास; मुनीम, मुनीमानें; इ०. पण जे शब्द भाषेंत येऊन विशेष प्रचारांतले झाले आहेत, त्यांचें उपान्त्य ऱ्हस्व होतें, किंवा विकल्पेंकरून तसेंच राहातें. उदा०—रीत—रितीस, रीतीस; रूप—रूपास, रुपास; जीव—जिवाला; जामीन—जामिनास; वकील—वकिलास; इ०.

**टीप**—या शब्दांचे संबंधानें ऱ्हस्व व दीर्घ असे दोन्ही प्रकार कांहीं दिवस चालू राहून ते जसे जसे ज्यास्त प्रचारांत येत जातील. तसतसे ते इतर शब्दांप्रमाणें सामान्य नियमांखालीं येतील हें उघड आहे.

१३४. हे नियम साधारणपणें प्रचलित मराठींतही गद्यपद्यांत त्याचप्रमाणें जुन्या भाषेंतही पाळतात. पण जुन्या मराठी भाषेंत जीं शब्दांचीं रूपें आढळतात, त्यांवरून उपान्त्य अक्षरांसंबंधानें आणखी कांहीं नियम बांधितां येतात. ते असेः—

(१) शब्दाचें अन्त्याक्षर 'र,' 'ळ,' किंवा 'ल,' असून व उपान्त्य अक्षर च–वर्गांतलें नसून अकारान्त असलें, तर उपान्त्य 'अ' च्या जागीं 'उ' किंवा 'ऊ' येतो. उदा०—लेंकरें, डिखळ, बगळा, विरळ, धाकला, चांगलें,आपला, इत्यादि शब्दांचीं रूपें, लेंकुरें, डिखूळ, बगुळा, विरुळा, धाकुला, चांगुलें, आपुला, अशीं होतात. जसें,—

'लेंकुरें उदंड झालीं । तों ते लक्ष्मी निघोनी गेली.
बापुडीं भिकेसि लागलीं । कांहीं खावया मिळेना.'
'बाळामंत्र बगुळामंत्र । काळीमंत्र किंकाळीमंत्र.'
'निःशेष कामनारहित । ऐसा तो विरुळा संत.'
'गुण म्हणजे हें हें चांगुलें । हें हें ओंगळ, तें तें दूषिलें.
'येणें रीतीं जीवें कल्पिलें । गुणदोषात्मक.'

(२) शब्दाचा अन्त्य वर्ण 'र,' 'ळ' किंवा 'ल' असून उपान्त्य अक्षर अकारान्त व चवर्गांतलें असेल, तर उपान्त्य 'अ'–च्या जागीं 'इ' किंवा 'ई' हा स्वर येतो. जसें,–कुश्चळ, साजरा, गोजरा, कुचर, या शब्दांचीं रूपें, कुश्चिळ, साजिरा गोजिरा, कुचिर–कुचीर अशीं होतात. उदाः—

'जन्म होंचि अतिकुश्चिळ । नरकपतन.'
'ऐशिया कुचीर शिष्यासी । उपेक्षितां दोष नाहीं गुरूसी.'
'पाहा, पाहा, डोळेभरी । मूर्त सांवळी गोजिरी.'

(३) शब्दाचे शेवटीं, 'र,' 'ळ' किंवा 'ल' असून उपान्त्य वर्ण 'ह' असेल, तर 'ह'–च्या अकाराचा ओकार होतो. जसें,–मोहरा, मोहोरा; डोहळा, डोहोळा; वोहळें, वोहोळें; इ०. उदा०—

'परि ते सरिता मिळणीमागें । वोहोळ ऐसें मानिजे जगें.'
'सकळ सोहोळा जाहलियावरी । गौरवी निर्धारीं राम सर्वां.'
'म्हणे सुमित्रा, करुनि कृपा हा पुरवावा डोहोळा.'

( ४ ) शब्दाच्या शेवटीं 'र,' 'ळ' किंवा 'ल' असून त्याच्यामागें 'य' असेल, तर त्या ' य '-च्या जागीं ' इ ' किंवा ' ई ' हा स्वर येतो. जसें,—सोयरा, सोईरा; पायरी, पाइरी; कायली, काइली इ०. उदा०—

' मैंद सोइरीक काढिती । फांसे घालून प्राण घेती. '

' देवद्वारीं पडशाळा । पाइरीया दीपमाळा. '

( ५ ) शब्दाचें अन्त्याक्षर टवर्गांतलें असून उपान्त्याक्षर अकारान्त व चवर्गांतलें असलें, तर उपान्त्य ' अ '-च्या जागीं 'इ' किंवा 'ई' हा स्वर येतो; व उपान्त्याक्षर अकरान्त असून चवर्गांतलें नसलें, तर ' अ '-च्या जागीं ' उ ' किंवा ' ऊ ' येतो. जसें,—गोचड, गोचीड; बोजड, बोजीड; धाकटा, धाकुटा; वांकडा, वांकुडा; बापडा, बापुडा, आंखडणें, आंखुडणें; इ०.

( ५ ) उपान्त्य र् ( रेफ ) असेल तर त्याचा ' रु ' किंवा ' रू ' होतो. जसें,—हर्ष, हरुष ( ख ); मार्ग, मारूग; पर्ता, परुता; तुर्क, तुरूक; दर्शन, दरुशन; इ०. उदा०—

' हरुषें डोले वैकुंठपीठ । सुखें नीळकंठ तांडव नाचे. '

' शतवरुषें अनावृष्टी । तेणें संहारे जीवसृष्टी. '

' आपण तुरूक गुरू केला । शिष्य चांडाळ मेळविला. '

' आजि भाग्यें मी सभाग्यपूर्ण । लाधलों तुमचें दरुशन. '

## ( ३ ) स्वराघात.

१३५. एकापेक्षां अधिक अक्षरांचा शब्द उच्चारतांना त्याचीं सर्व अक्षरें आपण सारख्या जोरानें उच्चारीत नाहीं; तर त्यांतील कांहीं अक्षरांचा उच्चार आपण विशेष जोर देऊन करितों. कोणत्याही शब्दांतील विशेष अक्षरांवर हा जो जोर बसतो, त्याला **स्वराघात** किंवा **स्वर** असें म्हणावें.

१३६. ( १ ) मराठींत एकापेक्षां अधिक अक्षरांचे जे शब्द आहेत, त्यांतील प्रत्येकाच्या कोणत्या तरी अक्षरावर हा स्वराघात येतोच. बहुधा संयुक्त व्यंजनाचे मागील अक्षराचा उच्चार साघात होतो. त्याचप्रमाणें दोन किंवा तीन अक्षरी शब्द असला, म्हणजे त्याचें उपान्त्याक्षर स्वरित असतें.

( २ ) तिहींपेक्षां ज्यास्ती अक्षरांचा शब्द असल्यास त्याचीं एकापेक्षां अधिक अक्षरें स्वरित असतात. पण प्रत्येक शब्दाचें उपान्त्याक्षर स्वरित असतेंच.

( ३ ) शब्दाच्या शेवटीं आ, ई, किंवा ऊ असेल तर उपान्त्यक्षराचा स्वर दीर्घ असूनही अन्त्याक्षरावर जोर येतो. अशा शब्दांच्या उपान्त्यक्षराचा स्वर ऱ्हस्वही असतो. जसें,—सुरी, धुरी, पुरी, बरी, धुरा, पुरा, विठू, मथू, इ०.

**टीप**—या शब्दांचीं जीं अन्त्याक्षरें आहेत तीं मूळचीं उपान्त्य होतीं; व त्यांच्यापुढें स्वर होते. पण ते स्वर नाहींतसे होऊन मूळचीं उपान्त्याक्षरें अन्त्य झालीं. उदा०—मोतीअं=मोतीं; मत्तीआ, माती; वालुआ, वाळूआ, वाळू; इत्यादि. [ शब्दसिद्धि पृ० १८, क० १९ पाहा. ]

( ४ ) स्वरित अक्षरांत जर 'इ'-कार किंवा 'उ'-कार असेल, तर तो नेहमीं दीर्घ असतो, व 'अ' कार किंवा 'आ' कार असेल, तर त्याचा उच्चार नेहमींपेक्षां लांब होतो. शब्दाचे शेवटीं जोडाक्षर असेल, तर उपान्त्याक्षराचा स्वर दीर्घ असतोच असें नाहीं, पण त्या अक्षरावर स्वराघात येऊन तें जोरानें उच्चारतात. जसें—वृद्ध, बद्ध, पुष्ट, पिंड, रुंद, कुंड, कुष्ठ इत्यादि. [ पुढें ( ६ ) पाहा. ]

**टीप**—हा नियम शुद्ध मराठी शब्दांत नेहमींच लागू पडत नाहीं. जसें,— तुँझ्या, तुँम्ही, इ०.

( ५ ) कधीं उपान्त्य आणि अन्त्य या दोन्ही अक्षरांचा स्वर 'अ' किंवा 'आ' असतो, किंवा उपान्त्य आणि त्याच्या मागील अक्षर या दोहोंचा स्वर 'अ' किंवा 'आ' यांशिवाय असून तो दीर्घ असतो किंवा त्याला गुरुत्व येतें. अशा शब्दांत एकापेक्षां अधिक अक्षरें साघात असतील, तरी पण उपान्त्य हेंच मुख्य स्वरित अक्षर असतें. जसें,—वरकंड, वरंण, निरूपंण, नगीरा, इ०.

( ६ ) छंदःशास्त्राप्रमाणें ऱ्हस्व स्वराचेपुढें जोडाक्षर आलें म्हणजे तो स्वर दीर्घ मानितात किंवा त्याला गुरुत्व आलें असें म्हणतात. उदाहरणार्थ,—निष्ठा, पुत्र व वृद्ध या शब्दांतील उपान्त्याक्षरें दीर्घ मानावयाचीं.

( ७ ) विशेषण, कोंनाडा, इत्यादि कांहीं शब्दांत उपान्त्याच्या मागील अक्षरावर स्वराघात येतो; पण अशा शब्दांचीं सामान्य नियमाप्रमाणें उपान्त्याक्षरेंही स्वरित असून त्यांचा विशेषंण, कोनोंडा असाही उच्चार होतो.

(८) पुढील शब्दांतील अधोरेखित अक्षरें स्वरित आहेत:—कोशिंबीर, तसबीर, रीत, विश्वामित्र, कुत्रा, रथ, संतोष, कऊल, विजार, विभक्ति, पुत्र, विशेषण किंवा विशेषण, कोनाडा किंवा कोनाडा, सुरी, गिरी, पिडा किंवा पीडा, स्वातंत्र्य, निशाण, विलक्षण किंवा विलक्षण, जगन्नाथ किंवा जगन्नाथ, इ०.

(९) शब्दाचा उच्चार स्पष्टपणें व्हावा म्हणून या स्वराघाताची योजना आहे. शब्दापुढें कोणचाही प्रत्यय लाविला, म्हणजे तो प्रत्यय ऐकणारास स्पष्ट-पणें ऐकूं जाणें इष्ट असतें. याकरितां शब्दाच्या शेवटच्या अक्षरावर जोर द्यावा लागतो; आणि तो जोर देतां येण्यास त्या अक्षराचा स्वर दीर्घ पाहिजे. जर तो मूळचा दीर्घ नसेल तर त्याला दीर्घत्व आणावें लागतें. नामाला प्रत्यय लावण्या पूर्वी त्याचें जें सामान्यरूप करावें लागतें, किंवा त्याच्या अन्त्याक्षरांत जो बदल करावा लागतो तो याच कारणामुळें होय.

(१०) अन्त्याक्षर ऱ्हस्व असल्यास दीर्घ होतें; तें मूळचें दीर्घच असेल तर तें तसेंच राहतें; किंवा शेवटच्या अक्षराचा उच्चार स्पष्टपणें व जोरानें व्हावा याकरितां त्या अक्षरांत जरूर व योग्य असेल तो फेरफार करितात. उदा०— बाप, बापा–,हरि, हरी–,घोडा, घोड्या–,माता, माते–,इ०.

(११) स्वराघात सामान्यपणें शब्दाच्या उपान्त्यावर असतो, हें मागें सांगि-तलेंच आहे. पण शेवटच्या अक्षरावर जोर येण्याकरितां उपान्त्यावरील स्वरा-घात अन्त्यावर आणून त्याचा [उपान्त्याचा] ऱ्हस्व स्वर करावा लागतो. उदा०—देऊळ, देउळास, देवळास; कोशिंबीर, कोशिंबिरीस, विहीर, विहिरीस; इ०.

(१२) हें सामान्यरूप केवळ नामांचेंच होतें असें नाहीं, तर कोणत्याही प्रकारच्या शब्दांना प्रत्यय लावण्यापूर्वी त्यांचें असें कांहींतरी रूप करावें लागतें. उदा०—नीघ (क्रियापद) निघाला; फीर, फिरतो; तिकडील (विशेषण) तिकडल्यास; करीत, करितां; तेथें (क्रि० वि०) तेथचा; इ०.

(१३) उपान्त्य ई किंवा ऊ असल्यास त्याला ऱ्हस्वत्व येऊन त्याच्या उच्चाराचा जोर कमी झाल्याचें स्पष्ट दिसण्यासारखें आहे. कारण या स्वरांचीं ऱ्हस्व रूपें आहेत. पण उपान्त्य आ, ए, किंवा ओ असल्यास, सामान्यरूप होतांना त्यांवरील स्वराघात अन्त्यावर नेल्यावर त्यांना ऱ्हस्वत्व आणतां येणार

नाहीं; कारण त्यांच्या जोडीचे ऱ्हस्व स्वर नाहींत. परंतु त्यांना जरी प्रत्यक्ष ऱ्हस्वत्व आलें नाहीं तरी ते निराघात झाल्यानंतर त्यांचा उच्चार नेहमींपेक्षां तोकडा होतो. पुढील शब्दांवरून हें स्पष्टपणें लक्षांत यईल.—रामा+चा=रामाचा; देव+नें=देवानें; शेत+एँ=शेतें; ओघ+स=ओघास; इ०.

---

# प्रकरण ११.



## वचनविचार.

१३७. प्रातिपदिकाच्या रूपावरून आपण एका पदार्थाविषयीं बोलत आहों किंवा अनेकांविषयीं बोलत आहों, याचा बोध होतो, त्याला **वचन** म्हणावें.

**टीप**—'वचन' या शब्दाचा धात्वर्थ 'बोलणें' किंवा 'सांगणें' असा आहे. व्याकरणांत त्याचा अर्थ 'पदार्थाविषयीं संख्येचा निर्देश करून बोलणें' असा होतो, आणि त्यासाठीं जें विवक्षित रूप होतें त्याला वचन असें म्हणतात.

१३८. मराठींत वचनें दोन आहेत:—(१) **एकवचन** आणि (२) **अनेकवचन**.

१३९. नामाच्या रूपावरून जेव्हां एकाच पदार्थाचा, किंवा अनेक पदार्थ मिळून झालेल्या एकाच समुदायाचा बोध होतो, तेव्हां त्या रूपाला त्या नामाचें एकवचन असें म्हणतात. उदा०—मूल, मनुष्य, पांखरूं, फौज, वर्ग, देश, इ०.

१४०. नामाच्या रूपावरून जेव्हां अनेक पदार्थांचा, किंवा पदार्थांच्या अनेक समुदायांचा बोध होतो, तेव्हां त्या रूपाला त्या नामाचें अनेकवचन असें म्हणतात. उदा०—मुलें, मनुष्यें, पांखरें, फौजा, वर्ग, देश, इ०.

टीप १—वचनविचार हें प्रकरण नामांच्या प्रथमा विभक्तीच्या संबंधाचें आहे. यांत सांगितलेलीं दोन वचनें हीं प्रथमा विभक्तीचीं वचनें होत. हा विचार फार लांब असतो, म्हणून विभक्तिविचारांतून निराळा काढून स्वतंत्र प्रकरणांत सांगतात. नामाचें मूळचें रूप किंवा अंग याचा विचार मराठी व्याकरणांत कोणी करीत नाहींत. कारण त्याचा तादृश उपयोग नसतो. आपण बोलतांना पदार्थांच्या नांवाचा उपयोग करितों तेव्हां शब्दांचें जें रूप घालितों, तें त्या शब्दाचें प्रथमेचें एकवचनी रूप असतें. त्यालाच हवें तर शब्दांचें मूळ रूप असें म्हणावें. संस्कृतांतून मराठी प्रातिपदिकें बनवितात तीं एकदम प्रथमेच्या एकवचनींच बनवितात. निरनिराळ्या अन्त्यांच्या प्रातिपदिकांचे प्रथमैकवचनांचे अन्त्यस्वर कसे बनले, याची चर्चा पुढील प्रकरणांत सविस्तर केली आहे. प्रातिपदिकाच्या प्रथमेचें एकवचन तेंच भाषेंतलें मूळचें प्रातिपदिक असें मानण्याची चाल मराठी भाषेंत पडली आहे.

टीप २—संस्कृत भाषेंत एकवचन, द्विवचन व बहुवचन अशीं तीन वचनें आहेत. द्विवचनावरून फक्त दोन वस्तूंचा व बहुवचनावरून दोहोंपेक्षां ज्यास्त वस्तूंचा बोध होतो. त्या भाषेंत बहुवचन याचा अर्थ दोहोंपेक्षां ज्यास्ती असा आहे. मराठींत आपणांस एकापेक्षां ज्यास्त अशा अर्थी शब्द पाहिजे; असा शब्द अनेकवचन ( अन्+एक=एक नव्हे तें ) हा आहे. त्याचाच बहुवचन असा पर्याय शब्द मराठी व्याकरणांत योजितात.

१४१. पुष्कळ नामांचें अनेकवचनाचें रूप एकवचनाप्रमाणेंच असतें; पण जेव्हां तें भिन्न असतें, तेव्हां तें मूळ शब्दाच्या अन्त्य आणि क्वचित् उपान्त्य अक्षरांना कांहीं विकार होऊन झालेलें असतें. अनेकवचनाचे प्रत्यय असे आहेतः—पुल्लिंगी ‘ ए ’ स्त्रीलिंगी ‘ आ ’ व नपुंसकलिंगी ‘ ई ’ आणि ‘ एँ. ’

टीप—हे प्रत्यय संस्कृतांतील प्रथमेच्या बहुवचनाच्या प्रत्ययांवरून साधलेले आहेत. पुल्लिंगी प्रत्यय ‘ ए ’ हा संस्कृत ‘ ए ’ ( उदा०—सर्वे ) याच प्रत्ययावरून झालेला आहे. संस्कृतांत अनेकवचनाचे प्रत्यय ‘ अस् ’ आणि ‘ए’ असे दोन आहेत. यांपैकीं ‘ ए ’ हा जुना आणि लोकभाषांत प्रचारांत असलेला प्रत्यय दिसतो. स्त्रीलिंगी प्रत्यय ‘ आ ’ हा ‘ अः ’ ( उदा०—नद्यः ) या संस्कृत प्रत्ययावरून बनलेला आहे. संस्कृतांतील नपुंसकलिंगी नामांचा प्रथ-

मेच्या व द्वितीयेच्या बहुवचनाचा प्रत्यय 'आनि' हा आहे. त्याचें प्राकृतांत 'आई' असें रूप होऊन त्यावरून मराठींत 'ईं' हा प्रत्यय आला. 'एँ' हा प्रत्ययही 'आई' या प्राकृत प्रत्ययाचीं दोन्हीं अक्षरें एकांत एक मिळून, अथवा अन्तीं येणाऱ्या 'क' या स्वार्थी प्रत्ययाच्या जुळणीनें झाला आहे. उदा०—मौक्तिकानि, मोत्तिआई, मोत्तियें, मोत्यें.

१४२. एकवचनी नामाचें अनेकवचनी रूप करतांना त्याच्या अन्त्याक्षराला कांहीं तरी विकार होतो. हा विकार नामाचें लिंग व अन्त्यस्वर यांना अनुसरून होत असतो. नामांचें अनेकवचन करण्याचे नियम असे आहेत.—

(१) दुसऱ्या गणांत (घोड्याच्या गणांत) येणारीं आकारान्त नामें शिवाय करून बाकीच्या सर्व पुल्लिंगी नामांचें एकवचन व अनेकवचन हीं सारखींच असतात. उदा०—सुतार, सुतार; तेली, तेली; शत्रु, शत्रु; किंवा शत्रू, शत्रू; इत्यादि.

(२) दुसऱ्या गणांत येणाऱ्या आकारान्त पुल्लिंगी नामांचें अनेकवचन 'ए' प्रत्यय लागून होतें; पण आकारान्त पुल्लिंगी विशेषनामांचें, त्याचप्रमाणें पहिल्या गणांत (बापाच्या गणांत) येणाऱ्या आकारान्त पुल्लिंगी नामांचें एकवचन व अनेकवचन हीं सारखींच असतात. उदा०—मुलगा, मुलगे; घोडा, घोडे; बाबा, तात्या, रामा, गोविंदा, काका, मामा, अण्णा, इ०.

टीप—तिरस्कारानें बोलावयाचें असल्यास काका, मामा, दादा, इत्यादि शब्दांचें काके, मामे, असें अनेकववचनी रूप करितात. उदा०—"हे कोण बायकोंचे मामे । घरांत हिंडती रिकामे." "तुमचे काके, मामे कोणी असें करीत होते का?" "तुमचे बापदादे कधीं घोड्यावर बसले होते?" इ०.

(३) देशपांड्या, वाटाड्या, वाघ्या, वाघमाऱ्या, इत्यादि ज्या शब्दांत उपान्त्य 'य' आहे, त्याचीं अनेकवचनें देशपांड्ये, देशपांडे, इत्यादि अशीं दोन प्रकारचीं होतात. यांत दुसऱ्या रूपाचा प्रघात विशेष आहे.

(४) अकारान्त स्त्रीलिंगी नामामध्यें ज्याचें सामान्यरूप एकारान्त होतें, त्यांचें अनेकवचनी रूप आकारान्त असतें. जसें,—वीट, विटा; चिंच, चिंचा; इ०. ज्यांचें सामान्यरूप ईकारान्त होतें, त्यांचें अनेकवचनी रूपही ईकारान्तच असतें. जसें,—भिंत; भिंती, रीत, रिती; व ज्यांचें

सामान्यरूप विकल्पेंकरून ईकारान्त किंवा एकारान्त होतें, त्यांचें अनेकवचनी रूप, ईकारान्त किंवा आकारान्त, असें दोन प्रकारचें होतें. जसें,—तरवार, तरवारी, तरवारा; विजार, विजारी, विजारा; परत, पराती, पराता; वागणूक, वागणुकी, वागणुका; इ०.

(५) संस्कृतांतील (ऱ्हस्व) इकारान्त व उकारान्त पुल्लिंगी आणि स्त्री-लिंगी तत्सम नामें हीं मराठी भाषेला अनुसरून जर दीर्घान्त लिहिलीं, तर त्यांचीं अनेकवचनी रूपेंही तशींच करावीं. पण जर संस्कृताप्रमाणें तीं ऱ्हस्वच लिहिलीं, तर अनेकवचनी रूपेंही ऱ्हस्व लिहिण्याची चाल आहे. जसें,—कवि, कवि; कवी, कवी; रवि, रवि; भानु, भानु; भानू, भानू; साधु, साधु; साधू, साधू; रुची, रुची; किंवा रुचि, रुचि; भक्ती, भक्ती; किंवा भक्ति, भक्ति; धेनू, धेनू; किंवा धेनु, धेनु; इ०. इकारान्त नामांचें अनेकवचन क्वचित् ईकारान्त नामांप्रमाणें म्हणजे 'इ'च्या जागीं 'या' येऊनही होतें. जसें,—रुच्या, भक्त्या, युक्त्या, इ०.

**टीप**—अनेकवचनी प्रत्यय 'आ,' 'ए,' हे असून इ, ई, उ, ऊ, या अन्तांच्या नामांच्या अनेवचनीं, नामांचा स्वर बहुतेक ठिकाणीं कायम राहातो. याचें कारण तो स्वरित म्हणून उच्चाराला जोरदार असतो, म्हणून पूर्वरूप संधि होतो. हा स्वर तसाच रहात नाहीं. तेव्हांही अन्त्यस्वर जाऊन अनेक-वचनी प्रत्यय लागत नाहीं; तर तेथें यकार, वकार होऊन लागतो; जसें— काव्या, युक्त्या, सास्वा, इत्यादि.

(६) ज्यांच्या अन्तीं 'आ,' 'ए,' किंवा 'ऊ,' स्वर असतो, अशा स्त्रीलिंगी नामांचें एकवचन व अनेकवचन हीं सारखींच असतात. उदा०— माता, विल्हे, चमू, वधू, गेरू, पाचू, कौलू, अफू, शेपू, इ०.

(७) पाऊ, पाचू, शेळू, माऊ, इत्यादि कित्येक शब्दांचीं अनेकवचनें पावा, पाचवा, मावा इत्यादि आकारान्त करितात; पण तीं वास्तविक पाव, पाचव, शेळव, माव, इत्यादि अकारान्त शब्दांचीं अनेकवचनें आहेत. ते शब्द पाऊ, माऊ, इत्यादि मानिल्यास त्यांचीं उभयवचनें समान होतील.

(८) कित्येक ऊकारान्य स्त्रीलिंगी शब्दांचीं अनेकवचनें विकल्पेंकरून आकारान्त होतात. उदा०—सासू–सासू,–सासवा–सास्वा; जाऊ–जाऊ—

जावा; पिसू–पिसू–पिसवा–पिस्वा; भू–भू–भुया; बाजू–बाजू–बाजवा–बाज्वा; इत्यादि.

**टीप**—जळू, दुरू, ऊ, धू, सू, चिरू, इत्यादि कित्येक शब्द अपवादक आहेत. त्यांचीं अनेकवचनें 'आ' लागून होतात, जसें,–जळू–जळवा–जळ्वा; दुरू–दुरवा–दुर्वा; ऊ–उवा; धू–धुवा, इ०.

( ९ ) ईकारान्त स्त्रीलिंगी नामांचें अनेकवचन होतांना 'ई–' च्या जागीं 'या' होतो. जसें,—नदी, नद्या; पेटी, पेट्या; वाडी, वाड्या; चौकी, चौक्या; इ०.

अपवाद ( १ )–मूळ आकारान्त किंवा व्यंजनान्त शब्दांना 'ई' हा स्त्रीलिंगी प्रत्यय लावून केलेलीं जीं नामें आहेत, त्यांचीं उभयवचनें सारखींच होतात. उदाहरणार्थ—

| मूळ शब्द | स्त्री० ए० व० | अनेकवचन |
|---|---|---|
| देव | देवी | देवी |
| नर | नारी | नारी |
| सिंह | सिंही | सिंही |
| श्रीमत् | श्रीमती | श्रीमती इ०. |

अपवाद—( २ )—आकारान्त पुल्लिंगी शब्दांचीं जीं ईकारान्त स्त्रीलिंगी रूपें होतात, त्यांचीं अनेकवचनें वरील मुख्य नियमाप्रमाणें होतात. जसें,—काका, काकी–काक्या; घोडा, घोडी–घोड्या; इ०.

अपवाद ( ३ )—एकाक्षरी ईकारान्त स्त्रीलिंगी शब्दांचें अनेकवचन होतांना अन्त्य 'ई'–चें 'इया' असें रूप होतें, व ज्यांच्या शेवटीं नुस्ता 'ई' स्वर असतो, त्या शब्दांचें अनेकवचन होतांना 'ई'–च्या जागीं 'या' होतो. उदा०—स्त्री, स्त्रिया; बी, बिया, श्री, श्रिया; आई, आया; बाई, बाया; डोई, डोया; राई, राया ( राई ); संवई, संवया ( संवई ); इ०.

अपवाद ( ४ )—आई बाई, काकी, मामी, इत्यादि शब्द आणि हे ज्यांच्या अन्तीं आहेत असे सामासिक शब्द, हे जेव्हां आदरार्थी असतात, तेव्हां त्यांचीं उभयवचनें सारखींच होतात. उदा०—'आई असें म्हणाल्या.' 'या बाई नव्या दिसतात.' 'रमाबाई आज सभेंत बोलतील.' इत्यादि.

अपवाद (५)—सती, साध्वी, भागीरथी, अटवी, पृथ्वी, इत्यादि प्रौढ संस्कृत शब्दांचीं उभयवचनें सारखींच होतात. परंतु क्वचित् सत्या, भागीरथ्या, साध्व्या, पृथ्व्या, अशींही मराठीच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें रूपें करितात.

(१०) ज्या स्त्रीलिंगी नामांचे शेवटीं 'य' असतो त्यांचें अनेकवचन होतांना 'य'-च्या जागीं 'ई' हा स्वर येतो. जसें,—गाय—गाई; चोय—चोई; डोय—डोई; कोय—कोई; सोय—सोई; संवय—संवई; इ० चोया, डोया, गाया, सोया, अशींही त्यांचीं अनेकवचनें होतात; परंतु पहिल्या रूपांचा प्रघात जास्त आहे.

**टीप**—वास्तविक ईकारान्त रूप मूळचें आहे. यकारान्त रूप हें प्रथमैकवचनाचें विकृत रूप होय, म्हणून असें होतें.

(११) ऐकारान्त स्त्रीलिंगी नामें ईकारान्त आहेत असें मानावें; म्हणजे त्यांचें अनेकवचन पांचव्या नियमाप्रमाणें ('ई'-च्या जागीं 'या' होऊन) होईल, जसें,—तिवै-तिवई-तिवया, इ०.

(१२) ओकारान्त स्त्रीलिंगी नामांचें अनेकवचन आकारान्त होतें. उदा०-बायको, बायका; इ०.

(१३) इ-उ-कारान्त संस्कृत नपुंसकलिंगी नामांचीं उभयवचनें सारखींच असतात. उदा०—दधि, मधु, इ०.

(१४) अकारान्त नपुंसकलिंगी नामांचें अनेकवचन ऍंकारान्त होतें; ऍंकारान्त नामांचें ईंकारान्त होतें; आणि ईंकारान्त नामांचें अन्त्य 'ईं' बद्दल 'यें' येऊन होतें. उदा०—कुरण, कुरणें; नाणें, नाणीं; मोतीं, मोत्यें.

(१५) ऊंकारान्त नपुंसकलिंगी नामांमध्यें ज्यांचें सामान्यरूप आकारान्त होतें, त्यांचें अनेकवचन ऍंकारान्त असतें; व ज्यांचें सामान्यरूप वाकारान्त किंवा ऊंकारान्त होतें त्यांचें अनेकवचन वेंकारान्त असतें. उदा०—करडूं, करडें; लिंबू, लिंबें; तारूं—तार्वें, तारवें; उठाणूं—उठाण्वें—उठाणवें; जिवाणूं—जिवाणवें, जिवाण्वें; इत्यादि.

**टीप १**—ऊं, कूं, डूं, रूं, इत्यादि प्रत्यय लागून झालेल्या तिरस्कारदर्शक

नामांचें अनेकवचन एँकारान्त असतें. जसें,—वाघरूं, वाघरें; रांडरूं, रांडरें; शेरडूं, शेरडें; पारडूं, पारडें; म्हसरूं, म्हसरें; रेडकूं, रेडकें; इ०.

**टीप २**—तारूं, गळूं, असूं, आसूं, कुंकूं, इत्यादि नामांचीं अनेकवचनें तारवें, तावें; गळवें–गळ्वें; असवें–अस्वें; आसवें–आस्वें; कुंकवें–कुक्वें: अशीं वैकल्पिक होतात.

**टीप ३**—कांहीं ऊंकारान्त नपुंसकलिंगी नामांच्या अनेकवचनांचीं तीन रूपें होतात. जसें,—कुसूं, कुसें–कुसवें-कुस्वें; सुकाणूं, सुकाणें–सुकाण्वें-सुकाणवें; जिवाणूं, जिवाणें—जिवाणवें—जिवाण्वें; उठाणूं, उठाणें–उठाणवें—उठाण्वें; इ०.

१४३. नामांचें अनेकवचन करण्याचे हे जे नियम सांगितले, ते प्रथमा व अंशतः द्वितीया या विभक्तींच्या संबंधानें आहेत. इतर विभक्तींचें अनेकवचन, प्रथमतः नामांचें सामान्यरूप होऊन व पुढें निरनिराळया विभक्तींचे अनेकवचनी प्रत्यय लागून होतें. अनेकवचनी सामान्यरूप करण्याचे नियम असे आहेतः—

( १ ) पहिल्या पांच गणांत ( बापाचा गण, घोड्याचा गण, गऱ्हाचा गण, कवीचा गण आणि साधूचा गण यांत ) येणाऱ्या नामांचें अनेकवचनी सामान्यरूप करितांना एकवचनी सामान्यरूपाच्या अन्त्याक्षरावर अनुस्वार द्यावा.

( २ ) ईकारान्त स्त्रीलिंगी नामें आणि मातेचा गण व बायकोचा गण यांतील नामें, यांचें अनेकवचनी सामान्यरूप प्रथमेच्या अनेकवचनाच्या अन्त्याक्षरावर अनुस्वार देऊन करितात. जसें,—नदी, नद्या, नद्यांस; नारी, नारींस; साध्वी, साध्वींस; माता, मातांस; जीभ, जिभांस; बायको, बायकांस इत्यादि.

( ३ ) आई, बाई, काकी, मामी, इत्यादि ईकारान्त स्त्रीलिंगी नामांचें आदरार्थी अनेकवचनी सामान्यरूप एकवचनी सामान्यरूपावर अनुस्वार देऊन करितात. उदा०—आईंस, बाईंस, काकींस, मामींस, इ० पण हे शब्द आदरार्थी नसल्यास त्यांचीं अनेकवचनी सामान्यरूपें आयां, बायां, काक्यां, माम्यां, अशीं होतात.

(४) अनेकवचनी सामान्यरूपाचे शेवटीं अनुस्वार आला. तो संस्कृत षष्ठीचा बहुवचनी प्रत्यय 'नाम्', प्राकृत 'नं' आणि अपभ्रंश 'अं' यांवरून आला.

१४४. मर्जी, स्तुति, कलंक, गति, बुद्धि, उजेड, अंधार, सावट, आकाश, काळोख, हवा, काळ, सोनें, तेल, साखर, इत्यादि गुण, धर्म, क्रिया, स्थिति, पदार्थांचा प्रकार, मनोविकार वगैरे दाखविणाऱ्या नामांचें अनेकवचन होत नाहीं.

१४५. चांगलेपणा, महत्त्व, गुरुत्व, धैर्य, गुलामगिरी, इत्यादि भाववाचक नामांचेंही अनेकवचन होत नाहीं. परंतु या व वरील अशा दोन्ही कलमांत सांगितलेल्या नामांवरून ज्या गुणादिकांचा बोध होतो, त्यांचे अनेक भिन्न प्रकार दाखवावयाचे असल्यास त्यांचीं अनेकवचनें होतात. जसें,—"सोनें आणि कथील यांचीं विशिष्टगुरुत्वें." "सुनेस सासू, नणंद, दीर, जाऊ, या सर्वांच्या मर्ज्या राखावयाच्या असतात." इ०.

१४६. विशेषनामांचें अनेकवचन सामान्य नियमांना अनुसरूनच होतें. अशा नामांचें अनेकवचन करण्याचे प्रसंग क्वचित् येतात. त्यांचें आदरार्थी अनेकवचन करणें झाल्यास त्यांच्यापुढें पंत, राव, भाऊ, साहेब, तात्या, दादा, अण्णा, बाई, ताई, इत्यादि शब्द जोडतात. जसें,—गोविंदराव आले. बाळासाहेब जातील. हरिभाऊ किंवा हरीपंत सांगतात. नागरजी म्हणाले. गंगूबाई बोलल्या. विसूअण्णा बसले. इ०.

**टीप**—एकाच व्यक्तीच्या नांवापुढें उपनाम जोडणें असल्यास तें अनेकवचनी घालितात. जसें,—रामा देशपांडे. हरी भोसले. कृष्णा मराठे. विठू नेने. इ०. कोंकणांत उपनांव एकवचनी घालितात. जसें,—विठू नेना, हरी लेला, विठू गडबोला, इत्यादि.

१४७. एका व्यक्तीसंबंधानें जरी बोलावयाचें असलें, तरी प्रौढ मराठी भाषेंत सामान्यनामें व विशेषनामें यांचीं मानाकरितां अनेकवचनी रूपें घालण्याची वहिवाट आहे. अशा रूपांना **आदरार्थी अनेकवचन** किंवा बहुवचन असें म्हणावें. उदा०—'यजमान आले.' 'गोविंदराव हे त्यांचे वडील बंधु.'

**टीप**—‘ आदरार्थी बहुवचन ’ असें म्हणावें; असें कित्येक **म्हणतात.** **पण** मराठींत ‘ अनेक ’ व ‘ बहु ’ **हे** शब्द समानार्थी घेण्याला कांहीं प्रत्यवाय दिसत नाहीं.

१४८. कांहीं सामान्यनामें नेहमीं अनेकवचनी असतात. जसें,—वडील [ बाप ], क्लेश, हाल, ख्याल, वन्सें, आळेपिळे, आख्यापाख्या, देवी [ रोगविशेष ], मुस्क्या, कांजिण्या, मिशा, खडावा, वाहाणा, इ०. कांजिण्या, खडावा व वाहाणा यांचें, केवळ एकेकच वस्तू असा बोध होत असतां, एकवचनही होतें. जसें,— कांजिणी [एक फोड ], खडाव, वाहाण[जोड्यापैकीं एक ]. मिशा शब्द जसा अनेक-वचनी असतो तसा तो नुसता एकवचनीही असतो. जसें,—‘ त्याच्या ओंठावर अजून मिशी नाहीं. ’

**टीप**—‘ वन्सें ’ या शब्दाचा अर्थ ‘ नवऱ्याची बहीण ’ असा जरी आहे, तरी तो शब्द नपुंसकलिंगी मानितात, आणि रूप तसेंच करितात. तथापि त्याला क्रियापद सामान्यपणें स्त्रीलिंगीच घालितात. तरी नपुंसकलिंगी क्रियापद नसतें असें नाहीं. जसें,–‘ वन्सें आल्या ’ किंवा ‘ वन्सें आलीं. ’

१४९. कधीं पदार्थांचें वैपुल्य दाखविण्याकरितां, पाठीमागें बाहुल्यदर्शक संख्याविशेषण असूनही, मनुष्यवाचक, वस्तुवाचक, आणि पदार्थवाचक नामांचें नुसतें एकवचनी रूप घालितात. अशा वेळीं क्रियापदही, एकवचनी असतें. जसें,–‘ तो चमत्कार पाहण्यास हजारों माणूस लोटलें. ’ ‘ त्या सैन्यांत पांच हजार घोडें असेल. ’ ‘ यंदा गहूं चांगला पिकला, पण हरभरा अगदीं बुडाला. ’ ‘ या गांवांत निदान हजार उंबरा असेल. ’ ‘ आज दोन वर्षें या प्रांतांत आंबा मुळींच पिकला नाहीं. ’ ‘आजच्या सभेला दोनशें खुर्ची पुरणार नाहीं. ’

‘ भव बुडवी म्हणुनिच तव भजनीं **सनकादि जाणता** रमला. ’

—मोरोपंत.

———

# प्रकरण १२.



## विभक्तिविचार--भाग दुसरा.

### ( १ ) विभक्तींची संख्या.

१५०. ( १ ) संस्कृत भाषेंत प्रथमा, द्वितीया, इत्यादि सात, आणि संबोधन, अशा आठ विभक्ति मानिल्या आहेत. सर्व आर्य-भाषांत आणि प्राकृतांत साधारणतः आठ विभक्ति आहेत. परंतु लौकिक आर्य भाषांत म्हणजे प्राकृतांत प्रथमा आणि द्वितीया या एकच झाल्या. संस्कृतांत तरी ज्यांची प्रथमा आणि द्वितीया यांचीं तिन्ही वचनांचीं रूपें एकासारखीं आहेत अशीं नामें फार आहेत.

( २ ) प्राकृतांत चतुर्थी नाहीं. 'रामाय, रामाभ्यां, रामेभ्यः,' इत्यादि रूपें होणारी जी चतुर्थी ती लौकिक आर्यभाषांत नष्ट झालेली दिसते. तिच्या जागीं संस्कृतांतल्या स्य--प्रत्ययान्त षष्ठीच्या रूपांचा उपयोग करीत. जसें,—सं०--रामस्य, प्रा०—रामस्स, मरा०— रामास. यांनाच पुढें चतुर्थी म्हणू लागले.

( ३ ) तेव्हां ऐतिहासिक दृष्ट्या मराठींत [ १ ] प्रथमा आणि द्वितीया, [ २ ] तृतीया, [ ३ ] चतुर्थी ( मूळची षष्ठी ). [ ४ ] पंचमी, [ ५ ] सप्तमी आणि [ ६ ] संबोधन, अशा सहा विभक्ति येतात.

( ४ ) विभक्ति किती आणि कशा मानाव्या यासंबंधानें मराठी व्याकरण-कारांत मतभेद आहे. पण वास्तविक तो मतभेद अगदीं अल्प म्हणजे फक्त द्वितीयेच्या संबंधाचा आहे. तो तेव्हांच काढून टाकतां येईल. अमक्या रूपास विभक्तीचें नांव कोणतें द्यावें, हा विचार केवळ व्यवस्थेचा आणि भाषेचा अभ्यास करणारांच्या सोईचा आहे. त्यांत सशास्त्राशास्त्रतेचा भाग नाहीं. यासाठीं विभक्ति मानण्याची व्यवस्था करणें ती शिकणारांच्या सोईचा विचार करून करावी.

( ५ ) विभक्तींचीं रूपें कारकें दाखविण्यासाठीं होतात. तेव्हां प्रत्येक मुख्य कारकास एकेक विभक्ति योजावी. क्वचित् एक कारक ज्यास्त विभक्तींकडे घालावें लागेल, अथवा कारकाचे बारिकसारिक पोटभेद मानावे लागतील. पण ह्या किरकोळ गोष्टी समजाव्या. तेव्हां मुख्य कारकें आणि विभक्ति यांची व्यवस्था अशी करावीः—

| कारकाचें नांव. | विभक्तीचें नांव. |
|---|---|
| ( १ ) उद्देश्य, आणि कर्ता म्हणजे प्रत्यक्ष क्रिया करणारा | प्रथमा |
| ( २ ) कर्म | द्वितीया |
| ( ३ ) करण ( आणि कर्मणिवाक्यांत कर्ता ) | तृतीया |
| ( ४ ) संप्रदान | चतुर्थी |
| ( ५ ) अपादान | पंचमी |
| ( ६ ) स्वामित्व | षष्ठी |
| ( ७ ) अधिकरण | सप्तमी |
| ( ८ ) आव्हान | संबोधन |

( ६ ) मागें तिसऱ्या पोटकलमांत सांगितल्याप्रमाणें मराठींत ऐतिहासिकदृष्ट्या सहा विभक्ति आल्या आहेत. त्यांमध्यें द्वितीया आणि षष्ठी या आणखी ज्यास्त घालाव्या. द्वितीयेकडे **कर्म** या कारकाची व्यवस्था सोंपवावी. कित्येक व्याकरणकार कर्म याची प्रथमा मानितात, आणि चतुर्थीही मानितात. जसें,–'गोवारी गाय बांधितो,' ' येथें '**गाय**' ही कर्मणि–प्रथमा, आणि 'गोवारी गाईस बांधितो, येथें '**गाईस**' ही कर्मणि–चतुर्थी. कोणी **गाय** ही कर्मणि-प्रथमाच मानितात, पण **गाईस** ही कर्मणि–द्वितीया मानितात. कर्म हें कारक फार महत्त्वाचें असून, त्याचा विचार करण्याचा प्रसंग विद्यार्थ्यांस वारंवार येतो. यासाठीं त्याची अशी ओढाताण व धांदल असूं नये. या घोंटाळ्याच्या व्यवस्थेमुळें सांप्रत विद्यार्थ्यांना संस्कृत आणि इंग्लिश या भाषा–ज्या अगदीं अवश्य शिकाव्या लागतात–त्यांची व्यवस्था समजण्यामध्येंही अडचण येते. खेरीज 'गोवारी गाईस बांधतो,' यांत **गाईस** ही कर्मणि–चतुर्थी मानण्यास जरी प्रत्यवाय नाहीं, तरी 'गोवारी **गाय** बांधतो' यांत **गाय** ही प्रथमा

आहे असें म्हणणें हें अशास्त्र आहे. त्याचप्रमाणें अर्थ एकच असतां एकदां **गाय** आणि एकदां **गाईस** अशीं रूपें फिरलीं कीं, विभक्ति निराळ्या झाल्या असें म्हणणेंही गैर आहे. विभक्ति प्रत्ययावरून मानलेल्या नसून अर्थावरून मानल्या आहेत, हें लक्षांत ठेवावें. तेव्हां कर्म हें कारक असतां **गाय** आणि **गाईस** या दोन्ही रूपांना द्वितीयाच म्हणावें, हीच योग्य आणि सोईवार व्यवस्था आहे.

( ७ ) मूळच्या षष्ठीची चतुर्थी झाल्यावर षष्ठीचें कारक म्हणजे ' स्वामित्व-संबंध ' दाखविण्यासाठीं चा-ची-चें प्रत्ययान्त विशेषणें ( रामाचा पिता, घराची बाजू, मुलाचें पुस्तक, इत्यादि ) उपयोगांत होतीं; त्यांना षष्ठी असें म्हणण्याची चाल पडली. वास्तविक हीं रूपें विभक्तीचीं नव्हत; हीं विशेषणें आहेत. तथापि त्याचें खरें स्वरूप लक्षांत घेऊन मग त्यांना ' षष्ठीविभक्तीचीं रूपें ' असें आपल्या व शिकणारांच्या सोईकरितां म्हणण्यास चिंता नाहीं,

याप्रमाणें मराठी भाषेंत एकंदर आठ विभक्ति आहेत.

## ( २ ) विभक्त्यन्त, अथवा प्रत्यय आणि अव्ययें.

१५१. ( अ ) मागें सांगितलेंच आहे कीं, विभक्तीचीं रूपें मूळ प्रातिप्रादिकास प्रत्यय लागून होतात. तसेंच प्रत्यय लावण्यापूर्वी त्याचें **सामान्यरूप** करावें लागतें. याचें विवरण मागें ९ व्या प्रकणांत केलेंच आहे.

( आ ) विभक्तींचीं रूपें करण्याचा आणखी एक प्रकार असा आहे कीं, प्रातिपदिकाचें सामान्यरूप झाल्यावर विभक्तिप्रत्ययांचेबद्दल त्यांस कांहीं अव्ययें लावितात. जसें,–घर + ई (सप्तमीचा प्रत्यय)= घरीं; घर + आंत अथवा मध्यें ( शब्दयोगी अव्ययें )=घरांत, घरामध्यें इत्यादि.

**टीप**—हीं शब्दयोगी अव्ययें प्रत्ययांबद्दल लावितात, किंवा योग्य प्रत्यय नसतो तेव्हां लावितात. उदाहरणार्थ,–' ई ' हा सप्तमीचा प्रत्यय सांप्रत थोड्या अकारान्त नामांस मात्र लागतो. इतर नामांची सप्तमी करण्यास प्रत्यय नाहीं, म्हणून ' आंत, ' ' मध्यें ' या अव्ययांचा उपयोग करितात.

( इ ) प्रत्यय म्हणजे अर्थविरहित असें अक्षर अथवा अक्षरसमुदाय. प्रत्ययाला स्वतांचा अर्थ नसतो. तो शब्दाला लाविला म्हणजे एकंदर शब्दाला त्या प्रत्ययामिळून अर्थ येतो. उदाहरणार्थ,–नें, स, ला, यांना अर्थ नाहीं. पण

हीं अक्षरें शब्दाला जोडून ' रामानें, ' ' हरीस, ' ' घराला, ' अशीं रूपें केल्यावर त्या प्रत्ययांलाही अर्थ आला.

( ई ) शब्दयोगी अव्ययें हे मूळचे सार्थ असे शब्द आहेत. त्यांतलीं कित्येक तर कांहीं शब्दांचीं विभक्तिरूपें आहेत. जसें—कडे=कड+ए ( सप्तमी ); द्वारें=द्वार=एँ ( तृतीया ); मध्यें=मध्य+एँ ( सप्तमी ); इत्यादि. हे शब्द मग मूळ शब्दाचें सामान्यरूप म्हणजे षष्ठीचें रूप करून जोडून द्यावयाचे. जसें,—घरामध्यें=घराचा+मध्य+तेथें=घराच्यामध्यें, घरा=मध्यें, इत्यादि.

**टीप**—घराचा मध्य ( भाग )=' घरामध्य ' हा शब्द प्रथमतः अलुक्समास झाला. मग ' एँ ' हा सप्तमीचा प्रत्यय लागून ' घरामध्यें ' असें झालें.

( उ ) शब्दयोगी अव्ययें हे मूळचे स्वतंत्र शब्द आहेत, आणि तसा त्यांचा स्वतंत्र उपयोगही होतो. उदाहरणार्थ,—' तो झाडा-वर आहे. ' ' तो वर आहे. ' ' घरांत अन्न नाहीं. ' ' तो आंत नव्हता. ' ' लोकांमध्यें. ' ' मध्यें बोलूं नको, ' इत्यादि. यावरून वास्तविक विभक्ति बनविणाऱ्या अव्ययांचा आणखी स्वतंत्र उपयोग असला पाहिजे, तरच त्यांना शब्द म्हणतां येईल. परंतु सध्यां जी शब्दयोगी अव्ययांची याद व्याकरणांत दिलेली असते, त्यांत कित्येकांना शब्द म्हणतां येणार नाहीं अशीं आहेत. उदाहरणार्थ,—प्रत, लागीं, लागोनी, स्तव, साठीं, इत्यादि. यांना अव्ययें कां म्हणावें, प्रत्यय कां म्हणूं नये, हा महत्त्वाचा प्रश्न आहे. ज्यांना अर्थ आहे, म्हणजे जे **शब्द** आहेत, त्यांना अव्ययें म्हणावें; आणि ज्यांना अर्थ नाहीं, त्यांना प्रत्यय म्हणावें हेंच योग्य. परंतु कांहीं थोड्या विभक्त्यन्तांना प्रत्यय असें म्हणून बाकीच्यांना शब्दयोगी अव्ययांखालीं घालण्याची चाल हल्लीं कोणत्या तरी कारणानें पडली आहे. यासंबंधानें योग्य व्यवस्था झाली पाहिजे. म्हणून तूर्त आजपर्यंत ज्यांना प्रत्यय असें म्हणत आलें, त्यांना जुने प्रत्यय म्हणूं; जे वास्तविक शब्द नसून शब्दयोगी अव्ययांत ढकललेले आहेत, त्यांना नवे प्रत्यय म्हणूं; आणि जे **शब्द** आहेत, त्यांना विभक्त्यर्थक किंवा शब्दयोगी अव्ययें म्हणूं.

**टीप**—विभक्तीचीं रूपें करण्याचा आणखी एक प्रकार असा आहे कीं, वाक्यांत प्रातिपदिकांचें नुसतें सामान्यरूप घालावें, आणि अर्थ होत असेल

त्याप्रमाणें विभक्ति मानावी. हा प्रकार वास्तविक वाक्यरचनेच्या संबंधाचा असल्यामुळें याचा विशेष विचार कारकप्रकरणांत होईल.

१५२. (अ) **विभक्तींचे जुने प्रत्ययः**—[प्रथमेचा विचार निराळा करावयाचा आहे, त्यांत या विभक्तीच्या प्रत्ययांबद्दल सांगण्यांत येईल. द्वितीया ही प्रथमा आणि चतुर्थी यांमधून घेतली आहे. तेव्हां तिचा येथें विचार करावयास नको. तेव्हां तृतीयेपासून प्रत्यय सांगावयाचे.]

| विभक्ति. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| तृतीया | नें, एँ, शीं, आं, ई. | नीं, हीं, ईं, शीं. |
| चतुर्थी | स, ला, तें. | स, ला, तें ना. |
| पंचमी | ऊन, हून. | ऊन, हून. |
| षष्ठी | [च–प्रत्ययान्त विशेषणरूप.] | |
| सप्तमी | आं, ईं, ए, एँ. | आं, ईं, ए, एँ. |
| संबोधन | [विशेषरूप] | नो. |

(आ) **विभक्तींचे नवीन प्रत्ययः**—[हे भाषेमध्यें शब्द म्हणून जुनेच आहेत; 'नवीन' याचा अर्थ, ज्यांना 'प्रत्यय' असें म्हणण्याची चाल नवीन घालावयाची ते. हे उभयवचनी आहेत.]

तृतीया–करवीं, कडून, सुद्धां, परी, परीस, सदृश, खेरीज, विना, विणें, वीण, बगर.

चतुर्थी–प्रत, प्रती, प्रति, लागीं, लागोनी, करितां, साठीं, स्तव,

पंचमी–पासीं, पासून, कडून, पेक्षां, परीस, पासाव, पर्यंत, पैकीं.

षष्ठी–विषीं, बाबत–द.

सप्तमी–कडे, भर, भीतरीं, माजीं, माझारीं.

संबोधन–हो, अहो, रे, अगे, गे, ग, इत्यादि. [हीं अव्ययें शब्दांचे अंतीं अथवा अगोदरही येतात.]

(इ) **शब्दयोगीं अव्ययें.**—शब्दयोगी अव्ययें शब्दापुढें जोडून विभक्ति करणें हा वाक्यजुळणीचा प्रकार असल्यामुळें त्याचें पूर्ण विवरण कारकप्रकरणीं होईल. येथें प्रत्येक विभक्तीचीं कांहीं मुख्य अव्ययें सांगतोः—

तृतीया–द्वारें, हातीं, हातून, निमित्तें, योगें, करून, बरोबर, सह, संगें, प्रमाणें, शिवाय, खेरीज, इत्यादि.

चतुर्थी–जवळ, बद्दल, बदला, इत्यादि.

पंचमी–आंतून, जवळून, पासून, वरून, खालून, इत्यादि.

षष्ठी–संबंधीं, विषयीं, बाबतींत.

सप्तमी–पुढें, मागें, आंत, मध्यें, वर विरुद्ध, अंतीं, सन्निध, समक्ष, समोर, लगत, लगत्यास, भोंवतीं, इत्यादि.

## ( ३ ) विभक्तिप्रत्ययांची मूलपीठिका आणि त्यांचा उपयोग.

१५३. प्रत्येक विभक्तीचे प्रत्यय कसे बनले, आणि निरनिराळ्या विभक्तिप्रत्ययांचा उपयोग कसा होतो, याविषयीं आतां सांगतोंः—

**प्रथमाः**—( १ ) प्रातिपदिकांचीं तिन्ही लिंगी आणि उभयवचनी रूपें हीं प्रथमा विभक्तीचीं रूपें होत, असें मागें सांगितलेंच आहे. ‘ नामाचें मूळ रूप ती प्रथमा ’ असें म्हणण्याची जुनी चाल आहे. पण हें म्हणणें बरोबर नाहीं. मूळ रूप याचा अर्थ कोणताही प्रत्यय लागण्यापूर्वी आणि सामान्यरूप व्हावयाचें असल्यास त्याचेही पूर्वी जें रूप बनतें तें. उदाहरणार्थ,—संस्कृतांत ‘ तस्थिवस् ’ हें मूळ रूप. मग तीन प्रकारचीं सामान्य रूपें होऊन ‘ तस्थिवान्. ’ ‘ तस्थुषा ’ ‘ तस्थिवद्भ्यः ’ अशा प्रकारचीं विभक्तिरूपें बनलीं. मराठींत अशा प्रकारचें प्रातिपदिकाचें एकादें मूळ रूप नसतें. जें रूप बनतें तें एकदम प्रथमेचें बनतें. म्हणून त्याला **मूळरूप** असें म्हणतां येणार नाहीं. मग सामान्यरूप होतांना हें रूप तसेंच राहील, ( जसें,—कवीस, बायकोला, इत्यादि ) अथवा निराळें सामान्यरूप होईल, ( जसें,–गाय,–प्रथमा, गाई–सामान्यरूप; जीभ,–प्रथमा, जिभे–सामान्यरूप, इत्यादि ). यासंबंधानें मागें चर्चा झालीच आहे.

**टीप १**—मराठी क्रियापदांना मात्र **मूळरूप** आहे. त्याला आपण ‘धातु’ असें म्हणतों. उदा०—सांग–मूळ रूप अथवा धातु, सांगित–( सामान्यरूप )+लें, भूतकाळचा प्रत्यय, आणि ‘ सांगितलें ’ हें रूप. कर–धातु, करि किंवा के सामान्यरूप, करितों, केला हीं रूपें.

**टीप २**—प्रातिपदिकांचेंही असें मूळरूप सांगतां येणार नाहीं, असें नाहीं; परंतु मागें सांगितल्याप्रमाणें मराठींत बनणारीं प्रातिपदिकें एकदम प्रथमेचीं रूपें बनतात, यामुळें मूळरूपें ठरवीत बसण्यांत तादृश फायदा नाहीं.

( २ ) जुन्या मराठींत 'उ' आणि 'ओ' असे प्रथमेचे अन्त होते. हे संस्कृत प्रत्यय जो 'स्' ( विसर्ग ) त्यापासून झाले. सिंधी आणि गुजराथी भाषांत तसेंच कोंकणी प्रांतिक भाषेंत ते अद्याप आहेत. जुन्या मराठींत तर क्रियापदांच्या आणि अव्ययांच्या रूपांनाही उकार ( ऱ्हस्व किंवा दीर्घ ) लावण्याची चाल होती. सांप्रत जुन्या मराठींत आणि कवितेंत जे प्रथमेच्या रूपांच्या अन्तीं उकार आणि ओकार आढळतात, त्याच्यासंबंधानें पुढील नियम लक्षांत ठेवावेः—

( अ ) अकारान्त शब्दाच्या अंताच्या अ–स्वराच्या अगोदर 'य्' किंवा 'ह्' असल्यास प्रथमा ओकारान्त असते. जसें,–निश्चय, निश्चयो; उपाय, उपायो; अनुग्रह, अनुग्रहो; देह, देहो; लाह, लाहो; इत्यादि. उदाहरणेंः—

'वरा **निश्चयो** शाश्वताचा करावा। म्हणे दास संदेह तो वीसरावा;
सदा **वीषयो** चिंतितां जीव गेला। अहंभाव अज्ञान जन्मास आला.'
'धन्य धन्य हा **नरदेहो**। येथील अपूर्वता पहा हो।
जो जो कीजे परमार्थ–**लाहो**। तो तो पावे सिद्धीतें.'

—रामदास.

( आ ) अन्य अकारान्त शब्दांच्या अन्तीं 'उ' किंवा 'ऊ' होतो. जसें, वसंत, वसंतु, वसंतू; लाभ, लाभू; अर्थ, अर्थू; पंडित, पंडितू; निंदकू, कुंजरू, भ्याडू, संसारू, इत्यादि. उदाहरणेंः—

'–गोडी आणि **गूळू**। कापूर आणि **परिमळू**।
निवडू जातां **पांगळू**। निवाडू ( निवाडा ) होय.' —ज्ञानेश्वर.
नव्हे **चेटकू**, **बाळकू**, द्रव्यभोंदू। नव्हे **निंदकू**, **मत्सरू**, **भक्तिमंदू**।
नव्हे **उन्मतू**. वेसनीं ( व्यसानामध्यें ) **संग बाधू**। जगीं ज्ञानिया तोचि साधू अगाधू.' —रामदास.

'–एकें दिधला कल्पतरू। त्या दीजे दर्पणींचा **हारू**,
तेणें तो काय **गव्हारू**। उत्तीर्ण होय.' —ज्ञानेश्वर.

( इ ) ज्याच्ने अगोदर यकार किंवा हकार आहे असा अन्तींचा ' उ ' किंवा ' ऊ ' याचा ' ओ ' होतो जसें,–वायू, वायो; राहू, राहो; इत्यादि. उदाहरणेंः–

' काम क्रोधें लाथाडिला । तो कैसा म्हणावा भला,
अमृत सेवितांचि पावला । मृत्यु **राहो.** '
' जरेपासून जन्मला **मोहो** । तैसा जरासंध पाहा हो,
वेगीं उठला महा**बाहो** । सैन्यसमुदावो लोटला. '

( इ ) शेवटच्या अक्षरांत यकार असून त्याचे अगोदर 'आ' स्वर असला तर यकाराबद्दल ' व ' अथवा ' वो ' होतो. जसें,–समुदाय, समुदाव, समुदावो; राय, राव, रावो; घाय, घाव, घावो; ठाय, ठाव, ठावो; अपाय, अपाव, अपावो; इत्यादि. उदाहरणेंः—

' भक्तिचेनियोगें देव । निश्चयें पावती मानव,
ऐसा आहे **अभिप्राव** । इये ग्रंथीं.–'
' मनीं धरोनी हाचि भावो । अंतःपुरा आला **रावो.**
हाचि भक्ताचा पूर्ण **गौरवो** । तोचि **अभिप्रावो** हरि सांगे. '

( उ ) शब्दाच्या अन्तीं यकार असून त्याचे अगोदर ' अ ' असेल तर तो ' अ ' आणि पुढलि ' य ' या दोहोंबद्दल पुल्लिंगी नामांत ' ओ, ' स्त्रीलिंगी नामांत ' ए ' आणि नपुंसकलिंगी नामांत ' एँ ' होतात. जसें,—उदय, उदो, विषय, विषो; संवय, संवे; भय, भें; इत्यादि. उदाहरणेंः—

' आपणाप्रति रवी । **उदो** न करी जेवी,
हा वेद्य नव्हे तेवीं । वेदनासी. '
' दृष्टीस लागली **संवे** । जें दिसेल तेंचि पाहावें,
परंतु सार तें जाणावें । गौप्य आहे. '
'–प्रल्हादासी दैत्य थोर । म्हणे, मज थोर थोर–
भीती; बोलतां समोर । **भें** न वाटे तूजला. '
' परी दुसरेपणाचा **अतिसो** [ सोस ] ज्ञातया नाहीं. '

( ऊ ) शब्दाच्या शेवटीं ' व ' असल्यास त्याचा ' वो, ' ' उ ' किंवा ' ऊ ' होतो. जसें,–शिव, शिउ, शिऊ; देव, देवो; ठाव, ठावो, ठाऊ; राव, रावो, राऊ; इत्यादि. उदाहरणेंः—

'जिया जेवविला **शिऊ** । वेयाचें बोणें बहू,
वाडितेनशीं **जेऊं** । निघाला जो.'
'जनांचा लालचा **स्वभावो** । आरंभींच **म्हणती देवो**,
म्हणजे कांहीं तरी देवो । ऐशी भावना.'
'**ज्ञानदेऊ** म्हणे श्रीमंत । हें अनुभवामृत.'

**टीप**—जुन्या मराठी लेखांतून 'माधवराव,' 'रावसाहेब' इत्यादि शब्द 'माधवराऊ,' 'माधोराऊ,' 'राऊ' किंवा 'राउसाहेब' असे लिहिलेले आढळतात.

**द्वितीया**-(अ) कर्म हें कारक दर्शविणाऱ्या शब्दरूपास **द्वितीया** म्हणावयाची. हें रूप प्रथमेप्रमाणें असेल, अथवा चतुर्थीप्रमाणें असेल. 'गुराखी **गाय** बांधितो,' येथें **गाय** या प्रथमेसारख्या रूपानें कर्म दर्शविलें आहे. व 'गुराखी **गाईस** बांधितो,' येथें तें चतुर्थीचें रूप करून दर्शविलें आहे.

(आ) चालू मराठींत प्रथमेच्या रूपाला प्रत्यय नसतो. यासाठीं द्वितीया प्रथमेप्रमाणें असतां **अप्रत्यय द्वितीया** आणि चतुर्थीप्रमाणें असतां **सप्रत्यय द्वितीया** असें म्हणावें.

(इ) वाक्यांत द्वितीया सप्रत्यय किंवा अप्रत्यय घालणें ती बोलणारास मर्जीप्रमाणें घालतां येत नाहीं. भाषेंतल्या रूढीवरून तत्संबंधानें कांहीं नियम ठरले आहेत. उदाहरणार्थ, –'बाप रामा बोलावितो.' असें म्हणतां येत नाहीं, तर '**रामाला**' असें म्हणावें लागतें. परंतु 'गुराखी **गाय** बांधितो.' किंवा '**गाईस** बांधितो,' असें दोन्ही रितींनीं म्हणतां येईल. तसेंच, 'मी पुस्तक देतों,' असेंच म्हणावें लागतें; 'पुस्तकास देतों,' असें म्हणून चालणार नाहीं. सप्रत्यय द्वितीया आणि अप्रत्यय द्वितीया यांच्या उपयोगाचे संबंधाचे नियम वाक्यरचनेंत प्रयोगप्रकरणीं सांगितले आहेत.

**तृतीया**—(अ) 'आं' आणि 'एँ' हे प्रत्यय म्हणजे प्राकृतांतील सामान्यरूपाचे अन्त्य आहेत. हेच तृतीयेचे आणि अन्य विभक्तींचेही प्रत्यय झाले आहेत. त्यांचा उपयोग विभक्त्यन्त असा होऊं लागल्यानंतर मराठीच्या पद्धतीप्रमाणें शेवटीं अनुस्वार आलेला आहे. संस्कृतांत तृतीयेचा प्रत्यय न (इन) आहे. त्यास एकवचनीं 'एँ' आणि अनेकवचनी 'ईं' लागून

‘ नें ’ आणि ‘ नीं ’ असे प्रत्यय झाले. फार जुन्या मराठींत एकारान्त सामान्यरूपापुढें अथवा ‘ चे ’ च्या पुढें ‘ न, ’ ‘नि,’ ‘ नी, ’ लागून तृतीया होत असे. ‘ जाणतेनि, ’ ‘ त्याचेनी, ’ ‘ सगळेन, ’ ‘ मनाचेनि, ’ अशीं रूपें ज्ञानेश्वरींत आणि इतरत्र जुन्या कवितेंत पुष्कळ आहेत. ‘ त्यान्, ’ ‘ त्याणन्, ’ ‘ रामान् ’ अशीं रूपें कोंकणी भाषेंत आहेत. नंतर ज्यास्ती जोरासाठीं ‘ एँ ’ लागून ‘ नें ’ असा प्रत्यय झाला. ‘ हीं ’ हा अनेकवचनी प्रत्यय, ‘ भिः ’ याचें फार जुनें स्वरूप ‘ एहिं ’ किंवा ‘ इहिं ’ असें आहे, त्यावरून झाला; आणि त्याचेंच दुसरें सोपें रूप ‘ ई ’ हें आहे. ‘ शीं ’ हा प्रत्यय ‘ सह ’ या अव्यया-वरून झाला. संस्कृतांत या अव्ययाच्या अगोदर तृतीया असते. मराठींतही ‘ शीं ’ च्या पूर्वी पुष्कळदां ‘ नीं ’ प्रत्यय नेतो. उदाहरणार्थः—‘ तो एका धोत्रानीशीं घराबाहेर पडला. ’ ‘ शीं ’ लागल्यावर ‘ नीं ’ वरील अनुस्वार जातो; व ‘ नी ’ ऱ्हस्वही लिहितात.

( आ ) चालू भाषेंत साधारणतः तृतीया विभक्ति एकवचनीं ‘ नें ’ आणि अनेकवचनीं ‘ नीं ’ प्रत्यय लावून करितात. ‘ शीं ’ हा प्रत्यय बरोबरच्या वस्तू दर्शविण्यासाठीं येतो.

( इ ) एकवचनीं प्रत्यय ‘ आं ’ आणि ‘ एँ ’ आणि अनेकवचनीं प्रत्यय ‘ ईं ’ आणि ‘ हीं ’ हे जुन्या ठरींव भाषेंत आणि कवितेंत येतात. ते बहुधा अकारान्त पुल्लिंगी आणि नपुंसकलिंगी नामांस मात्र लागतात. उदाहरणेंः—

‘ स्वकीर्ती **डोळां** न देखावी.’—रामदास.

‘ देखोनि **डोळां** हृदयाभिरामा. ’—वामन.

‘ **व्यसोक्तें** अवगाहिला, बुधजनीं नानागुणीं गाइला,
जो **नामें** नळ तत्कथौघ लिहिला तो पाहिजे पाहिला. ’—रघु. पं.

‘ ती मुलगी **नाकीं डोळीं** निटस आहे. ’

‘ **हातीं पायीं** सुटणें. ’ [ एकाद्या प्रसंगांतून हातांना आणि पायांना व इतर अवयवांना इजा न होतां सुटणें. ]

‘ **दाशांहीं** बहु-पीन-मीन-निकरीं जो देखिला हो बरा. ’—मोरोपंत.

**टीप**—तृतीयेच्या सर्व प्रत्ययांच्या अन्तीं अनुस्वार असतो. या विभक्तीचे जे नवीन प्रत्यय क० १५२ ( आ ) यांत सांगितले आहेत, त्यांची मूलपीठिका सहज लक्षांत येण्यासारखी आहे.

**चतुर्थी**—( अ ) ‘ स ’ हा प्रत्यय संस्कृतांतील षष्ठीचा प्रत्यय ‘ स्य ’ ( प्रा० स्स ) यापासून झाला. ला–प्रत्यय ‘ लग् ’ धातूपासून झाला. ‘ लग् ’ धातूचीं रूपें लागीं, लागोनी, लागौनी वगैरे हीं जुन्या मराठींत येतात. खानदेशी, वऱ्हाडी आणि नागपुरी प्रांतिक मराठींत ‘ ले ’ असा प्रत्यय आहे. जसें,—बापाले; माणसाले, मसे–मजले, इत्यादि. या भाषांत क्वचित् ‘ लाई ’ प्रत्यय आहे. नेपाळी भाषेंत चतुर्थीचा ‘ लाई ’ प्रत्यय आहे. जुन्या हिंदी भाषेंत ‘ लौं, ’ ‘ लगी, ’ ‘ लगु ’ असे प्रत्यय आहेत. अपभ्रंश प्राकृतांत ‘लगाई’ ‘ लाऊं ’ असे प्रत्यय आहेत. त्यांपासून ‘ ला ’ प्रत्यय झाला. प्राकृतांत ‘ लग्गइ ’ असाही प्रत्यय आढळतो. ‘ तें ’ हा प्रत्यय प्राकृतांतील ‘ तेहि ’ यावरून आणि ‘ ना ’ हा संस्कृत ‘ नाम् ’ आणि प्राकृत ‘ णं ’ यावरून झाला. नवीन प्रत्यय ‘ ‘ सार्ठी ’ हा ‘ स्य+अर्थे ’ यावरून झाला.

**टीप**—कोकणांतील प्रांतिक भाषांत चतुर्थीचा ‘ क ’ प्रत्यय आहे. उदा०-पुताक=मुलाला. हिंदी भाषेच्या सन्निध पोंचलेल्या मराठी प्रांतिक भाषांत ‘के, आणि ‘ को ’ असे प्रत्यय आहेत.

( आ ) चालू मराठी देशावर ‘ स ’-चा उपयोग लेखांत विशेष, आणि ‘ला’-चा बोलण्यांत फार; आणि कोंकणांत ‘स’-चा उपयोग बोलण्यांत फार, आणि ‘ ला ’-चा लेखांत विशेष, असा प्रकार आढळतो. कोंकणामध्यें ‘ ला ’-चा उपयोगही पुष्कळ जुना आहे. तिकडील प्रांतिक भाषांत ‘ बापासला ’ ‘माणसासला’ अशीं रूपें येतात. ‘ तें ’ हा प्रत्यय कवितेंतच येतो.

( इ ) ‘ स ’ हा प्रत्यय कवितेंत आणि जुन्या भाषेंत ‘ सी ’ आणि क्वचित् ‘ शी ’ असाही येतो. उदाहरणें:—

‘ सारथी शार्ङ्धर ।–अर्जुनेशी. ’
‘ पवाडा तुवां केला । गंधर्वांसी. ’ ज्ञानेश्वर.

‘ जे नेदी देवकी-यशोदेसी । ते गती दिधली पूतनेसी,
समान देणें अरिमित्रांसी । उदारतेसी काय वर्णूं ? ’–एकनाथ.
‘ ती त्यासि म्हणे, पूर्वी एके मुनिनें विचारिलें होतें. ’–मोरो०.

**पंचमी**—( अ ) प्राकृतांत पंचमीचे प्रत्यय ‘ हिंतो ’ आणि ‘ सुंतो ’ असे आहेत त्यांवरून ‘ हून ’ आणि प्रांतिक प्रत्यय ‘सून’ (उदा०–मुंबईसून, घरसून

इ०. ) हे झाले असावे, असें कित्येकांचें मत आहे. मग ' हून ' यांतील हकार जाऊन ' ऊन ' हा प्रत्यय झाला.

( आ ) ही मूलपीठिका योग्य दिसत नाहीं. प्राकृत भाषांत पंचमी तृतीयेमध्यें लोप पावली. नंतर सध्यांची मराठी पंचमी ही नवीनच उत्पन्न झाली. डा० सर रामकृष्ण भांडारकर यांनीं असें प्रतिपादिलें आहे कीं, ' हून ' हा प्रत्यय ' होऊन ' या धातुसाधित अव्ययापासून आणि ' सून ' हा 'असून' यापासून झाला. ' घराहून ' म्हजजे ' घर होऊन ' म्हणजे ' घर आहे तेथून. ' ' मुंबईसून ' म्हणजे ' मुंबई शहर आहे किंवा असतें, तेथून. ' ' होऊन ' याचें ' हून ' असें होईल. कारण, ' मी होऊन असें करणार नाहीं.' ' तो होऊन तेथें गेला तर बरें. ' अशा वाक्यांत आपण, ' मी हून, ' ' तो-हून ' असें म्हणतों. ' असून ' यांतील ' अ ' जाऊन ' सून ' असें रूप होईल. संस्कृतांत पुष्कळ रूपांत ' अस् ' धातूच्या ' अ '–चा लोप होतो. कोंकणी पोटभाषेंत ' अस् ' धातूच्या ' अ '–चा नेहमीं लोप होतो. जसें,–' मे सलों. ' ' तूं सस, ' ' तूं सलोस. ' ' तो से. ' ' ते सत. ' इत्यादि. बंगाली भाषेंत ' होऊन ' याचें स्वरूप ' हइते ' आहे व ' घरहइते आसिलाम् ' किंवा ' वृक्ष हइते फल पाडिल,' ' वृक्ष आहे तेथून–वृक्षावरून फळ पडलें ' असा उपयोग होतो. हिंदी भाषेंत, ' बनारस होके आया हूं. ' असा उपयोग आहे. ' होऊन' असें रूप घालून पंचमी केल्याचीं जुन्या भाषेंतली उदाहरणें:—

( १ ) ' पाताळा–होऊनी निम्न । जियेचिये उंचिये सानें गगन,
जिये पाहातां त्रिभुवन । अणुहि नव्हे. ' —ज्ञानेश्वर १६–२३१.

यांत ' पाताळा–होऊनी निम्न ' म्हणजे ' पाताळाहून, पाताळ आहे त्याहून ठेंगणें, खोल, ' असा अर्थ. त्याचप्रमाणें:—

( २ ) ' सुवर्णा-होऊनि आनें । लेणीं गमती भिन्नें,
मग पाहिजे तंव सोनें । आवघेंचि तें. ' —ज्ञाने० १५–२३३

( ३ ) ' स्वरूप वैभव अलंकार । श्रिये-होऊन सुंदर,
सेवेलागीं अति तत्पर । सदा सादर सावधानें. '—एक. भा.–४-१८०.

( ४ ) ' विज्यानगरा–होऊनु बाहेर येऊन—'
—तालिकोटची बखर—महा. सार. पृ० ४९८.

(५) ‘रायगडास वाराणसी–होऊन सुखरूप पावलियावरि–’.

—सभासद, शिवाजी चरित्र.

(६) ‘काळोखा होउनु उजुवाडु बरवा काय, ऐसें कवणुइ न पुसे.’

—ख्रिस्तपुराण, प्रस्तावना

(७) ‘निष्ठुर तियेचें अंतःकरण। पाषाणा–होऊनी कठिण,
म्हणून शस्त्र न लगे जाणा। मनुक्षाचे जीवीं.’

(८) ‘इजिप्ता–होऊनी आलियावरी। भरले तिन्ही मासवेरी,
लोकू क्रमौनु पातले पुढारी। सिनाइ पर्वतीं.’

—पहिलें पुराण.

**टीप**—१. ख्रिस्त पुराणांत जेथें पंचमीचा उपयोग आहे, तेथें सर्वत्र ‘होऊन’ असाच प्रत्यय आहे.

**टीप**—२. सागर प्रांतांत ‘मी नागपुराहून येतों,’ ‘नागपुरास जाऊन येतों,’ याबद्दल ‘नागपुरास होऊन येतों’ असें म्हणण्याचा प्रघात आहे.

(इ) ‘म्हणून,’ ‘करून,’ ‘बोलून,’ हीं रूपें ज्ञानेश्वरीमध्यें ‘म्हणौन, ‘करौनि,’ ‘बोलौनि’ अशींच सर्वत्र आढळतात. तसेंच पंचमीचीं रूपें ‘कष्टौनि’ (कष्टाहून), मेघौनि’ (मेघाहून, मेघापासून), ‘जन्मौनि,’ ‘ठाउनी’ (स्थाना-हून-पासून), अशीं अनेक ठिकाणीं आहेत. त्याचप्रमाणें ज्ञानेश्वरींत आणि जुन्या गद्यलेखांतही पंचमीचा प्रत्यय ‘होन,’ ‘होनि,’ ‘होनी’ असा अनेक ठिकाणीं आलेला आहे. त्यावरून ‘होऊन’ ‘असून’ या ‘ऊन’ प्रत्ययान्त धातुसाधित अव्ययांवरून ‘हून’ आणि त्यावरून पुढें ‘ऊन’ प्रत्यय झाला, अशी पूर्वपीठिकाच योग्य आहे. ‘ऊन’ हा प्रत्यय अगदीं क्वचित् येतो. तो कित्येक अव्ययांना लागतो. उदा० घरून, हातून.–नामें; वरून, खालून, मागून, पुढून, इ०–हीं स्थलवाचक अव्ययें आहेत.

**टीप**—कोणी ‘तून’ असा प्रत्यय देतात. पण तो प्रत्यय नव्हे. ‘आंतून’ असें पंचम्यर्थक शब्दयोगी अव्यय असून त्याचा संधि झाला आहे.

(ई) नवीन प्रत्यय ‘पासीं (पाशीं),’ ‘पासाव’ ‘पासून’ हें ‘पार्श्वे’ ‘पार्श्व’ या संस्कृत शब्दांवरून आले आहेत.

**टीप ३**—क्रियापदावरून उद्देश्याच्या कृतीचें अथवा स्थितीचें **विधान** केलें असतें, यामुळें त्यास **विधेय** असेंही म्हणतात. हा शब्द वाक्यविचाराच्या संबंधाचा आहे. विधेय होण्यासाठीं कांहीं थोड्या क्रियाशब्दांबरोबर दुसऱ्या कांहीं शब्दांची जरूर असते. एरव्हीं **क्रियापद** आणि **विधेय** हे शब्द समानार्थकच आहेत.

१९५. क्रियापदें आणि कृदन्तें क्रियादर्शक मूळ शब्दांवरून होतात. या शब्दांना **धातु** असें म्हणतात. उदाहरणार्थ,–'असतो' यांत 'अस' धातु, 'केलें' यांत 'कर,' 'भिईल' यांत 'भी,' 'बसावा' यांत 'बस,' इत्यादि. या धातूंना प्रत्यय लागून निरनिराळ्या प्रकारचीं क्रियादर्शक रूपें सिद्ध होतात.

**टीप १**—मूळ धातूचें ठरींव रूप असतें. आज्ञार्थाच्या द्वितीयपुरुषीं एकवचनीं प्रत्यय लागत नाहीं, आणि अन्य फेरफारही होत नाहीं; यामुळें तें रूप म्हणजे मूळचा धातु असें विद्यार्थ्यांना समजण्यास सोईचें आहे. व्याकरणांत मूळ धातूपुढें 'णें' कृदन्त प्रत्यय लावून असणें, होणें, करणें, जाणें, येणें, इत्यादि अशा प्रकारेंही धातु सांगतात.

**टीप २**–मराठींतले बहुतेक धातु द्व्यक्षरी असून अकारान्त असतात. 'लिहि' हा द्व्यक्षरी धातु इकारान्त आहे. कांहीं–अगदीं थोडे–एकाक्षरी धातु आहेत, त्यांचे अंतीं दीर्घ ई, ऊ, आणि ए हे स्वर असतात.

## (२) धातुशब्दांचे प्रकार.

१९६. (अ) धातुशब्दांचे प्रकार दोन कारणांनीं होतात; (१) रचनेवरून आणि (२) उपयोगावरून किंवा अर्थावरून.

(आ) रचनेवरून दोन भेद होतात; (१) **सिद्ध** आणि (२) **साधित**. कांहीं मूळचे धातु आहेत, ते सिद्ध. जसें,—करणें, बोलणें, चालणें, इत्यादि. यांवरून 'क्रिया करवणें' अशा अर्थाचे करवणें, बोलवणें, चालवणें, असे साधितधातु प्रत्यय लागून होतात. त्याचप्रमाणें कित्येक प्रातिपदिकांवरूनही धातु होतात. जसें–हात=हाताळणें, फूल=फुलणें, लांब=लांबणें, इत्यादि. हे साधित धातु.

(इ) धातुशब्दांचे उपयोगावरून **सकर्मक** आणि **अकर्मक** असे दोन भेद होतात.

(इ) ज्या धातुशब्दांचा क्रियार्थ त्यांच्यामध्यें पूर्ण असतो, 'काय करणें' हें ज्याविषयीं सांगावें लागत नाहीं ते, आणि स्थितिदर्शक 'अस' आणि 'हो' धातु, **हे अकर्मक धातु** होत. जसें,—बसणें, उठणें, निजणें, जाणें, फुगणें, उगवणें, मावळणें, असणें, होणें, इत्यादि.

(उ) ज्या धातुशब्दांचा क्रियार्थ पूर्ण होण्यास त्यांच्याबरोबर '**अमुक** करणें,' असें त्यांविषयीं सांगावें लागतें, ते **सकर्मक** धातु. जसें,—' विद्यार्थी **पुस्तक** वाचितो.' 'गाय **चारा** खाते-' 'मूल **दूध** पितें.' 'मुली **गाणें** म्हणतात." मीं **चाकराला** गांवाला धाडिलें." तो चारी **दिशा** हिंडला इ०

(ऊ) सकर्मक धातूंबरोबर **अमुक** केलें, किंवा **अमक्यास** कांहीं केलें, असें दर्शविण्यासाठीं जो शब्द येतो, त्यास **कर्म** असें म्हणतात.

**टीप**—यावरून वरील उदाहरणांत पुस्तक, चारा, दूध, गाणें, चाकराला आणि दिशा हीं कर्में होत, हें उघड दिसून येईलच.

१९७. **उभयविध धातु**—धातु सकर्मक किंवा अकर्मक असतात, ते विवक्षित वाक्यांतील अर्थावरून असतात. यामुळें तसा अर्थ असल्यास दिसण्यांत एकच धातु एका वाक्यांत सकर्मक आणि दुसऱ्या वाक्यांत अकर्मक होऊं शकेल. उदाहरणार्थ,—' मी झाड मोडतों.' 'गडी पाणी भरतो.' 'चाकर दार उघडतो.'—सकर्मक. आणि 'वाऱ्यानें झाड मोडलें.' 'त्याला हींव भरलें.' 'धक्कयानें दार उघडलें.'—अकर्मक. अशा धातूंना उभयविध धातु असें कोणी म्हणतात. परंतु एकादा धातु सकर्मक आणि अकर्मक असा एकदम नसतो; तर तो अर्थावरून निरनिराळ्या वाक्यांत तसा असतो. तेव्हां अर्थ भिन्न असतां ते भिन्नच धातु मानणें रास्त होय. ह्याकरितां **उभयविध धातु** असा भेद सांगण्याचें कधीं कारण पडणार नाहीं.

१९८. वरील विवेचनावरून दिसून येईल कीं, क्रिया म्हटली म्हणजे ती **करणारा** असला पाहिजे. तसा शब्द वाक्यांत असतो. जसें,—' हरी पत्र लिहितो ' यांत लिहिण्याची क्रिया करणारा ' हरी ' आहे.

वाक्यांत क्रिया करणाराचा दर्शक जो शब्द, त्यास **कर्ता** असें म्हणतात.

१९९. कांहीं क्रियापदें अशीं आहेत कीं, त्यांच्यामध्येंच सर्व अर्थ पूर्ण असतो. तीं अकर्मक असतात. आणि त्यांना कर्त्याचीहि जरूर नसते. अशा

क्रियापदांनी अकर्तृक क्रियापदें असें म्हणावें. उदाहरणें,—'आतांशा सहा वाजतां **उजाडतें**.' 'मला त्याच्या येथेंच **सांजावलें**.' 'त्याला तेथें मुळींच **करमत** नाहीं.' इत्यादि. अशा प्रकारचे धातु फार थोडे आहेत. ते असेः— कळमळणें, मळमळणें, सांजावणें, फावणें, उजाडणें, करमणें, ढवळणें, गडगडणें, चकाकणें, इत्यादि.

**टीप**—क्रियापदें कर्तरि, कर्मणि आणि भावी असतात. हे क्रियापदांचे भेद अर्थावरून होतात. परंतु हे भेद धातुशब्दांचे नसून क्रियापदांचे अथवा आख्यात विभक्तींच्या संबंधाचे आहेत, हें लक्षांत ठेवावें. याचें विवेचन पुढें योग्य स्थळीं होईल.

२००. क्रियापदावरून आपल्या बोलण्यांत म्हणजे वाक्यांत कशाबद्दल तरी विधान केलेलें असतें. ज्याबद्दल विधान करावयाचें तें **उद्देश्य** आणि विधानार्थक शब्द **विधेय** किंवा **क्रियापद**. उद्देश्यदर्शक शब्द हा नामवाचक असतो, आणि क्रियादर्शक शब्द म्हणजे क्रियापद याचा त्यांच्याशीं निकट संबंध असतो. यामुळें उद्देश्याचें लिंग, वचन आणि पुरुष, यांच्याशीं क्रियापदाची जुळणी व्हावी लागते. ही जुळणी मूळच्या धातुशब्दास प्रत्यय लावून त्याचीं रूपें करून करितात. उदाहरणार्थ,–(१) वचनें–'विद्यार्थी **वाचितो**. एकवचन. 'विद्यार्थी **वाचितात**.'–अनेककवचन. (२) पुरुष–'मी जातों; आम्ही जातों.'–प्रथमपुरुष. 'तूं लिहितोस; तुम्ही लिहितां.'–द्वितीयपुरुष. 'तो येतो; ते येतात.'–तृतीयपुरुष–इत्यादि. (३) लिंगविकार–'हरी येतो.' पुल्लिंगी. 'मुलगी येते.'–स्त्रीलिंगी. 'पांखरूं उडालें.'–नपुं०. याप्रमाणें क्रियापदांचीं लिंग, वचन, आणि पुरुष यांवरून रूपें होतात.

**टीप**—लिंगभेद सर्व क्रियापदरूपांना होत नाहीं. उदाहरणार्थ,–'जाईल' हें रूप 'तो जाईल, ती जाईल, तें जाईल,' असें तिन्ही लिंगीं एकच असतें. कोणत्या क्रियापदरूपांना लिंगभेद आहे व कोणत्यांना नाहीं, याचा खुलासा पुढें होईल.

२०१. क्रियापदावरून क्रिया अमुक वेळीं झाली, असा काळाचा बोध होतो. गत काळ, चालू काळ आणि पुढील काळ, असे वेळाचे तीन प्रकार असतात. यामुळें वेळाचा बोध होण्यासाठीं क्रियापदाचीं रूपें होतात.

उदाहरणार्थ,–‘पक्षी उडतो.’–**चालू काळ**. ‘पक्षी उडाला.’–**गत काळ**. ‘पक्षी उडेल.’–**पुढील काळ**. या काळांना अनुक्रमें **वर्तमान काळ, भूत काळ** आणि **भविष्य काळ** असें म्हणतात.

२०२ त्याचप्रमाणें क्रियापदावरून कांहीं विशेष अर्थाचा किंवा हेतूंचा बोध होतो. उदाहरणार्थ,–‘तूं **जा**.’—आज्ञा; ‘तो घरीं **असावा**.’—अजमास. ‘ईश्वर तुझें कल्याण **करो**.’—आशीर्वाद. ‘तूं **येतोस** तर मीही **येतों** (आलों असतों).’—संकेत. असा बोध होण्यासाठींही क्रियापदाचीं रूपें बदलतात. हा जो क्रियापदाच्या रूपांना बदल होतो त्यास **अर्थ** असें म्हणतात

२०३. (अ) अशा रितीनें क्रियापदांचीं निरनिराळीं रूपें असतात. प्रथमतः तीन काळांचीं रूपें; नंतर हेतुदर्शक म्हणजे अर्थांचीं रूपें. काळ आणि अर्थ यांच्या रूपांना तीन लिंगें,* तीन पुरुष, आणि प्रत्येकीं दोन वचनें याचे विकार होतात.

(आ) भाषेंत होणाऱ्या भिन्न भिन्न रूपांना व्याकरणांत **विभक्ति** असें नांव आहे, हें मागें सांगितलें आहे. क्रियापदांच्या या विभक्तिरूपांना **आख्यात विभक्ति** असें शास्त्रीय नांव देऊं.

**टीप**—संस्कृतांत क्रियापदास ‘आख्यात’ असा शब्द आहे. त्यावरून ‘आख्यात–विभक्ति’ असा सोईवार शब्द तयार केला आहे. त्याचप्रमाणें क्रियापदांच्या निरनिराळ्या रूपांना ‘आख्यात-रूपें’ असें म्हणावें.

२०४. वर्तमान, भूत आणि भविष्य असे तीन काळ आहेत. वर्तमानकाळ दोन तऱ्हेचे होतात. जसें,—‘मांजर पळतें.’ आणि ‘तो बोले (बोलतो).’ भूतकाळही दोन प्रकारचे होतात. जसें,—‘मी **जाई** (जात असें).’ आणि ‘मी गेलों.’ भविष्यकाळ एकच प्रकारचा आहे. यावरून काळांच्या संबंधानें पांच **आख्यातविभक्ति** होतात.

२०५. बोलण्याचे **हेतु** किंवा **अर्थ** यांवरून तीन **आख्यातविभक्ति** होतात. जसें,—‘तूं जा.’—आज्ञार्थ. ‘तो असावा.’—विध्यर्थ. ‘तो **जाता** तर.’–संकेतार्थ.

---

* लिंगविकार सर्वच रूपांना होत नाहीं, कांहीं रूपांना होतो, हें सांगण्यांत आलेंच आहे. पूर्ण खुलासा पुढें योग्य स्थलीं होईलच.

२०६. यांप्रमाणें एकंदर आख्यात—विभक्ति आठ आहेत.—दोन वर्तमान, दोन भूत, एक भविष्य, असे काळ; आणि आज्ञार्थ, विध्यर्थ आणि संकेतार्थ.

( अ ) या प्रत्येक आख्यातविभक्तीचीं पुरुषांवरून तीन, प्रत्येक पुरुषाचीं वचनांवरून दोन आणि कांहींचीं लिंगांवरून तीन अशीं रूपें व्हावयाचीं हें उघड दिसून येईलच.

## ( ३ ) काळ आणि अर्थ.

२०७. क्रियापदाच्या रूपांवरून एकादी क्रिया पूर्वी झाली, आतां होत आहे किंवा पुढें होईल, असा जो वेळेचा बोध होतो, त्यास **काळ** असें म्हणतात.

( अ ) क्रियापदाच्या रूपांचे तीन काळ असतात.–( १ ) **वर्तमान**, ( २ ) **भूत**, आणि ( ३ ) **भविष्य**.+

२०८. क्रियापदाच्या रूपावरून 'पूर्वी' असा काळाचा बोध होतो, तो **भूतकाळ**; 'आतां' असा बोध होतो तो **वर्तमानकाळ**; आणि 'यानंतर' किंवा 'पुढें' असा बोध होतो, तो **भविष्यकाळ**. उदाहरणें:––

( १ ) भूतकाळ—मुलगा चालला. हरी बसला. सूर्य उगवला. पत्र आलें. मीं पत्र लिहिलें. त्यानें तें पुस्तक घेतलें. इ०.

( २ ) वर्तमानकाळ—मुलगा चालतो. हरी बसतो. सूर्य उगवतो. पत्र येतें. मी पत्र लिहितों. तो पुस्तक घेतो. इ०.

( ३ ) भविष्यकाळ––मुलगा चालेल. हरी बसेल. सूर्य उगवेल. पत्र येईल. मी पत्र लिहीन. तो पुस्तक घेईल इ०.

( अ ) काळांचीं आणखी कवितेंतील उदाहरणें:—

'मत्सुत मद्वनिता हें जाणें ( वर्तमान ) मी, परि जनांस कळवाया; ऐसें निष्ठुर वदलों ( भूत ) तुमची शंका अशेष पळवाया.'

'ती त्यास म्हणे ( वर्त० ) पूर्वी एक्या मुनिनें विचारिलें होतें ( भूत ), जें त्यातें मत्तातें कथिलें ( भूत ) मद्वृत्त सांगत्यें ( वर्त० ) हो तें.'

---

+ मूळचा संस्कृत शुद्ध शब्द 'भविष्यत्' असा आहे, त्यावरून 'भविष्यत्काळ' असें होईल. परंतु मराठींत 'भविष्य' असा शब्द योजण्याची चाल पडली आहे. आतां त्यांत बदल करण्यांत अर्थ नाहीं.

'आर्यामुक्तामाला दाविन ( भ० ) परि जरि तुम्ही न मागाल ( भ० ); घालाल ( भवि० ) प्रभुकंठीं, तेव्हां फुगवील ( भवि० ) कीं रमा गाल.'
—मोरोपंत.

'अदितिच्या उदरीं हरि जन्मला ( भूत ),
म्हणुन ये समयीं कळलें ( भूत ) मला;
'विभव, राज्य, समस्त हरील ( भविष्य ) रे,
यशहि होइल ( भविष्य ) विस्तृत अस्त रे.' —वामन.

२०९. क्रियापदांच्या कित्येक रूपांवरून असा काळांचा बोध न होतां कांहीं विशेष हेतूंचा किंवा अर्थांचा बोध होतो. अशा रूपांना व्याकरणांत **अर्थ** असें म्हणतात. क्रियापदाच्या रूपांवरून ( १ ) **आज्ञार्थ** ( २ ) **विध्यर्थ** आणि ( ३ ) **संकेतार्थ** असे तीन अर्थ उत्पन्न होतात.

( अ ) जेव्हां क्रियापदाच्या रूपावरून आज्ञा मागणें, आज्ञा करणें, उपदेश करणें, आशीर्वाद देणें, प्रार्थना करणें, अशा प्रकारचे हेतु दिसून येतात तेव्हां तो **आज्ञार्थ**. जसें,–'मी घरीं जाऊं?' 'हें काम आम्ही करूं काय?' हरी, पुस्तक वाच.' 'मुलांनो, जाग्यावर बसा.' 'ईश्वर तुमचें कल्याण करो." देवा, महाराजांचें रक्षण कर.' इत्यादि.

( आ ) जेव्हां क्रियापदाच्या रूपावरून कर्तव्य, शक्यता, रीत, उपदेश, अजमास, इत्यादि हेतूंचा बोध होतो, तेव्हां तो **विध्यर्थ**. जसें,—'मुलांनीं गुरूची आज्ञा मानावी.' 'तुम्हांस वास्तविक एवढा धडा व्हावा.' 'त्यानें लहानपणीं नित्य इष्ट करावा.' 'सर्वांनीं खरें असेल तें सांगावें.' 'चाकर आज गांवाहून परत यावा.' इत्यादि.

( इ ) जेव्हां क्रियापदाच्या रूपावरून असें असेल तर असें, अमुक असल्यास अमुक, असा संकेताचा अर्थ उत्पन्न होतो, तेव्हां तो **संकेतार्थ**. उदाहरणें,–'तो कालच जाता तर बरें होतें.' तूं पत्र लिहितास तर काम झालें असतें.' इत्यादि.

**टीप**—या अर्थीं वेळेचा बोध होत नाहीं, म्हणून अर्थांना काळाचा भेद नाहीं. व्यवस्थेसाठीं पाहिजे तर हे वर्तमानकाळाचे प्रकार आहेत असें मानावें. वास्तविक संकेतार्थावरून भूतकाळासारखा बोध होतो, आणि त्यांत सांगितलेली क्रिया खरोखरी झालेली नसते.

(ई) या अर्थांचीं कांहीं कवितेंतील उदाहरणें:—

(१) आज्ञार्थ—

'**घेई घेई** माझे वाचे। गोड नाम विठोबाचें.'
'**धावें पावें** बा अनंता। सर्वसाक्षी कृपावंता.' —तुकाराम.
'जा **सांग** पित्याला, म्यां त्यजिलें वृषपर्वपुर, असे सांगे.'
'**हलु हलु झडो** अहंता सन्नमनीं, वार्धकीं जशी शेंडी,
**केंडू** विवेक विषया, निःस्पृहजन वस्तुतें जसा केंडी!'
सुसंगति सदा **घडो**, सुजनवाक्य कानीं **पडो**;
कलंक मतिचा **झडो**, विषय सर्वथा **नावडो**;
स्वतत्त्व हृदया **कळो**, दुरभिमान सारा **गळो**;
पुन्हा न मन हें **मळो**, दुरित आत्मबोधें **जळो**.'—मोरोपंत.

(२) विध्यर्थ—

'**कांपावें** मन कुजनीं, वृद्धपणीं कांपतें जसें शिर तें;
सत्संगांत **शिरावें**, बालक जननीकडे जसें शिरतें.'
'सत्यातें **जोडावें** सुज्ञें, धर्मास पळ न **सोडावें**.'
'धृतराष्ट्र म्हणे, विदुरा, हें त्या पौत्रासि वर्ष सोळावें,
**लोळावें** मांडिवरी, तेणें द्रोणादिकांसि **घोळावें**!'—मोरोपंत.

(३) संकेतार्थ—

'ऐसें चित्तीं बोले, मोजी उर्वरित दिवस-महिने ती;
**नसतें** तसें, तरि सुखें वय भोगुनि तदधिकश्रम हि **नेती**.'
—मोरोपंत.

'श्रीमन्मयूरकविची देते संतोष मानवां कविता;
**असता** जरि भूमिवरी सुरगुरु तरि तोहि मान **वांकविता**.'

(उ) या तिन्ही अर्थांपैकीं कोणताही अर्थ वाक्यांत नसतां तो भेद कळावा म्हणून अशा वाक्याचा **स्वार्थ** असा चौथा अर्थ मानण्याची चाल आहे. ज्या वाक्यांत आज्ञार्थ, विध्यर्थ किंवा संकेतार्थ नसेल, तेथें **स्वार्थ** आहे असें म्हणावें.

## ( ४ ) आख्यातविभक्तींचा इतिहास.

२१०. संस्कृत भाषेंत काळांचीं आणि अर्थांचीं मिळून दहा प्रकारचीं आख्यातरूपें होतात. या दहा आख्यातविभक्तींना दहा लकार असें संज्ञेनें म्हणतात. मराठींत अशा आख्यातविभक्ति आठ आहेत. त्या अशाः—( १ ) जुना अथवा कवितेंतील वर्तमानकाळ. ( २ ) चालू वर्तमानकाळ. ( ३ ) रीतिभूत. ( ४ ) भूतकाळ. ( ५ ) भविष्यकाळ. ( ६ ) आज्ञार्थ. ( ७ ) विध्यर्थ आणि ( ८ ) संकेतार्थ.

२११. या आख्यातविभक्तींपैकीं ( १ ) जुना वर्तमान, ( २ ) रीतिभूत, ( ३ ) भविष्य आणि ( ४ ) आज्ञार्थ ह्या चार मूळ संस्कृतांतील लकारावरून झाल्या आहेत. बाकीच्या चार कृदन्त विशेषणाच्या रूपापुढें 'अस' धातूचें रूप येऊन, आणि दोहोंचा एकजीव होऊन झाल्या आहेत.

टीप—वस्तुतः जुना वर्तमानकाळ आणि आज्ञार्थ या दोन आख्यातविभक्ति संस्कृत लकारांवरून आल्या आहेत. रीतिभूत आणि भविष्य या जुन्या वर्तमानकाळावरून मराठींत साधल्या आहेत. याविषयीं पुढें चर्चा होईल.

२१२. मराठी भाषेंत कृदन्तांवरून झालेल्या आख्यातरूपांना लिंगविकार होतो. संस्कृतांत आख्यातरूपांना लिंगविकार नाहीं.* यामुळें मूळ संस्कृत काळांवरून† मराठींत ज्या आख्यातविभक्ति झाल्या आहेत, त्यांना लिंगविकार नाहीं. परंतु संस्कृतांत विशेषणास विशेष्याचे लिंगादिविकार होतात, आणि ती पद्धत मराठींतही आली आहे; म्हणून कृदन्त विशेषणांवरून झालेल्या आख्यातरूपांना मराठींत लिंगविकार होतो. पुढील विवेचनावरून हें चांगलें लक्षांत येण्यासारखें असल्यामुळें येथें जास्त विवेचन करण्याचें कारण नाहीं.

---

* आख्यातरूपांना लिंगविकार होणें ही मराठी भाषेंतील व्यवस्था अपूर्व वाटण्यासारखी आहे. संस्कृत आणि इंग्लिश या भाषेमध्यें हा प्रकार नाहीं. परंतु मराठी आणि इतर देशभाषा यांतील कांहीं आख्यातरूपें कृदन्त विशेषणांवरून झाल्यामुळें हा प्रकार साहजिकच देशभाषेमध्यें उत्पन्न झाला आहे.

† आठ आख्यातविभक्तींमध्यें कांहीं काळ आहेत व कांहीं अर्थ आहेत. परंतु विवेचन करितांना सुलभपणासाठीं 'काळ व अर्थ' यांबद्दल फक्त 'काळ' असेंही म्हटलें आहे.

२१३. आतां या आख्यातविभक्ति कशा झाल्या हें सांगतों.—

( १ ) **जुना वर्तमान काळ**—ही आख्यातविभक्ति संस्कृतांतील वर्तमान-काळावरून झाली. संस्कृत ' हस् '–हसणें ह्या धातूचीं संस्कृतांतील व प्राकृतांतील वर्तमानकाळाचीं रूपें पाहाः—

| | संस्कृतरूपें | | प्राकृतरूपें | |
|---|---|---|---|---|
| | ए० व० | अने० व० | ए० व० | अने० व० |
| प्र० पु० | हसामि | हसामः | हसम्मि | हसम्म |
| द्वि० पु० | हससि | हसथ | हससि | हसह |
| तृ० पु० | हसति | हसन्ति | हसदि, | हसइ, हसन्ति |

( अ ) या रूपांमध्यें लागलेल्या प्रत्ययांवरून मराठींतल्या जुन्या वर्तमान-काळाचे प्रत्यय झाले आहेत, हें सहज लक्षांत येईल, हे प्रत्यय असेः—

प्रथम पुरुष–सकर्मक धातूंचा एकवचनी प्रत्यय ' ईं. ' उदा०—मी करीं. अकर्मक धातूंचा ' एँ. ' उदा० —मी हसें. सकर्मक व अकर्मक, अनेकवचनी ' ऊं, ' आणि ' ओं. ' उदा०—करूं, करों. हसूं, हसों.

द्वितीय पुरुष–एकवचनी प्रत्यय ' सी,' 'शी.' उदा०—करिसी, करीशी.हससी, हसशी. अनेकवचनी प्रत्यय ' आ. ' उदा०—करा. हसा.

तृतीय पुरुष—एकवचनी सकर्मक धातूंचा प्रत्यय ' ई. ' उदा०—तो करी. अकर्मक धातूंचा प्रत्यय ' ए. ' उ०—तो हंसे. अनेकवचनी ' ती. ' उदाहरण करिती. हसती.

( आ ) याप्रमाणें ' कर ' धातु सकर्मक, आणि ' हस ' धातु अकर्मक. यांचीं रूपें:—

| | | | |
|---|---|---|---|
| मी करीं | आम्ही करूं, करों. * | मी हसें | आम्ही हसूं, हसों.* |
| तूं { करिसी / करिशी | तुम्ही करा. | तूं { हससी, / हसशी. | तुम्ही हसा. |
| तो करी | ते करिती. | तो हसे | ते हसती. |

( इ ) वरील रूपांवरून दिसून येईल कीं, ( १ ) द्वितीयपुरुषीं आणि तृतीयपुरुषीं सकर्मक आणि अकर्मक धातूंचे प्रत्यय थोडे भिन्न आहेत.

---

*अनेकवचनीं दोन्ही प्रत्यय होतात.

अकर्मक धातूंचे प्रत्यय संस्कृत आत्मनेपदी¶ प्रत्ययांवरून झाले आहेत. ( २ ) तृतीयपुरुषाचा अनेकवचनी संस्कृत प्रत्यय ' अन्ति ' आहे, तसा अनुस्वार विरहित ' अति ' असाही आहे. मराठींत अनुस्वारविरहित प्रत्यय आला आहे. ( ३ ) सकर्मक ' कर ' धातूला व्यंजनादि प्रत्ययांपूर्वी ' इ ' आगम झाला आहे, हा आगम मूळचा दीर्घ आहे. या ठिकाणीं हा आगम विकल्पें होतो; कारण ' करशी, ' ' करती, ' अशींही रूपें होतात.

( ई ) ' ई ' **आगम**—हा ' ई ' आगम पुष्कळ ठिकाणीं होतो. यासाठीं तत्संबंधानें नियम येथेंच सांगावे हें बरें. ( १ ) हा आगम अकारान्त धातूंना व्यंजनादि प्रत्ययांमागें होतो. ( २ ) याचें मूळ कारण असें आहे कीं, प्रत्यय एकाक्षरी असून अकारान्त असला, तर शब्दाचे शेवटीं दोन अकारयुक्त अक्षरें येऊन उच्चार नीट होत नाहीं. उदाहरणार्थ ' कर ' धातु + स ( रीतिभूत, द्वितीय पुरुषी अनेकवचनी प्रत्यय )=' करस ' असें रूप उच्चारास सोईवार नाहीं. अकारान्त शब्दाच्या उपान्त्य अकाराचा दीर्घ उच्चार करावा, असा मराठी शब्दांमध्यें नियम आहे. ( जसें,– गवैत, मर्दत, हळंद, इत्यादि. ) परंतु येथें तेवढ्यानें भागत नाहीं; यामुळें प्रत्ययाचे अगोदर ' ई ' आगम होतो. जसें,—करील, करीत, इत्यादि. हा आगम उपान्त्यास जोर आणण्यासाठीं होतो, म्हणून मूळचा दीर्घ आहे. परंतु प्रत्ययामध्यें अकार नसून दीर्घ स्वर असला, म्हणजे मग या आगमाचें उपान्त्यास दीर्घत्व आणण्याचें काम नाहींसें होऊन तो ऱ्हस्व होतो आणि विकल्पें होऊं लागतो. उदाहरणें—कर + त ( वर्तमानकालवाचक विशेषणाचा प्रत्यय )=करीत; परंतु यांत ' आं ' मिळून दुसरें रूप ' करितां ' अथवा ' करतां ' असें होतें. त्याचप्रमाणें ' करिशी, ' ' करशी, ' ' करिती, ' ' करती, ' इत्यादि. ( ३ ) अकर्मक धातूंच्या रूपांत हा आगम होत नाहीं. जसें,–हसत, हसती; बसतात; बसस; इत्यादि. असा भेद होण्याचें कारण कळत नाहीं. ( ४ ) कित्येक लोकांच्या बोलण्यांत हा

---

¶ संस्कृत आख्यातप्रत्यय परस्मैपदी आणि आत्मनेपदी असे दोन प्रकारचे आहेत. आत्मनेपदी प्रत्ययांत एकार आहे, व हे प्रत्यय मूळचे अकर्मक धातूंना लागणारे आहेत. यावरून मराठींत अकर्मक धातूंना लागणाऱ्या प्रत्ययांमध्यें एकार आला आहे.

आगम येत नाहीं. ‘ मी हें काम करत नाहीं. ’ असें कित्येक बोलतात, परंतु हा प्रांतिक प्रकार आहे. सुशिक्षित लोकांच्या बोलण्यांत आणि लेखांमध्यें सर्वत्र हा आगम होतो. (५) हा आगम ऱ्हस्व झाला म्हणजे वैकल्पिक होतो. मग तो करावा कीं नाहीं ? अशा ठिकाणीं त्याचें कार्य नाहींसें होऊन तो निरर्थक झाला हें खरें. पण भाषेंतील व्यवस्थेकरितां सकर्मक धातूंच्या रूपांत हा आगम नेहमीं करावा, आणि धातु अकर्मक असतां करूं नये, असा नियम असणें बरें. अर्थात् ‘ करितां येतें. ’ ‘ लिहिशील तर बरें. ’ असें बोलावें व लिहावें. ‘ करतां येतें. ’ ‘ लिहशील तर बरें. ’ असें नसावें.

( उ ) कित्येक धातूंच्या संबंधानें या ‘ ई ’ आगमाविषयीं कांहीं अपवाद आहेत. त्यांविषयीं योग्य स्थळीं सांगण्यांत येईल.

**टीप**—जुन्या वर्तमानकाळीं रूपांना लिंगभेद नाहीं.

( २ ) **चालू वर्तमान**—हा काळ कृदन्तावरून झाला आहे. वर्तमानकालवाचक विशेषण ‘ त ’ प्रत्यय लागून होतें. जसें,—कर + ई ( आगम )+ त=करीत. यापुढें ‘ अस ’ धातूचें रूप येतें. मग कृदन्त आणि ‘ अस’–चें रूप यांचा एकजीव होऊन सांप्रतचें रूप बनलें. उदाहरणार्थ,–‘ मी करीत आहें, ’ याचें ‘ मी करितों, ’ असें झालें.

( अ ) प्रथमतः एक सकर्मक आणि एक अकर्मक असे धातु घेऊन फक्त पुल्लिंगी रूपें करूं:—

| ‘ कर ’ धातु, सकर्मक. | | ‘ बस ’ धातु, अकर्मक. | |
|---|---|---|---|
| मी करितों | आम्ही करितों. | मी बसतों | आम्ही बसतों. |
| तूं करितोस | तुम्ही करितां. | तूं बसतोस | तुम्ही बसतां. |
| तो करितो | ते करितात. | तो बसतो | ते बसतात. |

( आ ) कृदन्तांवरून क्रियापदरूपें कशीं झालीं ?—संस्कृत व्याकरणांत जीं निरनिराळ्या धातूंचीं निरनिराळ्या काळीं रूपें दिलीं आहेत, तीं फार कठीण आहेत. नेहमींच्या बोलण्यांत किंवा साधारण लेखनव्यवहारांत हीं काळांचीं रूपें येणें अशक्य. यासाठीं लोकव्यवहार आणि साध्या लोकांचा लेखनव्यवहार यांत अशी रीत पडली कीं, क्रियापदरूपावरून जो अर्थ हवा असेल,त्या अर्थाचें कृदन्त घालून पुढें ‘ अस् ’ धातूचें पूर्ण रूप घालावें आणि वाक्य

करावें. हें 'अस्'—चें रूप नेहमीं प्रत्यक्ष घालीत असेंही नाहीं. तें गुप्त ठेवीत. उदाहरणार्थ, 'चाकर गांवाला गेला' असें म्हणावयाचें तर 'किंकरो ग्रामं अगच्छत्,–जगाम–अगमत्' याचे ऐवजीं 'किंकरो ग्रामं गतः (अस्ति) अशी थोडक्यांत सोपी रचना करीत. हीच रीत देशभाषांत आली. अशा प्रकारें मराठींत आणि दुसऱ्या सर्व देशभाषांत पूर्ण क्रियापदांचें काम कृदन्तांनीं होऊं लागलें, आणि पुढें त्यांनाच **काळ** असें म्हणूं लागले. मराठींत संस्कृतांतल्या वर्तमानकाळावरून वर्तमान, रीतिभूत आणि भविष्य आणि आज्ञार्थावरून आज्ञार्थ या आख्यात विभक्ति झाल्या. बाकीच्या चार आख्यातविभक्ति कृदन्तांवरून झाल्या आहेत.

(इ) ह्या काळाचीं रूपें कशीं साधलीं हें आपण पाहूं. 'कर' या धातूचें वर्तमानकाळचें विशेषण कर + ई + त = करीत; याला 'अस' धातूचीं रूपें जोडावयाचीं:—

प्रथमपुरुष, एकवचन (पु०)—करीत + आहें = करितोहें* = करितोएँ = करितोंय् † = करितों.

अनेकवचन—करीत + आहों = करितोहों = करितों.

द्वितीय पुरुष, एकवचन (पु०)—करीत+आहेस=करितोहेस,—ताहेस=करिताएस=करितोस.

तृतीय पुरुष, एकवचन (पु०)—करीत+आहे =करितोहे, = ताहे = करितोए= करितोय्=करितो.

प्रथम पुरुष, एकवचन (स्त्री०)—करिती + आहें = करित्याहें = करित्याएँ = करित्यें = करितें.

---

* 'करितो' हें 'करीत' या विशेषणाचें जुनें पुल्लिंगी प्रथमेचें एकवचन आहे. त्यांत 'आहे' हें रूप मिळालें. 'ह' हें अक्षर उच्चारामध्यें लोप पावून नष्ट होणारें आहे. प्राकृतांत–विशेषतः प्राकृताचें अन्त्यस्वरूप अपभ्रंश त्यामध्यें —असा प्रकार होतो.

† शब्दाचे अंतीं दोन स्वर आले असतां अन्त्य स्वर जाऊन उपान्त्यच अन्त्य होतो [शब्दसिद्धि. पृ० १८, क० १९].

द्वितीय पुरुष, एकवचन (स्त्री०)–करिती+आहेस=करित्याहेस=करित्याएस=
करित्येस=करितेस. ‘करितीस’ असें रूप कोल्हापूर
वगैरे ठिकाणीं उपयोगांत आहे.

तृतीयपुरुष, अनेकवचन (स्त्री०)–करीत याचें स्त्रीलिंगी अनेकवचन ‘करित्या’ +आहेत=करित्याहेत=करित्याएत=करित्यात=करितात.

अशा रितीनें दोन्ही रूपें एकवटून सर्व रूपें सिद्ध झालीं आहेत. प्रथमतः दोन्ही रूपें निराळीं होतीं. तीं वर सांगितल्याप्रमाणें बनत जाऊन सांप्रतचीं चालू रूपें बनतपर्यंत पुष्कळ काळ लोटला असावा हें उघडच आहे. यांतलीं कित्येक रूपें निरनिराळ्या प्रांतांत बोलण्यामध्यें आणि क्वचित् लिहिण्यांतही अजून उपयोगांत आहेत उदाहरणार्थ,—करितोहें, करितोहे, करितोएँ, करिताएँ, करितोय, करित्याहे, करित्ये, करित्यात, इत्यादि.

(ई) ह्या काळाचीं रूपें लिंगांप्रमाणें फिरतात. परंतु कोंकणांतल्या आणि वऱ्हाड-नागपुराकडील प्रांतिक भाषांत हीं आणि दुसरीं लिंगांप्रमाणें फिरणारीं क्रियापदांचीं रूपें न फिरविण्याचा प्रघात आहे. यावरून क्रियापदांचीं रूपें लिंगांप्रमाणें फिरविणें ही गोष्ट भाषा बोलणारांस गैरसोईची वाटते, आणि ती मोडण्याचे प्रयत्न झाले आहेत, असें दिसून येतें.

(उ) कोंकणी भाषांत या काळाचीं लिंगाप्रमाणें न फिरणारीं अशीं रूपें पुढें दिल्याप्रमाणें होतातः—

| मालवणी | | गोमांतकी | |
|---|---|---|---|
| ए० व० | अ० व० | ए० व० | अ० व० |
| करतैं, करतंय्, | करतौं, करतंव | करतां | करतांव |
| करतस | करतात | करतास | करतात |
| करता | करतत | करता | करतात |

| चित्पावनी | | कोंकणी | |
|---|---|---|---|
| करचां | करचां | करतां | करतांव |
| करचस | करचां | करताय् | करतात |
| करचे | करचत | करता | करतात |

ः—हा काळ अगदीं अशाच प्रकारें झालेला आणि सर्वांत एकसारखा ात मुख्य देशी भाषांत सांप्रत चालू आहे.

( ३ ) **रीतिभूत**—प्राचीन मराठींत जुन्या वर्तमानकाळाचीं रूपें घालून भूतकाळाचा अर्थ दर्शविण्याची चाल होती. पुढें चालू भूतकाळाच्या रूपांचा प्रचार फार झाल्यावर या रूपांचा उपयोग रीतिभूतकाळीं म्हणजे 'मागें अशी रीत होती' असें दर्शविण्यासाठीं होऊं लागला. 'तो जाई' म्हणजे 'त्याची जाण्याची रीत होती.' 'तूं बसस' म्हणजे 'तूं बसत असस.' इत्यादि तेव्हां जुन्या वर्तमानकाळाचीं व या काळाचीं रूपें एकच आहेत. फक्त द्वितीय-पुरुषीं एकवचनी आणि तृतीयपुरुषीं अनेकवचनी प्रत्ययांच्या अन्तींचा 'ई' स्वर जाऊन प्रत्यय अकारान्त होतात, आणि त्यामुळें 'ई' आगमन दीर्घ असतो. जसें,—'तूं करीस' 'ते करीत.' इत्यादि. द्वि. पु. ए. व. व तृ. पु. अने. व. यामध्यें 'अ' नाहीं अशीं रूपें जुन्या मराठींत (पंचतंत्रांत) वर्तमानकाळींही आहेत.

**टीप**—या काळाच्या रूपांना लिंगभेद नाहीं.

( ४ ) **चालू भूतकाळ**–( अ ) हा काळ कृदन्त विशेषणावरून झाला, आणि यांचीं रूपें लिंगाप्रमाणें फिरतात. संस्कृतांत भूतकाळाचें कर्मणि विशेषण 'त' प्रत्यय लागून होतें. जसें,–कृत, दत्त, प्राप्त, गत, नीत, इत्यादि. हा प्रत्यय क्वचित् न, ण असाही असतो. जसें,–लून, भिन्न, पूर्ण, तून्न इत्यादि. हा प्रत्यय प्राकृतांत द्, ड्, ल्, असा होऊन त्यावरून मराठींत 'ल्' असा प्रत्यय झाला. त्यापासून पुढें दिला, पावला, नेला इत्यादि अशीं रूपें झालीं.+

( आ ) संस्कृत भूतकाळवाचक 'त'–प्रत्ययान्त विशेषणाच्या 'त'—चा 'द' ( आणि क्वचित् 'ड' ) झाला आहे. अशीं उदाहरणें प्राकृतात शेंकडों आहेत. निरनिराळ्या प्राकृत भाषांत हा प्रत्यय 'द' असाच आहे. पुढील उदाहरणें पहाः—गत; गदे; आगता, आगदा; गता, गडा; उपरत, उवरद; मारित, मालिद; प्राप्त, पाविद; ज्ञातं, जाणिदं; भक्षित, भक्खिदे; विघटित, विहडिद; कृत, कडे; इत्यादि. मृच्छकटिक नाटकामध्यें 'आर्ये, कृतो निश्चयः' या संस्कृत वाक्याबद्दल 'अज्जए, कले निश्चए' असें वाक्य

---

+ महाराष्ट्री या प्राकृतांत 'द' चा 'अ' होतो, त्यावरून केला, गेला, अशीं थोडीं रूपें मराठींत आलीं आहेत. मराठीमध्यें 'त' चा 'ल' होतो. तो शौरसेनी या प्राकृताच्या द्वारें होतो.

आहे. यांत ‘ कृतः ’ याबद्दल ‘ कले ’ असें आहे, म्हणजे ‘ त ’ बद्दलच ‘ ल ’ झाला आहे.

( इ ) संस्कृतांतून प्राकृतांत आणि पुढें मराठींत ‘ त ’ चा ‘ द, ’ ‘ ड, ’ ‘ ल, ’ वगैरे झाल्याचीं अनेक उदाहरणें आहेत. ‘ न ’ चा ‘ ल ’ झाल्याचींही उदाहरणें आहेत. त्यांतलीं थोडीं पुढें देतों. त्यांवरून या संस्कृत भूत-कालवाचक कर्मणि विशेषणावरूनच मराठींतलें ल प्रत्ययान्त विशेषण झालें असें स्पष्ट दिसून येईल. ‘ त ’–चा द;–वसति, वसदि; रजत, रअद; संप्रति, संपदि; आगत, आअद; आवृत्ति, आउदी; आकृति, आइदी; इतः, इदो; भवतु, भोदु; माता, मादा; मातृका, मादिका; प्रति, पदि, [ तसेंच पलि ]; इत्यादि. आर्द्र=ओल्ल ( ‘ द ’ आणि ‘ र ’ मिळून ‘ ल्ल ’ ) ओला, मर्द–मल्ल, ‘ द ’चा ‘ ळ ’–ककुद–कोळें. ‘ त, ’ ‘ द, ’ यांचा ‘ ड ’–पतन, पडणें; हरी-तक, हरडा; मृतक, मडअ, मडें; दाडिम, डाळिंब; दोहद, डोहल, डोहळा; इत्यादि. ‘ द ’ आणि ‘ ड ’ याबद्दल प्राकृतांत आणि मराठींत ‘ ल ’ होतो. उदाहरणें,—मृद, मल ( ई ); शद, सड (णें); प्रदीप्त, प्रा० पलित, मरा० पलिता; कदंब, प्रा० कलंब; तडाग, तलाव; वडभी, प्रा० वलही; आपीड, प्रा० आपेल; इत्यादि. ‘ न ’ चा ‘ ल ’ होतो. जसें,—निंब, लिंब, लिंबू; नमन, लवणें; नवनीत, लोणी; लघु, ( प्रांतिक ) न्हान, न्हानु, ( ‘ल’चा ‘न’ ) नानु [ लहान मुलास म्हणतात ]; इत्यादि.

[ ई ] या लकारान्त विशेषणापुढें ‘ अस ’ धातूचीं वर्तमानकाळचीं रूपें येऊन आणि दोहोंचा एकजीव होऊन, चालू वर्तमानकाळाच्या रूपांप्रमाणेंच हीं रूपें बनलीं. उदाहरणार्थ,—

प्रथमपुरुष, एकवचन, [ पु० ]–गेलो+आहें [क०२१३ (२इ) टीप* पाहा ] =गेलोहें=गेलोएँ=गेलोंय्=गेलों.

प्रथमपुरुष, एकवचन, [ स्त्री० ]–गेली+आहें=गेल्याहें=गेल्याएँ=गेल्यें= गेलें; गेलाँय्, गेलाँए, गेला [ प्रांतिक ].

तृतीय पुरुष, एकवचन, [ स्त्री० ]–गेली+आहे=गेलीहे=गेलीए= गेली. इत्यादि.

(५) **भविष्य**—या काळाचीं रूपें अशीं होतातः—

| | |
|---|---|
| कर,—सकर्मक | बस,—अकर्मक |
| करीन करूं | बसेन बसूं |
| करिशील कराल | बसशील बसाल |
| करील करितील | बसेल बसतील |

(अ) हीं रूपें पाहिलीं असतां असें दिसून येईल कीं, जुन्या वर्तमान-काळाच्या रूपांपुढें 'ल' हें अक्षर लागून हीं रूपें झालीं आहेत. प्रथम-पुरुषीं एकवचनीं मात्र 'न' लागतो, आणि अनेकवचनीं मूळच्याप्रमाणेंच रूप होतें. जुन्या वर्तमानाचें दुसरें रूप मात्र (करों, बसों, इ०) या काळीं होत नाहीं. प्रथमपुरुषीं एकवचनीं करीं+ ल=करीन; येथें अनुस्वार आणि 'ल' मिळून 'न' झाला. अनेकवचनीं करूं+ल= 'करून' असें व्हावें. करून, पाठवून, देऊन, अशीं रूपें जुन्या पत्रव्यवहारांत आढळतात. मराठी अमदा-नींतल्या पत्रव्यवहारांत 'रुपये पाठवून (पाठवूं)' असा प्रयोग पुष्कळ ठिकाणीं आला आहे. 'पाठवून' याचें सोपें रूप 'पाठवूं' असें उपयोगांत राहिलें. तेव्हां या सर्व रूपांच्या शेवटीं 'ल' आहे असें सिद्ध होतें.

(आ) प्राचीन मराठी भाषेत केवळ जुन्या वर्तमानकाळाचीं रूपें घालून भविष्यकाळ करीत. अशी पद्धत प्राचीन हिंदींतही होती. 'जैसें ध्याए तैसें पाए' अशा प्रकारचे उपयोग त्या भाषेंत आढळतात. मराठीची उपभाषा कोंकणी, हिच्यामध्येंही जुन्या वर्तमानकाळावरूनच भविष्याचा बोध होत असे. पुढें 'लो' प्रत्यय होऊं लागला. 'हांव् निदतां, निदतों.' म्हणजे 'मी निजतों;' 'निदतों +लों=निदतोलों, मीं निजेन.' हीं रूपें लिंगाप्रमाणें फिरतात. जसें, निदतेली स्त्री० निदतेलें, नपुं०. हा भविष्यकाळाचा 'ल' जुनी मारवाडी, गरवाली, कमाउनी, आणि नेपाळी यांमध्यें ए० व० 'लो' आणि अने० वचनीं 'ला' असा आहे. त्या भाषेंत याला लिंगभेद नाहीं, वचनभेद आहे. मराठींत लिंग आणि वचन या दोहोंचाही भेद नाहीं.

(इ) हा भविष्यकाळाचा 'ल' कसा आला, आणि कोठून आला, हें सांगतां येत नाहीं. आरंभीं वर्तमानकाळ घालूनच भविष्याचा अर्थ आणीत. ज्ञान-

देवाची गीतेवरील टीका सन १२९० मध्यें पूर्ण झाली. ज्ञानेश्वरींत ल–भविष्य सर्वत्र आहे. ज्ञानेश्वरीच्या अगोदरचा ग्रंथ प्रसिद्ध नाहीं, पण कांहीं शिलालेख सांपडलेले आहेत. त्यांतला परळ येथील शिलालेख सन ११८६ सालांतला आहे. त्यांत 'जो कोणहुवी ए शासन लोपी तेच्या वेद्यनाथ देवाची भाल सकुटुंबी आपडे,' असें वाक्य आहे. यांत 'लोपी' म्ह० लोपील (लोप करील) आणि 'आपडे' म्ह० आपडेल (आपटेल) असें आहे. पाटण येथील शिलालेख सन १२०६ तला आहे. त्यांत, 'येथ जें मविजे तें मढिचेन मापें मवावें.' असें वाक्य आहे. मविजे म्हणजे 'मविजेल'= मोजलें जाइल. यावरून जुन्या वर्तमानकाळाच्या रूपांपुढें 'ल' लावून भविष्यकाळ करण्याची पद्धत सन १२०६ आणि सन १२९० या दोन वर्षांच्या मध्यंतरीं केव्हां तरी सुरू झाली असावी. तेव्हां भविष्यकाळाचा 'ल' उपयोगांत केव्हां येऊं लागला हें सांपडतें; पण तो कसा आणि कोठून आला हें तूर्त सांगता येत नाहीं. कित्येक देशी भाषांत भविष्य-लकार आहे, हें मागें सांगितलेंच आहे.

**टीप**—चालू वर्तमान आणि भूतकाळ या मराठींतल्या काळांप्रमाणेंच सर्व देशभाषांमध्यें काळांचीं रूपें आहेत. भविष्यकाळ मात्र हिंदी, बंगाली, गुजराथी आणि सिंधी या देशभाषांत संस्कृतांतील स्य-भविष्यकाळावरून झाला आहे. मराठी भाषेतल्याप्रमाणें 'ल' लागून झालेला नाहीं.

(६) **आज्ञार्थ**—ही आख्यातविभाक्ति संस्कृतांतील आज्ञार्थावरून आली. पुढील रूपें पाहिलीं असतां हें तेव्हांच लक्षांत येईलः—

| संस्कृत आज्ञार्थ 'हस्' धातु | | मराठी आज्ञार्थ 'हस' धातु | |
|---|---|---|---|
| ए० व० | अ० व० | ए० व० | अने० |
| हसानि | हसाम | हसूं (प्रा० हसाइं), | हसूं |
| हस | हसत | हस | हसा |
| हसतु | हसन्तु | हसू, हसो, (प्रा० हसउ). | हसूत, हसोत |

तृतीयपुरुषीं अनेकवचनी संस्कृत प्रत्ययांत अनुनासिक आहे. मराठींत अनुनासिक नाहीं. संस्कृतांत अनुनासिक नाहीं असाही प्रत्यय आहे, त्यावरून मराठी प्रत्यय झाला. असाच प्रकार जुन्या वर्तमानकाळींही आहे.

( ७ ) **विध्यर्थ**–( अ ) संस्कृतांत विध्यर्थक कर्मणि विशेषणाचा प्रत्यय 'तव्य' आहे. जसें,–कर्तव्यम् , दातव्यम्, गन्तव्यम् , भवितव्यम् , इत्यादि. 'तव्य' याचें प्राकृतांत 'अव्व' असें झालें. पुढें मराठींत द्वित्त 'व'–चा एक 'व' राहून मागील अचा 'आ' झाला. अशा प्रकारें 'आव' प्रत्यय झाला. उदा०—करावा, करावी, करावें, द्यावें, घ्यावें, बोलावें, चालावें, म्हणावा, इत्यादि. याचा संस्कृतांत उपयोग असा होतोः–'मया तत्र किमर्थं गन्तव्यं ( अस्ति ) ?'–'मी तेथें कशाकरितां जावें ?' 'तेन कथमिदं ज्ञातव्यं ?'–'त्यानें हें कसें जाणावें ?' 'त्वया विश्वासः कर्तव्यः'–'तूं विश्वास धरावास;' इत्यादि. यावरून मराठींतला उपयोग लक्षांत येईलच.

( आ ) या विशेषणांना 'आहे' धातूचे अवशेष असे प्रत्यय लागून विध्यर्थाचीं क्रियापदें बनलीं आहेत. हीं बनतांना लिंग आणि वचन यांचे प्रत्यय सर्वत्र लागतात. पुरुषांचे प्रत्यय मात्र सर्वत्र निरनिराळे लागत नाहींत. उदा०—मी जावा, आम्हीं जावें; तूं जावास; जावीस; जावेंस; तो जावा, ते जावेत; तें जावें, तीं जावींत; इत्यादि.

( ८ ) **संकेतार्थ**–ही आख्यातविभक्ति तितकी पूर्ण नाहीं. चालू वर्तमान-काळाच्या रूपांवरूनच थोड्या फेरफारानें संकेताचा बोध होतो. तरी तो बोध होण्याला 'जर-तर' या अव्ययांचें साह्य लागतेंच. उदा०—'तो घरीं **असता** तर मला भेटला **असता**.' 'मी असें **करितों** तर बरें **होतें**.' '**हे** मुलगे नीट अभ्यास **करते** तर परीक्षेंत पास **होते**.' इत्यादि. यांत अर्थबोध असा होतो कीं, प्रथमची गोष्ट झाली नाहीं, आणि त्यामुळें दुसरीहि झाली नाहीं.

**टीप**—संकेतार्थाचीं रूपें पुढें चालवून दाखविलीं आहेत.

## ( ५ ) कर्मणि आणि भावी रूपें.

२१४. ( अ ) प्रत्येक वाक्यांत कर्ता, क्रियापद आणि तें सकर्मक असल्यास कर्म हीं मुख्य असतात. त्यांचा परस्पर निकट संबंध असतो. या गोष्टी ठाऊक झाल्याच आहेत. तसेंच क्रियापदाचा ज्याच्याशीं निकट संबंध असतो त्यास उद्देश्य असें म्हणतात, हेंही मागें सांगितलेंच आहे.

( आ ) क्रियापदाच्या योगानें ज्याला उद्देशून आपण बोलतों तें उद्देश्य. उदाहरणार्थ, 'रामा पुस्तक वाचितो.' यांत 'वाचितो' हें 'रामा' याविषयीं

आपण सांगितलें; यासाठीं 'रामा' हा जो क्रियापदाचा कर्ता तो **उद्देश्य**. आतां हेंच वाक्य फिरवून ' रामानें पुस्तक दिलें, ' असें केलें तर ' दिलें ' हें पुस्तक या कर्माबद्दल सांगितलें. यासाठीं 'पुस्तक' हें कर्मपद **उद्देश्य**. अशा रितीनें दोन प्रकारची वाक्याची रचना होते.

( इ ) पहिल्या प्रकारांत कर्त्याला उद्देशून आपण बोलतों, यामुळें कर्तृपद उद्देश्य होतें; आणि त्याप्रमाणें क्रियापद असतें; यामुळें या वाक्यरचनेच्या प्रकारास ' कर्तरि-प्रयोग ' असें व्याकरणांत नांव देतात. दुसऱ्या प्रकारांत कर्माला उद्देशून आपण बोलतों. यामुळें कर्मपद उद्देश्य होतें. आणि त्याला अनुसरून क्रियापद असतें, यामुळें त्या वाक्यरचनेच्या प्रकारास कर्मणि-प्रयोग असें म्हणतात. तसेंच या प्रकारच्या वाक्यांतील क्रियापदांस अनुक्रमें ' कर्तरि–क्रियापद ' आणि ' कर्मणि–क्रियापद ' असें म्हणतात.

**टीप**—' कर्तरि ' आणि 'कर्मणि' हीं संस्कृतांत 'कर्तृ' आणि 'कर्मन्' या शब्दांचीं सप्तमीचीं रूपें आहेत. ' प्रयोग ' म्हणजे वाक्यांतील क्रियापदाची रचना. 'कर्तरि-प्रयोग' म्हणजे कर्त्याच्या लिंग-वचन पुरुषांप्रमाणें क्रियापदाची रचना. 'कर्मणि-प्रयोग' म्हणजे कर्माच्या लिंग-वचन-पुरुषाप्रमाणें क्रियापदाची रचना. ' रामा पुस्तक वाचितो, ' यांतलें कर्तृपद ' रामा ' याचे लिंग-वचन–पुरुष फिरविले तर क्रियापदाचे फिरवावे लागतील. आणि त्याचप्रमाणें रामानें पुस्तक वाचिलें, ' यांत ' पुस्तक ' या कर्मपदासंबंधानें होईल, हें सांगावयास नकोच.

( ई ) वाक्यरचनेची आणखी एक तिसरी तऱ्हा आहे. ' रामानें रावणास मारिलें. ' या वाक्यांत क्रियापद ' रामानें ' या कर्तृपदाप्रमाणें नाहीं, आणि ' रावणास ' या कर्मपदाप्रमाणेंही नाहीं. तसेंच, ' हरीनें गांवाला जावें; ' यांतलें क्रियापद अकर्मक असून तें ' हरीनें ' या कर्तृपदाप्रमाणें नाहीं. या दोन्ही वाक्यांत क्रियापद स्वतंत्र आहे. यांतील कर्ता आणि कर्म यांचें लिंग-वचन-पुरुष फिरविले तरी क्रियापद नेहमीं आहे तसेंच तृतीयपुरुषी-नपुंसकलिंगी, एकवचनी राहील. या वाक्यांची रचना वास्तविक अशी आहे कीं, 'रामानें रावणास मारिलेलें आहे ' म्हणजे ' मारिलें अशी स्थिति आहे; ' आणि ' हरीनें गांवाला जावें असें आहे, ' म्हणजे ' जावें अशी स्थिति आहे. ' म्हणजे दोन्ही

वाक्यांत 'आहे' हें क्रियापद बाहेरचें किंवा अध्याहृत घेऊन 'मारिलेलें' आणि 'जावेसें' हे क्रियार्थ किंवा 'क्रियाभाव' उद्देश्यस्थानीं समजावयाचे आहेत. अशा रचनेला 'भावेप्रयोग' असें म्हणण्याची चाल पडली आहे. अशा वाक्यांतील क्रियापदाच्या योगानें आपण कशालाही **उद्देशून** बोलत नाहीं. म्हणून भावे-प्रयोग-घटित वाक्यांत **उद्देश्यपद** नसतें. भावे-प्रयोगांतील क्रियापदास **भावी** क्रियापद असें म्हणावें. हें रचनेला कर्मणि क्रियापदा-प्रमाणेंच असतें.

( उ ) याप्रमाणें **कर्तरि, कर्मणि** आणि **भावी** अशीं तीन प्रकारचीं क्रियापदें असतात. असाच प्रकार संस्कृतांत आहे. उदाहरणार्थ,–'नृपतिस्तेनान् दण्डयति,' हें कर्तरि वाक्य आणि क्रियापद कर्तरि; 'नृपतिना स्तेनाः दण्ड्यन्ते' हें कर्मणि वाक्य आणि क्रियापद कर्मणि. 'सूर्यः प्रकाशति,' हें कर्तरि वाक्य. परंतु 'सूर्येण प्रकाश्यते,' हा भावे प्रयोग आणि यांतील क्रियापद **भावी** आहे.

**टीप**—संस्कृतांत भावेप्रयोग अकर्मक क्रियापदांवरूनच होतो. इंग्रजी भाषेंतही असे प्रयोग आहेत. पण ते कर्तरि आणि कर्मणि असे दोनच आहेत.

( ऊ ) याप्रमाणें आपल्यास ज्यांची माहिती आहे, त्या तिन्ही भाषांत ही प्रयोगरचना आहे; पण मराठींतली ही प्रयोगरचना संस्कृत आणि इंग्लिश या भाषांतील प्रयोगरचनेहून बरीच भिन्न आहे. संस्कृतांत जे दहा प्रकारचे काळ व अर्थ आहेत, त्या प्रत्येकांत सकर्मक क्रियापदावरून कर्तरि आणि कर्मणि अशी दोन्ही प्रकारची रचना होते. इंग्लिश भाषेंतही तसाच प्रकार आहे. परंतु मराठींत कर्मणि प्रयोग सार्वत्रिक नाहीं. तो क्रियापद* भूतकाळीं ( दुसरा भूतकाळ ) आणि विध्यर्थी असतां मात्र होतो. 'तो पुस्तक वाचितो,' हा कर्तरिप्रयोग आहे. याचा कर्मणिप्रयोग याच काळीं होणार नाहीं. तर 'त्यानें पुस्तक वाचिलें,' अथवा 'त्यानें पुस्तक वाचावें,' अशा रितीनें क्रियापदाचा 'भूतकाळ' किंवा 'विध्यर्थ' करावा तेव्हांच होईल. तसेंच 'भूतकाळ' किंवा 'विध्यर्थ' कायम ठेवून कर्तरिप्रयोगही करितां येणार नाहीं.

( ए ) ही तऱ्हा चमत्कारिक आहे हें उघडच आहे. मराठी भाषेंत प्राचीन-

---

* कर्मणि क्रियापदाचा उल्लेख आला कीं, नेहमीं सकर्मक क्रियापद असें समजावें.

काळीं संस्कृत आणि इंग्रजी भाषांप्रमाणेंच प्रत्येक सकर्मक क्रियापदावरून कर्मणि प्रयोग करीत असत. संस्कृतांत कर्मणि-प्रत्यय ' य ' असा आहे. जसें,—क्रियते, दीयते, अहन्यत, अबध्यत, इत्यादि. याचा मराठींत ' ज ' होऊन ' कीजते, ' ' दीजे, ' ' मारिजेल, ' ' देखिजेतो, ' अशीं रूपें होत असत. क्वचित् ' य '–ही कायम राहिलेला आढळतो. हीं रूपें बहुधा आठही आख्यात विभक्तींचीं होत असत. या रूपांचीं उदाहरणें:—

(१) **कर्मणि रूपें**—

' जें ध्यानाविण **ध्यायिजे** । जें चित्ताविण **चिंतिजे**,
जें जाणीवेवीण **जाणिजे** । परब्रह्म तें. ' —रामदास.
' विचारी तूं अर्जुनू । कीं कारुण्यें **कीजसी** दीनू. '
' जैसें स्वप्नामाजी **देखिजे** । स्वप्नचि साच **जाणिजे**,
मग येऊनियां **पाहिजे** । तों कांहीं नाहीं. ' —ज्ञानेश्वर.
' जेणें माया **अधिष्ठिजे** । तें ब्रह्म मायोपाधी **बोलिजे**,
माया शबल ऐसें **म्हणिजे** । तया तेंची. ' —मुकुंदराज.

(२) **भावी रूपें**—

' स्वर्गी पुण्यात्मकें पापें **येइजे** । पापात्मकें पापें नरका **जाइजे**,
मग जेणें मातें **पाविजे** । तें शुद्ध पुण्य. ' —ज्ञानेश्वर.
' या गुणेंचि कमलोद्भवतातें । **होइजे** सुलभ भागवतांतें. ' —मोरोपंत.

(ऐ) अशीं रूपें जुन्या कवितेंत आणि जुन्या वाक्यांतून सर्वत्र आढळतात. परंतु अलीकडल्या मराठी भाषेंत हीं रूपें होण्याचें बंद पडलें, आणि वास्तविक मराठींत कर्मणिप्रयोगच नष्ट झाला. हीं रूपें तयार करण्यास कठीण असतात, म्हणून असा प्रकार झाला असावा.

(ओ) सांप्रत मराठी भाषेंत वस्तुतः कर्मणिप्रयोग नाहीं. हल्लीं आपण ज्या वाक्यांत कर्मणिप्रयोग आहे, असें म्हणतों, त्या वाक्यांत भूतकाळाचें अथवा विध्यर्थाचें रूप असतें, म्हणून कर्मणिप्रयोग असतो. उदाहरणार्थ—'विद्यार्थ्यानें धडा केला. ' ' विद्यार्थ्यानें धडा करावा. ' यांतील ' केला ' आणि ' करावा ' हीं रूपें मूळच्या संस्कृतांतील कर्मणि विशेषणांवरून मराठींत आलीं. यामुळें अशा प्रकारचीं रूपें ज्या वाक्यांत घालावयाचीं असतात, त्याचा कर्मणिप्रयोग

साहजिक होतो. या वाक्यांचा कर्तरि प्रयोग होत नाहीं, आणि इतर काळ आणि अर्थ यांचीं रूपें असतां कर्मणिप्रयोग होत नाहीं.

( औ ) याप्रमाणें आठ आख्यातविभक्तींपैकीं भूतकाळ आणि विध्यर्थ यांचीं रूपें केवळ कर्मणि किंवा भावी असतात; आणि बाकीच्या सहा आख्यात-विभक्तींचीं रूपें केवळ कर्तरि असतात. सार्वत्रिक कर्मणिप्रयोग मराठींत नाहीं. भूतकाळीं आणि विध्यर्थीं कर्मणि रचनाच करावी लागते, म्हणून तेथें मात्र कर्मणिप्रयोग आहे.

**टीप १**—वरील उदाहरणांत ' *पाहिजे ' व ' म्हणिजे ' अशीं रूपें आलीं आहेत. ' पाहिजे ' हें ' पाहा ' धातूचें मूळचें कर्मणि रूप आहे. परंतु चालू मराठींत तो स्वतंत्र धातुच झाला आहे. ' म्हणिजे ' हेंही ' म्हण ' धातूचें कर्मणि रूप आहे. पण आतां तें ' म्हणिजे ', ' म्हणजे' असें अव्यय झालें आहे.

**टीप २**—ल-प्रत्ययान्त भूतकाळाच्या रूपापुढें ' आहे, ' ' होतें ' आणि ' असेल, ' हीं तिन्ही काळांची रूपें येऊन संयुक्त क्रियापदें होतात. हीं तिन्हीं काळांचीं कर्मणि क्रियापदें असें म्हणतां येईल. जसें,–' रामानें पत्र **लिहिलें** आहे. ' ' रामानें पत्र **लिहिलें होतें**. ' ' रामानें पत्र **लिहिलें असेल**. '

**टीप ३**—हीं संयुक्त क्रियापदें तशाच अर्थाच्या कर्तरि क्रियापदांचींच कर्मणि क्रियापदें असें म्हणतां येईल. जसें,–' रामा पत्र लिहीत आहे (लिहितो )' 'रामा पत्र लिहीत होता. ' ' रामा पत्र लिहिता झाला. ' ' रामा पत्र लिहीत असेल ( लिहील ). ' इ०.

**टीप ४**—तसेंच हीं कर्मणि–वाक्यें अगदीं हुबेहुब इंग्रजी कर्मणि–वाक्यां-सारखीं आहेत. जसें,–' A letter is written by Rama. ' ' A letter was written by Rama. ' आणि ' A letter might have been written by Rama. ' इत्यादि.

**टीप ५**—अशा रितीनें ल-प्रत्ययान्त भूतकाळाच्या क्रियापदापुढें ' अस ' धातूचें रूप नेहमीं नसतें. परंतु तें अध्याहृत मानून, अर्थ असेल त्याप्रमाणें. तिन्ही काळांचा कर्मणिप्रयोग हवा तर मानतां येईल.

---

* ' पाह ' हें पश्य-'चें रूप. ' पश्य ' हें ' दृश् ' धातूबद्दल येतें. ' म्हण ' ' भण्-'पासून झालें.

## ( ६ ) क्रियापदें चालविणें.

२१५. ( अ ) या ज्या आठ आख्यातविभाक्ति सांगितल्या, त्यांचीं रूपें आतां करून दाखवावयाचीं. ज्या आख्यातविभक्तीमध्यें लिंगावरून रूपें फिरत नाहींत, त्यांचीं पुरुष आणि वचन यांमिळून प्रत्येकीं सहा रूपें होतात; आणि लिंगावरून रूपें फिरणाऱ्या आख्यातविभक्तींचीं प्रत्येकीं १८ रूपें होतात.

( आ ) प्रत्येक आख्यात–विभक्तीचे पुरुष, लिंग आणि वचन यांचे निरनिराळे प्रत्यय आहेत, ते लागून रूपें व्हावयाचीं. प्रत्यय लागण्यापूर्वीं मूळ धातूस कांहीं विकार होऊन **सामान्यरूप** किंवा **अंग** तयार होतें. हे फेरफार साधेच असून ते जेथच्या तेथें सांगितले आहेत. प्रथमतः येथें सर्वत्र होणारे फेरफार सांगतों:—

( १ ) मराठींत थोडेसे धातु एकाक्षरी आहेत; यांचे अंतीं ई, ऊ, ओ, हे स्वर असतात. बाकी सर्व धातु अकारान्त असतात. त्यांचे उपान्त्य दीर्घ ई, ऊ, ऐ, आणि ओ, हे असतात.

( २ ) एकाक्षरी धातूंचे अन्त्य स्वर ई, ऊ, हे प्रत्यय लागण्यापूर्वीं ऱ्हस्व होतात. जसें,–भी, भितो, भिईल, भियाला ( भ्याला ); पी, पियाला ( प्याला ), पिईल; धू, धुईल, धुशील; इत्यादि.

( ३ ) अनेकाक्षरी धातूंच्या उपान्त्याचे ई, ऊ, स्वरही प्रत्यय लागण्यापूर्वीं ऱ्हस्व होतात. जसें,–नीघ, निघतो, निघेल, निघाला; ऊठ, उठला, उठेल, उठतात; इत्यादि.

## ( १ ) जुना वर्तमानकाळ.

२१६. या आख्यात-विभक्तींचे प्रत्यय मागें [ क० २१३ (१) (अ) यांत ] सांगण्यांत आलेच आहेत. हे प्रत्यय लागण्यापूर्वीं पुढील फेरफार घडून येतातः—

( १ ) धातु सकर्मक असतां प्रथमपुरुषीं एकवचनीं व तृतीयपुरुषीं एकवचनीं अनुक्रमें ‘ ईं ’ आणि ‘ई’ हे प्रत्यय लागतात. परंतु धातु अकर्मक असतां अनुक्रमें ‘ एँ ’ आणि ‘ ए ’ हे प्रत्यय होतात. जसें.–करीं, करी; लिहीं, लिही; बसें, बसे; चालें, चाले; इत्यादि.

( २ ) स्वरादि प्रत्यय म्हणजे सकर्मक प्रत्यय ' ईं ' आणि ' ई ' आणि अकर्मक प्रत्यय 'एँ' आणि ' ए ' हे एकाक्षरी धातूंच्या शेवटीं नुस्ते लावितात. परंतु अनेकाक्षरी धातूंना हे प्रत्यय लागतांना पररूपसंधि होतो. अर्थात् धातूच्या अंतींचा ' अ ' जातो. जसें,—ने- ईं, घे-ईं, धुईं, धुई, कर + इ = करी; जेव + ईं = जेवीं; बसे, चाले, निजें, उठें, इत्यादि,

( ३ ) धातु एकाक्षरी असतां तो सकर्मक किंवा अकर्मक कसाही असला तरी प्रत्यय ईं, ई, हेच लागतात. जसें.—जाईं, जाई; घेईं, घेई; पिईं, पिई; धुईं, धुई;–इत्यादि.

**टीप**—एकाक्षरी धातु अकारान्त नसतो हें लक्षांत ठेवावें.

( ४ ) दुसऱ्या नियमाला अपवादक असे कांहीं धातु आहेत. ते सकर्मक असूनही ' एँ ' आणि 'ए' हे प्रत्यय घेतात. हे धातुः– उमज, आचर, आंचव, ओक, उतर ( पलीकडे जाणें ), खेळ, चढ, चूक, जप, जेव, तर, थुंक, नेस, पसव, पढ, पाव, पोंच, पोह, प्रसव, बडबड, बोल, भज, भूल, मूक, मूत, लढ, लाभ, लाह, वद, विसर, विसंब, शिंकर, शीक—शीख, समज, स्मर, हग, हूक, म्हण ( ' म्हणालों ' असा भूतकाळ होतो तो ), इत्यादि.

**टीप**—या धातूंच्या प्रयोगव्यवस्थेसंबंधानें कांहीं विशेष प्रकार होत असतो, म्हणून यांचा निराळा वर्ग करून त्यास ' उमजगण ' असें नांव दिलें आहे.

( ५ ) ऐक, जाण, देख, परीस, पूस, बघ, माग, सांग, म्हण ( भूतकाळ ' म्हटलें ' ), तसेंच झगड, झोंब, लगट, डस, घड, शीव ( शिवणें ), हे धातुही अकर्मक प्रत्यय घेतात.

( ६ ) वरील धातु सकर्मक असून ते अकर्मक प्रत्यय घेतात, ही गोष्ट पुष्कळ वेळां प्रांतिक उपयोगावर अवलंबून असते. उदाहरणार्थ,—' मी धर्म आचरीं, किंवा आचरें. ' ' तो भात जेवीं किंवा जेवे. ' असे प्रकार आहेत हें, लक्षांत ठेवावें. म्हणजे कांहीं धातु प्रांतोप्रांतींच्या प्रघाताप्रमाणें विकल्पें करून दोन्ही प्रत्यय घेतात.

( ७ ) ओळख, चाख, चाव, जिंक, पाह आणि वाह, या धातूंना विकल्पेंकरून दोन्ही प्रत्यय होतात.

( ८ ) गा, पी, ले आणि धू ( आंग, तोंड, इत्यादि. शब्द कर्मं असतां ) विकल्पेंकरून दोन्ही प्रकारचे प्रत्यय घेतात. ( नि० ३ यास अपवाद. )

( ९ ) ' राह ' धातूला विकल्पें अकर्मक प्रत्यय लागतो. कोंकणामध्यें एकाक्षरी धातूंना अकर्मक प्रत्ययही लावण्याची चाल आहे. जसें,--जाए, पिए, पिये, धुए, इत्यादि. ( नि० ३ यास अपवाद. )

( १० ) अनेकाक्षरी सकर्मक धातूंना व्यंजनादि प्रत्यय ' सी ' आणि ' ती ' यांच्या पूर्वी विकल्पें ' ई ' आदेश होतो. या रूपांच्या अंतीं दीर्घ स्वर असल्यामुळें हा आदेश ऱ्हस्व होतो. जसें,--करिती, करती; करिसी--करिशी; करसी--करशी; इत्यादि. अकर्मक धातूंना हा आदेश होत नाहीं. जसें,--बससी, उडती, इत्यादि.

( अ ) एकाक्षरी धातु सकर्मक किंवा अकर्मक कसेंही असले, तरी त्यांना हा आदेश होत नाहीं. उमज--गणांतील धातूंनाही सामान्य नियमानें हा आदेश होत नाहीं. परंतु त्यांपैकीं कित्येक धातूंना प्रांतिक उपयोगाप्रमाणें विकल्पेंकरून हा आदेश होतो. उदाहरणार्थ,--' ते धर्म आचरिती किंवा आचरती. ' इत्यादि.

( आ ) वरील पांचव्या नियमांतील धातु आणि ' पाह ' आणि ' राह, ' धातु यांना हा आदेश होत नाहीं.

( ११ ) धातु सकर्मक आणि अकर्मक असतां, सकर्मक उपयोग असतां ' ई, ई ' आणि अकर्मक उपयोग असतां ' ए, ए ' हे प्रत्यय लागतात. उदाहरणार्थ--' तो घर मोडी. ' ' घर मोडे. ' ' चाकर दार उघडी. ' ' वाऱ्यानें दार उघडे. ' ' गडी धान्य भरी. ' ' त्याला हींव भरे. ' इत्यादि. ' कर ' धातूला हा नियम लागत नाहीं. जसें,--तो काम करी. ' ' मला मळमळ करी. ' इत्यादि.

( १२ ) हाच नियम ' ई ' आगमाच्या संबंधानेंही लागू पडतो. धातूचा अकर्मक उपयोग असतां हा आगम होत नाहीं. जसें,--' तूं दार उघडिशी किंवा उघडशी. ' ' वाऱ्यानें दारें उघडती. ' इत्यादि.

( १३ ) द्वितीयपुरुषाचा अनेकवचनी प्रत्यय ' आं ' किंवा ' आ ' हा लागतांना पुढील फेरफार होतात.--( अ ) अ, आ आणि ई या अन्ताच्या धातूंना हा प्रत्यय संधिनियमाप्रमाणें लागतो. जसें,--कर + आ = करा; धर + आ = धरा; जा + आ = जा; पी + आ = प्या; इत्यादि. ( आ ) ऊकारान्त धातूच्या ' ऊ ' चा ' उव ' होतो. जसें,--धुवां, धुवा. ( इ ) ' ई ' चें ' इया '

करण्याचाही प्रांतिक प्रघात आहे. जसें,—प्या, पिया; भ्या, भिया; इत्यादि.
( ई ) एकारान्त धातूच्या 'ए'–चा 'य' होतो आणि ओकारान्त धातूच्या 'ओ'–चा 'व' होतो. जसें,—घे, घ्या; हो, व्हा; कोंकणांत 'होवा' असेंही रूप होतें.

( १४ ) द्वितीयपुरुषाचा अनेकवचनी प्रत्यय 'आं' यांतील अनुस्वार बहुधा गाळतात. एकाक्षरी धातूंना हा प्रत्यय 'आ' असाच होतो. 'सी' हा प्रत्यय पुष्कळदां 'शी' असा लिहितात. तसेंच 'शी,' 'ती' यांचा 'ई' स्वर कवितेंत हवा तर ऱ्हस्व लिहितात.

( १५ ) मागें या काळाचीं रूपें चालविलींच आहेत [ क० २१३ ( १ ) ( आ ) ]. तथापि येथें आणखी एक आकारान्त धातु चालवून दाखवितोंः—

| | |
|---|---|
| मी जाई | आम्ही जाऊं ( क्वचित् जावूं ). |
| तूं जासी, जाशी | तुम्ही जा. |
| तो, ती, तें, जाइ | ते, त्या, तीं जाती. |

( १६ ) या काळाच्या रूपांचा उपयोग जुन्या मराठींत असे. जुने मराठी लेख व बखरी यांत हीं रूपें येतात. त्याचप्रमाणें भाषेंत प्राचीन काळापासून ठरून गेलेल्या म्हणींत आणि भाषेंत कायमचीं ठरून गेलेलीं वाक्यें असतात, त्यांत हीं रूपें येतात. कवितेंत यांचा उपयोग फार होतो. कवितेमध्यें वर्तमानकाळ असाच करावा, असें निरंतरचें ठरल्यासारखेंच आहे. 'न' आणि 'ना' हीं निषेधार्थक अव्ययें असतां या रूपांचा उपयोग होतो. उदाहरणेंः—[ कविता. ]

'**बोले चाले** हरी। ज्याची कथा तोची करी.' —तुकाराम.

'सारा या प्रभुची हे लीला **गातो** सदैव ही सुकवी,
**सुकवी** भवजलनिधितें, अनुपम सुख रसिकजनमनीं **पिकवी**.'
'अजांडशतकोटि ज्या उदरिं सर्वदा **नांदवी**.'
'सदाहि हित **नायको**, बहु अपाय केले, **करूं**.' —मोरो०

'माझी कोण गती **सांगा** पंढरिनाथा। **तारीशी** अनाथा केव्हां मज ?
मनापासूनीयां **सांगा** मजप्रती। **पुसे** काकूळती जीवाचीया.' —नामदेव.

[ साधीं वाक्यें. ]

'रामा घरीं **जाईना** !' 'तो माझ्याशीं **बोलेना**.'
'तो न **करी** ( तो **करी ना** ) त्याला मीं काय करावें ?'
'दाम **करी** काम.' 'राजा **बोले**, सभा **डोले**.'
'आयापेक्षां खर्च मोठा, त्याचा **होई** सदा तोटा.'
'काय **म्हणे**, मला गाडी पाठवा तरच मी येईन !'

( १७ ) कवितेंत 'ई' आगम सोईप्रमाणें ऱ्हस्व अथवा दीर्घ लिहितात. कवितेंत ऱ्हस्वाचें दीर्घ अथवा दीर्घाचें ऱ्हस्व करण्याची चाल नेहमींचीच आहे. मात्र हा फेरफार शब्दाच्या मूळच्या स्वराला सहसा करीत नाहींत.

( १८ ) या काळाचीं वर सांगितलेलीं रूपें हीं कर्तरि आहेत. 'ज' लागून कीजे, लिहिजे, देखिजे, वगैरे रूपें जुन्या भाषेंत येतात. चालू भाषेंत कर्मणि रूपें नाहींत.

( १९ ) हा काळ मूळचा वर्तमानकाळ आहे, तरी कवितेंत याच्या रूपांवरून भूत आणि भविष्य काळांचाही बोध होतो. तसेंच कवितेंत आणि जुन्या भाषेंत ह्या काळाच्या रूपांचा उपयोग करून भविष्यकाळ दर्शविण्याची चाल पुष्कळ दिवस होती. हा प्रघात हिंदी वगैरे भाषांतही होता. पुढें या काळाच्या रूपांत किंचित् बदल होऊन भूतकाळ बनला, आणि पुढें 'ल' लावण्याची चाल पडून भविष्यकाळाचीं रूपें झालीं.

( २० ) धातु एकारान्त व ओकारान्त असतां कवितेंत पुष्कळदां तृतीयपुरुषाचा एकवचनी प्रत्यय 'इ' याचा लोप करून, 'नेई,' याबद्दल 'ने,' 'होई' याबद्दल 'हो' अशीं रूपें करितात. उदाहरणें:—

'घे इक्षु वारण जसा करपुष्करानें,
श्रीराम चाप उचली करपुष्करानें,'
'मागून **ये** दूरुन चक्रपाणी.'
'तदुपरि हरिभेटी **ये** विदर्भेन्द्र तेथें.'

'पडे केळ जैशी महाचंड-वातें। असें देखतां **ये** कृपा माधवातें.'
'आली समीप यजमानिन पट्टराणी। पाहे हरीस, तिचि **हो** न पुरे शिराणी.'
—वामन.

'सोडुनि न्याय, साध्वीतें ने कुधी हानि जोडुनी.'
'कृष्णरथीं चढले मग, तोहि चढे पुत्र सत्यकाचा हो,
जेवीं हररथिं विधि-हरि, दुसरा दृष्टान्त सत्य काचा हो.'
'वत्सा सहदेवा, मी मेल्यावरि हाय न च वदावें हो.
तेरा पळें हि नसती माता, हें हायन चवदावें हो.'
'झांका प्रसादपदरें, न कुजनदृक्स्पर्श कन्यकेला हो.'

**टीप**—क्वचित प्रथमपुरुष एकवचनाचा प्रत्यय 'ईं' याचाही असाच लोप होऊन अनुस्वार मात्र राहतो, आणि 'नेईं' 'घेईं' यांबद्दल 'नें,' 'घें' अशीं रूपें होतात.

## [ २ ] चालू वर्तमानकाळ.

२१७. ( १ ) या काळाचे प्रत्यय असे आहेतः—

| पुल्लिंग. | | स्त्रीलिंगी, | | नपुंसकलिंग. | |
|---|---|---|---|---|---|
| तों | तों | त्यें, तें | तों | तें | तों |
| तोस | तां | तीस, त्ये, तेस | तां | तेंस | तां |
| तो | तात | ती, त्ये, ते | तात | तें | तात |

( अ ) नपुंसकलिंगी प्रथम आणि द्वितीयपुरुषी रूपें सांगावीं कीं नाहीं, यासंबंधानें कित्येकांस शंका आहे. कित्येक द्वितीयपुरुषाचीं नपुंसकलिंगी रूपें आहेत, असें कबूल करितात, पण प्रथमपुरुषी रूपें नाहींत, असें म्हणतात. यासंबंधाचा विचार असा आहे कीं, नपुंसकलिंग हें निर्जीव पदार्थ किंवा हलक्या योग्यतेचा सजीव प्राणी वगैरे यासंबंधानें उपयोगांत असतें. परंतु निर्जीव पदार्थ सजीव मानून किंवा हलका प्राणी बोललेला समजतो अशी कल्पना करून त्याला उद्देशून आणि 'तूं' असें सर्वनाम घालून आपण त्याच्याशीं बोलत आहों अशी कल्पना जर करितां येते, तर तो नपुंसकलिंगी पदार्थ किंवा प्राणी आपल्याशीं प्रथमपुरुषीं बोलत आहे, अशी कल्पना करणेंही भाग आहे; आणि यासाठीं व्याकरणांत रूपें दिलीं पाहिजेत. नपुंसकलिंगाचीं द्वितीयपुरुषीं रूपें आढळतातच. जसें,—मोरोपंत परमेश्वराच्या नामाला उद्देशून म्हणतोः—

'**वसलेंस** पिंगलेच्या जैसें श्रीनारदादि धीरांच्या—
रामसुतमयूरमुखीं वस नामा, वससि जेविं कीरांच्या'

( आ ) आतां पुढील उदाहरणें पाहा,—

‘ फुगलें काऊळें । म्हणे, ‘ मी राजहंसा आगळें [ आहें ]. ’

येथें नपुंसकलिंगी पक्षी बोलत आहे अशी कल्पना आहे. यांत क्रियापद प्रत्यक्ष नाहीं. पण मराठींत लिंगाप्रमाणें फिरणारीं क्रियापदें आहेत. तेव्हां ‘ आगळें ’ याबद्दल अथवा त्याच्यानंतर तसें क्रियापद घालावयाचें असतें, तर प्रथमपुरुषी एकवचनी घातलें असतें हें उघड आहे. ‘ आपण स्वतां गेलें तरच हें काम होईल. ’ अशा वाक्यांत बोलणारा भाषेच्या पद्धतीप्रमाणें ‘ आपण स्वतां ’ म्हणजे ‘ मी ’ असें प्रथमपुरुषी नपुंसकलिंगी घेऊन बोलतो. तेव्हां व्याकरणांत नपुंसकलिंगी प्रथमपुरुषी रूपें दिलींच पाहिजेत.

( इ ) अशा ठिकाणीं प्रथमपुरुषी एकवचनी रूप ‘ मी बसलें ’, असें द्यावें, कीं ‘ मी बसलों ’ असें द्यावें ? ‘ बसलें ’ हें रूप अधिक ग्राह्य होय. परंतु ‘ बसलों ’ असेंही रूप नपुंसकलिंगी, प्रथमपुरुषी एकवचनी आहे असें समजण्यास चिंता नाहीं.

( २ ) धातु सकर्मक असतां प्रत्ययापूर्वी विकल्पें ‘ इ ’ आगम होऊन तो आगम ऱ्हस्व होतो. जसें,—करितो, करतो; पाठवितो, पाठवतो; इत्यादि. अकर्मक धातु, उमजगणाचे धातु+ आणि एकाक्षरी धातु यांना आगम होत नाहीं. जसें,—उमजतों, पढतात, बसत्ये, गातें, इत्यादि. यासंबंधानें क० २१६ यांतील नियम ४ ते ९ हे लक्षांत ठेवावे. त्यांमुळें सांग, माग, बघ, म्हण, इत्यादि धातूंना आगम होत नाहीं. जसें,—सांगतो, मागतां, बघतात, म्हणते, इत्यादि.

( ३ ) उभयविध धातु असतां त्याचा सकर्मक उपयोग केल्यास विकल्पें आगम होतो. आणि अकर्मक उपयोग असल्यास आगम होत नाहीं. उदाहरणें:—‘ तो आपलें घर मोडितो किं० मोडतो. ’ ‘ त्याचें घर मोडलें. ’ ‘ तो पाणी भरितो किं० भरतो. ’ ‘ त्याला हिंव भरतें. ’ ‘ राजा पंडितास मानितो किं० मानतो, ’ ‘ त्याच्या प्रकृतीला तें मानत नाहीं. ’ ‘सुतार जसजसें

---

+ उमज–गणाचे कित्येक धातु वैकल्पिक आहेत हें मागें सांगण्यांत आलेंच आहे.

लांकूड कापितो किं० कापतो, तसतसें तें कापत आहे.' 'चाकर काम करितो किंवा करतो.' 'मला मळमळ करते.' इत्यादि.

(४) 'कर' धातु, सकर्मकः—

| पुल्लिंगी | | नपुंसकलिंगी | |
|---|---|---|---|
| मी करितों, करतों | आम्ही करितों, करतों | मी करितें, करतें | आम्ही करितों, करतों |
| तूं करितोस, करतोस | तुम्ही करितां, करतां | तूं करितेंस, करतेंस | तुम्ही करितां, करतां |
| तो करितो, करतो | ते करितात, करतात | तें करितें करतें | तीं करितात, करतात |

स्त्रीलिंगी

| | |
|---|---|
| मी करितें, करित्यें, करतें, करत्यें | आम्ही करितों, करतों |
| तूं करितीस, करित्येस, करितेस, करतीस, करत्येस, करतेस | तुम्ही करितां, करतां |
| ती करिती, करित्ये, करिते, करती, करत्ये, करते | त्या करितात, करतात |

(५) 'बस' धातु अकर्मकः—

| पुल्लिंगी | | नपुंसकलिंगी | |
|---|---|---|---|
| मी बसतों | आम्ही बसतों | मी बसतें | आम्ही बसतों |
| तूं बसतोस | तुम्ही बसतां | तूं बसतेंस | तुम्ही बसतां |
| तो बसतो | ते बसतात | तें बसतें | तीं बसतात |

स्त्रीलिंगी

| | |
|---|---|
| मी बसत्यें, बसतें | आम्ही बसतों |
| तूं बसतीस बसत्येस, बसतेस | तुम्ही बसतां |
| ती बसती, बसत्ये, बसते | त्या बसतात |

(६) हीं कर्तरि रूपें आहेत. या काळाचीं कर्मणि रूपें चालू भाषेंत नाहींत.

ज-प्रत्यय लागून झालेली कर्मणि रूपें करिजेतो, लिहिजेतें वगैरे जुन्या भाषेंत आढळतात. जसें,:—

'नित्य पोटीं वडवाग्नि पेट घेतो ।
सागरानें तो काय **सांगिजेतो** ?' –रघु० पं०.
'म्यां तीर्थाचें सेवन **करिजेतें** नित्य कंसराया तें.' –मोरो०.

## (३) रीतिभूतकाळ.

२१८. (१) प्रथमारंभीं जुन्या वर्तमानकाळाचाच उपयोग भूतकाळासारखा होत असे. पुढें त्या भूतकाळाला रीतिभूतकाळाचा अर्थ आला. त्याच्या रूपांमध्येंही थोडा फरक होतो. तो असा:—द्वितीयपुरुष एकवचन आणि तृतीय पुरुष अनेकवचन यांचे प्रत्यय 'सी' आणि 'ती' यांच्या अंतींचा 'ई' स्वर जाऊन ते 'स' आणि 'त' असे होतात; आणि हीं रूपें अकारान्त झाल्यामुळें 'ई' आगम दीर्घच असतो. जसें,–'तूं करीस.' 'ते करीत,' इत्यादि.

**टीप**—हा काळ जुन्या वर्तमानकाळावरूनच झालेला असल्यामुळें त्या काळामध्यें होणाऱ्या सर्व गोष्टी या काळांतही होतात, हें लक्षांत ठेवावें.

(२) 'स' आणि 'त' या प्रत्ययापूर्वी अकर्मक धातूंना 'ए' आणि एकाक्षरी धातूंना 'ई' असे आगम विकल्पेंकरून होतात. जसें–बस, बसस, बसेस; बसत, बसेत; जा–जास, जाईस, जात, जाईत; ने—नेस, नेईस; हो-होत, होईत; इत्यादि.

**टीप**—अकर्मक धातूंचें 'ए' आगम होऊन झालेलें हें रूप सांप्रत उपयोगांतून जात आहे असें दिसतें. बसेस, उठेत, चालेस इत्यादि रूपें फारशीं प्रचारांत नाहींत.

**टीप**—या काळाचीं रूपें लिंगावरून फिरत नाहींत.

(३) आतां कांहीं धातु चालवून दाखवितों.

'धर' धातु–सकर्मकः–

| ए० व० | अ० व० |
|---|---|
| मी धरीं | आम्ही धरूं, धरों |
| तूं धरीस | तुम्ही धरां |
| तो इ० धरी | ते, इ० धरीत |

'नीज' धातु–अकर्मकः—

| ए० व० | अनेक व० |
|---|---|
| मी निजें | आम्ही निजूं, निजों |
| तूं निजस, निजेस | तुम्ही निजां |
| तो, इ० निजे | ते, इ० निजत |

| ‘पी’ धातु—सकर्मक एकाक्षरीः— | | ‘धू’ धातु—सकर्मकः— | |
|---|---|---|---|
| ए० व० | अने०व० | ए० व० | अने० व० |
| मी पिई, पिएँ | आम्ही पिऊं, पिओं | मी धुई | आम्ही धुऊं, धुओं |
| तूं पीस, पिईस | तुम्ही पिया, पिआं | तूं धूस, धुईस | तुम्ही धुवां, धुआं |
| तो पिई, पिए | ते पीत, पिईत | तो धुई | ते धूत, धुईत |

( ४ ) हीं रूपें कर्तरि आहेत. चालू भाषेंत या काळीं कर्मणि रूपें नाहींत. ‘ज’ लागून झालेलीं कर्मणि रूपें कवितेंत येतात.

( ५ ) या काळावरून अमुक क्रिया करण्याची पूर्वी रीत होती, अथवा असें असें होत असे, अशा अर्थाचा बोध होतो. ‘प्रवासामध्यें स्वयंपाक तो करी; मी तयारी करून देई.’ ‘त्याचा बाप त्याला नित्य दोन तास धडे शिकवी.’ ‘आम्ही महाबळेश्वरीं होतों तेव्हां येथें रोज पाऊस पडे.’ इत्यादि.

## ( ४ ) चालू किंवा ल-प्रत्ययान्त भूतकाळ.

२१९. ( १ ) धातूस ‘ल’ लागून झालेलें रूप मूळचें विशेषण आहे. त्याला लिंगाचे प्रत्यय आ, ई, एँ—एकवचन, आणि ए, या, ई—अनेकवचन, असे लागून तृतीयपुरुषार्चीं रूपें होतात. त्यांना मग काळाचे म्हणून प्रत्यय लागत नाहींत. प्रथम आणि द्वितीय पुरुषीं ‘हो’ धातूच्या रूपांचा अवशेष ‘ल’ मध्यें मिळून झालेले प्रत्यय लागतात. अशा रितीनें या काळाचे प्रत्यय होतात. ते असे—

| पुरुष | पुल्लिंगी | | स्त्रीलिंगी | | नपुंसकलिंगी | |
|---|---|---|---|---|---|---|
| | ए० व० | अने० व० | ए० व० | अने०व० | ए० व० | अने० व० |
| प्र०पु० | लों | लों | ल्यें, लें | लों | लें | लों |
| द्वि०पु० | लास | ला, लांत, लेत | लीस | लां, लांत, ल्यांत | लेंस | लां, लांत, लींत |
| तृ०पु० | ला | ले | ली | ल्या | लें | लीं |

( २ ) ‘ल’ हा प्रत्यय मूळ संस्कृतांतील कर्मणि प्रत्ययावरून झाला आहे. यामुळें या काळाचीं सकर्मक धातूचीं रूपें कर्मणि असतात. मराठींत असा नियम

आहे कीं, कर्मणिप्रयोग कर्मपद तृतीयपुरुषीं असतां मात्र होतो. जसें,— 'विद्यार्थ्यानें घडा केला, '–'घडे केले,'–' पुस्ती लिहिली, '–'पुस्त्या लिहिल्या, '–'पत्र लिहिलें'– ' पत्रें लिहिलीं. ' इत्यादि.*

( ३ ) यावरून दिसून येईल कीं, धातु सकर्मक असतां या काळाचीं रूपें प्रथम आणि द्वितीय पुरुषीं होत नाहींत. उदाहरणार्थ, पुढील कर्तरि वाक्यें पाहाः—

' तो मला बोलावितो. ' ' तो आम्हांस बोलावितो. '

' तो तुला बोलावितो. ' ' तो तुम्हांला बोलावितो. '

यांचीं कर्मणि वाक्यें करूं लागल्यास ' त्यानें मी बोलाविलों. ' ' त्यानें तूं बोलाविलास. ' ' त्यानें तुम्ही बोलाविलेत कि० बोलाविलांत. ' अशीं होतील. परंतु सांप्रत असें बोलण्याची रीत नाहीं. अशीं वाक्यें आलीं असतां कर्मणिप्रयोग न करितां भावेप्रयोग करावा अशी चाल आहे. जसें,–'त्यानें मला बोलाविलें. ' ' त्यानें आम्हांस बोलाविलें. ' ' त्यानें तुला बोलविलें. ' ' त्यानें तुम्हांस बोलाविलें. ' इत्यादि.

( ४ ) प्रथम आणि द्वितीय पुरुषीं कर्मणिप्रयोग जरी सांप्रत उपयोगांत नाहीं, तरी तो जुन्या काळीं उपयोगीत असें दिसतें. पंचतंत्रांत उपयोग आहे. कवितेमध्यें अशीं उदाहरणें येतात. जसें,—

' मज हृदयीं सद्गुरु। तेणें तारिलों हा संसार–पूरु–' ज्ञान० अमृ०.
' मी आधींच कांहीं नेणें। वरी **कवळिलों** मोहें येणें,
श्रीकृष्णा, विवेक या कारणें। पुसिला तुज. ' —ज्ञानेश्वर.
' जाउनि तो सूत म्हणे, कृष्णे, द्युतांत तूं स्वयें धर्मे–
**हारविलीस**; सुयोधनसदनाप्रति ये करावया कर्में. '
' भूप म्हणे, तूं मुनिनीं चित्तीं षढरिक्षयार्थ **धारिलास**. '
' **वरिलासि** मत्सखीनें, म्यांही **वरिलासि** तूं मनें–'
' येणे तो मुनि गुरुवर, परमेश्वर **मोहिलासि** तूं, तोही. '

* कर्मणिप्रयोग होणें म्हणजे कर्मपद उद्देश्य होणें. असें झालें म्हणजे वाक्यांत आपण त्याविषयीं बोलतों; कर्मपदाची द्वितीया विभक्ति जाऊन प्रथमा होते; आणि क्रियापदाचें रूप त्याप्रमाणें फिरतें; या गोष्टी लक्षांत ठेवाव्या.

'प्रभु तीसं म्हणे [ म्यां ] धुवावया **सोडविलीस** [ तूं ] यशास.'
'तूं **पूजिलासि** भरतें; न तें परमर्षिपितें.' —मोरोपंत.

अशा प्रकारचीं आणखी उदाहरणें प्रयोगप्रकरणीं दिलीं आहेत. यावरून दिसून येईल कीं, प्रथमपुरुषीं आणि द्वितीयपुरुषीं कर्मणिप्रयोग भाषेंत जुन्या कालीं होता. तेव्हां प्रौढ विद्यार्थ्यांनीं कोणत्याही सकर्मक धातूचीं रूपें सांगतांना तिन्ही पुरुषीं सांगितलीं पाहिजेत. अकर्मक धातु तिन्ही पुरुषीं चालतो हें उघडच आहे.

( ६ ) भूतकाळीं सकर्मक धातूवरून कर्मणिप्रयोगच होतो, असा साधारण नियम आहे. परंतु उमजगणांतील धातूंना कर्मणिप्रयोग नाहीं. त्यांवरून भूतकाळींही कर्तरिप्रयोगच होतो. जसें,—उमज—'तो ती गोष्ट लौकर उमजला.' जेव—'मी भात जेवलों.' शीक, पढ—'तूं व्याकरण शिकलास किंवा पढलास.' इत्यादि. यांतील कित्येक धातूंवरून विकल्पेंकरून कर्मणिप्रयोग होतो. उदा०—'मी धर्म आचरलों.' अथवा 'म्यां धर्म आचरिला.' 'तो शंभर गायत्री जपला,' 'त्यानें शंभर गायत्री जपल्या.' इत्यादि.

**टीप**—उमज धातूंच्या प्रयोगांच्या संबंधानें ज्यास्त विवरण प्रयोगप्रकरणांत होईल.

[ ६ ] 'ल' हा व्यंजनादि प्रत्यय आहे, यामुळें याच्यामागें रितीप्रमाणें 'ई' आगम होतो. तेव्हां तत्संबंधानें मागें सांगितलेले सर्व नियम लक्षांत आणावे.

[ ७ ] आतां कांहीं धातु भूतकाळीं चालवून दाखवितों:—

[ अ ] 'बस' धातु अकर्मक:—

पुल्लिंगी

| | | |
|---|---|---|
| मी | बसलों | आम्ही बसलों |
| तूं | बसलास | तुम्ही बसलां, बसलांत, बसलेत |
| तो | बसला | ते बसले |

स्त्रीलिंगी

| | | |
|---|---|---|
| मी | बसल्यें, बसलें | आम्ही बसलों |

| | | |
|---|---|---|
| तूं | बसलीस | तुम्ही बसलां, बसलांत, बसल्यांत |
| ती | बसली | त्या बसल्या |

नपुंसकलिंगी

| | | |
|---|---|---|
| मी | बसलें | आम्ही बसलों |
| तूं | बसलेंस | तुम्ही बसलां, बसलींत, बसलांत |
| तें | बसलें | तीं बसलीं |

( आ ) 'पाठव' धातु, सकर्मक, यामध्यें विकल्पें 'इ' आगम [ ऱ्हस्व होऊन ] होइल. तसेंच याचीं रूपें पहिल्या दोन पुरुषीं चालू भाषेंत येत नाहींत. याचीं रूपें:—

पुल्लिंगी.

| | |
|---|---|
| मी पाठविलों, पाठवलों | आम्ही पाठविलों, पाठवलों |
| तूं पाठविलास, पाठवलास | तुम्ही पाठविलां, पाठवलां, पाठविलांत, पाठवलांत, पाठविलेत, पाठवलेत. |
| तो पाठविला, पाठवला | ते पाठविले, पाठवले |

स्त्रीलिंगी.

| | |
|---|---|
| मी पाठविल्यें, *पाठविलें, पाठवल्यें, पाठवलें | आम्ही पाठविलों, पाठवलों |
| तूं पाठविलीस, पाठवलीस | तुम्ही पाठविलां, पाठवलां, पाठविलांत, पाठवलांत, पाठविल्यात, पाठवल्यात |
| ती पाठवली, पाठविली | त्या पाठविल्या, पाठवल्या |

नपुंसकलिंगी.

| | |
|---|---|
| मी पाठविलें, पाठवलें | आम्ही पाठविलों, पाठवलों |
| तूं पाठविलेंस, पाठवलेंस | तुम्ही पाठविलां, पाठविलींत, पाठविलांत, पाठवलां, पाठवलींत, पाठवलांत |
| तें पाठविलें, पाठवलें | तीं पाठविलीं, पाठवलीं |

**टीप**—कर्मणिप्रयोगांत कर्ता तृतीयान्त व कर्म प्रथमान्त असावयाचें; आणि कर्मपद उद्देश्य म्हणजे कियापदाचीं रूपें फिरविणारें होऊन त्याच्या लिंग-वचनपुरुषांप्रमाणें क्रियापदाचे लिंग--वचन--पुरुष असावयाचे. अशी गोष्ट उघड

असतांना प्रथमपुरुषी कर्ता असतां, आणि कर्म तृतीयपुरुषी असतां, तोच क्रियापदाचा प्रथमपुरुष, असें समजून कर्मणि-क्रियापद चालविण्याची जुनी रीत आहे. जसें,—' मीं अथवा म्यां केलें. ' ' तूं अथवा त्वां केलें. ' इत्यादि. यांतील क्रियापदें अनुक्रमें प्रथम व द्वितीयपुरुषी आहेत असें कोणी मानितात. पण हा समज चुकीचा आहे. यांत ' केलें काय, ' हें दाखविण्यासाठीं कर्मपद घातलें तर क्रियापद त्याप्रमाणें चालतें असें दिसून येईल. जसें,–' मीं काम केलें. ' ' मीं कामें केलीं. ' ' त्वां काम केलें. ' ' त्वां कामें केलीं. ' इत्यादि. तेव्हां या सर्व वाक्यांत क्रियापद तृतीयपुरुषी आहे. प्रथम आणि द्वितीय पुरुषीं क्रियापद चालविणें असेल तर ' मी ' आणि ' तूं ' हीं कर्मपदें घालावीं लागतील. जसें,–ईश्वरानें मी उत्पन्न केलों. ' ' ईश्वरानें आम्ही उत्पन्न केलों. ' ' ईश्वरानें तूं उत्पन्न केलास. ' ' ईश्वरानें तुम्ही उत्पन्न केलेत,-केलां,-केलांत. ' इत्यादि. तेव्हां सकर्मक क्रियापद भूतकाळीं चालवितांना ही चुकीची पद्धत सोडून दिली पाहिजे हें लक्षांत ठेवावें.

( इ ) ' जेव ' धातु—सकर्मक, उमज गणांतीलः—

| पुल्लिंगी | | स्त्रीलिंगी | |
|---|---|---|---|
| मी जेवलों+ | आम्ही जेवलो | मी जेवल्यें, जेवलें | आम्ही जेवलों |
| तूं जेवलास | तुम्ही जेवलां, जेवलांत, जेवलेत | तूं जेवलीस | तुम्ही जेवलां, जेवलांत जेवल्यात |
| तो जेवला | ते जेवले | ती जेवली | त्या जेवल्या |

नपुंसकलिंगी

| | |
|---|---|
| मी जेवलें | आम्ही जेवलों |
| तूं जेवलेंस | तुम्ही जेवलां, जेवलांत, जेवलींत |
| तें जेवलें | तीं जेवलीं |

( ८ ) या काळाचीं रूपें होतांना कांहीं अनियमित प्रकार होतात, ते आतां सांगतोंः—

---

+ येथे ई आगम झाला नाहीं हें लक्षांत येईलच.

( अ ) कांहीं धातूंच्या अंतींच्या अचा आ होतो. जसें,–नीघ, निघाला; पळ, पळाला; म्हण, म्हणाला; रीघ, रिघाला; इत्यादि, ऊड, दड, नांव, बूड, मीळ, या धातूंच्या अचा आ विकल्पेंकरून होतो, परंतु 'आ' झालेलें रूप विशेप प्रचारांत आहे. जीर, भीज, वीझ, खीज, वीर, दब, कळ, या धातूंच्या अचा आ करण्याचा प्रांतिक प्रघात आहे. ऊभ, ऊब, गळ, जळ, झीज, दीप, बूज, वूझ, लप, या धातूंच्या अचा आ विकल्पेंकरून होतो. परंतु यांच्या-संबंधानेंही प्रांतिक मतभेद आहे.

( आ ) एकाक्षरी आकारान्त धातूंना प्रत्ययापूर्वी विकल्पेंकरून ऱ्हस्व 'इ' आगम होतो. जसें,–गाला, गाइला; माला, माइला; घ्याला, घ्याइला; इत्यादि.

( इ ) एकाक्षरी ईकारान्त धातूंना आ लागून, आणि संधि नियमाप्रमाणें संधि होऊन रूपें होतात. जसें,–भी, भ्याला; वी, व्याली; पी, प्याला; इत्यादि. भियाला, पियाला, अशींही रूपें करण्याची प्रांतिक पद्धत आहे.

( इ ) कर आणि मर धातूंना अनुक्रमें के, मे, अशीं सामान्यरूपें होतात; आणि दे धातूच्या एच्या जागीं इ स्वर होतो. जसें,–केला, मेला, दिलें, इत्यादि.

( उ ) सांग, माग, बघ, धू, या धातूंना भूतकाळाच्या प्रत्ययापूर्वी त लागतो. या तच्यापूर्वी ऱ्हस्व इ आगम होतो. जसें,—सांगितलें, मागितलें, बघितला, इत्यादि. धूचा अन्त्य स्वर ऱ्हस्व होतो. जसें,–धुतला. घे धातूलाही त लागतो. जसें,—घेतला. म्हण आणि हाण, यांना त विकल्पेंकरून लागतो. जसें,–म्हणितलें, म्हटलें; हाणितलें, हाणलें; यांतील त घातलेलें रूप कवितेंत येतें. घाल याचा 'ल' जातो. जसें,–घातला. हा 'त' जुना कर्मणि-प्रत्यय जो ज किंवा य, तोच आहे. कारण हाणियलें, सांगियलें अशींही रूपें आहेत.

( ऊ ) धातूंच्या अंतीं 'ण' असल्यास त्याचा विकल्पें 'ट' होतो. जसें,–खण, खणलें, खटलें; हाण, (किंवा हण) हाणलें, हाटलें; म्हण, म्हटलें, म्हणाला; इ०

टीप—जेव्हां म्हण धातूच्या 'ण'चा 'ट' होत नाहीं, तेव्हां 'ण' चा 'णा' होतो, आणि मग तो धातु उमजगणाचा होतो.

( ए ) कांहीं धातूंचीं चमत्कारिक रूपें होतात. जसें,–जा, गेला; खा, खाल्लें; ये, आला; हो, जाहला, झाला; इत्यादि.

**टीप**--संस्कृतांत कांहीं धातूंच्या आद्य व्यंजनाला अभ्यास म्हणून फेरफार होत असतो. त्याप्रमाणें 'हो' याचें 'जहो,' 'जहा,' असें झालें. पुढें 'ज' आणि 'ह' मिळून 'झा' असें झालें.

(ऐ) या काळाचीं बरींच चमत्कारिक आणि अनियमित रूपें कवितेंत आढळतात. त्यांचीं कांहीं उदाहरणें पुढें देतोंः—

'शुक्रें बहु संतोषें **दिधली** जाया पित्याकडे आज्ञा.' —मोरो०
'मग गर्जोनि नराधीशें। **म्हणितलें**, आश्रमीं कोण असे?' —मुक्तेश्वर.
'सवेंचि दुःशासनसुतें। **हाणितलें** अभिमन्यातें.' —श्रीधर.
'तुका म्हणे, हें तों आहे तयां ठावें, जिहीं एका भावें **जाणितलें**.'—तुका.
'कामें **हरितल्या** (हरल्या) दृष्टी। धनुष्यें गळाली मुष्टी.' —एकनाथ.
'बाहेर **पातली** मुनीश्वरदुहिता.' —मुक्तेश्वर.
'ऐकोन उद्धवाचा प्रश्न। **हसिन्नला** मधुसूदन.' —एकनाथ.
'ऐसिया तांतडी **धाविन्नला**। द्रौपदीमागें उभा **ठेला**.' —श्रीधर.
'क्रोधें गेला संतसंग। लोभ **जाहला** वीरंग.' —रामदास.
'मृदुलत्व, म्लानत्व स्वीकारुन **जाहलासि** कां पाला?' —मोरोपंत.
'ऐकून विकर्णाची वाणी। **गर्जिन्नली** खलश्रेणी.' —श्रीधर.
'जीव **खादला** दैवतें, माझा येणें महाभूतें.'
'कस्तुरी **भिन्नली**.* जये मृत्तिकेसी। तये आणिकेसी कैसी सरी.'—तुकाराम.

(ओ) या काळाचीं सकर्मक धातूंवरून होणारीं रूपें वास्तविक कर्माणि आहेत. परंतु इतर रूपांच्या सादृश्यावरून त्यांसच आणखी 'य' आणि 'ज' लागलेलीं सकर्मक आणि अकर्मक धातूंचीं रूपें जुन्या कवितेंत आढळतात. जसें,

'ओंतीव हे न घटिताकृति **बोलिजली**.'
'द्विजीं निषधापासाव **म्हणीजेलें**.'
'कांहीं पुढें फडकला **अवलोकिजेला**.'
'मागावयास जन मागिल **देखियेले**.'
'नळें इंद्रासी असें **बोलिजेलें**.'
'सैंवरासी यालागिं **येयिजेलें**.' —रघु० पं०

---

* दिलें, दिधलें, याबद्दल 'दिन्नलें' असें रूप पाटण येथील शिलालेखांत आहे.

'पसरुनी.गुरुजालक धीवरीं। धरियले बहु मीन नदीवरी.' —मोरो०

'नगर हें कवणें रचिलें बरें। मदुन काढियलें कनकांबरें.' —अनंत.

**टीप**—या उदाहरणांत कर्मणि प्रत्यय दुहेरी लागला आहे. तो, 'ल' हा प्रत्यय कर्मणि आहे, याची आठवण बुजून लागलेला आहे. बोलणारे बोलतांना व्याकरणसंबंधीं विचार थोडाच करीत असतात! बाकी ही रीत फार जुनी दिसते. कारण कर्नाटकांत एका देवळावर शके ९०० तला एक कानडी लेख आहे, त्यांत पुढील एक मराठी वाक्य आहे:—'चामुंडरायें सुत्तालें करवियलें.' यांत 'करवियलें' म्हणजे 'करविलें.'

(औ) कित्येक भूतकाळाचीं रूपें जुन्या कवितेंत आढळतात, परंतु त्या मूळच्या धातूंचीं इतर आख्यातविभक्तींचीं रूपें आढळत नाहींत. जसें,—ठेला (स्था धातूवरून); उदेला (उत्+इ या धातूवरून); इत्यादि.

## (५) भविष्यकाळ.

२२०. (१) या काळाचे प्रत्यय असे आहेत:—

| | ए० व० | अने० व० |
|---|---|---|
| प्र० पु० | ईन (सकर्मक) | ऊं |
| | एन (अकर्मक) | |
| द्वि० पु० | सील, शील | आल |
| तृ० पु० | ईल (सकर्मक) | तील |
| | एल (अकर्मक) | |

(२) या काळीं रूपांना लिंगभेद नाहीं. हे प्रत्यय कवितेंतील वर्तमान-काळाच्या प्रत्ययांना 'ल' लागून झाले आहेत; म्हणून त्या काळीं होणारे फेरफार वगैरे या काळींही होतात.

(३) 'वाच' धातु, सकर्मक:—

| | |
|---|---|
| मी वाचीन | आम्ही वाचूं |
| तूं वाचिशील, वाचशील, वाचिसील, वाचसील | तुम्ही वाचाल |
| तो इ० वाचील | ते इ० वाचितील, वाचतील |

'नीज' धातु, अकर्मकः–

| | |
|---|---|
| मी निजेन | आम्ही निजूं |
| तूं निजशील, निजसील | तुम्ही निजाल |
| तो इ० निजेल | ते इ० निजतील |

'जा' धातु, अकर्मकः—

| | |
|---|---|
| मी जाईन, जाएन | आम्ही जाऊं |
| तूं जाशील, जासील | तुम्ही जाल |
| तो इ० जाईल, जाएल | ते इ० जातील |

(४) अकर्मक प्रत्यय 'एन,' 'एल,' हे कवितेंत सकर्मक धातूंना लावलेले पुष्कळ ठिकाणीं आढळतात. उदाहरणेंः—

'सीता रामासि न देतां जाण। रावणा तुज राखेल कोण?' –एकनाथ.

'म्हणे, आणि धन्य नयन। देखेन वैकुंठींचें निधान,
पूर्णब्रह्म सनातन। मी पाहेन डोळेभरी.' –श्रीधर.

'फलमूलार्थ निघे पति, त्यासि म्हणे, मजहि सत्तमा न्या हो,
वन पाहेन, तुम्हां ही न प्रथम प्रार्थना अमान्या हो.' –मोरो०

(५) वरील रूपें हीं कर्तरि आहेत. 'ज' प्रत्यय लागून झालेलीं कर्मणि आणि भावी रूपें जुन्या कवितेंत वगैरे आढळतात. तीं अशीं:–

'तैसें अभिलाषें येणें कीजेल। विपयाची आशा धरिजेल,
तेणें वरपडा होईजेल। क्रोधानळा.' –ज्ञानेश्वर.

'ते अनुभवाचे चमत्कार। पुढें बोलिजतील.' –वामन.

'धौम्याभिप्रायहि हा, जइं धारजेतील कुरु परेतत्त्वें,
गातिल पुढें कुरुगुरु दर्भ धरुनियां करीं परे तत्त्वें.'

'करिजेल हास्य आस्य प्रेक्षुनि नगरांत बायकांनीं कीं.'

'धर्म–यश विपुल यावें, स्वमुखें वाखाणिजेल तुज शक्र.'–मोरो०

## (६) आज्ञार्थ.

२२१. (१) आज्ञार्थाचे प्रत्यय असे आहेतः–

| | ए० व० | अनेक व० |
|---|---|---|
| प्र० पु० | ऊं | ऊं |

| | |
|---|---|
| द्वि० पु० [ प्रत्यय नाहीं ] | आ |
| तृ० पु० ऊ, ओ | ऊत, ओत |

( २ ) द्वितीयपुरुषीं एकवचनीं प्रत्यय नाहीं, आणि मूळ धातूला विकारही होत नाहीं. यामुळें कोणत्याही धातूचें मूळ रूप कोणतें आहे, हें पाहणें झाल्यास आज्ञार्थाचें द्वितीयपुरुष-एकवचनाचें रूप करावें. या नियमाला हकारान्त धातु अपवादक आहेत. ' राह, ' ' पाह, ' यांचें द्वितीयपुरुषीं एकवचन ' राहा, ' ' पाहा, ' असें होतें. ' लिह ' धातूचें ' लिही ' होतें. ' पोह ' धातूचें ' पोह ' असें नियमाप्रमाणेंच होतें. याचें कारण हा धातु मूळचा 'पोव ( पोवणें )' असा असावा. कोंकणांत हा धातु ' पोवणें ' असाच आहे. ' बस ' धातूचें द्वि० पु० एकवचन ' बैस ' असेंही करितात. 'बैस' या रूपावरून या धातूचें मूळ दिसून येतें. सं० उप+विश्, पाली, उवैस; मरा० बैस.

( ३ ) द्वितीय-पुरुष-अनेकवचनाचा प्रत्यय ' आ ' याचे पूर्वी जुन्या वर्तमान-काळाचा प्रत्यय जो ' आ ' किंवा ' आं ' त्यापूर्वी होणारे फेरफार होतात.

( ४ ) रूपें— ' कर ' धातु-सकर्मकः—

| | | | |
|---|---|---|---|
| मी | करूं | आम्ही | करूं |
| तूं | कर | तुम्ही | करा |
| तो इ० | करू, करो | ते इ० | करूत, करोत |

' बस ' धातु—अकर्मकः—

| | | | |
|---|---|---|---|
| मी | बसूं | आम्ही | बसूं |
| तूं | बस, बैस | तुम्ही | बसा |
| तो इ० | बसू बसो | ते इ० | बसूत, बसोत |

' हो ' धातु, अकर्मकः—

| | | | |
|---|---|---|---|
| मी | होऊं | आम्ही | होऊं |
| तूं | हो | तुम्ही | व्हा |
| तो इ० | होऊ, होवो | ते इ० | होऊत, होवोत |

**टीप**—या रूपांना लिंगभेद नाहीं.

( ५ ) प्रथमपुरुषीं आज्ञार्थाचा उपयोग आज्ञा मागण्याकडे होतो. तृतीय-पुरुषीं आज्ञा देण्याकडे उपयोग होतो. द्वितीयपुरुषीं आज्ञा प्रत्यक्ष केलेली

असते. जसें,–'मी जाऊं का?' 'तुम्ही आतां घरीं जा.' 'तो जावो.' म्ह० 'त्याला जाऊं द्या.' इत्यादि.

(६) कवितेंत द्वितीयपुरुषीं एकवचनीं सकर्मक धातूला 'ईं' आणि अकर्मक धातूला 'एँ' असेही प्रत्यय होतात. हे प्रत्यय होतांना मागें ते होण्याच्या संबंधाचे सांगितलेले नियम लागतात. जसें,–कर, करीं; बस, बसें; जा, जाईं; हो, होईं; इत्यादि. आणखी उदाहरणः—

'घेईं घेईं माझे वाचे। गोड नाम विठोबाचें.'
'धावें पावें गा अनंता। सर्वसाक्षी कृपावंता.'– तुकाराम.
'तिये अहिल्येचिये सरी। मज उद्धरीं श्रीकृष्णा.'–मुक्तेश्वर.

**टीप**—'ईं' हा प्रत्यय, संस्कृतांतला आज्ञार्थाचा द्वितीयपुरुषाचा कित्येक धातूंना होणारा प्रत्यय जो 'हि' त्यावरून झाला. त्यावरील अनुस्वार मराठीच्या संवईप्रमाणें आला. पुढें इतर ठिकाणच्या सादृश्यानें सकर्मक 'ईं' आणि अकर्मक 'एँ' असा भेद उत्पन्न झाला.

(७) येवो, होवो, इत्यादि रूपें येओ, होओ, अशींही लिहितात. कवितेंत हीं रूपें यो, हो, अशींही आढळतात. उदाहरणः—

'भीम म्हणे, केशवजी, मृदु बोला, उग्र तो सुयोधन हो,
बा, त्याशीं सख्यचि हो, युद्धीं हत एकही सुयोध न हो.'
'श्रीरामाला दशरथ द्यावें युवराजपद असें योजी;
गुरु सचिव म्हणति, इच्छित होतों कीं हेंचि तव मना यो जी.'
'वैराटि म्हणे, नर्तक हो, कीं वादक, तथैव गायक हो,
सारथी हो या समयीं, एकहि वश कौरवांसि गाय न हो.'–मोरो०
'हातपाय तुझे पथीं न चालतां। जावोत अनंता गळोनियां.'
तुका म्हणे खरें सांगें। दोत रागें येती ते.'—तुका०.

(८) या अर्थी 'ज' प्रत्यय लागून झालेलीं कर्मणि रूपें आढळत नाहींत. पण क्वचित् वर्तमानकाळाच्या तशा रूपांचा आज्ञार्थी उपयोग केलेला आढळतो. जसे,—

'मना कल्पना वावुगी ते न कीजे। मना सज्जना, राघवीं वस्ति कीजे।
—रामदास.

## (७) विध्यर्थ.

२२२. (१) या अर्थी धातूंचीं रूपें अशीं होतातः—

'अस' धातु, अकर्मकः—

पुल्लिंगी

| | | |
|---|---|---|
| मी असावा | आम्ही | असावों, असावे |
| तूं असावास | तुम्ही | असावे, असावेत |
| तो असावा | ते | असावे, असावेत |

स्त्रीलिंगी

| | | |
|---|---|---|
| मी असावी | आम्ही | असावों, असाव्या |
| तूं असावीस | तुम्ही | असाव्या, असाव्यात |
| ती असावी | त्या | असाव्या, असाव्यात |

नपुंसकलिंगी

| | | |
|---|---|---|
| मी असावें | आम्ही | असावों, असावीं |
| तूं असावेंस | तुम्ही | असावीं, असावींत |
| तें असावें | तीं | असावीं, असावींत |

'कर' धातु सकर्मकः—

पुल्लिंगी

| | | |
|---|---|---|
| मी करावा | आम्ही | करावों, करावे |
| तूं करावास | तुम्ही | करावे, करावेत |
| तो करावा | ते | करावे, करावेत |

स्त्रीलिंगी

| | | |
|---|---|---|
| मी करावी | आम्ही | करावों, कराव्या |
| तूं करावीस | तुम्ही | कराव्या, कराव्यात |
| ती करावी | त्या | कराव्या, कराव्यात |

नपुंसकलिंगी

| | | |
|---|---|---|
| मी करावें | आम्ही | करावों, करावीं |
| तूं करावेंस | तुम्ही | करावीं, करावींत |
| तें करावें | तीं | करावीं, करावींत |

(२) या अर्थाचीं रूपें चालू भूतकाळाप्रमाणेंच धातु सकर्मक असतां केवळ कर्मणि आणि धातु अकर्मक असतां कर्तरि किंवा भावी आहेत. यासाठीं त्या काळाचीं रूपें करण्याचे संबंधाचे अनेक प्रकार येथें लागू आहेत. सकर्मक धातूंचीं रूपें चालू भाषेंत फक्त तृतीयपुरुषी व्हावयाचीं; प्रथम व द्वितीयपुरुषी क्वचित् कवितेंत मात्र येतील. भावी रूप फक्त तृतीयपुरुषी एकवचनी असावयाचें. 'राजानें [ किंवा त्वां, त्यांनीं, इ० ] दुष्टांस दंडावें.' 'म्यां [ किं० तुम्ही त्यांनीं, इ० ] घरीं जावें.' इत्यादि.

## [ ८ ] संकेतार्थ.

२१३. ( १ ) 'कर' धातु, सकर्मकः—

पुल्लिंगी.

| | |
|---|---|
| मी करितों, करतों | आम्ही करितों, करतों |
| तूं करितास, करतास | तुम्ही करितां, करतां |
| तो करिता, करता | ते करिते, करते |

स्त्रीलिंगी

| | |
|---|---|
| मी करित्यें, करितें, करत्यें, करतें | आम्ही करितों, करतों |
| तूं करितीस, करतीस | तुम्ही करितां, करतां |
| ती करिती, करती | त्या करित्या, करत्या |

'अस' धातु, अकर्मकः—

पुल्लिंगी

| | |
|---|---|
| मी असतों | आम्ही असतों |
| तूं असतास | तुम्ही असतां |
| तो असता | ते असते |

स्त्रीलिंगी

| | |
|---|---|
| मी असत्यें, असतें | आम्ही असतों |
| तूं असतीस | तुम्ही असतां |
| ती असती | त्या असत्या |

नपुंसकलिंगी

| | |
|---|---|
| मी असतें | आम्ही असतों |
| तूं असतेंस | तुम्ही असतां |
| तें असतें | तीं असतीं |

(२) या अर्थी कर्मणि 'ज' प्रत्यय लागून झालेलीं रूपें आढळण्यांत नाहींत. या अर्थाचा उपयोग एका क्रियेचें होणें दुसऱ्या क्रियेवर अवलंबून आहे अशा अर्थी होतो, आणि या अर्थाच्या वाक्यांत बहुधा जर, तर, या अव्ययांचा उपयोग करावा लागतो. उदाहरणे,—'तूं मुंबईस जातास तर मीही गेलों असतों.' 'नीट अभ्यास करितास तर यंदांच परीक्षा उतरली असती.'

'नसतें तसें, तरि सुखें वय भोगुनि तदधिक श्रम हि नेती.' —मोरो०

[ क० २१३ (८) पाहा. ]

**टीप**—या अर्थाच्या रूपांचा उपयोग लक्षपूर्वक पाहिला असतां असें दिसून येईल कीं, आज्ञार्थाशिवाय इतर काळ आणि अर्थ यांच्या रूपांबरोबर 'जर-तर' या अव्ययांचा उपयोग केला असतां संकेताचा अर्थ उत्पन्न होतो. मात्र वर्तमानकाळाच्या रूपांबरोबर 'जर-तर' हीं अव्ययें आलीं असतां त्या काळाच्या रूपांत थोडा फरक होतो 'तूं असतोस, असतास; ते असतात, असते;' इत्यादि यामुळे ही निराळी आख्यातविभक्ति उत्पन्न झाली आहे. हिचा अर्थ भूतकाळासारखा असतो उदाहरण, 'तो जाता तर मी गेलों असतों.' म्हणजे 'तो जर गेला असता तर मीही गेलों असतों; पण ज्या अर्थी तो गेला नाहीं, त्या अर्थी मीही गेलों नाहीं.' असा अर्थ.

## (९) अनियमित धातुरूपें.

२२४. निरनिराळ्या आख्यातविभक्तींचीं रूपें कशीं होतात हें, प्रत्येक आख्यातविभक्ति सांगतांना धातु चालवून दाखविले आहेत त्यांवरून दिसून येईल. त्याप्रमाणें सर्व धातु चालतात. परंतु कांहीं धातूंचीं रूपें थोडीं अनियमित आहेत. असे धातु पुढें चालवून दाखवितोंः—

(१) 'हो' धातु, अकर्मकः—

जुना वर्तमान*

| एक प्रकार | | दुसरा प्रकार | |
|---|---|---|---|
| मी होई | आम्ही होऊं, होवों, होओं | मी होय | आम्ही होय |

* क्रियापदरूपें लिंगांप्रमाणें कोठें फिरतात, हें मागें सांगितलेलेंच आहे. पुढें धातुरूपें दिलीं आहेत, यामध्यें लिंगाप्रमाणें फिरणाऱ्या काळाचीं फक्त पुल्लिंगी रूपें दिलीं आहेत. अन्य लिंगांचीं रूपें त्यांवरून सहज कळण्यासारखीं असल्यामुळें तीं सर्वत्र देण्याची गरज नाहीं.

| | | | |
|---|---|---|---|
| तूं होशी, होसी | तुम्ही व्हा | तूं होस | तुम्ही व्हा |
| तो* होई | ते* होती | तो होय | ते होत |

| चालू वर्तमान. | | रीतिभूत | |
|---|---|---|---|
| मी होतों | आम्ही होतों | मी होई | आम्ही होऊं |
| तूं होतोस | तुम्ही होतां | तूं होस, होईस | तुम्ही व्हा |
| तो होतो | ते होतात | तो होई | ते होत, होईत |

भूतकाळ.

| एक प्रकार. | | दुसरा प्रकार. | |
|---|---|---|---|
| मी होतों | आम्ही होतों | मी झालों | आम्ही झालों |
| तूं होतास | तुम्ही होतां | तूं झालास | तुम्ही झालां |
| तो होता | ते होते | तो झाला | ते झाले |

| आज्ञार्थ | | भविष्यकाळ | |
|---|---|---|---|
| मी होऊं | आम्ही होऊं | मी होईन | आम्ही होऊं |
| तूं हो | तम्ही व्हा | तूं होशील होसील | तुम्ही व्हाल |
| तो होवो होओ होऊ | ते होवोत होओत होऊत | तो होईल | ते होतील |

| विध्यर्थ. | | संकेतार्थ. | |
|---|---|---|---|
| मी व्हावा † | आम्ही व्हावे, व्हावों | मी होतों | आम्ही होतों |
| तूं व्हावास | तुम्ही व्हावें, व्हावेत | तूं होतास | तुम्ही होतां |
| तो व्हावा | ते व्हावे, व्हावेत | तो होता | ते होते |

( २ ) ‘ अस ’ धातु, अकर्मकः—

| जुना वर्तमान | | चालू वर्तमान. | |
|---|---|---|---|
| मी असें | आम्ही असूं, असों | मी असतों | आम्ही असतों |

* येथें तो, ती, तें, आणि ते, त्या, तीं, असें समजावें.

† व्हावे, व्हावेत, व्हाल, इत्यादि ठिकाणीं होवावे, होआवे; होआ, होवा; होवाल, होआल; इत्यादि रूपें कवितेंत व चालू भाषेंत बोलण्यामध्यें उपयोगांत आहेत.

| | | | |
|---|---|---|---|
| तूं असशी | तुम्ही असां | तूं असतोस | तुम्ही असतां |
| तो असे | ते असती | तो असतो | ते असतात |

रीतिभूत.

| | |
|---|---|
| मी असें | आम्ही असों |
| तूं असस | तुम्ही असां |
| तो असे | ते असत |

चालू भूतकाळ.

टीप—या काळच्या 'अस' धातुच्या रूपांचा उपयोग नाहीं. त्यांबद्दल 'हो' धातूच्या भूतकाळाच्या रूपांचा उपयोग होत असतो.

भविष्यकाळ.

| | |
|---|---|
| मी असेन | आम्ही असूं |
| तूं असशील | तुम्ही असाल |
| तो असेल | ते असतील |

आज्ञार्थ.

| | |
|---|---|
| मी असूं | आम्ही असूं |
| तूं अस | तुम्ही असा |
| तो असो, असू | ते असोत, असूत |

विध्यर्थ.

| | |
|---|---|
| मी असावा | आम्ही असावे |
| तूं असावास | तुम्ही असावेत |
| तो असावा | ते असावेत |

संकेतार्थ.

| | |
|---|---|
| मी असतों | आम्ही असतों |
| तूं असतास | तुम्ही असतां |
| तो असता | ते असते |

(३) 'आहे' धातु—मराठींत 'आहे' असा एक धातु आहे. हा 'अस' धातूपासून प्रत्यक्ष झालेला नाहीं. तर संस्कृतांतलि 'अस्' धातूचें वर्तमानकाळाचें तृतीयपुरुषाचें एकवचनी रूप जें 'अस्ति' त्यावरून हा झाला आहे. 'अस्ति' याचीं आत्थि, आत्थि, अथि, आथि, आहि, अशीं रूपें प्राकृतांत आणि जुन्या मराठींत आढळतात. त्याचें 'आहे' असें होऊन मग त्याचीं तिन्ही पुरुषीं आणि उभयवचनीं रूपें होऊं लागलीं. जुन्या रूपांचीं उदाहरणें:—

'तैसा घेतला प्रसंगू। जिये ज्ञानी आम्ही लागूं,
आणि तुझा अनुरागू। अर्थी येथें.'
'स्पर्शासि तरी जाणें। परिमळ सेवी घ्राणें,
अवसरोचित बोलणें। तयाहि आथि.'
'जयांतें बाह्याचे भाष। नेणिजेची निःशेष,
अंतरीं सुख। एक आथि.'

या धातूचीं रूपें फक्त वर्तमानकाळीं होतात. त्यांना लिंगभेद नाहीं. तीं रूपें अशीं:—

| | |
|---|---|
| मी आहें | आम्ही आहों, आहोंत |
| तूं आहेस, आहेशी | तुम्हीं आहां, आहांत |
| तो इ० आहे | ते इ० आहेत, आहेती |

(४) 'नाहीं' धातु—या 'आहि' धातूच्या अगोदर 'न' लागून 'नाहीं' असा नकारार्थक अथवा अकरणरूपी धातु होतो. हाही केवळ वर्तमानकाळीं चालतो. तो असा:—

| | |
|---|---|
| मी नाहीं | आम्ही नाहीं |
| तूं नाहींस | तुम्ही नाहीं |
| तो नाहीं | ते नाहींत |

या रूपांना लिंगभेद नाहीं. या रूपांमध्यें 'ही' यावर सर्वत्र अनुस्वार देतात. हा अनुस्वार प्रथमपुरुषीं युक्त दिसतो. इतरत्र अनुस्वारांचें कारण दिसत नाहीं.

(५) 'नहो'—'हो' याच्या मागें 'न' येऊन 'नहो' असा नकारार्थक धातु होतो. याचीं जुन्या वर्तमानकाळाचीं आणि भूतकाळाचीं मात्र रूपें आहेत. तीं अशीं:—

| वर्तमान | | भूतकाळ | |
|---|---|---|---|
| मी नव्हें, नवें | आम्ही नहों, नव्हों नवों | मी नव्हतों, नवतों | आम्ही नव्हतों, नवतों |
| तूं नव्हेस, नव्हस, नवस | तुम्ही नव्हां, नवां | तूं नव्हतास, नवतास | तुम्ही नव्हतां, नवतां |
| तो इ० नव्हे, नवे | ते नव्हेत, नवत | तो नव्हता, नवता | ते नव्हते, नवते |

यांतील वर्तमानकाळाच्या रूपांना लिंगभेद नाहीं. नव्हें, नव्हों, हीं रूपें अशीं होतात:—न+होई किंवा होएँ=न होएँ=नव्हें. न+होतों=नव्हतों. होतों, होतास याचा उच्चार साधारण लोक बोलतांना व्हतों, व्हतास, असा करितात हें आपल्यास माहीत आहेच.

( ६ ) 'नाहीं' 'नाहींत' आणि 'नव्हे' 'नहो' यांबदला कवितेंत 'नोहे' असें रूप येतें. उदाहरणें:-

'ना तरी इक्षुदंडु। पाळी तयासची गोडु,
गाळी तया कडु। नोहेचि जेवीं.' —ज्ञानेश्वर

'बलवीर्यादि गुणांही भिन्नाचि मी, उग्रसेनसुत नोहें.'

'निर्मळ, पुष्कळ, केवळ अमृतरसाचे नवे नवे पोहे,
नोहे हे स्वल्प सख्या, मज विश्वात्म्याहि फार साधो हे.' —मोरो.

( ७ ) 'हो' या धातूचीं 'होतों,' 'होतास,' 'होते,' इत्यादि रूपें हीं संकेतार्थाचीं रूपें आहेत. परंतु सांप्रत त्यांचा उपयोग भूतकाळीं होतो. तसेंच 'अस' धातूचीं भूतकाळाचीं 'ल' प्रत्यय लागून झालेलीं रूपें याचा उपयोग संकेतार्थी होतो. तीं रूपें अशीं:—

पुल्लिंगी

| | | | |
|---|---|---|---|
| मी | असलों | आम्ही | असलों |
| तूं | असलास | तुम्ही | असलां, असलांत, असलेत |
| तो | असला | ते | असले |

हा दोन्ही प्रकारचा बदललेला उपयोग लक्षांत घेण्यासारखा आहे.

( ८ ) 'आहे' आणि 'असतो'— 'आहे' आणि 'असतो' यांच्या अर्थांतील भेद असा आहे कीं, 'आहे' यावरून केवळ अस्तित्वाचा बोध होतो; परंतु 'असतो' यापासून सातत्याचा म्हणजे सतत, नेहमीं, पुष्कळ वेळ, असा बोध होतो. उदाहरण, 'रामा देवळांत आहे.' म्हणजे या वेळीं आहे. पण 'रामा देवळांत असतो' म्हणजे पुष्कळदां, नेहमीं किंवा वारंवार असतो असा अर्थ होतो. असाच 'नाहीं' आणि नसतो' या रूपांतील अर्थाचा फरक आहे. कवितेंत मात्र हा फरक नेहमीं आढळून येत नाहीं.

( ९ ) 'न' हें अव्यय 'अस' धातूच्या अगोदर येऊन 'नस' असा धातु होतो. याचीं सर्व प्रकारचीं रूपें 'अस' धातूच्या रूपांप्रमाणें करावीं. जसें,—मी नसतों ( वर्त० ), मी नसलों ( भूत ), तो नसेल ( भविष्य ), तूं नस ( आज्ञार्थ ), इत्यादि.

( १० ) नको—संस्कृत अव्यये 'खलु' यामागें 'न' येऊन 'नखलु'

असें होतें. प्राकृतांत 'नख्खु' असें रूप होतें. त्यावरून मराठींत 'नको' असा धातु झाला आहे. हा धातु म्हणजे मूळचा अव्ययरूपी आहे. 'नको' असा अव्यय–शब्द हिंदींत असून त्या भाषेंत त्याचा उपयोग अगदीं मराठींतल्याप्रमाणेंच होतो. उदा०—'नको हो दिवाना.' याचीं फक्त वर्तमानकाळाचीं रूपें आहेत. तीं अशीं:—

| | |
|---|---|
| मी नको | आम्ही नको |
| तूं नकोस | तुम्ही नको, नका |
| तो नको | ते नकोत |

या रूपांना लिंगभेद नाहीं. 'नको' याचा उपयोग विशेषणासारखाही होतो. उदाहरण—'तो मला नको आहे.' 'तें पुस्तक मला तूर्तच नको होतें, मग कशाला विकत आणलेंस?' 'मला इतकें नको, थोडें पाहिजे (आहे).'

(११) **पाहिजे**—संस्कृतांतील 'दृश्' धातूला 'पश्य' असा आदेश होतो. त्याचें प्राकृतांत 'पस्स' आणि मराठींत 'पाह' होतें. या पाह धातूचें कर्मणि 'ज' लागून पाहिजे' असें वर्तमानकाळाचें तृतीयपुरुषी एकवचनी रूप होतें. यालाच द्वितीयपुरुषी एकवचनी आणि तृतीयपुरुषी अनेकवचनी प्रत्यय लागून रूपें होतात, आणि यामुळें त्याचीं वर्तमानकाळाचीं सर्व रूपें अशीं होतात:—

| | | | |
|---|---|---|---|
| मी | पाहिजे | आम्ही | पाहिजे, पाहिजेत |
| तूं | पाहिजेस | तुम्ही | पाहिजेत |
| तो इ० | पाहिजे | ते इ० | पाहिजेत |

अशा प्रकारें हा 'पाहिजे' धातु झाला आहे. याचा अर्थ 'हवें आहे, त्याची जरूर आहे,' असा असतो. याला मग कर्मणित्व राहिलें नाहीं, आणि याचीं फक्त एवढींच रूपें होतात. 'पाहिजे' याचा 'नको' याप्रमाणेंच विशेषणासारखाही उपयोग होतो. उदाहरण, 'तें पुस्तक मला पाहिजे आहे. इत्यादि.

(१२) **व्हावा, हवा**—हीं मूळचीं 'हो' धातूचीं विध्यर्थक विशेषणें' आहेत. यांना प्रत्यय लागून क्रियापदरूपें होतात. हीं वस्तुतः मूळचीं विध्यर्थाचीं रूपें होत:—

पुल्लिंगी

| | | | |
|---|---|---|---|
| मी | व्हावों, हवों | आम्ही | व्हावों, हवों |
| तूं | व्हावास, हवास | तुम्ही | व्हावां, व्हावे, व्हावेत, हवां, हवे, हवेत |
| तो | व्हावा, हवा | ते | व्हावे, व्हावेत, हवे, हवेत |

( १३ ) **'जा'** धातु–हा धातु संस्कृत 'या' यापासून झाला आहे. याचीं इतर काळांचीं रूपें यथानियम होऊन भूतकाळाचीं रूपें गेलों, गेला, गेले, अशीं होतात. हे **'ग'** असें सामान्यरूप संस्कृत 'गम्' धातूवरून झालें.

( १४ ) **नलग**—'लाग' या धातूच्या अगोदर 'न' येऊन हा धातु होतो. याचीं फक्त वर्तमानकाळाचीं तिन्ही लिंगी रूपें होतात. तीं अशीं:—

| | | | |
|---|---|---|---|
| मी | नलगें | आम्ही | नलगों |
| तूं | नलगस, नलगेस | तुम्ही | नलगेत |
| तो इ० | नलगे | ते इ० | नलगत, नलगेत |

( १५ ) **नये**—हा धातु म्हणजे न+ये, असा होय. याचीं फक्त तृतीयपुरुषाचीं रूपें 'करूं, देऊं, बोलूं,' 'येतां, करिता,' या ऊकारान्त व आकारान्त कृदन्तांपुढें येऊन कर्मणि अर्थाचीं वाक्यें होतात. जसें—'मी करूं नये.' 'त्यानें बोलूं नये.' 'त्यांनीं जातां नये.' इत्यादि.

## ( ७ ) साधित धातु.

२२५. आतांपर्यंतचें विवरण मूळचे किंवा सिद्ध धातु यांच्यासंबंधानें झालें. मूळच्या धातूंमध्यें फेरफार होऊन साधित धातु होत असतात. त्याचप्रमाणें नामें, विशेषणें यांपासूनही साधित धातु होतात. त्यांविषयीं आतां सांगतों.

२२६. साधित धातु दोन प्रकारचे होतातः—( १ ) **प्रयोजक धातु** आणि ( २ ) **नामधातु**. यासंबंधानें मूळच्या धातूस **मूलधातु** असें म्हणावें.

( अ ) मूळ धातूस प्रत्यय लागून किंवा त्याच्या मूळच्या रूपात कांहीं फरक होऊन 'क्रिया करविणें' अशा अर्थाचे धातु होतात. यांना **प्रयोजक धातु** असें म्हणतात. जसें,–करणें, करविणें; जाणें, जाववणें; मरणें, मारणें; तुटणें, तोडणें; फुटणें, फोडणें; इत्यादि. या धातूंच्या रूपांची कवितेंतील उदाहरणें:—

'मजकरवीं न तुम्ही बध गुरुमर्यादातिपात **करवा हो**.'

'मथुरापुरी पहाल, स्वजनांचा सर्व ताप **शमवाल**,

**भ्रमवाल** शत्रुचित्त, **श्रमवाल** न बाहु, साधु **रमवाल**.' —मोरो०.

'ऐसें अर्जुन अनुवादोन । **विझविला** संतापहुताशन,

क्षमा धरोनी भीमसेन । स्वस्थानीं **बैसाविला**.' —मुक्तेश्वर.

**टीप**—हे धातु प्रत्यय लागून होतात, तेव्हां 'क्रिया करविणें' असा स्पष्ट अर्थ असतो; आणि मूळ धातूच्या रूपांत थोडा बदल होऊन होतात, तेव्हां त्यांचा मूळचा अकर्मक अर्थ असतो तो बदलून सकर्मक अर्थ होतो; जसें,— **मरणें**–अक०, **मारणें**–सकर्मक; फुटणें–अक०, फोडणें–सकर्मक; इत्यादि.

(आ) नामें व विशेषणें यांना प्रत्यय लागून धातु होतात; अथवा त्यांना प्रत्यय न लागतांही त्यांचा धातूंसारखा उपयोग आणि अर्थ होतो. उदा०— **हात, हाताळणें; मंद, मंदावणें;** फंस, फंसाळणें; लांब, लांबणें; फुल, फुलणें; हर्ष, हर्षणें; आनंद, आनंदणें. याचप्रमाणें उत्तरणें (उत्तर देणें), उद्धारणें, प्रमाणणें, उपयोगिणें, आमंत्रणें (जुनें रूप आंवतणें), संतोषिणें (संतोष करणें), अलंकारणें, सत्कारणें, मानणें, संकोचणें, लाजणें, इत्यादि. हे **नामधातु** होत.

(इ) नामधातु तयार झाला म्हणजे तो इतर कोणत्याही धातूप्रमाणें चालवितां येईल, आणि त्याचीं सर्व आख्यातविभक्तींचीं रूपें होतील.

## प्रयोजक धातु.

२२७. प्रयोजक धातु नेहमीं सकर्मक असतात. ते अकर्मक धातूंवरून झाले असतांही सकर्मकच होतात. जसें,—'मूल निजतें'–'आई मुलास निजवितें.' 'तो बसतो–' 'सुतार खिळा बसवितो.' इत्यादि.

२२८. प्रयोजक धातु पुढें सांगितल्याप्रमाणें करितातः–

(१) मूळ धातूस 'व' प्रत्यय लागून प्रयोजक धातु होतो. जसें,–कर, करव; बोल, बोलव; सांग, सांगव; ऊठ, उठव; संप, संपव; इत्यादि.

(२) संस्कृतांत प्रयोजक प्रत्यय 'अय्' असा आहे. जसें,—गम्, गमयति; कृ, कारयति; मुच्, मोचयति; इत्यादि. हा 'अय्' प्रत्यय विशेषतः आकारान्त धातूंच्या संबंधानें 'प' असा होतो. उदाहरणें,—ज्ञापयति,

स्थापयति, यापयति, इत्यादि. या ‘ प ’ पासून मराठी प्रयोजक प्रत्यय ‘ व ’ हा झाला आहे. मराठींत ‘प’चा ‘व’ झाल्याचीं उदाहरणें पुष्कळ आहेत. जसें,– दीप, दिवा; मंडप, मांडव; ताप, ताव; पश्चात्ताप, पस्तावा; बाप, बावा; इ०.

टीप—कोंकणी भाषेंत ‘अय’ किंवा ‘य’ प्रत्यय आहे. जसें,–‘ करायलों. ’

( ३ ) ‘ व ’ याच्यापूर्वी धातूंना ‘ ई ’ आगम होतो, व तो विकल्पें ह्रस्वही होतो. त्याचप्रमाणें ‘ व ’ लागून प्रयोजक धातु तयार झाल्यावर त्यासही ‘ई’ आगम विकल्पेंकरून होतो. कोणत्याही धातूस ‘ई’ आगम लागण्याच्या संबंधाचे मागें सांगितलेले नियम येथें लक्षांत घेतले पाहिजेत. अशा रितीनें ‘ कर ’ धातूचें वर्तमानकाळीं, तृतीयपुरुषी, पुलिंगी एकवचनाचें रूप निरनिराळ्या प्रकारचें होईल. तें असेंः—करवतो, करिवतो, करीवतो, करावितो, करिवितो, करीवितो, इत्यादि.

( अ ) हा आगम स्वरादि प्रत्ययांमागें होत नाहीं, म्हणून तसा प्रत्यय असतां एकच रूप होईल. जसें,–बस+ईल=बसवील, करवील, जाववील, इ०.

( ४ ) फीत, नीभ इत्यादि कित्येक धातूंच्या अन्त्य अच्या पूर्वी विकल्पें आ होतो. जसें,–फितणे, फितविणे, फिताविणें; निभणें, निभविणें, निभाविणें; इत्यादि. तेव्हां नीभ याचीं रूपें व्यंजनादि प्रत्यय असतां निभवतो, निभिवतो, निभवितो, निभिवितो, निभावतो, निभावितो, अशीं होतील, व स्वरादि प्रत्यय असतां निभवील, निभावील, अशीं होतील.

( ५ ) अशा प्रकारें खुळखुळ, गटगट, मटमट, वगैरे अनुकरणवाचक धातूंच्या अचा आ नेहमींच होतो. जसें,—खुळखुळावणें, गटगटावणें, मटमटावणें, इत्यादि.

( ६ ) कांहीं धातूंच्या उपान्त्यांतलि दीर्घ ई, ऊ, यांना गुण होऊन प्रयोजक धातु होतात, तेव्हां धातूच्या शेवटीं ‘ ट ’ असल्यास त्याचा ‘ ड ’ होतो; व ‘ त ’ आणि ‘ म ’ यांचा ‘ व ’ होतो. जसें,–जूट, जोडतो; फीट, फेडतो; गूत, गोवतो; गूंत, गोंवतों; फूट, फोडतो; सूट, सोडतो; खूप, खोवतो; लाग, लावतो; रूप, रोवतो; इत्यादि.

( ७ ) कांहीं धातूंच्या उपान्त्य अला वृद्धि होऊन प्रयोजक धातु होतात. यांतही शेवटीं ‘ ट ’ असल्यास त्याचा ‘ ड ’ होतो. जसें,–गळ, गाळतो;

मर, मारतो; चर, चारतो; वळ, वाळतो; पड, पाडतो; गट, गाडतो; दब, दाबतो; टळ, टाळतो; इत्यादि.

( ८ ) कलम ६ आणि ७ यांत सांगितलेलीं रूपें मूळचीं प्रयोजक होत. पण आतां तीं केवळ अकर्मक धातूंचीं सकर्मक रूपें अशीं मानितात. आणि त्यांवरून आणखी 'व' लागून प्रयोजक धातु होतात. जसें,—फेडवणें, सोडवणें, मारवणें, दाबवणें, इत्यादि.

( ९ ) एकाक्षरी धातूंना 'व' दोनदां लागतो. हकारान्त धातूंना विकल्पें दोनदां 'व' लागतो; परंतु 'पोह' यास एकदांच लागतो. जसें,—घेववणें, देववणें, नेववणें, पिववणें, लेववणें, लिहीवणें किंवा लिहिववणें, पाहवणे, किंवा पाहाववणें, पोहवणें, इत्यादि.

( १० ) कांहीं धातूंचीं अनियमित प्रयोजक रूपें होतात. जसें,—पी, पाजतो; ये, येववतो, आणतो; भी, भेवडावतो; देख, दाखवितो; इत्यादि.

( ११ ) कांहीं प्रयोजक धातु उपयोगांत आहेत, परंतु त्यांचे मूळचे धातु उपयोगांत नाहींत. जसें,—ठेवणे, पाठविणें, बडाविणें. धाडणें, कालविणें, काढणें, उठाविणें, दावणें, लोटणें, इत्यादि. 'ठे' या धातूचें मूळ रूप कवितेंत आढळतें. जसें,—

'राजकुमार धरोनि हातीं। उभी ठेली संमुख.' —मुक्तेश्वर.
'क्षणभरि उभेचि कौरव, पांडव ससहाय चित्रसे ठेले.' —मोरोपंत.

( १२ ) 'मावणें' आणि 'सोकावणें' हे धातु प्रयोजकसे वाटतात; परंतु त्यांचा उपयोग त्यांचे आद्य धातु 'माणें' आणि 'सोकणें' यांप्रमाणेंच होतो. जसें,—'या भांड्यांत शेरभर दूध मातें किंवा मावतें.' 'मुलगी माहेरीं राहाण्यास सोकली किंवा सोकावली आहे.' इत्यादि.

२२९. प्रयोजक धातूंच्या काळांचीं रूपें मूळ धातूंप्रमाणेंच होतात. उदाहरणार्थ, 'करव' धातु. ( १ ) जुना वर्तमानकाळः—

| | | | |
|---|---|---|---|
| मी | करवीं | आम्ही | करवूं |
| तूं | करविशी | तुम्ही | करवा |
| तो इ० | करवी | ते इ० | करविती |

( २ ) चालू वर्तमान—करवितों, करवितो, करवितोस, करवित्यें, करवितात, इत्यादि.

( ३ ) भूतकाळ—करविलें, करविलीं, इत्यादि.

( ४ ) भविष्यकाळ—करवील, करवीन, इत्यादि.

२३०. येथें लक्षांत ठेवावें कीं, मूळ धातूला आणि 'व' यासही ई आगम होतो, आणि तो विकल्पेंही होतो, यामुळें अनेक रूपें होतात. 'लिही' धातूचीं व्यंजनादि प्रत्यय लागून झालेली प्रयोजक रूपें करावयाचीं आहेत असें समजा. तर या धातूला 'व' प्रत्यय विकल्पेंकरून दुहेरी लागेल. यामुळें या धातूची' चालू वर्तमानकाळीं पुल्लिंगी, तृतीयपुरुषीं एकवचनी अशीं रूपें होतील;–

| | | | |
|---|---|---|---|
| लिह्वतो | लिह्ववतो | लिह्वीवतो | लिह्ववितो |
| लिहिवतो | लिहिववतो | लिहीविवितो | लिहीविवितो |
| लिहीवितो | लिहीववतो | लिहीवीवितो | लिह्वीवतो |
| लिहिवितो | लिह्विवतो | लिहिविवतो | लिहीविवतो |
| लिह्वितो | लिहिविवितो | लिहिविवितो | लिह्विवितो |
| लिहीवितो | लिहीविवितो | लिहिवींवतो | लिहिवीवितो |

( अ ) स्वरादि प्रत्यय असतां पुढें सांगितलेलीं एवढींच रूपें होतीलः—लिह्वील, लिहिवील, लिहीवील, लिह्ववील, लिहिववील, लिहीववील, लिहिविवलि आणि लिह्वीवील.

२३१. **शक्य धातु**—मूळधातु सकर्मक असून, त्याचा प्रयोजक करून अकर्मक उपयोग केला असतां, अथवा मूळ अकर्मक धातूचा प्रयोजक, भावी उपयोग केला असतां क्रियापदानें दाखविलेली क्रिया शक्तीचा विषय आहे, असा अर्थ उत्पन्न होतो. या क्रियापदरूपांना शक्य क्रियापदें असें म्हणतात. उदा०—' मी काम करवितों. '–प्रयोजक. ' माझ्यानें काम करवतें. '–शक्य. ' मी जाववितों. '–प्रयोजक. ' माझ्यानें जाववतें. '–शक्य.

**टीप**—वास्तविक पाहतां ही केवळ प्रयोजक क्रियापदांच्या उपयोगाची तऱ्हा आहे; हीं निराळ्या प्रकारची क्रियापदें नव्हत. प्रयोजक धातु सकर्मक असतात; परंतु त्यांचा अकर्मक उपयोग केला असतां त्यांना शक्य क्रियापदें म्हणावें.

२३२. शक्य धातु अकर्मक होतात, म्हणून त्यांमध्यें कोठेंहीं ‘ ई ’ आगम होत नाहीं. जसें,–मी करवितों. ’ ‘ माझ्यानें करवतें. ’ इत्यादि.

२३३. मूळधातु सकर्मक असल्यास, त्यावरून होणारें शक्य रूप कर्मणि आहे असें मानतात, कारण तें दिसण्यांत तसें असतें. जसें,–‘ मी काम करवितों. ’ याचें कर्मणि, ‘म्यां काम करविलें. ’ असें होईल. परंतु ‘ माझ्यानें काम करवतें, ’ हें जरी दिसण्यांत कर्मणि दिसतें, तरी वास्तविक हा अकर्मक उपयोग आहे. येथें ‘ माझ्यानें ’ म्हणजे ‘ माझ्या शक्तीच्या साह्यानें ’ असा करणी उपयोग झाला. मूळधातु अकर्मक असल्यास शक्य रूप भावी असतें, हें उघडच आहे. जसें,–‘ मी जातों. ’ ‘ मी जाववितों. ’–प्रयोजक ‘ माझ्यानें जाववतें. ’–भावी, शक्य.

२३४. मूळ धातूंवरून भूतकाळ आणि विध्यर्थ यांमध्येंच केवळ भावी रूपें होतात, असें मागें सांगितलें आहे. परंतु प्रयोजक धातूंवरून सर्वकाळीं भावी रूपें होतात. उदाहरणेः–

वर्तमानकाळ—मी काम करवितों.–कर्तरि.
माझ्यानें काम करवतें.–भावी.
भविष्यकाळ—मी काम करवीन.–कर्तरि.
माझ्यानें काम करवेल.–भावी.
रीतिभूत—मी काम करवीं.—कर्तरि.
माझ्यानें काम करवे.–भावी.
संकेतार्थ—जर मी काम करवितों.–कर्तरि.
जर माझ्यानें काम करवतें.–भावी.
तसेंच,––मी जाववितों, जाववीन. ( कर्तरि ).
माझ्यानें जाववतें, जाववेल. ( भावी ).

## ( ८ ) कृदन्तें किंवा धातुसाधित शब्द.

२३५. मागें दोन प्रकारचे क्रियाशब्द–क्रियापदें आणि कृदन्तें असे—सांगितले आहेत. त्यांपैकीं कृदन्तें अथवा धातुसाधित शब्द यांचा विचार आतां करावयाचा. धातूवरून नामें, विशेषणें आणि अव्ययें होतात, यांना **कृदन्तें किंवा धातुसाधित शब्द** असें म्हणतात.

२३६. हे धातुसाधित शब्द पुढें लिहिल्याप्रमाणें आहेतः—

( १ ) **धातुसाधित नाम**—हें धातूला ' णें ' प्रत्यय लागून होतें; जसें,—करणें, बोलणें, चालणें, बसणें, उठणें, निजणें, लिहिणें, जाणें, येणें, इ०.

( २ ) हा ' णें ' प्रत्यय संस्कृत धातुसाधित नामाचा प्रत्यय जो ' अन ' त्याच्या अचा संधि होतांना लोप होऊन, ' न ' चा ' ण ' होऊन, आणि नंतर मराठींत नपुंसकलिंगाचा प्रत्यय एँ लागून झाला आहे. मूळचें संस्कृत 'अन-' प्रत्ययान्त धातुसाधित नाम नपुंसकलिंगीच आहे. हें कोणत्याही एँकारान्त नपुंसकलिंगी नामाप्रमाणें चालतें. याचा अर्थ धात्वर्थ-दर्शक क्रिया किंवा कृति असा असतो.

( ३ ) **वर्तमानकालवाचक धातुसाधित विशेषणें**—( अ ) हें धातूस ' त ' प्रत्यय लागून होतें. जसें,—करीत, लिहीत, वाचीत, जात, येत, बसत, उठत, जेवीत, शिकत, पढत, आचरीत, आचरत, इत्यादि. (आ) 'त' प्रत्यय लागण्याच्या पूर्वी सकर्मक धातूस 'ई' आगम होतो. (इ) हा 'ई' आगम होणें, अपवादानें न होणें, किंवा विकल्पेंकरून होणें, यासंबंधानें मागील सर्व नियम येथें लागतात, हें उघडच आहे. ( ई ) हा प्रत्यय संस्कृत वर्तमान-कालवाचक विशेषणें जीं गच्छत्, कुर्वत्, दहत्, भवत् , इत्यादि, त्यांच्या 'त्' प्रत्ययावरून झाला आहे.

( ४ ) **वर्तमानकालवाचक अव्यय**—हें धातूस ' तां ' आणि ' तांना ' हे प्रत्यय लागून होतें. जसें,—करितां, करितांना; जेवितां, जेवतां, जेवि-तांना, जेवतांना; जाता, जातांना; बोलतां, बोलतांना; लिहितां, लिहि-तांना; इत्यादि.

( ५ ) ह्या अव्ययाचे प्रत्यय ' तां ' आणि ' तांना ' हे वास्तविक वर्तमान-कालवाचक विशेषणाचा प्रत्यय जो ' त ' त्यास ' आं ' आणि ' आंना ' लागून होतात; म्हणजे तें जें विशेषण, त्याची ' आं ' प्रत्यय लागून सप्तमी होते. तेंच हें अव्यय. त्यास पुढें 'ना' असा प्रत्यय केवळ जास्त जोर येण्यासाटीं लागतो या अव्ययामध्यें प्रत्ययापूर्वी सकर्मक धातूला ' ई ' आगम होण्याची जरूर पडत नाहीं; म्हणून तो ऱ्हस्व होतो. [ क० २१३, ( १ ) ( ई ) पाहा. ] पुढील उदाहरणांवरून हें अव्यय सप्तमीचें रूप आहे हें उघड दिसून येईलः—

'**उठतां बसतां** अणु शक्ति नसे, परि आस निरंतर माजतसे.'

—वामन.

'**देतां घेतां वदतां** शमवी सत्रांत शतगुणें काय.'

'प्रसाद **करितां** नसे पळ विलंब, बापा, खेंर.' —मोरोपंत.

'प्रसाद **करितां** उणा-अधिक नाठवा हो हरी.'

'**चालतां बोलतां** धंदा **करितां** । **खातां जेवतां** सुखी **होतां**,

नाना उपभोग **भोगितां** । नाम विसरूं नये.' —रामदास.

येथें 'उठतां' म्हणजे 'उठत असतां,' 'चालतां' = चालण्याचे कामांत. 'प्रसाद करण्याचे कामीं' = प्रसाद करितां 'खातां' = खात असतां, इत्यादि. अर्थ उघडच आहे.

( ६ ) **दुसरें वर्तमानकालवाचक अव्यय**—हें धातूस 'ऊं' प्रत्यय लागून होतें. जसें,–करूं, बोलूं, चालूं, बसूं, उठूं, ठेवूं, लिहूं, वाचूं, इत्यादि. एकाक्षरी धातूस विकल्पें 'ऊं' किंवा 'वूं' प्रत्यय लागतो. जसें,—जाऊं, जावूं येऊं, येवूं; घेऊं, घेवूं; इत्यादि. याला **निमित्तवाचक** धातुसाधित अव्यय असें म्हणतात.

( ७ ) 'ऊं' ह्या प्रत्यय संस्कृतांतील कर्तुं, गन्तुं, पातुं, दातुं, इत्यादि अव्ययांच्या 'तुम्' प्रत्ययावरून झाला आहे.

**टीप**—कवितेंत 'ऊं' याचें 'ओं' असें होतें. चिंतपावनी भाषेंत '--ओं' असाच प्रत्यय आहे.

( ८ ) **भूतकालवाचक कर्तरि विशेषण**—हें कलम ( ३ ) यांतील धातुसाधित विशेषणाप्रमाणेंच होतें. परंतु तें लिंगांप्रमाणें फिरून, करिता पु०, करिती स्त्री०, करितें नपुं०, अशीं रूपें होतात. हीं रूपें वचनांप्रमाणेंही फिरतात. जसें,—करिता, करिते; करिती, करित्या; करितें, करितीं; इत्यादि. यांतील 'इ' आगम नियमाप्रमाणें ऱ्हस्व होतो. याचीं उदाहरणें,—करिता, बोलता, चालता, जाता, लिहिता, रांगता, इत्यादि.

( ९ ) ह्या 'ता' प्रत्यय संस्कृत विशेषणें जीं कर्तृ, गन्तृ, दातृ इत्यादि. त्यांतील 'तृ' प्रत्ययावरून झाला आहे असें समजतात. माझ्या मतें हें वरील ( ३ ) कलमांतील वर्तमानकालवाचक त-प्रत्ययान्त विशेषणाचेंच लिंगाप्रमाणें

फिरणारें स्वरूप आहे. त्याचाच ' झाला ' या क्रियापदाबरोबर विधिविशेषणासारखा उपयोग झाला म्हणजे त्यास भूतकाळाचा अर्थ येतो. उदाहरणार्थ, ' करिता झाला; ' ' बोलता झाला; ' ' पत्र लिहिता झाला; ' ' पाठविता झाला;' ' सांगता झाला; ' इत्यादि. इतरत्र याचा विधि-विशेषणासारखा उपयोग होत नाहीं. याचा वाच्याविशेषणासारखाही उपयोग होतो. उदाहरणें—' चालतें, बोलतें, रांगतें मूल. ' ' जळत्या घराचा पोळता वांसा. ' ' जागती ज्योत.' 'पळतें, पीक. ' इत्यादि.

( १० ) **भूतकालवाचक कर्माणि विशेषण**—हें धातूस ' ल ' प्रत्यय लागून होतें. भूतकाळाचें रूप होण्याचा ' ल ' प्रत्यय तो आणि हा प्रत्यय हे एकच आहेत. याचेंच दुसरें रूप ' लेल ' असें आहे. याला लिंगादिकांचे प्रत्यय लागतात. जसें,—केला, केली, केलें; केलेला, केलेली, केलेलें; केला, केले; केली, केल्या; केलें, केलीं; केलेले, केलेल्या, केलेलीं; इत्यादि.

( ११ ) ल-प्रत्ययान्त भूतकाळीं धातूंना जे जे फेरफार होतात, ते सर्व या प्रत्ययापूर्वी होतात. हें विशेषण अकर्मक धातूवरूनही होतें. जसें,—गेलेला, बसलेला, चाललेला, इत्यादि. तेव्हां हें उघडच कर्माणि नसतें.

( १२ ) **भूतकालवाचक अव्यय**—हें धातूला ' ऊन ' असा प्रत्यय लागून होतें. यावरून ' क्रिया केल्यानंतर ' अशा प्रकारचा अर्थ होतो. जसें,—करून, बोलून, चालून, बसून, उठून, जाऊन, येऊन, इत्यादि, एकाक्षरी धातूंमध्यें हा प्रत्यय ' वून ' असाही होतो. जसें,—जाऊन, जावून; देऊन, देवून; घेऊन, घेवून; इत्यादि.

( १३ ) हा प्रत्यय संस्कृतांत ' त्वा ' असा आहे. जसें,—कृत्वा, दत्वा, पीत्वा, इत्यादि. प्राकृतांत हा प्रत्यय ' त्वान ' आणि ' तूण ' असा आहे. जसें,-नेत्वान, घेतूण, इत्यादि. फार प्राचीन संस्कृतांत हा प्रत्यय ' त्वन् ' असा आहे. त्यावरून मराठीत ' ऊन ' हा प्रत्यय झालेला दिसतो.

**टीप**—कवितेंत हा प्रत्यय उनी, उनियां, ऊनी, ऊनियां, ओन, ओनी, ओनियां, असाही होतो. जसें,—करुनी, करुनियां, करूनी, करूनियां, करोन, करोनी, करोनियां, इत्यादि. चितपावनी भाषेंत हा प्रत्यय ' उनी ' असा आहे. जसें.—करुनी, देउनी, इत्यादि.

( १४ ) **भविष्यकालवाचक विशेषण**—हें धातूला 'णार' असा प्रत्यय लागून होतें. जसें—करणार, जाणार, येणार, बसणार, उठणार, इत्यादि ह्या विशेषणाचा उपयोग वाच्यविशेषणासारखा होतो, तेव्हां त्याला विकार होतो; आणि विधिविशेषणासारखा उपयोग होतो, तेव्हां विकार करितात किंवा करीत नाहींत. जसें–'बोलणारा मनुष्य.' 'शाळेंत जाणारी मुलगी.' 'रडणारें मूल.' 'खेळणाऱ्या मुलानें.' 'तो आज मुंबईस जाणार आहे. 'तो विद्यार्थी धडे न करणारा आहे.' इत्यादि.

( १५ ) हीं रूपें 'अन' प्रत्ययान्त कृदन्त नामाला 'आर' ( सं० 'कार' ) प्रत्यय लागून झालीं आहेत. जसें,–करण+आर=करणार. 'आर' या प्रत्ययाचा अर्थ, 'ती कृति करणारा' असा आहे. हा प्रत्यय संस्कृतांत मूळचा 'आर' असाही आहे. तेव्हां जेवण+आर=जेवणार=जेवण्याची कृति करणारा, असा अर्थ होतो. ही कृति पुढें होणार अशासारखा अर्थ असतो, म्हणून यास भविष्यकालवाचक विशेषण असें म्हणावें.

( १६ ) **विध्यर्थक विशेषण**—हें धातूला 'आव' असा प्रत्यय लागून होतें. याला लिंगादिविकार होतात. जसें,–करावा, जावा, यावी, बोलाव्या, लिहावी, पाठवावी, इत्यादि. विध्यर्थक आख्यातविभक्ति याच विशेषणावरून होते. हें कर्तव्यं, गन्तव्यं, दातव्यं, यांपासून झालें आहे.

( १७ ) हें विशेषण ये–पासून 'यावा' असें होतें. परंतु ने, घे, दे, हो, पी, ले, इत्यादि अन्य एकाक्षरी धातूंपासून होतांना त्यांचा अन्त्य स्वर जाऊन मागील व्यंजनास प्रत्यय लागतो, व तो लागताना अनियमित संधि होतो. जसें,–न्यावा, घ्यावा, द्यावा, व्हावा ( होवावा ), प्यावा, ल्यावा, इत्यादि.

२३७. हे जे धातुसाधित शब्द सांगितले यांच्यापासूनही कांहीं विशेषणें आणि अव्ययें होतातः—( १ ) 'णें' आणि 'आव' हे प्रत्यय लागून झालेलीं विशेषणें यांना 'चा' प्रत्यय लागून विशेषणें होतात, जसें,–करण्याचा, बोलण्याचें, करावयाचा, लिहावयाचें, इत्यादि. हीं विशेषणें विकार पावतात. ( २ ) याच धातुसाधितांना स, ला, तें, हे प्रत्यय लागून अव्ययें होतात. जसें,—करण्यास, करण्याला, करण्यातें; करावयास, करावयाला, करावयातें; इत्यादि.

**टीप**--'करावयाचें,' 'जावयास,' 'द्यावयाला,' यांतील 'व' गाळून हीं रूपें करायचें, जायास, द्यायला, अशींही लिहितात.

२३८. हीं जीं धातुसाधितें सांगितलीं, तीं जरी मूळचीं नामें, विशेषणें आणि अव्ययें आहेत, तरी त्यांतील विशेषणें आणि अव्ययें यांचा उपयोग नामासारखाही होतो. जसें,-'मला मुंबईस **जावयाचें** आहे.' 'आई मुलास जेवूं घालिते.' 'त्याला कानडी **बोलावयास** येतें.' यांत 'जावयाचें', 'जेवूं', 'बोलावयास' हीं कृदन्त नामें आहेत.

२३९. कृदन्तांचा उपयोग पुष्कळदां पूर्ण क्रियापदाच्या अर्थी करितात. जसें,-'मी आज जाणार' (म्हणजे जाणार आहें, जाईन). 'मी आज मुंबईस जावयाचा, पण कामामुळें राहिलों.' 'तो आज जिन्यावरून पडून मरावयाचाच, पण आयुष्य होतें म्हणून वांचला.' इत्यादि. अशा ठिकाणीं पुढें 'अस' चें रूप अध्याहृत घ्यावयाचें.

२४०. या कृदन्तापुढें अस हो, व दुसरे कित्येक धातु यांचीं पूर्ण क्रियापदरूपें येऊन संयुक्त किंवा जोड-क्रियापदें होतात. यांना कृदन्त आणि पुढलि सहायक क्रियापदरूप मिळून क्रियापद असें म्हणण्याची चाल आहे. जसें-'मी करीत आहें.' 'तो जात-असतो.' 'हरी बोलणार-होता.' 'चाकर गेला असेल.' 'तो जाऊं-लागला.' 'मला लिहावयास-येतें.' 'त्याला पत्र लिहावयाचें-आहे.' 'हें तुला कोणी करावयास-सांगितलें?' इत्यादि.

**टीप**—वरील तीन कलमांत सांगितलेले प्रकार वाक्यरचनेच्या संबंधाचे आहेत, त्यांचें ज्यास्त विवरण पुढें होईल.

---

# प्रकरण १६.

## अव्ययें.

२४१. कांहीं शब्द असे असतात कीं, त्यांना लिंगवचनविभक्त्यादिकांसंबंधानें विकार होत नाहीं. ते वाक्यांत अर्थ कमज्यास्त करण्यासाठीं उपयोगी पडतात. आणि त्यांचें मूळरूपच कायम असतें. अशा शब्दांना **अव्ययें** असें म्हणतात.

**ज्या शब्दांवरून पदार्थ, लिंग, वचन, इत्यादि कांहीं कळत नाहीं, परंतु जे वाक्यांत अर्थ कमज्यास्त करण्यासाठीं उपयोगीं पडतात, आणि जे विकारविरहित असतात, त्यांस अव्ययें असें म्हणतात.**

**टीप**—'व्यय' म्हणजे विकार. अ+व्यय म्हणजे ज्याला कांहीं विकार होत नाहीं असा शब्द. अव्ययांना विकार होत नाहीं, याचा अर्थ त्यांना लिंगादिकांचा विकार नाहीं. त्यांना प्रत्यय लागून आणखी शब्द तयार होतात.

२४२. हल्लीं ज्यांना आपण अव्ययें म्हणून म्हणतों त्यांत खरीं अथवा शुद्ध अव्ययें अशीं फारच थोडीं आहेत. त्यांतलीं बरींच प्रातिपदिकांची सविभक्तिक रूपें आहेत; परंतु आतां त्यांचा तो प्रकृति–प्रत्यय संबंध लक्षांत न आणतां त्यांना स्वतंत्र शब्दच मानितात. उदा०—खालीं, कडे, पाशीं, मागें, विषयीं, तेथें, ठायीं, इत्यादि, हीं सप्तमीचीं रूपें आहेत; पासून, वरून, खालून हीं पंचमीची आहेत; बुद्धया, जात्या, हीं तृतीयेचीं आहेत; तसेंच तस्मात् हें तत् या संस्कृत सर्वनामाचें पंचमीचें रूप आहे. या सर्व शब्दाना आतां अव्ययें मानितात. वास्तविक कोणत्याही नामाचीं प्रथमा आणि द्वितीया या विभक्तींशिवाय अन्य विभक्तींचीं रूपें ही अव्ययेंच आहेत.

( अ ) धातुशब्दावरूही अव्ययें होतात. असें,—करितां, जातां, बोलून, चालून, लिहूं, बसूं, इ०.

२४३. अव्ययें हीं वाक्यांत अनेक महत्त्वाचीं कार्यें करितात. कित्येक अव्ययें शब्दांपुढें येऊन विभक्तिप्रत्ययांचें कार्य करितात. जसें,—घरांत, घरावर, घरामध्यें, घरापासून, इ०. कित्येकांपासून वाक्यामध्यें स्थल, काल, हेतु, कारण, अनुक्रम, समुच्चय, विकल्प, संकेत, प्रकार गुण, इत्यादिकांचा बोध होतो. कित्येक अव्ययें वाक्यें आणि शब्द एकत्र जोडतात. कित्येक आनंद, दुःख, भय, शोक, इत्यादि मनोवृति दर्शवितात. जसें, वाहवा ! अरेरे ! शाबास इत्यादि. अव्ययांपासून होणाऱ्या या निरनिराळ्या कार्यांवरून त्यांचे अनेक भेद केले आहेत. त्यातील मुख्य भेद पुढें दिले आहेत.

( १ ) **शब्दयोगी** किंवा **विभक्त्यर्थक**—प्रत, लागीं, मुळें. कडून, द्वारें, कारणें, करितां, साठीं, स्तव, पासून, वर, खालीं, कडे, मध्यें, विना, शिवाय, इत्यादि,

( २ ) **स्थलवाचक**—येथें, तेथें, जेथें, कोठें, इकडे, तिकडे, जवळ, पुढें, मागें, वर, खालीं, वरतीं, खलतीं, पलीकडे, अलीकडे, भलतीकडे, आंत, बाहेर मध्यें, मधें, इत्यादि,

( ३ ) **कालवाचक**—नेहमीं, काल, आज, उद्यां, परवां, तेरवां, आतां, मग, पूर्वी, नंतर, जेव्हां, एव्हां, तेव्हां, केव्हां, कधीं, जधीं, तधीं, शेवटीं, लागलेंच, लगेच, दरसाल, यंदां, गुदस्तां, इ०.

( ४ ) **गुणवाचक** किंवा **प्रकारवाचक**—बरें, चांगलें, हळू, मोठ्यानें, सावकाश, स्पष्ट, साफ, इ०.

( ५ ) **क्रमवाचक**—प्रथमतः पाहिल्यानें, दुसऱ्यानें, इ०.

( ६ ) **संख्यावाचक** किंवा **परिमाणवाचक**—एकदां, दोनदां, पुष्कळ, बहुत, अतिशय, कमी, कमती, इ०.

( ७ ) **संशयार्थक**—कदाचित्, क्वचित्, बहुशः, बहुधा, दैवगत्या, दैववशात्, बहुतकरून, प्रायः, इ०.

( ८ ) **निश्चयार्थक**—होय, खचित, खरोखर, निःसंशय, निभ्रांत, अगदीं, मुळींच, इ०.

( ९ ) **अनुकरणवाचक**—चटकन, चटदिशीं, पटदिशीं, पटपट, चटपट, झटपट, झटझट, पटपट, भडभडां, भडाडां, इ०.

( १० ) **निषेधार्थक**—न, ना, इ०.

( ११ ) **समुच्चयार्थक**—आणि, व, आणखी, आणीक, इ०.

( १२ ) **विकल्पबोधक**—अथवा, किंवा, वा, अगर, कीं, कां, नाहीं, तर, इत्यादि.

( १३ ) **विरोधबोधक**—पण, परंतु, पेक्षां, पक्षीं, इ०.

( १४ ) **संकेतबोधक**—जर, तर, इत्यादि.

( १५ ) **विपक्षबोधक**—जरी, तरी, यद्यपि, तथापि, इ०.

( १६ ) **कारणबोधक** किंवा **हत्वर्थक**—म्हणजे, म्हणून, तर, तर मग, कीं, इत्यादि.

( १७ ) **स्वरूपबोधक**—कीं, जे, ऐसाजे, म्हणजे, म्हणून, जसें, इ०.

( १८ ) **अवधारणाबोधक**—च, ही, ना, मात्र, देखील, पण, सुद्धां, इ०.

( १९ ) **धिक्कारदर्शक**—छी, छीः, अं, छ, छित्, छत्, उंः, धिक्, इश्श्, थुत्, इ०.

( २० ) **दुःखसूचक**—अरेरे, रेरे, हायहाय, आईआई, अयाई, आईग, अगाई, अगई, इ०.

( २१ ) **आनंदबोधक**—वाहवा ! वा ! शाबास ! भले !

( २२ ) **आर्जवदर्शक**—जीसाहेब, महाराज, इ०.

( २३ ) **आश्चर्यदर्शक**—अहा ! अहाहा ! अबब ! बब ! कायहो ! धन्य ! ओहो ! इत्यादि.

( २४ ) **संबोधनार्थक**—यांस लिंग व वचन असतें. हीं खालीं लिहिल्याप्रमाणें आहेतः—

| एकवचन | अनेकवचन |
|---|---|
| पु०. रे, अरे, हे, अगा, अजी, | अहो, हो, अगा, अजी |
| स्त्री०. अगे, गे, ग, अग | |
| न०. हे, अगो | |

२४४. याप्रमाणें अव्ययांचे अनेक प्रकार होतात खरे, परंतु उपयोगावरून त्यांच्या मुख्य चार जाति मानितात. त्या अशाः—( १ ) **शब्दयोगी**, ( २ ) **क्रियाविशेषण**, ( ३ ) **उभयान्वयी**, आणि ( ४ ) **केवलप्रयोगी**.

**टीप**—हे विशेष प्रकारचे चार भेद मानण्यापासून कांहीं जास्त उपयोग होतो असें नाहीं. असे भेद इंग्लिश भाषेच्या अनुकरणावरून करण्याची चाल पडली आहे.

( १ ) जीं अव्ययें, नामें व नामवाचक शब्द यांच्यापुढें योजिलीं असतां विभक्तीचें कार्य करितात, तीं **शब्दयोगी** अव्ययें होत. उदा०—**रामीं**

या रूपाबद्दल आपल्याला रामांत ( रामा+आंत ) किंवा रामा-मध्यें असें म्हणतां येतें.

**टीप**—निरनिराळ्या विभक्ति दाखविण्याकरितां जीं निरनिराळीं शब्दयोगी अव्ययें योजितात, त्यांचा विशेष विचार पुढें कारकप्रकरणांत केला आहे.

( अ ) विभक्तिप्रत्यय लागतांना नामांचें जसें सामान्यरूप होतें तसेंच शब्दयोगी अव्ययापूर्वींही होतें. हें सामान्यरूप होतांना मागें विभक्तिविचारांत सामान्यरूप करण्याचे जे नियम सांगितले आहेत, तेच लागतात.

**टीप**—सामान्यरूप व्यंजनादि प्रत्ययांचे मागें मात्र करावें लागतें. स्वरादि प्रत्ययांमागें तें होत नाहींत. परंतु शब्दयोगी अव्ययांना हा नियम लागू नाहीं. तीं स्वरादि असलीं, तरी त्यांच्यापूर्वीं सामान्यरूप होतें. उदाहरण०—' सर्व घोड्यांत आरबी घोडा उत्तम. ' ' शंकराच्या जटेंतून गंगा निघाली. ' इत्यादि.

( आ ) ' पावेतों ' ' पर्यंत, ' व ' भर, ' यांपासून जेव्हां कालावधीचा बोध होतो, तेव्हां त्यांच्या योगानें नामांचें सामान्यरूप होत. नाहीं. उदा०— रात्रभर, दुपारपावेतों, शनिवारपर्यंत, इ०.

( इ ) ' पावेतों ' व ' पर्यंत ' हीं अकारान्त स्थलवाचक नामांपुढें आलीं असतां त्या नामांचें विकल्पेंकरून सामान्यरूप होतें. उदा०—सुरते–पावेतों, सुरतपावेतों; कोल्हापूर–पर्यंत, कोल्हापुरापर्यंत; इ०.

( ई ) परंतु ' भर ' याच्यापूर्वीं अकारान्त स्थलवाचक नामांनासुद्धां सामान्यरूप होत नाहीं. उदा०—गांवभर, शहरभर, घरभर, मैदानभर, इ०.

( उ ) कित्येक शब्दयोगी अव्ययें व क्रियाविशेषणें अर्थानें व रूपानें एक-सारखींच असतात. उदा०—वर, खालीं, पुढें, मागें, इ०. तीं ओळखण्याची रीत अशी आहे कीं, ज्या अव्ययांचा नामाशीं योग झालेला असतो, म्हणजे जीं नामांना जोडलेलीं असतात, तीं शब्दयोगी अव्ययें होत; व जीं नामांशीं संलग्न झालेलीं नसून स्वतंत्र असतात, तीं क्रियाविशेषणें आहेत असें समजावें. उदा०—' तो वर आहे. ' या वाक्यांत ' वर ' हें क्रियाविशेषण आहे; पण ' तो माडीवर आहे ' या वाक्यांत तेंच शब्दयोगी अव्यय आहे. ' तो मागें राहिला. ' यांत ' मागें ' हें क्रियाविशेषण; पण ' बापाच्यामागें त्यानें साऱ्याचें वाटोळें केलें. ' येथें ' मागें ' हें शब्दयोगी अव्यय आहे.

( ऊ ) शब्दयोगी अव्ययें विभक्तीचें काम करितात. प्रत्येक विभक्तीचीं मुख्य मुख्य शब्दयोगी अव्ययें मागें विभक्तिप्रकरणीं सांगितलीं आहेत. प्रत्यय कोणता आणि अव्यय कोणतें, यासंबंधानें मतभेद आहे. ह्याविषयीं मागें क० १५१ यामध्यें विवरण केलें आहे.

( ए ) स्थलवाचक शब्दयोगी अव्ययांस ' ऊन ' हा प्रत्यय लागून साधित शब्दयोगी अव्ययें होतात. हा प्रत्यय लावतांना शब्दयोगी अव्ययांचे शेवटीं ' ई ' किंवा ' एँ ' हे स्वर व अनुस्वार असल्यास त्यांचा लोप होतो. उदा०— वर, वरून; खालीं, खालून; मागें, मागून; पुढें, पुढून; इ०. याप्रमाणें ' देवापुढें, ' याचा अर्थ ' देवापुढील जागेंत, ' असा होतो; परंतु ' देवापुढून, ' याच अर्थ ' देवापुढें असलेल्या जागेपासून, ' असा होतो.

( ऐ ) पासून, पावेतों, व पर्यंत हीं शब्दयोगी अव्ययें स्थलवाचक व कालवाचक क्रियाविशेषणांना लागतात; व तीं लागतांना त्या क्रियाविशेषणांना नामांप्रमाणें अर्थ येतो; म्हणजे त्यावरून विशिष्ट स्थळ व काळ यांचा बोध होतो. हीं शब्दयोगी अव्ययें लावतांना क्रियाविशेषणांचे शेवटीं ' ई ' किंवा ' एँ ' असल्यास त्याचे जागीं ' अ ' होतो. उदा०—तेथपर्यंत, खालपासून येथपावेतों, कालपासून, तेव्हांपासून, आजपावेतों, उद्यांपर्यंत, इ०.

**टीप**—तेथपासून=तेथलें जें स्थळ, त्यापासून; कालपर्यंत=काल हा जो विवक्षित दिवस, त्यापर्यंत; वरपर्यंत=वरची जी जागा, तीपर्यंत; इत्यादि, अशा रितीनें मूळच्या क्रियाविशेषण अव्ययांना स्थल-दर्शक आणि काल-दर्शक नामांचा अर्थ आला, हें लक्षांत येईलच.

( ओ ) कित्येक स्थलवाचक शब्दयोगी अव्ययांस चा, ची, चें, ला, ईल, इत्यादि प्रत्यय लागून विशेषणें होतात; या विशेषणांचे योगानेंही शब्दयोगी अव्ययांप्रमाणें नामांचें सामान्यरूप होतें; व एकंदर शब्द साधित विशेषणें होतात. उदा०—घराखालचा, देवापुढला, घराखालील, झाडावरील, घरापुढचें आंगण, देवापुढचा–पुढला–पुढील पैसा, इ०. चा, ची, चें, व ला, हे प्रत्यय लागतांना शब्दयोगी अव्ययांचे शेवटीं ' ई ' किंवा ' एँ ' हा स्वर असल्यास त्याचे जागीं ' अ ' होतो; व ' ईल ' प्रत्यय लागतांना पररूपसंधि होतो.

**टीप**—येथें वास्तविक पाहिलें तर नाम आणि शब्दयोगी मिळून एक शब्द झाल्यानंतर मग 'चा' वगैरे प्रत्यय लागतात. शब्दयोगी अव्ययांचे स्थलवाचक, कालवाचक, असे अर्थावरून पोटभेद करितां येतील. परंतु तसे भेद करण्याचें विशेष कारण दिसत नाहीं.

( २ ) ज्या अव्ययांचा वाक्यांत केवळ क्रियापदाकडेच संबंध असतो, व जीं क्रियेच्या संबंधानें काळ, स्थळ, रीत, इत्यादि दाखवितात, तीं **क्रियाविशेषण अव्ययें** होत. जसें,—वर, खालीं, पुढें, मागें, उंच, फार, उद्यां, खचित, निःसंशय, बहुधा, बहुतकरून, कदाचित्, क्वचित् इ०.

**टीप १**—या प्रकरणाचे आरंभीं अव्ययांचे जे सामान्य भेद दिले आहेत, त्यांतील दोनपासून दहापर्यंतचे विभाग क्रियाविशेषणांचे आहेत.

**टीप २**—कधीं कधीं क्रियाविशेषणांचा संबंध क्रियेकडे नसून विशेषणाकडे किंवा एकाद्या क्रियाविशेषणाकडे असतो. अशा ठिकाणीं तीं नुसतीं विशेषणें मानावीं हें बरें. उदा०—' आज पुष्कळ गार हवा आहे. ' ' तो अतिशय हळू-हळू चालतो. ' ' तूं फार लवकर जातोस. ' यांत पहिल्या वाक्यांत ' पुष्कळ ' याचा संबंध ' गार ' या विशेषणाकडे आहे; व दुसऱ्या व तिसऱ्या वाक्यांतील ' अतिशय ' व ' फार ' यांचा संबंध अनुक्रमें ' हळूहळू ' व लवकर' या क्रियाविशेषणांशीं आहे. तेव्हां ' पुष्कळ, ' ' अतिशय ' व ' फार ' हीं अनुक्रमें 'गार,' ' हळूहळू ' व ' लवकर ' यांचीं विशेषणें मानावीं.

**टीप ३**—क्रियाविशेषण ( विधिविशेषण ) आणि क्रियाविशेषण अव्यय यांमधील भेद विद्यार्थ्यांनीं नीट लक्षांत ठेवावा. क्रियाविशेषण ( विधिविशेषण) हें विशेषण असून त्याचा संबंध नाम व क्रियापद या दोहोंकडे सारखाच असतो; परंतु क्रियाविशेषण अव्ययाचा संबंध केवळ क्रियेकडेच असतो. उदा०—'खेंकडे उलटे चालतात. ' या वाक्यांत ' उलटे ' हें क्रियाविशेषण आहे. परंतु ' तो तिकडे गेला. ' ' मी पुढें चाललों. ' या वाक्यांत ' तिकडे ' व ' पुढें ' हीं क्रियाविशेषण अव्ययें आहेत.

( अ ) स्थलवाचक व कालवाचक क्रियाविशेषण अव्ययांस शब्दयोगी अव्ययांप्रमाणें चा, ची, चें, ला, ली, लें व ईल हे प्रत्यय लागून विशेषणें होतात. हे प्रत्यय लागतांना अव्ययांचा अंत्य स्वर जर ' ई ' ' ए ' किंवा

'एँ' असेल, तर त्याच्या जागीं 'अ' होतो. 'अ' झाल्यानंतर 'ईल' लागतांना पररूपसंधि होतो. जसें,-कालचा, मागील, परवांचा, खालला, वरील, इकडचा, तिकडला, इकडील, तिकडील, कोठचा, कोठला, कोठील, तेथील, इ०.

( ३ ) जीं अव्ययें दोन शब्द अथवा दोन वाक्यें यांचा अन्वय अथवा संबंध जोडतात, त्यांस **उभयान्वयीं अव्ययें** असें म्हणतात. जसें,—आणि, व, अथवा, किंवा, वा, जर, तर, जरी, तरी, म्हणून, म्हणजे, पण, परंतु, यद्यपि, तथापि, इ०.

**टीप**-अव्ययांचे मागें जे सामान्य विभाग दिले आहेत, त्यांत अनुक्रमांक अकरापासून एकोणीसपर्यंत सांगितलेले विभाग या अव्ययांचे आहेत.

( ४ ) हर्षशोकादि मनोविकारांच्या उत्कटतेनें जे उद्गार आपल्या तोंडांतून बाहेर पडतात, ते दाखविणारीं जीं अव्ययें तीं **केवलप्रयोगी अव्ययें** होत.

**टीप १**—या अव्ययांचा वाक्यांत इतर शब्दांशीं संबंध नसतो, तीं केवल एकटींच येत असतात, म्हणून त्यांस केवलप्रयोगी अव्ययें म्हणतात. यांना उद्गारवाचक असेंही नांव दिलें तरी चालेल.

**टीप २**—हर्षशोकादि अनेक मनोविकारांवरून यांचे पुष्कळ भेद होण्यासारखे आहेत. त्यांतील कांहीं मागें सांगितले आहेत.

---

# प्रकरण १७.



## समासविचार.

२४५. शब्दांचा **समास** करणें म्हणजे दोन अथवा अधिक शब्दांचें अर्थदृष्ट्या एकीकरण करून त्यांचा एक शब्द बनाविणें.

२४६. संस्कृत आणि मराठी भाषेंत दोन किंवा दोहोंपेक्षां ज्यास्ती शब्दांचें एकीकरण करून म्हणजे ते शब्द एकत्र जुळवून त्यांचा एक शब्द करण्याची वहिवाट पुष्कळ आहे. या व्यवस्थेनें शब्दांचा संक्षेप होऊन थोड्या शब्दांत पुष्कळ अर्थ उत्पन्न होतो, आणि भाषेस आटपसरपणा येतो. संस्कृतांत सामासिक शब्द वाटतील तितक्या शब्दांचे बनवितां येतात. मराठींत फारसे लांब समास नसतात.

२४७. हें शब्दांचें एकीकरण करतांना दोन किंवा अधिक मुख्य शब्दांमधील अन्वय किंवा संबंध दाखविणारे जे शब्द किंवा प्रत्यय असतात, त्यांचा लोप करितात. उदा०—'रामलक्ष्मण' हा शब्द 'राम आणि लक्ष्मण (असे दोघे)' असा असावयाचा, तो 'आणि' याचा संक्षेप करून 'रामलक्ष्मण' असा थोडक्यांत बनविला. 'राजाचा वाडा,' या दोन शब्दांचा सामासिक शब्द करावयाचा असल्यास त्यांमधील संबंध दाखविणारा षष्ठीचा प्रत्यय 'चा' याचा लोप केला, म्हणजे 'राजवाडा' असा शब्द तयार होतो. 'पोळीकरितां पाट,' यांतील 'करितां' हें अव्यय जाऊन 'पोळपाट' असा एक शब्द होतो. 'चक्रपाणि' यांत चक्र आहे पाणीच्या ठायीं म्हणजे हातीं ज्याच्या, असा देव; या सर्व विवरणांतील 'चक्र' आणि 'पाणि' एवढे दोन शब्द ठेवून व बाकी सर्व संबंधी शब्दांचा लोप करून 'चक्रपाणि' असा एकच शब्द बनविला आहे. 'गजमुख' यांत 'गजाच्या मुखासारखें आहे मुख ज्याचें तो देव' इतका अर्थ आणिला आहे. तसेंच 'काळमांजर' हा सामासिक शब्द, 'काळें मांजर' किंवा 'काळें असें मांजर,' यांतील विशेष्यविशेषणांच्या परस्परसंबंधाचें आणि अर्थाचें एकीकरण होऊन झाला आहे.

**टीप**—समास या शब्दाचा अर्थ आकुंचन किंवा संक्षेप असा आहे. सामासिक शब्दांना समास असें म्हणण्याचें कारण ते सर्व संबंधवाचक शब्दांचा किंवा प्रत्ययाचा लोप होऊन झालेले असल्यामुळें त्यांच्या स्वरूपाला साहजिक लघुत्व येतें. तेव्हां समास म्हणजे दोन अथवा अधिक शब्दांचा संक्षिप्त बनाव किंवा एकीकरण; व असे अनेक शब्द मिळून बनलेल्या एका शब्दास सामासिक शब्द असें म्हणतात. प्रचारांत 'समास' हा शब्द 'सामासिक शब्द,' या अर्थी योजितात. त्याचप्रमाणें तो 'सामासिक शब्दाचा भेद' या अर्थीही योजण्याची वहिवाट आहे. जसें,—'चक्रपाणि' हा बहुव्रीहि समास.

**२४८ दोन अथवा अधिक शब्दांमधील अन्वय दाखविणाऱ्या शब्दांचा किंवा प्रत्ययांचा लोप करून त्या शब्दांचा एकच शब्द बनविणें, यास समास असें म्हणतात. आणि अशा बनविलेल्या शब्दास सामासिक शब्द असें म्हणतात.**

२४९. समासघटित शब्दांची मूळची, म्हणजे त्यांचा सामासिक शब्द बनण्यापूर्वी, जशी रचना होती, तशी मधील संबंधवाचक शब्द किंवा प्रत्यय जेथल्या तेथें घालून पुन्हां रचना करणें, आणि समासघटित शब्दांचा अर्थ स्पष्ट करून दाखविणें, यास त्या समासाचा **विग्रह** असें म्हणतात. ही सामासिक शब्दांची फोड कशी करावयाची हें खालील उदाहरणांवरून लक्षांत येईल.—

| समास. | विग्रह. |
|---|---|
| १ राजवाडा. | राजाचा जो वाडा तो. |
| २ काळमांजर. | काळें असें जें मांजर तें. |
| ३ गजमोजणी. | गजानें जी मोजणी ती. |
| ४ काळपुरुष. | काळासारखा जो पुरुष तो. |
| ५ वांकडमान्या. | वांकडी आहे मान ज्याची तो. |
| ६ चक्रपाणि. | चक्र आहे पाणीच्या ठायीं म्हणजे हातीं ज्याच्या तो; किंवा चक्रयुक्त आहे पाणि ज्याचा तो. |

२५०. अनेक शब्द मिळून सामासिक शब्द बनविला, म्हणजे तो एकच शब्द झाल्यामुळें विभक्त्यादि कार्यें समासघटित शब्दांपैकीं शेवटच्या शब्दासच होतात. मागील सर्व शब्द संधिनियमानें संयोग पावून त्या एकाच शब्दाचे अवयव होतात,

२५१. सामासिक शब्दांचे रचनेवरून होणारे मुख्य प्रकार चार आहेत.

(१) **तत्पुरुष**, (२) **द्वंद्व**, (३) **बहुव्रीहि**, आणि (४) **अव्ययीभाव**.

## (१) तत्पुरुष.

२५२. या समासांत दोनच पदें किंवा शब्द असून त्यांतील दुसरें पद मुख्य असतें, व पहिल्या पदाचा दुसऱ्याशीं विभक्तीनें, सादृश्यानें किंवा विशेष्यविशेषणभावानें संबंध जोडलेला असतो.

जसें,—'राजपुत्र' यांत 'पुत्र' हा शब्द मुख्य असून त्याच्याशीं 'राजा' या पूर्व शब्दाचा 'राजाचा' या संबंधी विशेषणानें किंवा षष्ठीनें संबंध जोडला आहे; तसेंच 'शुक्लपक्ष' या सामासिक शब्दांत 'पक्ष' शब्द मुख्य असून पहिला शब्द 'शुक्ल' याचा त्याच्याशीं विशेषणात्मक संबंध आहे. 'मुखचंद्र' यांत मुख आणि चंद्र यांचें सादृश्य दर्शविलें आहे.

२५३. तत्पुरुषाचे तीन भेद आहेतः—(१) **विभक्तितत्पुरुष,** (२) **नञ्तत्पुरुष,** आणि (३) **कर्मधारय.**

२५४. विभक्तितत्पुरुषामध्यें पहिल्या पदाचा दुसऱ्या पदाशीं विभक्तिसंबंध असून, समासांत त्या विभक्तीचा लोप झालेला असतो. त्या विभक्तीचें नांव त्या समासास देतात. अर्थात् द्वितीयादि विभक्तीं-वरून याचे निरनिराळे सहा विभाग होतात.

२५५. या सहा विभक्तितत्पुरुषांचीं उदाहरणें:—

(१) **द्वितीयातत्पुरुष**—द्विजदंड (द्विजाप्रत जो दंड तो); परपीडा (पराप्रत पीडा); दुःखप्राप्त (दुःखाला प्राप्त = मिळालेला); कृष्णार्पित; धोंड-फोड्या; अंगचोर; तोंडपुज्या; मारखाऊ; स्वर्गारोहण; इ०.

(२) **तृतीयातत्पुरुष**—कृपावलोकन (कृपेनें जें अवलोकन तें); तोंड-पाठ (तोंडानें पाठ); गजमोजणी (गजानें मोजणी); उपासमार; दयार्द्र; भाक्तिवश; द्रव्यसाध्य; मातृसदृश; नखभिन्न (नखानें भिन्न—फोडलेलें); वस्त्र-गाळ; ईश्वरनिर्मित; घोडमात,-घोडेमात; प्यादेमात; अंगजड; कपाळकरंटा; हातघाई; इ०.

(३) **चतुर्थीतत्पुरुष**—गायरान (गाईकरितां-गुरांकरितां जें रान तें); पोळपाट (पोळीसाठीं जो पाट तो); बाजारवाडा; कृष्णार्पण; यज्ञस्तंभ; पूजा-द्रव्य; काकबलिः लोकराक्षित; डोईजड; इ०.

(४) **पंचमीतत्पुरुष**—स्वर्गपतन (स्वर्गापासून पतन); चोरभय (चोरा-पासून भय); पापविमोचन; ऋणमोचन; भवतारण; इ०.

(५) **षष्ठीतत्पुरुष**—राजवाडा (राजाचा वाडा); राजपुत्र; केळफूल; पिंपळपान; हातचाळा; देवपूजा; देवालय; भूपति; सूर्यप्रकाश; नृपपद, इ०.

(६) **सप्तमी तत्पुरुष**—रानमांजर (रानांत असणारें मांजर); पाणबुड्या; स्वर्गवास (स्वर्गांत वास); ग्रहप्रवेश; कर्मकुशल; शास्त्रनिपुण; शास्त्रप्रवीण; शिल्पपाटव; कूपमंडूक; कलाकुशल; घरकोंबडा; दानशूर; रणशूर; अवसानघातकी; घरजांवई; समयसूचक; इ०.

**टीप १**—'च' प्रत्ययान्त संबंधी विशेषणानें षष्ठी विभक्तीचा बोध होतो. म्हणून त्या विशेषणाचे योगानें झालेल्या समासास षष्ठीतत्पुरुष-समास म्हणावें. षष्ठीचें रूप विशेषणात्मक असल्यामुळें कित्येक इतर समासांचा विग्रह तें रूप घालून होईल, आणि त्या समासांस षष्ठीतत्पुरुष म्हणतां येईल. उदा०—पूजाद्रव्य=पूजेचें द्रव्य; चोरभय=चोराचें भय; इत्यादि.

**टीप २**—विभक्ति जशा प्रत्ययांनीं होतात तशा शब्दयोगी अव्ययांनींही होतात. म्हणून विग्रहांत शब्दयोगी अव्यय येऊन विभक्तीचा बोध होत असतां ज्या विभक्तीचें तें शब्दयोगी अव्यय असेल, त्या विभक्तीचें त्या तत्पुरुष-समासास नांव द्यावें.

२५६. विभक्तितत्पुरुषसमासांत कधीं पूर्वशब्दाच्या विभक्तीचा लोप होत नाहीं, म्हणजे समास झाला तरी पूर्वपदाचा विभक्तिप्रत्यय तसाच राहातो; अशा समासास **अलुक्समास** म्हणतात. उदा०—युधिष्ठिर (युधि=युद्धांत स्थिर); पंकेरुह (पंके=चिखलांत, रुह=वाढणारें, कमल); वाचस्पति (वाचः=वाणीचा,=भाषणाचा, पति=स्वामी); दिवस्पति; परस्मैपद; आत्मनेपद; कर्तरिप्रयोग; कर्मणिप्रयोग; भावेप्रयोग; इ०.

२५७. वरील उदाहरणें संस्कृत शब्दांचीं आहेत. असे शुद्ध मराठीही शब्द आहेत; पण त्यांच्या पहिल्या पदाच्या विभक्तिप्रत्ययाचा लोप होऊन त्याचें नुसतें सामान्यरूप राहिलेलें असतें. अशा समासांसही **अलुक्समासच** म्हणावें. जसें,—'**पिशाचाहातीं** कोलीत.' 'भिल्ली बोलुनि बोल सुंदर असे, **रामाकरीं** तीं फळें.' 'हरिश्चंद्र, ताराराणी। **डोंबाघरीं** भरी पाणी.' '**भीमा-आंगीं** वीरश्रीचा लोट.' घोडेमात. प्यादेमात. इ०.

२५८. तत्पुरुषसमासांत कधीं मुख्यपद म्हणजे उत्तरपद धातुसाधित शब्द किंवा कृदंत असतें. अशा समासाला **उपपद-तत्पुरुष** म्हणतात. जसें,– **गृहस्थ** (गृहस्थ=गृहांत राहणारा; स्थ-स्था धातूपासून);अनुग (अनु–ग=मागून जाणारा: गम्-धातु ); शेषशायी ( शेष=सर्प, शायी=निजणारा, शीधातु ); ग्रंथकार; अधिप; खेचर; कच्छप; घृतपक्व; इ०.

२५९. हे शब्द शुद्ध संस्कृत आहेत. पण अशीं शुद्ध मराठी शब्दांचींही उदाहरणें आहेत. जसें,–आगलाव्या, कंबरमोड्या, पायमळ्या, भाजीविक्या, मासखाऊ, व्याजखाऊ, खेटरखाऊ, इ०.

**टीप**–विभक्ति-तत्पुरुषामध्यें अलुक्समास आणि उपपदतत्पुरुष असतीलच. जसें,—' रामा-करीं ' हा षष्ठीतत्पुरुष, प्यादेमात=तृतीयातत्पुरुष; आगलाव्या= द्वितीयातत्पुरुष; इत्यादि.

२६०. विभक्तितत्पुरुष समासांत केव्हां मुख्य शब्द प्रथम येऊन विभक्ति-युक्त असणारा शब्द द्वितीयपदीं येतो. जसें,—राजहंस ( हंसांचा राजा ) अर्धरात्र ( रात्रीचें अर्ध ); पूर्वकाय ( कायाचें म्हणजे शरीराचें पूर्व ); पूर्ववय; ( वयाचें पूर्व ) राजमार्ग ( मुख्य रस्ता ); इ०.

२६१. सर्वनामांच्या विभक्तींचा जेव्हां समासांत लोप होतो, म्हणजे तत्पुरुष समासांतील प्रथमपद जेव्हां सर्वनाम असतें, तेव्हां त्या सर्वनामांबद्दल त्यांचीं संक्षिप्त संस्कृत रूपें समासांत योजितात. निरनिराळ्या सर्वनामांचीं संक्षिप्त रूपें अशीं आहेत:—

| सर्वनामें | संक्षिप्तरूप | उदाहरणें |
|---|---|---|
| मी | मत् | मत्कार्य, मत्तात, मदुद्धरण, मन्मत, मज्जन्म, मन्मरण, इत्यादि. |
| आम्ही | अस्मत् | अस्मद्भाग्य, अस्मदपराध इ०. |
| तूं | त्वत् | त्वद्गुण, त्वल्लीला, त्वद्भाग्य, त्वल्लाभ, इ०. |
| तुम्ही | युष्मत् | युष्मत्कीर्ति, युष्मदौदार्य, इ०. |
| तो, ती, तें, ते, त्या, तीं; | तत् | तच्चरित, तद्गुण, तत्सुख, तन्नाम, तद्रूप, तद्गौरव, इ०. |
| हा, ही, हें, हे, ह्या, हीं; | एतत् | एतद्देशीय, एतद्विषयक, इ०. |

२६२. ‘ आपला-ली-लें ’ या संबंधीं सर्वनामरूपाच्या ठिकाणीं ‘निज,’ ‘स्व,’ हीं रूपें येऊनही समास होतात. जसें,—स्वजाति, स्वदेश, स्वभाषा, निजरूप, निजधाम, निजतनु, इ०. कोठें ‘आपला-ली-लें’ (हें ‘ आत्म ’ याचें रूप आहे.) यांतला ‘आप’ एवढाच अंश समासांत राहिलेला दृष्टीस पडतो. जसें,–आपखुषी, आपमतलब, इ०. हे सर्व षष्ठीतत्पुरुष समास जाणावे.

२६३. जेव्हां तत्पुरुषसमासाचें प्रथमपद नकारार्थक ‘ अ ’ असतें, तेव्हां त्यास **नञ्तत्पुरुष समास** म्हणतात. उत्तरपदाच्या आरंभींचें अक्षर जर स्वर असलें, तर नकारार्थी ‘ अ ’ बद्दल ‘ अन् ’ येतो. जसें,—अभाव, अधर्म, अब्राह्मण, अज्ञान, अजाणता, अनिष्ट, अनर्थ, अनुपकार ( नव्हे जो उपकार तो ), इ०.

२६४. **कर्मधारय**—तत्पुरुषसमासाचा पहिला शब्द जेव्हां विशेषण किंवा विशेषणसदृश असतो, म्हणजे तत्पुरुषसमासांत विशेषण व विशेष्य यांचा जेव्हां योग झालेला असतो, किंवा जेव्हां एका वस्तूची दुसरीस उपमा देऊन मग त्यांचा समास केलेला असतो, म्हणजे जेव्हां उपमानोपमेयसंबंध असतो, तेव्हां त्या समासास **कर्मधारयसमास** असें म्हणतात. जसें,–काळमांजर, तांबडमाती, महदुपकार, चोरघडी, घडकाम, मुखकमळ, कमलमुख, काव्यामृत, उंबरघांट, इत्यादि.

**टीप १**—उपमान म्हणजे ज्या पदार्थाची उपमा द्यावयाची तो, आणि उपमेय म्हणजे ज्याला उपमा द्यावयाची तें; चंद्र-मुख यांत ‘ चंद्र ’ हें उपमान आणि ‘ मुख ’ हें उपमेय.

**टीप २**—कर्मधारयसमासांचे विग्रह असे करावेः–काळसर्प–काळा असा किंवा काळासारखा जो सर्प तो. काळमांजर–काळें असें जें मांजर तें. तांबड-माती–तांबडी अशी जी माती ती; महदुपकार—महान् असे जे उपकार ते. चोरघडी—चोर ( गुप्त ) अशी जी घडी ती. घडकाम—घड ( घडलेलें ) असें जें काम तें. मुखकमल–मुख हेंच कमल. कमलमुख–कमलासारखें जें मुख तें. काव्यामृत–काव्य हेंच अमृत. उंबरघांट–उंबर ( उंबरठा ) हाच घांट=डोंगर. इत्यादि.

**टीप ३**—कर्मधारयसमासांत पूर्वपद प्रथमाविभक्तींत असल्यामुळें हा वास्तविक प्रथमातत्पुरुषसमासच होय. त्याचप्रमाणें नञ्तत्पुरुष म्हणजे कर्मधारयाचाच एक प्रकार आहे; कारण त्यांतील नकारार्थक अव्यय विशेषणात्मक असतें. तेव्हां नञ्तत्पुरुष आणि कर्मधारय मिळून 'प्रथमातत्पुरुष' असें म्हणण्यास चिंता नाहीं.

२६५. कर्मधारयसमासांत कधीं विशेष्य पहिल्यानें येऊन विशेषण उत्तरपदीं येतें. जसें,—पुरुषोत्तम (उत्तम असा पुरुष); छात्रवंचक (वंचक-लबाड असा छात्र–विद्यार्थी); इ०. हे समास 'पुरुषांमध्यें उत्तम,' 'छात्रांतला वंचक,' असेही हवे तर सोडवावे.

२६६. कांहीं कर्मधारय समासांत दोन्ही पदें विशेषणें असतात. उदा०—कृताकृत (कृत+अकृत=केलेलें आणि न केलेलें=वेताचें); शुक्लकृष्ण, नवपाठक, दृष्टादृष्ट, इ०. वस्तुतः अशा समासांतील दुसरें पद जरी विशेषण असतें, तरी त्याचा उपयोग नामाप्रमाणें केलेला असतो. आणि पहिलें पद त्याचें विशेषण असतें.

(अ) अशा समासांत मुख्य विशेषण पहिल्यानें घालितात. जसें,—हिरवागार (गार असा हिरवा); लालभडक (भडक असा लाल); इ०.

२६७. आतेभाऊ, आजेसासरा, चुलतभाऊ, भाचेसून, नातजांवई, मावसदीर वगैरे नात्यांचे वाचक सामासिक शब्द कर्मधारयसमास होत. यांतील पहिलीं पदें विशेषणें मानावीं. चुलतसासरा म्हणजे चुलत असा सासरा, आजेसासू-आजी अशी सासू, भाचेसून–भाचाची बायको अशी किंवा म्हणून सून.

२६८. उपमानोपमेयसंबंध असतां उपमान हें विशेषणासारखें असल्यामुळें बहुधा प्रथम येतें; पण तें उत्तरपदीं येत नाहीं असें नाहीं. जसें,—चंद्रमुख, मुखचंद्र, नरसिंह, मेघश्याम, इ०.

२६९. कर्मधारयसमासाचे रचनेच्या संबंधानें खालीं लिहिलेले पोटभेद होतातः—

(१) **विशेषणपूर्वपद**—तांबडमाती, काळमांजर, रक्तांबर, रक्ताशोक, काळसर्प, पीतपट, इ०.

(२) **विशेषणोत्तरपद**—घननील, प्रसंगविशेष (विशेष असा प्रसंग), पुरुषोत्तम, इ०.

( ३ ) **विशेषणोभयपद**—कृताकृत, लालभडक, हिरवाचार, हिरवागार, पांढरासफेत, इ०.

( ४ ) **उपमानपूर्वपद**—कमलमुख, वज्रदेह, इ०.

( ५ ) **उपमानोत्तरपद**—चरणपल्लव, मुखचंद्र, मुखकमल, भवसागर, इत्यादि.

( ६ ) **अवधारणापूर्वपद***—कालसर्प, विद्यासर्वस्व, इ०.

२७०. केव्हां समासांत 'अंतर' हा शब्द अन्य, दुसरा, अशा अर्थीं उत्तरपदाच्या ठिकाणीं येतो; अशा समासांत प्रथमपद मुख्य असतें. असे समास कर्मधारयच होत. जसें,—ग्रामांतर = दुसरा गांव; देशांतर = दुसरा देश; वेषांतर = दुसरा वेष; भाषांतर = दुसरी भाषा; वनांतर = दुसरें वन; इ०. सांप्रत **भाषांतर** याचा अर्थ 'दुसऱ्या भाषेंत नेलेलें' कसा करितात.

२७१. **द्विगुसमास**—कर्मधारयसमासांत जेव्हां पहिलें पद संख्याविशेषण असतें, आणि सगळा सामासिक शब्द समुच्चयार्थी असतो, तेव्हां त्या समासास **द्विगुसमास** असें म्हणतात. जसें,—त्रिभुवन—( स्वर्ग, मृत्यु आणि पाताळ या ) तीन लोकांचा समुच्चय; पंचपाळें—पांच पाळीं एके जागीं आहेत, असें लांकडी पात्र; पांचशेरी—पांच शेरांचें एक माप; पंचपदी—पांच पदें म्हणजे कविता यांचा समुच्चय; तीनवार, अष्टाध्यायी, बारभाई, अठराबाबू, पंचखाजें, चतुर्युग, पंचारती, इ०.

( अ ) या समासाचे विग्रह असे करितातः—पंचपाळें = पांच पाळ्यांचा समुदाय; पांचशेरी = पांच शेरांचें एक माप; त्रिभुवन = तीन भुवनांचा एक समुदाय; अष्टाध्यायी = ज्याचे आठ अध्याय आहेत असा ग्रंथ; पंचपदी = पांच पदांचा समुदाय; बारभाई = बारा भाईंचा समुदाय किंवा पुष्कळ जणांचा कारभार; इ०.

*अवधारणा म्हणजे संकल्प, निश्चय. 'कालसर्प' यांत 'काल' या शब्दावरून सर्पाच्या स्वरूपाचा निश्चय होतो; म्हणजे 'कालासारखा—मृत्यूसारखा—भयंकर असा सर्प.' 'विद्यासर्वस्व' = 'विद्या हेंच सर्व धन असा संकल्प.'

**टीप**—कोणत्याही समासांत पूर्वपद संख्याविशेषण आहे एवढ्यावरून केवळ त्यास द्विगु समास म्हणतां येणार नाहीं. तर तो कर्मधारय असून त्या एकंदर समासापासून समासदर्शित वस्तूंचा एकच समुदाय आहे, असा बोध झाला पाहिजे. उदा०—' त्रिनयन, ' यांत पूर्वशब्द जरी संख्यावाचक आहे, तरी तो एकंदर समास कर्मधारय नाहीं, व 'तीन डोळ्यांचा समुदाय,' असा त्या सामासिक शब्दाचा अर्थही होत नाहीं, म्हणून तो द्विगु नव्हे.

## ( २ ) बहुव्रीहि.

२७२. ज्या समासांत कोणतेंच पद मुख्य नसतें, व पहिलें पद दुसऱ्या पदाबद्दल कांहीं विशेष सांगतें, म्हणजे तें विशेषणात्मक असतें; आणि एकंदर समासानें समासघटित शब्दांनीं दर्शविलेल्या गुणांनीं युक्त अशा स्थितींतल्या निराळ्याच पदार्थाचा बोध होतो, त्यास **बहुव्रीहिसमास** असें म्हणतात. जसें,—महाबाहु, पीतांबर, चक्रपाणि, गजानन, चंद्रमौली, त्रिनयन, त्र्यंबक, सांब, मृगनयना, चंद्रमुखी, इ०.

( अ ) आपण ' चक्रपाणि ' हा सामासिक शब्द घेतला, तर त्यांत ' चक्र आणि ' पाणि, ' यांपैकीं कोणताच शब्द मुख्य नाहीं. ' चक्र ' याचा अर्थ ' चक्रयुक्त ' असा असून तो शब्द ' पाणि ' याचें विशेषण आहे; व दोन्ही शब्द मिळून ' चक्र आहे पाणीच्या ठायीं ( हातीं ) ज्याच्या,' अशा तिसऱ्याच पदार्थाचा म्हणजे एका विशेष देवतेचा–विष्णूचा–बोध होतो.

( आ ) हे समास असे सोडवावे:—चक्रपाणि–चक्र आहे पाणीच्या ठायीं म्हणजे हातीं ज्याच्या, किंवा चक्रयुक्त आहे पाणी ज्याचा. पीतांबर–पीत आहे अंबर ज्याचें. गजानन–गजाच्या आननासारखें आहे आनन ज्याचें. त्रिनयन–त्रि ( तीन ) आहेत नयन ज्याला; सांब–अंबेसहित आहे जो. महाबाहु-महान् आहेत बाहु ज्याचे. चंद्रमौली–चंद्र आहे मौलीच्या ठायीं ( मस्तकीं ) ज्याच्या. चंद्रमुखी–चंद्रासारखें आहे मुख जिचें. इ०.

२७३. कर्मधारय व बहुव्रीहि या समासांत सादृश्य फार आहे; पुष्कळ

वेळां ते ओळखणें कठीण असतें. कधीं एकच समास कर्मधारय व बहुव्रीहिही असतो. या दोन समासांत मुख्य भेद असा आहे.

( १ ) बहुव्रीहि समास नेहमीं विशेषणात्मक असतो, आणि कर्मधारय समासांत उत्तरपद जेव्हां विशेषण असतें तेव्हांच फक्त तो समास विशेषणात्मक असतो.

( २ ) बहुव्रीहि समासानें ज्या तिसऱ्या वस्तूचा बोध होतो, ती समासघटित शब्दांपैकीं कोणत्याही एका शब्दानें स्वतंत्रपणें व्यक्त होत नाहीं. कर्मधारय व बहुव्रीहि या दोन्ही समासांतील पूर्वपदें जरी विशेषणात्मक असतात, तरी कर्मधारयांतील पुढलें पद मुख्य असतें, किंवा जरी सर्व समास विशेषण असला, तरी पुढलें पद पूर्वपदाशीं विशेषणभावानें किंवा समानविभक्तिधर्मानें जुळतें. तसा प्रकार बहुव्रीहींत होत नाहीं. त्यांत कोणतेंच पद मुख्य नसतें, व पूर्वपद उत्तरपदाशीं—विशेष्याशीं—नेहमीं जुळणारें नसतें; आणि एकंदर समास कोणत्या तरी तिसऱ्या शब्दाचें विशेषण बनतो. उदा०—पीतांबर हा समास कर्मधारय असेल, तेव्हां 'पीत असें अंबर ( वस्त्र )' असा त्याचा विग्रह होतो; परंतु तोच शब्द बहुव्रीहि समास असतां 'पीत आहे अंबर ज्याचें,' असा त्याचा विग्रह होऊन त्याचा अर्थ 'विष्णु' असा होईल. पण समासघटित शब्दांपैकीं कोणताही शब्द 'विष्णु' यास लावितां येणार नाहीं. कारण 'पीत' म्हणजे 'विष्णु' नव्हे, व 'अंबर' म्हणजेही 'विष्णु' नव्हे; परंतु 'पीतांबर' या सामासिक शब्दाचा एकंदर अर्थ 'विष्णु' असा होतो. 'गजमुख' हा तत्पुरुष असतां 'गजाचें जें मुख तें,' असा विग्रह होईल; कर्मधारय असतां 'गजमुखासारखें जें मुख तें,' असा होईल; आणि बहुव्रीहि असतां 'गजाच्या मुखासारखें आहे मुख ज्याचें, असा देव'—गणपति असा विग्रह होईल. तिन्ही ठिकाणीं अर्थ भिन्न आहे. 'मी पीतांबर नेसलों.' व 'विष्णु पीतांबर आहे.' या दोन वाक्यांपैकीं पहिल्यांतील 'पीतांबर' कर्मधारय आहे, व दुसऱ्यांतील बहुव्रीहि आहे. 'कृष्णास **घनश्याम** म्हणतात.' या वाक्यांत 'श्याम' शब्द कृष्णाकडे लागतो, म्हणून तो बहुव्रीहि समास होणार नाहीं. असा या दोन समासांतील भेद जाणावा.

( ३ ) आणखी असें कीं, बहुव्रीहि सामासाचा विग्रह केला, म्हणजे शेवटी जो, जी, जें या संबंधी सर्वनामाचें कोणत्या तरी विभक्तीचें रूप येतें. उदा०—प्राप्तोदक—प्राप्त आहे उदक **ज्यास** ( असा गांव ) तपोधन—तप हेंच आहे धन **ज्याचें** ( असा पुरुष ). इ०

२७४. विग्रहांत शेवटीं जो, जी, जें यांचीं जीं निरनिराळ्या विभक्तींचीं रूपे होतात, त्यांवरून या समासाचे द्वितीया—बहुव्रीहि, तृतीया--बहुव्रीहि, इत्यादि, असे पोटभेद करितात उदा० —

द्वितीयाबहुव्रीहि—प्राप्तोदक—' प्राप्त आहे उदक ज्यास ' ( गांव ).
तृतीयाबहुव्रीहि—कृतकृत्य—' कृत आहे कृत्य ज्यानें ' ( मनुष्य ).
चतुर्थीबहुव्रीहि—निवेदितसंदेश—' निवेदित आहे संदेश ज्याला ' (मनुष्य).
पंचमीबहुव्रीहि—गलितपर्ण—' गलित आहेत पर्णे ज्यापासून ' ( वृक्ष ).
षष्ठीबहुव्रीहि—चक्रपाणि—' चक्र आहे पाणीच्या ठायीं ज्याच्या ' ( विष्णु ).
सप्तमीबहुव्रीहि—वीरपुरुष—' वीर आहेत पुरुष ज्यामध्यें ' ( असा देश ).

२७५. बहुव्रीहिसमासाचा विग्रह करितांना जेव्हां दोन्ही पदें एकाच विभक्तींत येतात, तेव्हां त्या समासास **समानाधिकरणबहुव्रीहि** व जेव्हां तीं भिन्न विभक्तींत असतात, तेव्हां त्यास **व्यधिकरणबहुव्रीहि** असें म्हणतात. उदा०—तपोधन—' **तप** हेंच आहे **धन** ज्याचें तो. '—समानाधिकरण बहु०. नीलकंठ—' **नील** आहे **कंठ** ज्याचा तो. '—व्यधिकरणबहुव्रीहि. चक्रपाणि—' **चक्र** आहे **पाणीच्या** ठायीं ज्याच्या तो. '—व्यधिकरणबहुव्रीहि. इ०.

२७६. हीं उदाहरणे संस्कृत शब्दांचीं आहेत. शुद्ध मराठींतही अशा समासांचीं उदाहरणें आढळतात. जसें,—आंखुडशिंगी, तिमजली, हे समानाधिकरणबहुव्रीहि; व माणुसघाण्या, हा व्यधिकरणबहुव्रीहि.

२७७. संस्कृतांत बहुव्रीहि समासाला पुष्कळ वेळां ' क ' हा स्वार्थी प्रत्यय लागतो. त्यावरून हे बहुव्रीहिसमासघटित शब्द पुष्कळ वेळां शुद्ध मराठी असतां त्यांस बहुधा पुल्लिंगी 'आ' (याचें बहुधा याकारान्त जोडाक्षर असतें ), स्त्रीलिंगी ' ई ' आणि नपुंसकलिंगी ' एँ ' हे प्रत्यय लागतात; व हे प्रत्यय लागतांना सामासिक शब्दाच्या अंत्य स्वराचा लोप होतो. उदा०—एकडोळ्या, दुतोंड्या, आंखुडशिंगी, वांकडमान्या, रडतोंड्या, बहुदुधी, दुतोंडें, इ०.

२७८. कांहीं शुद्ध मराठी बहुव्रीहिसमासांचीं रूपें तिन्ही लिंगी. एकच असतात. जसें—तिरंगी, चैाकोनी, इ०.

२७९. **मध्यमपदलोपी** असा एक समास कोणी मानितात; परंतु तो निराळा समास नाहीं. तर तत्पुरुष, कर्मधारय आणि बहुव्रीहि या समासघटित शब्दांचा विग्रह करितांना केव्हां समासघटित पदांशिवाय आणखी एक तिसरें पद मध्यें घालावें लागतें; या मधील पदाचा समासांत लोप झालेला असतो अशा समासास **मध्यमपदलोपी** तत्पुरुष, कर्मधारय किंवा बहुव्रीहि असें म्हणावें. उदाहरणें:—**तत्पुरुष**—रानमांजर=रानांत असणारें **मांजर**; (याचा विग्रह पाहिजे तर 'रानांतलें मांजर' असा होऊन मग तो कर्मधारय होईल). **कर्मधारय**—साखरभात=साखरेनें युक्त जो भात तो. गर्भश्रीमंत = गर्भांत असल्यापासून (जन्मापासून) श्रीमंत. चुलतसासरा=चुलता म्हणून जो सासरा तो. **बहुव्रीहि**—हरिणाक्षी 'हरिणाच्या **अक्षांसारखे** आहेत अक्ष जिचे.' गजानन-'गजाच्या **आननासारखें** आहे आनन ज्याचें.' चंद्रकांत—चंद्राच्या **कांतीसारखी** आहे कांति ज्याची.' इ०. या सर्व उदाहरणांत विग्रह करितांना तिसऱ्या पदाची जरूर पडून पुढें समास होतांना त्याचा लोप झाला, हें लक्षांत येईल.

२८०. केव्हां निषेधार्थक अव्यय 'अ' किंवा 'अन्' हें नामाच्या पाठीमागें लागून बहुव्रीहि समास होतो. तेव्हां त्यास **नञ्बहुव्रीहि** म्हणावें. जसें, अज्ञान—'नाहीं ज्ञान ज्याला.' अनंत—'नाहीं अंत ज्याला किंवा ज्याचा.' अपुत्र—'नाहीं पुत्र ज्यास.' इ०.

२८१. पूर्वपद 'स' किंवा 'सह' असून बहुव्रीहि समास होतात; त्याला **सहबहुव्रीहि** म्हणतात. जसें,—सपुत्र—'पुत्रासहित आहे जो तो.' सवर्ण, सहोदर, सचैल, सकल, इ०.

२८२. मारामारी, लठ्ठालठ्ठी, बुक्काबुक्की, ढकलाढकली, इत्यादि शुद्ध मराठी समास बहुव्रीहि मानावे. यांचे विग्रह, 'मार मार असें जींत चालतें ती मारामारी.' 'एकमेकांला जींत बुक्कया मारतात ती बुक्काबुक्की.' अशा स्पष्टीकरणानें करावे.

## ( ३ ) द्वंद्वसमास.

२८३. जेव्हां समासांत दोन किंवा अधिक शब्द असून ते सर्वच मुख्य असतात, व त्यांचा एकमेकांशीं 'आणि,' 'अथवा,' 'व,' यांच्या जुळणीचा संबंध असतो, तेव्हां त्या समासास **द्वंद्वसमास** असें म्हणतात. जसें,— रामलक्ष्मण = राम आणि लक्ष्मण. पितापुत्र = पिता व पुत्र. भीमार्जुन = भीम आणि अर्जुन. ब्रह्माविष्णुमहेश = ब्रह्मा आणि विष्णु आणि महेश. दोनतीन = दोन किंवा तीन. आईबाप; बहिणभाऊ; देशकालवर्तमान; इ०.

२८४. द्वंद्वसमासाचा विग्रह करितांना जेव्हां त्याच्या पदांमध्यें 'अथवा,' 'किंवा.' 'अगर,' अशा प्रकारचें एखादें विकल्पबोधक उभयान्वयी अव्यय घालावें लागतें, व एकंदर समासाचा अर्थ 'हें किंवा तें' अशा प्रकारचा असतो, तेव्हां त्यास **वैकल्पिक द्वंद्वसमास** असें म्हणावें. जसें, तीनचार—तीन किंवा चार. आंतबाहेर—आंत अथवा बाहेर. [किंवा आंत आणि बाहेर, अर्थ निराळा]. काळापांढरा; खरेंखोटें; बरेंवाईट; काळागोरा; इ०.

२८५. संस्कृतांत या समासाच्या लिंग–वचनासंबंधानें असा नियम आहे कीं, समासांत दोनच पदें असल्यास तो द्विवचनी असतो; व जेव्हां त्यांत दोहोंपेक्षां ज्यास्त पदें असतात, तेव्हां तो बहुवचनी असतो; आणि शेवटच्या पदाचें जें लिंग तेंच बहुधा एकंदर समासाचें लिंग असतें.

२८६. हा नियम संस्कृत शब्दांनी झालेल्या समासाचेसंबंधानें मराठींतही बराच लागू पडतो; मात्र द्विपदी समास अनेकवचनी मानितात. कारण मराठींत द्विवचन नाहीं. त्याचप्रमाणें समासघटित पदें भिन्न लिंगांचीं असल्यास मराठींत सर्व समास नपुंसकलिंगी समजतात. जसें,—'रामसीता आलीं.' 'भीमद्रौपदी बोलत बसलीं आहेत.' आईबापें, दादलाबायलें, मातापितरें, स्त्रीपुरुषें, इ०.

२८७. दोन शब्दांनीं बनलेल्या द्वंद्व समासावरून केव्हां दोनच वस्तूंचा बोध न होतां त्याच्या अर्थामध्यें तदंतर्गत किंवा तत्सदृश अशा दुसऱ्या अनेक वस्तूंचा समावेश झालेला असतो; तेव्हां त्या समासास **समाहारद्वंद्व** असें म्हणतात. उदा०–' भाजीपाला, ' यांत सर्व प्रकारच्या भाज्यांचा समावेश होतो. ' शेटसावकार, ' यांत दुकानदार, व्यापारी, अशा अनेक द्रव्योत्पादक धंदे करणाऱ्या अतएव श्रीमान् लोकांचा अंतर्भाव होतो. ' दगडबिगड, ' असें म्हटलें म्हणजे दगड किंवा तशीच एखादी वस्तू असा अर्थ होतो. 'हातपाय,' यावरून हात, पाय, वगैरे अवयव दाखविले जातात. अशीं आणखी उदाहरणें:—घरदार, पानपत्रावळ, दिवाणदरबार, भाकरीबिकरी, कोळीमाळी, टोपीबिपी, पोरसोरे, तांब्याबिंब्या, मीठबीठ, इ०.

**टीप**—समाहारद्वंद्वांतलें दुसरें पद पुष्कळदां केवळ पूर्वशब्दाचा अनुकरणवाचक शब्द असतो; त्याला कांहीं अर्थ नसून त्यावरून ' त्यासारखे इतर ' असा बोध होतो. उदाहरणें:—मीठबीठ, दगडबिगड, भाकरीबिकरी, लहानसान, घरबीर, मनुष्यबिनुष्य, इत्यादि.

२८८. हातपाय, नाकडोळे, घरदार, इत्यादि समास समाहारद्वंद्वच आहेत; परंतु त्यांत विशेष इतकाच कीं, या सामासिक शब्दांस विभक्ति लागली असतां प्रथम पदाचेंही सामान्यरूप होतें; क्वचित् त्या पदास विभक्तीहि लागते. उदा०—' हातापायाला सुख, तर सर्व ठीक. ' ' ती बाई हातींपायीं सुटली. ' ' ती मुलगी नाकाडोळ्यांनीं किंवा नाकींडोळीं सुरेख आहे. ' ' घरादारास बोलावणें करा. ' ' तो घरींदारीं सारखाच. ' इत्यादि.

२८९. द्वंद्वसमासांत समासघटित शब्दांचा अनुक्रम लावण्यासंबंधानें नियम असे आहेत:—

( १ ) वर्णांचीं किंवा जातींचीं नांवें त्यांच्या योग्य क्रमानें येतात. जसें,—ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र, इ०.

( २ ) भावांच्या नांवांत वडिलापासून आरंभ करून पुढें तीं वयानुक्रमानें घालितात. जसें—धर्मार्जुन, रामलक्ष्मण, नकुलसहदेव, इ०.

( ३ ) व्यक्तींच्या किंवा वस्तूंच्या नांवांत त्यांच्या महत्त्वावर किंवा प्रतिष्ठेवर अनुक्रम लावितात. जसें,–देवदैत्य, राजाप्रजा, छत्रीजोडा, घरवाडी, इ०.

(४) नात्याच्या वाचक शब्दांत विशेष मानाच्या किंवा ममतेच्या व्यक्तींचीं नांवें प्रथम घालितात. जसें,-आईबाप, मातापिता, सासूसासरा, इ०.

(५) निरनिराळ्या लिंगांचे शब्द असल्यास पुल्लिंगी, स्त्रीलिंगी व नंतर नपुंसकलिंगी असा अनुक्रम ठेवितात. जसें,—शेलापागोटें, नारळसुपारी, पैसा-सुपारी, कागदशाई, इ०.

(६) समासघटित शब्दांत सर्वांत कमी अक्षरांचा शब्द असेल तो प्रथम घालितात. मागील सर्व नियमांत हा नियम प्रथम पाळितात. जसें,—अर्जुन-भीमसेन, भीमार्जुन, भीमयुधिष्ठिर, युधिष्ठिरभीमसेन, कृष्णबळिभद्र, इ०.

**टीप**—हे नियम अक्षरशः पाळतात असें नाहीं; परंतु बहुतांशीं या नियमांप्रमाणें समास करितात.

## (४) अव्ययीभाव.

२९०. जेथें एक अव्यय व एक नाम यांचा समास होऊन त्या एकंदर समासाला अव्ययाचा अर्थ आलेला असतो, तेथें **अव्ययीभावसमास** असें म्हणतात. जसें,—दररोज, यथाक्रम, आमरण, अनुरूप, यथायोग्य, सरसकट, यथाशक्ति, बिनचूक, बिनधोक, बरहुकूम, इ०.

२९१. या समासांत पूर्व शब्द किंवा मुख्य शब्द बहुधा अव्यय असतो; पण तो नेहमीं अव्ययच असला पाहिजे, असा कांहीं नियम नाहीं. तसेंच, दोहोंपैकीं कोणताच शब्द अव्यय नसला तरीही चालतें. मात्र एकंदर समासास अव्ययाचा अर्थ असला पाहिजे. उदा०—गांवोगांव, दारोदार, घरोघर, घटकोघटकीं, इत्यादि यांत पूर्व शब्द अव्यय नसून एकंदर समास मात्र अव्ययरूप बनले आहेत.

(अ) मराठींत प्रत्ययांच्या जागीं शब्दयोगी अव्ययें लागून नामांचीं विभक्तिरूपें होतात. उदा०-घरावर, मनुष्याबरोबर, बागेमध्यें, गांवाबाहेर, तोंडापुढें, पैशामुळें, विद्येविषयीं, मन+आंत=मनात, इत्यादि०. हे अव्ययी-भावसमासच होत.

**टीप**—या समासांत अव्यय बहुधा प्रथम येतें, परंतु नाम व विभक्त्यर्थक शब्दयोगी अव्यय यांचा अव्ययीभावसमास झाला असतां, शब्दयोगी अव्यय उत्तरपदीं येतें.

## (५) समासांविषयीं सामान्य विचार.

२९२. आतांपर्यंत जे समासांविषयीं नियम सांगितले, ते अगदीं ठोकळ असे सांगितले. हें प्रकरण संस्कृत व्याकरणांतलें आहे, व समासही मुख्यतः त्याच भाषेंत फार होतात. तथापि मराठींत समास करण्याची चाल बरीच पडली आहे, आणि समास केलेले संस्कृत शब्द मराठींत फार येतात. म्हणून हे मुख्य मुख्य नियम दिले आहेत. संस्कृतांत समासांच्यासंबंधानें बारीक-सारीक नियम व अपवाद पुष्कळ आहेत. परंतु मराठी शिकणारांस त्यांचा तादृश उपयोग नसल्यामुळें येथें त्यांचा विचार केला नाहीं.

२९३. समासांसंबंधानें साधारण नियम असा आहे कीं, समासघटित शब्द एकाच भाषेंतील असावे; भिन्न भाषांतील शब्दांचे समास करणें अशुद्ध आहे, असें मानितात. उदा०—हत्तीचर्म, मृगडोळस, इलाखाधिपति, पायाशुद्ध, आगबोट, न्यायकोर्ट, इत्यादि. असले समास सदोष होत.

(अ) भिन्न भाषांतील शब्दांचे समास मुख्यतः कवितेंत आणि इतरत्र केलेले आढळतात. परकी भाषेंतील शब्द मराठी भाषेंत पूर्णपणें रुळलेले असल्यास, व शुद्ध समास संभवत नसल्यास असे समास करण्यासही विशेष हरकत नाहीं. परंतु एकंदरींत हा प्रकार गौणच. म्हणून व्याकरणशुद्ध समास संभवत असतां किंवा समास केल्यावांचून चालेल असें असतां, असले समास मुद्दाम करूं नयेत.

२९४. समास होऊन एकत्र झालेल्या संस्कृत शब्दांमध्यें संधि होत असल्यास तो नेहमीं केला पाहिजे. जसे,–'कृपाअरुण,' किंवा 'नृपआज्ञा,' असे शब्द न लिहितां ते 'कृपारुण,' 'नृपाज्ञा,' असे लिहावे.

(अ) कवितेंत या नियमाकडे बरेंच दुर्लक्ष केलेलें आढळतें. उदाहरणें,—

'आकाश-अंत न कळोनिहि अंतरिक्षीं
आकाश आक्रमिति शक्त्यनुसार पक्षी.' वामन.

'ते रामकृष्ण आले त्यांच्या पोटासि, **भाग्य अर्णव** तें-
न चतुर्मुखासि वदवे, कैसें एका मुखासि वर्णवतें.'–मोरोपंत.

२९५. कांहीं संख्यावाचक शब्दांचीं रूपें समासांत अशीं होतात.:—

| शब्द. | समासांतलें रूप. | उदाहरणें. |
|---|---|---|
| दोन | दु | दुघडी, दुघई, दुरंगी, दुतोंड्या, इ०. |
| तीन | ति, ते, तेह | तिकोनी, तिघई, तिरूपी, ( तिरपी ), तिरंगी, तेवीस, तेतीस, तेहतीस, इ०. |
| चार | चौ, चव | चौतीस, चौचाल, चौघडी, चौफळ, चौरंग, चवतीस, चवघडा, इ०. |
| पांच | पंच | पंचक्रोशी, पंचद्रवीड, पंचरंगी, पंचपक्वान्न, पंचपाळें, इ०. |
| सहा | छ | छत्तीस, छप्पन्न, छटाक, छदाम, इ०. |
| नऊ | नव किंवा नौ, | नवटांक, नौटांक, नवमास इ०. |
| बारा | बार | बारमास, बारभाई, इ०. |
| सोळा | सोळ | सोळन्हाण, सोळवंड, इ०. |

२९६. दुप्पट, तिप्पट, चौपट, पांचपट, इत्यादि शब्द नामें असल्यास ते विभक्तितत्पुरुष समास मानून, 'दोहोंनीं जी पट ती,' 'पांचांनीं जी पट ती.' असे त्यांचे विग्रह करावे; परंतु ते शब्द विशेषणें असल्यास ते बहुव्रीहिसमास होतात. 'दोहोंनीं आहे पट ज्याची,' 'पांचांनीं आहे पट ज्याची,' असे ते सोडवावे. उदा०–'आठांची दुप्पट करा.' यांत दुप्पट हा शब्द नाम असल्यामुळें तो तत्पुरुष समास आहे. 'अ बच्या दुप्पट काम करितो.' या वाक्यांत 'दुप्पट' शब्द विशेषण असल्यामुळें तो बहुव्रीहिसमास होतो.

२९७. सव्वा ( सपाद ) दोन, साडेतीन ( सार्धतीन ), पावणेचार ( पाव उणेचार ), हे कर्मधारय समास होत; कारण यांतील पहिलीं पदें विशेषणें आहेत.

२९८. 'एकवीस' ( एक आणि वीस ), 'बावीस' ( बा, बे,–दोन आणि वीस ), 'तेवीस' इत्यादि शब्द **द्वंद्वसमास** समजावे; परंतु 'एकोणीस' ( एकानें उणे वीस ), 'एकुणतीस' ( एकानें उणे तीस ),' इत्यादि कर्मधारय समास होत. कारण पहिलीं पदें विशेषणें आहेत.

२९९. एकाच सामासिक शब्दाचे पुष्कळ वेळां भिन्न भिन्न अर्थ संभवतात; तेव्हां अर्थानुरोधानें त्याचे समासही भिन्न भिन्न होतात. उदाहरणार्थ–'सत्यव्रत' हा समास तीन प्रकारांनीं सोडवितां येईल. जसें,–'सत्याचें जेंव्रत तें सत्यव्रतः' (षष्ठीतत्पुरुष); 'सत्य असें जें व्रत तें सत्यव्रत. (कर्मधारय); व 'सत्य हेंच आहे व्रत ज्याचें तो सत्यव्रत' (बहुव्रीहि). त्याचप्रमाणें 'यशोधन,' 'पीतांबर,' हे समास कर्मधारय किंवा बहुव्रीहि होतील; आणि 'गजानन,' हा तत्पुरुष किंवा बहुव्रीहि असेल. अशा वेळीं संदर्भ पाहून अर्थाला जुळेल तो समास करावा.

३००. केव्हां शब्दाचा अर्थ एकच असून त्याचे समास मात्र अनेक प्रकारांनीं करितां येतात. उदा०–' लक्ष्मीकांत, '--'लक्ष्मीचा जो कांत तो;' किंवा 'लक्ष्मी आहे कांता ज्याची तो. ' पहिला तत्पुरुष व दुसरा बहुव्रीहि. असे दोन प्रकारचे जरी विग्रह झाले तरी दोहोंचा अर्थ 'विष्णु' असा एकच आहे.

**टीप**—तत्पुरुष, कर्मधारय, द्वंद्व, द्विगु, बहुव्रीहि या संस्कृत शब्दांना मूळचा कांहीं विशेष अर्थ असेल. पण आतां ते शब्द केवळ विशेषनामासारखे झाले असून त्या प्रत्येकावरून विशिष्ट जातीचा समास इतकाच अर्थ होतो.

---

# भाग तिसरा.

## प्रकरण १८.

### वाक्य-विचार.

३०१. **वाक्य** हा शब्द वच्=बोलणें, या धातूपासून झाला असून, त्याचा अर्थ, जे बोललेलें किंवा बोलावयाचें तें, असा आहे. बोललेले शब्द अर्थानें पूर्ण असल्यावांचून त्यांस **वाक्य** म्हणतां येणार नाहीं. [ कलमें १४ ते १६ पाहा. ]

३०२. प्रत्येक वाक्यांत दोन भाग मुख्य असतात; एका भागावरून आपण ज्या कशाविषयीं बोलतों, त्याचा बोध होतो; आणि दुसऱ्यावरून त्याविषयीं आपण जें काय म्हणतों, तें समजतें. [ क० १३. ]

३०३. वाक्यांत ज्याविषयीं आपण बोलतों त्यास **उद्देश्य** असें म्हणतात. व जें कांहीं त्याविषयीं आपण सांगतों, तें **आख्यात** किंवा **विधेय** होय. उदा०—' घोडा चालतो. ' यांत ' घोडा ' या विषयीं आपण ' चालतो ' असें सांगितलें. म्हणून ' घोडा ' हें **उद्देश्य**; आणि त्या उद्देश्याबद्दल आपण ' चालतो ' हें सांगितलें, म्हणून हें **आख्यात** किंवा **विधेय** होय. त्याचप्रमाणें, ' रामानें पत्र लिहिलें. ' या वाक्यांत ' लिहिलें ' हे ' पत्र याविषयीं सांगितलें. म्हणून ' पत्र ' **हें उद्देश्य** आणि ' लिहिलें ' हें **विधेय**. [ क० १७ पाहा. ]

**टीप** १—वाक्यांत आपण विधेयाच्या साह्यानें जें विधान करितों, तें क्रिया करणारा म्हणजे कर्ता याबद्दल असतें, अथवा कर्माबद्दल असतें. म्हणजे **कर्ता** उद्देश्य असतो अथवा **कर्म** उद्देश्य असतें, त्याप्रमाणें वाक्याचा कर्तरिप्रयोग अथवा कर्मणिप्रयोग असतो.

**टीप** २—जें कांहीं आपण बोलतों तें अर्थानें पूर्ण होण्यास, ' ज्याविषयीं आपण कांहीं बोलतों तें, ' व ' त्याविषयीं आपण जें कांहीं बोलतों तें, ' अशा

दोन गोष्टी पाहिजेत. या दोन गोष्टी असल्यावांचून कोणतेंही वाक्य पूर्ण होणार नाहीं; म्हणून **उद्देश्य** व **विधेय** असे वाक्याचे दोन अत्यंत आवश्यक अवयव झाले. [ क० १५ पाहा ].

३०४. वाक्यांचे भेद दोन प्रकारांनीं करितां येतातः–( १ ) अर्थावरून व ( २ ) रचनेवरून.

३०५ अर्थावरून वाक्यांत भेद निरनिराळ्या कारणांवरून निरनिराळे करितां येतील. प्रथमतः **विधानार्थक** वाक्य व **प्रश्नार्थक** वाक्य असे दोन भेद होतात.

३०६. ज्या वाक्यांत 'अमुक गोष्ट अगर स्थिति आहे किंवा नाहीं, इतकेंच नुसतें सांगितलेलें असतें, त्यास **विधानार्थक** वाक्य असें म्हणावें. उदा०—'त्याच्या शेतांत ऊंस पिकतो.' 'आज पाऊस पुष्कळ पडला.' 'त्यानें आपला धडा केला नाहीं.' पृथ्वी सूर्याभोंवती फिरते.' इ०.

३०७ ज्या वाक्यांत एकादा प्रश्न विचारलेला असतो, किंवा चवकशी केलेली असते, त्यास **प्रश्नार्थक** वाक्य असें म्हणतात. उदा०—'त्याच्या शेतांत ऊंस पिकतो काय ?' 'आज येथें पाऊस पुष्कळ पडला काय ?' 'त्यानें आपला धडा केला नाहीं काय ?' 'पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरत नाहीं म्हणतां ?' 'तूं आज कां गेला नाहींस ?' 'पृथ्वीला किती उपग्रह आहेत ?' 'आज पाऊस पडेल ?'

**टीप**—वाक्यांत प्रश्नार्थक सर्वनाम किंवा अव्यय असलें म्हणजे तें वाक्य प्रश्नार्थक आहेत असें समजावें. किंवा ते केवळ अर्थावरून किंवा बोलणाराच्या झोंकावरूनही ओळखतां येतें. लिहिण्यांत अशा वाक्यांपुढें प्रश्नचिन्ह ( ? असें ) घालितात.

३०८. वाक्याचे आणखी **करणरूपी** किंवा **सत्तावाची** व **अकरणरूपी** किंवा **निषेधार्थी** असे भेद होतात. ज्या वाक्यांत 'होय किंवा आहे' असा अर्थ असतो तें **करणरूपी** किंवा **सत्तावाची** वाक्य होय;व ज्यांत नकाराचा किंवा 'नाहीं' असा अर्थ असतो, तें वाक्य **अकरणरूपी** किंवा **निषेधार्थी** समजावें. उदा० 'तो गेला.' 'तो धडे करतो काय ?' हीं वाक्यें **करणरूपी** आहेत; व 'तो गेला नाहीं.' 'तो धडे करीत नाहीं काय ?' हीं अकरण-रूपी आहेत.

**टीप**—जुन्या व्याकरणपद्धतींत 'करणरूप' किंवा 'अकरणरूप' असे क्रियापदाचे भेद मानिले आहेत, परंतु अकरणरूप होण्यासाठीं क्रियापदास प्रत्यय लागत नाहीं, किंवा त्याचें विशेषरूप बनत नाहीं. यासाठीं हे प्रकार क्रियापदाच्या रूपाचे नसून वाक्याच्या अर्थाचे आहेत. मराठींत क्रियापदाचें करणरूप किंवा अकरणरूप नसून त्या गोष्टी वाक्याच्या असतात. 'नाहीं,' 'नसतो,' वगैरे अर्थाला अकरणरूपी क्रियापदें आहेत, पण तीं स्वतंत्र क्रियापदें आहेत. तेव्हां क्रियापदाचें रूप सांगतांना हे प्रकार सांगण्याचें कारण नाहीं. वाक्याचे प्रकार सांगतांना ते सांगावे.

३०९. अर्थावरून वाक्याचे (१) **आज्ञार्थक**, (२) **विध्यर्थक**, (३) **संशयार्थक** व (४) **संकेतार्थक** असेही आणखी भेद होतात.

३१०. आज्ञार्थक वाक्यांत आज्ञा केलेली असते, अगर परवानगी दिली किंवा विचारली असते. उदा०—'तुम्ही घरीं जा.' 'मी जाऊं?' 'तूं बैस.' आम्ही पत्र वाचूं का?' 'मुलगे बसोत.' 'तो जावो.' इ०.

(अ) ज्या वाक्यांत प्रार्थना केलेली असते, अगर आशिर्वाद किंवा शाप दिलेला असतो, तें वाक्यही आज्ञार्थक होय. उदा०—'देवा, राजाचें रक्षण कर.' 'परमेश्वर आमचें बरें करो.' 'तुझें कल्याण असो किंवा होवो.' 'तुझें तळपट होवो.' 'दुष्टा, मर एकदांचा.'

३११. विध्यर्थक वाक्यांत आज्ञा, उपदेश, प्रार्थना, संशय, अटकळ किंवा अजमास इत्यादि असतात. उदा०—'त्वां जावें.' 'मुलांनीं अभ्यास करावा.' यजमानांनीं वास्तविक आमचेवर कोप न करावा.' 'एवढें आपण करावें.' आज पाऊस पडावा.' 'तो आज परत यावा.'

**टीप**—विध्यर्थक वाक्यांत जी 'आज्ञा' असते ती बरीच सौम्य असते, पण आज्ञार्थक वाक्यांत जी असते तींत अधिकाराचा भाग विशेष असतो. उदा० तुम्हीं आतां घरीं जावें.'–(विध्यर्थक). 'तुम्ही आतां घरीं जा.'–(आज्ञार्थक).

३१२. आज्ञार्थ व विध्यर्थ हे वस्तुतः अर्थाला सारखेच असतात, परंतु त्यांत होणारीं क्रियापदरूपें मात्र भिन्न असतात हें लक्षांत येईलच. आज्ञार्थक वाक्याचा कर्तरिप्रयोग व विध्यर्थक वाक्याचा त्याच अर्थी कर्मणिप्रयोग

किंवा भावेप्रयोग असतो. उदा०—'तूं काम कर.' 'त्वां काम करावें.' 'तूं घरीं जा.' 'त्वां घरीं जावें.' इ०.

३१३. संशयार्थक वाक्यांत संशय, अटकळ, इत्यादि दिसून येतात. उदा०—'तो वाचीत असेल.' 'त्यानें तुला हें दिलें असेल.' 'तो चोर असावा.'

'असेल अथवा पिंजऱ्यापाशीं उभी पुसत मैनेला,
का गे आठवतो तुजला तो प्राणसखा रंगेला?' —मेघदूत.
'केला असेल गरुडें गर्व पुन्हा काय त्याच बैलासी?' —मोरोपंत.

**टीप**—संशयार्थक वाक्य होण्यासाठीं क्रियापदाचें विशेष रूप होत नाहीं. हा केवळ वाक्यार्थावरून उत्पन्न होणारा प्रकार आहे, हें लक्षांत ठेवावें.

३१४. संकेतार्थक वाक्यांत एक विधान दुसऱ्यावर अवलंबून असतें, म्हणजे त्यांत कांहीं तरी अट असते. उदा०—'तो जाता तर हरी येता किंवा आला असता.' 'तुम्ही प्रयत्न कराल तर थोर व्हाल.' 'टांकीचे घाव सोसले तर देवकळा येते.'

'असतों जरि मी, तरि न व्यसनमळें धर्मपादतळ मळतें.'
—मोरोपंत.

३१५. ज्या वाक्यांत आज्ञार्थ, विध्यर्थ, संशयार्थ, किंवा संकेतार्थ नसतो, त्यास, तें वाक्य इतर वाक्यांपासून ओळखतां यावें किंवा त्याला कांहीं नांव असावें म्हणून, **स्वार्थी वाक्य** असें म्हणतात. स्वार्थ म्हणजे मूळची किंवा स्वाभाविक स्थिति.

३१६. रचनेवरून वाक्याचे तीन भेद होतात. ते असेः—

(१) **शुद्धवाक्य** (२) **मिश्रवाक्य** व (३) **संयुक्तवाक्य**.

३१७. शुद्ध वाक्यांत एकच उद्देश्य व एकच विधेय असतें. जसेंः—'तो चपल घोडा वाऱ्यासारखा गेला.' 'तुम्हां राजद्रोह्यांना मी भेटूं इच्छित नाहीं.'

३१८. मिश्र वाक्यांत एक मुख्य उद्देश्य व एक मुख्य विधेय असतें; परंतु तदवलंबी अशीं दुसरीं उद्देश्यें व विधेयें असतात. जसें,—'जो मुलगा मीं पाहिला तो हाच.' 'ज्या घोड्यावर तो बसला आहे, तो काळा आहे.' इ०.

३१९. मिश्र वाक्यांत एक **प्रधानवाक्य** असतें, व त्यांत एकंदर वाक्याचा मुख्यार्थ असतो. बाकीचीं वाक्यें **गौणार्थद्योतक** असतात; त्यांस **अवलंबी वाक्यें** असें म्हणतात. उदा०—' तुम्हांस असें वाटतें ही तुमची चूक आहे. ' या वाक्यांत ' ही तुमची चूक आहे, ' हें प्रधान वाक्य होय; व ' तुम्हांस असें वाटतें, ' हें अवलंबी वाक्य आहे.

३२०. अवलंबी वाक्यें नामाचें, विशेषणाचें, किंवा अव्ययाचें काम करितात, त्या-त्याप्रमाणें त्यांस **नामवाक्य, विशेषणवाक्य** किंवा **अव्यय-वाक्य** असें म्हणतात. उदा०—' मला ठाऊक आहे, कीं तो येणार आहे. ' यांत, ' तो येणार आहे, ' हें **नामवाक्य.** ' जो मुलगा मीं पाहिला तो हाच आहे. ' यांत ' जो मुलगा मीं पाहिला, ' हें वाक्य ' तो ' याचें विशेषण आहे, म्हणून, तें **विशेषणवाक्य** होय. ' तुम्ही सांगाल तिकडे मी जाईन. ' यांत तुम्ही सांगाल ' हें **अव्ययवाक्य** आहे.

३२१. जेव्हां दोन अथवा अधिक प्रधानवाक्यें समुच्चयार्थक उभयान्वयी अव्ययांनीं जोडलेलीं असतात, तेव्हां त्या एकंदर वाक्याला **संयुक्तवाक्य** असें म्हणतात. अशीं जोडलेलीं वाक्यें शुद्ध किंवा मिश्र असतात. परंतु मुख्य गोष्ट म्हटली म्हणजे उभयान्वयी अव्ययांनीं जोडलेलीं वाक्यें प्रधान किंवा स्वतंत्र असतात. गौणार्थद्योतक किंवा अवलंबी नसतात. उदा०—' तो घरीं आला आणि तसाच परत गेला. ' ' या पक्ष्यास कोणीं तरी गोळी घातली असावी अथवा धोंडा मारिला असावा. ' ' तो म्हणाला होता कीं येथें माझी वाट पाहा, म्हणून मी इतका वेळ थांबलों; पण त्याचें सार्थक झालें नाहीं असेंच म्हटलें पाहिजे; कारण तो भलत्याच मार्गानें निघून गेला, असें तुमच्या बोलण्यावरून दिसतें; मी त्याच्या येथें गेलों व पुष्कळ वेळ बसून वाट पाहिली, पण तो भेटला नाहीं. '

**टीप** १—संयुक्त वाक्यांत जीं स्वतंत्र वाक्यें जोडलेलीं असतात, त्यांस **समानवाक्यें** असें म्हणावें.

**टीप** २—वस्तुतः वाक्याचे **शुद्धवाक्य** आणि **मिश्रवाक्य** असे दोनच भेद करावे, आणि संयुक्तवाक्य हा मिश्रवाक्याचाच प्रकार समजावा. असें केल्यानें वाक्यमीमांसेस अधिक सुलभपणा येईल असें वाटतें.

२३२. केव्हां वाक्यांत मुख्य क्रियापद नसून धातुसाधित अव्यय किंवा विशेषण याच्या योगानें विधेयाचें किंवा क्रियापदाचें काम होतें. अशा वाक्यांस अपूर्ण वाक्यें किंवा **वाक्यांश** म्हणतात. उदा०—' मी घरीं नसतां तो आला' यांत ' मी घरीं नसतां, ' हा वाक्यांश होय.

२३३. वाक्यांशानें नाम, विशेषण, किंवा अव्यय यांपैकीं ज्याचें काम होत असेल, त्याप्रमाणें त्यास **नामवाक्यांश**, **विशेषणवाक्यांश**, किंवा **अव्ययवाक्यांश** असें म्हणावें. उदाहरणें:—

( अ ) नामवाक्यांश—'बापाचें गांवाला जाणें त्याच्या पथ्यावर पडलें.

( ब ) विशेषणवाक्यांश—' वारंवार चोरीत सांपडलेल्या मनुष्यास काळे पाण्यावर पाठवितात. '

( क ) अव्ययवाक्यांश—' अशा प्रकारें वर्तल्यानें त्यानें आपली नाचक्की करून घेतली. '

## कर्ता, कर्म आणि क्रियापद.

२३४. वाक्यघटित शब्दांत क्रियापद मुख्य होय. तें उक्त असेल किंवा अध्याहृत* असेल. पण तें ज्यांत नाहीं तें वाक्यच होणार नाहीं. जसें,—' तो काम करितो. ' ' त्यानें चित्र काढिलें. ' या दोन्ही वाक्यांत क्रियापदें उक्त आहेत. परंतु—

' स्नान, संध्या, टिळे, माळा, पोटीं क्रोधाचा उमाळा,
नित्यनेम, खटाटोप, मनीं विषयाचा जप. ' —रामदास.

यांत क्रियापद उक्त नाहीं; तथापि येथें ' आहे ' किंवा ' आहेत' यांचा अध्याहार आहे. तसेंच,—

' गांगेय म्हणे, सुभगे, धर्म परम सूक्ष्म, यास्तव स्पष्ट—
ऐसेंच असें मजला वदवेना, हा विचार बहु कष्ट. '—मोरोपंत.

---

* पुष्कळदां वाक्यांत ज्या शब्दाची जरूर असते, असा शब्द घातलेला नसतो; कारण तो न घातला तरी स्पष्ट कळण्यासारखा असतो. अशा शब्दाला **'अध्याहृत'** असें म्हणतात; व अशा रितीनें शब्द वगळणें याला **'अध्याहार'** असें म्हणतात.

यांत ‘ आहे ’ हें क्रियापद अध्याहृत आहे. ‘तुम्ही आमचे धनी, तुमच्या कृपेनें आमची थोरवी, आणि तुम्हीच आमचा त्याग कराल तर कसें !’ यांतही अध्याहार आहे. अशीं उदाहरणें अनेक देतां येतील.

३२५. प्रत्येक वाक्यांत कर्ताही अवश्य पाहिजे; परंतु ज्या वाक्यांत अकर्तृक क्रियापद ( क० १९९ पाहा ) असतें, त्यांत अर्थात् कर्ता नसतो. जसें,— ‘ हल्लीं साडेपांच वाजतां उजाडतें. ’ ‘ मला मळमळतें. ’ ‘ त्याला आज फावणार नाहीं. ’ इत्यादि. या वाक्यांत कर्तृपदाचा समावेश क्रियापदांतच होत असल्यामुळें, निराळा कर्ता नाहीं. या वाक्यांस, ‘ हल्लीं साडेपांच वाजतां उजाडणें होतें. ’ ‘ मला मळमळ करते. ’ ‘ त्याला आज फावणें होणार नाहीं.’ असें स्वरूप देऊन पाहिजे तर कर्ता सांगावा.

३२६. आज्ञार्थी द्वितीय पुरुषी क्रियापद वाक्यांत असतां बहुधा कर्ता गुप्त असतो. उदा०—‘ जा आतां घरीं. ’ ‘ उगाच बैस.’ ‘ खोटें बोलूं नको.’ इत्यादि. अशा वाक्यांत विशेष स्पष्टपणासाठीं किंवा निकडीची आज्ञा आहे हें दाखविण्यासाठीं कर्ता घालितात. उदा०—‘ रामा नको, तूंच जा. ’ इ०.

३२७. प्रथम किंवा द्वितीयपुरुषवाचक सर्वनाम वाक्यांत कर्ता असतां तो अध्याहृत ठेवितात; कारण क्रियापदाच्या रूपावरून कर्त्याचा बोध होतो जसें,—

‘ नसेन **दिसलों** कसा, नयन सर्वसाक्षी रवी ? ’
‘ घालूं **पाहसि** दंष्ट्रा उपडाया अहिमुखांत आंगोळी, ’
‘ जा, जा, उठा, मुलीला, **पाहूं**, **वाहूं**, वरा, घरा आणा. ’

—मोरोपंत.

३२८. एकाद्या सुप्रसिद्ध किंवा साधारणतः सर्वत्र आढळणाऱ्या गोष्टीचें तृतीयपुरुषीं सामान्येंकरून विधान करावयाचें असतां, कर्ता घालीत नाहींत. अशा वाक्यांत क्रियापद अनेकवचनी असतें. जसें,—‘असें **सांगतात** कीं, पूर्वी खतें लिहून घेतल्यावांचून कर्ज देत. ’

‘अगा प्रणतवत्सला [ लोक ] **म्हणाति** त्या जनां पावलां. ’
‘ **म्हणाति**, मनुष्य नव्हे हा राक्षस कीं काळ हा खवळला हो.

—मोरोपंत.

३२९. संबंधी सर्वनाम कर्तृपदस्थानीं असून त्याच्यापुढें दर्शक सर्वनाम आलें असलें, तर तें संबंधी सर्वनाम बहुधा गाळितात. जसें,—'गर्जेल तो पडेल काय?' 'करील तो भरील.' 'व्हायचें तें झालें.' 'जाणारे ते गेले.' इत्यादि.

३३०. कर्मणि किंवा भावी प्रयोगांत कर्तृपदाचा म्हणजे क्रियाकर्तृत्व-दर्शक शब्दाचा वाक्यांत क्रियापदाशीं संबंध नसतो; म्हणून क्रिया अमक्यानें केली असें सांगण्याची गरज नसतां कर्तृपद गुप्त असतें. उदा०—'पानें वाढलीं, जेवावयास उठा.' 'आर्जव केलें असतां कोण वळत नाहीं?' 'एक काम सांगितलें तर ऐकशील का?' 'सांगितल्याप्रमाणें केलें तर मग काय राहिलें?' इ०.

३३१. क्रियापद सकर्मक असल्यास वाक्यांत नेहमीं कर्म पाहिजे. परंतु कित्येक सकर्मक क्रियापदांचा कर्मावांचून उपयोग करितात. जसें;—'जेव्हां पाहावें तेव्हां रामा वाचीत असतो.' 'ती संध्याकाळीं शिवीत बसते.' 'तो चांगला गातो.' 'मी रात्रीं दिव्याजवळ बसून कधीं लिहीत नाहीं, वाचतों.' म्हणजे 'लिहिण्याचें काम करीत नाहीं, वाचण्याचें करितों.' असा अर्थ.

**टीप १**—वस्तुतः अशा वाक्यांतील क्रियापदास कर्माची अपेक्षाच नसते, कर्मावांचून त्यांचा अर्थ पूर्ण असतो; म्हणून त्यांस अकर्मक क्रियापदेंच म्हणणें प्रशस्त जाणावें.

**टीप २**–वाक्याच्या मुख्य अवयवांपैकीं एकादा गाळलेला किंवा अध्याहृत असतां, त्या वाक्यास संक्षिप्त वाक्य असें म्हणतात. जसें,—'माझे वडील घरीं आले आणि पुनः लगेच बाहेर गेले.' 'मी फळें विकत घेतलीं आणि मुलांना वांटून दिलीं.' 'विद्यार्थी शाळेंत जातात आणि तेथें आपले धडे करितात.' इ०.

---

# प्रकरण १९.

## प्रयोगविचार.

३३२. वाक्याची विवक्षित प्रकारची रचना असते, हें मागें सांगण्यांत आलेंच आहे. ( क० २१४ )

**वाक्यांत कर्तृदर्शक किंवा कर्मदर्शक शब्द याचे अनुरोधानें क्रियापदाची स्थिति असणें, म्हणजे त्याच्या पुरुष–लिंग–वचनांप्रमाणें क्रियापदाचें पुरुष–लिंग–वचन असणें, याला प्रयोग असें म्हणतात.**

**टीप**—' प्रयोग ' हा शब्द ' युज् '=जुळणें, योजना करणें, या धातूपासून मागें ' प्र ' हा उपसर्ग लागून झाला आहे. यावरून ' प्रयोग ' या शब्दाचा अर्थ, नीट रितीनें केलेली ' जुळणी ' किंवा 'रचना' असा आहे. अर्थात् सर्व-नामाची किंवा विशेषणाची नामाशीं जुळेल अशी व्यवस्था करणें, यासही प्रयोग म्हणतां येईल. परंतु वाक्यांत कर्तृपददर्शक अथवा कर्मदर्शक पदाशीं जी क्रियापदाची जुळणी, तीसच प्रयोग अशी संज्ञा देतात.

३३३. आपण बोलतों तेव्हां कर्त्याविषयीं किंवा कर्माविषयीं कांहीं तरी सांगतों. जेव्हां आपण कर्त्याविषयीं बोलतों, किंवा आपल्या बोलण्यांत जेव्हां आपण कर्त्याला प्राधान्य देतों, तेव्हां कर्तृवाचक जो शब्द असेल, त्याच्या अनुरोधानें किंवा त्याशीं जुळेल असें क्रियापदाचें रूप घालतों. जेव्हा आपण कर्माविषयीं बोलतों, किंवा आपल्या बोलण्यांत जेव्हां कर्माला प्राधान्य असतें, तेव्हां कर्मवाचक शब्दाच्या अनुरोधानें किंवा त्याशीं जुळेल असें क्रियापदाचें रूप आपण योजतों. अर्थात् वाक्यांत क्रियापदाचें रूप पुरुष-लिंग–वचनांत कर्तृपदाशीं किंवा कर्माशीं जुळलेलें असतें.

३३४. या दोन प्रकारांशिवाय आणखी एका प्रकारची वाक्यरचना मराठींत असते. तींत आपण कर्ता किंवा कर्म यांपैकीं एकासही उद्देशून न बोलतां केवळ क्रियार्थ म्हणजे क्रियेचा भाव यास प्राधान्य देऊन बोलतों.

अशा वाक्यांत क्रियापद नेहमीं स्वावलंबी, स्वतंत्र असतें, म्हणजे तें निरंतर तृतीयपुरुषी, नपुंसकलिंगी एकवचनी असतें.

३३५. याप्रमाणें प्रयोग तीन होतातः–( १ ) **कर्तरिप्रयोग**, ( २ ) **कर्मणिप्रयोग**, आणि ( ३ ) **भावेप्रयोग**.

**टीप**–प्रयोगाचे व्यवस्थेकडे नीटपणें लक्ष न देतां मराठींत अनेक प्रकारचे प्रयोग मानण्याची चाल पडली आहे. परंतु प्रयोग मानण्याचें कारण काय, याचा विचार केला असतां प्रयोग किती मानावे, याचा निर्णय सहज होईल. प्रयोग मानण्याचीं मुख्य कारणें दोन; एक कर्त्याविषयीं विधान करणे आणि मग कर्तृदर्शकशब्दानुरूप क्रियापद असणें, व दुसरें कर्माविषयीं विधान करणें आणि कर्मदर्शक शब्दानुरूप क्रियापद असणें. या दोन्ही कारणांचा अभाव, म्हणजे कर्तृदर्शक किंवा कर्मदर्शक शब्दानुरूप क्रियापद नसणें हें प्रयोगाचें तिसरें कारण मराठींत संभवतें तर याप्रमाणें प्रयोग होण्याचीं फक्त तीन कारणें आहेत. तेव्हां तिहींपेक्षां जास्त प्रयोग होणें अशक्य आहे. प्रत्येक वाक्याचा जर यांपैकीं कोणत्या तरी एका व्यवस्थेंत समावेश होत आहे, तर अधिक प्रयोग मानण्याचें कारणही नाहीं, असें उघड दिसून येईल.

३३६. प्रयोगांच्या व्याख्याः—

( १ ) वाक्यांत कर्ता आणि कर्म यांचें लिंग, वचन आणि पुरुष यांच्या अनुरोधानें क्रियापदाची जी व्यवस्था असते, तिला **प्रयोग** असें म्हणतात.

( २ ) जेव्हां वाक्यांत आपण कर्त्याला उद्देशून बोलतों आणि कर्तृदर्शक शब्दाच्या अनुरोधानें क्रियापदाची स्थिति असते, म्हणजे त्याच्या लिंग-वचन-पुरुषांप्रमाणें क्रियापदाचें लिंग, वचन व पुरुष हीं फिरतात, तेव्हां तो **कर्तरिप्रयोग** होय. जसें,–'तो घरीं असतो.' 'विद्यार्थी पुस्तक वाचितो.' 'ती जाते.' 'मुली घरीं गाणीं गातात.' 'मुलगे भात जेवले.' इ०.

( ३ ) जेथें वाक्यांत आपण कर्माला उद्देशून बोलतों, आणि कर्मदर्शक शब्दाच्या अनुरोधानें क्रियापदाची स्थिति असते, म्हणजे त्याच्या लिंग-वचन-पुरुषांप्रमाणें क्रियापदाचें लिंग, वचन व पुरुष हीं फिरतात, तेव्हां तो **कर्मणिप्रयोग** होय. जसें,—'त्यानें पुस्तक वाचिलें.' 'रामानें गाई बांधिल्या.' 'मुलींनीं गाणीं म्हटलीं.' 'मी पत्र लिहिलें.' इ०.

( ४ ) जेथें वाक्यांत कर्तृदर्शक किंवा कर्मदर्शक पदाच्या अनुरोधानें क्रियापदाची स्थिति नसून, तें निरंतर स्वावलंबी असतें, म्हणजे त्याचें रूप नेहमीं तृतीयपुरुषी, एकवचनी व नपुंसकलिंगी असतें, तेथें **भावेप्रयोग** जाणावा. उदा०—'रामानें रावणास मारिलें.' 'त्यानें घरीं जावें.' इ०.

**टीप**—१-वाक्यांत ज्या शब्दाशीं क्रियापद जुळतें, तो शब्द उद्देश्य होय. त्याला उद्देशून वाक्यांत विधान केलेले असतें. कर्तरिप्रयोगांत कर्तृदर्शक शब्द उद्देश्य असतो आणि कर्मणिप्रयोगांत कर्मदर्शक शब्द उद्देश्य असतो. भावे प्रयोगांत उद्देश्यदर्शक शब्द नसतो. कारण त्याचा क्रियापदांतच अंतर्भाव होतो. उद्देश्यदर्शक शब्द निरंतर प्रथमान्त असतो. ( क० १७ पाहा. )

**टीप २**—कर्तरि आणि कर्मणि हे शब्द मूळचे कसे झाले, व त्यांचा अर्थ काय, हें मागें सांगितलेंच आहे. ( क० २१४, इ, टीप ). 'भावे-प्रयोग' यांतही 'भावे' ही भाव याची सप्तमी आहे. 'भाव' यास म्हणजे क्रियार्थास अनुसरून क्रियापदाची रचना. भावी-प्रयोग' असा शुद्ध मराठी शब्द बनविण्यास चिंता नाहीं.

## ( १ ) कर्तरिप्रयोग.

३३७. कर्तरिप्रयोगांत कर्तृदर्शक शब्द प्रथमान्त असतो. हा प्रयोग सकर्मक व अकर्मक अशा दोन्ही प्रकारच्या क्रियापदांवरून होतो. क्रियापद सकर्मक असल्यास वाक्यांत कर्म असून तद्दर्शक शब्द द्वितीयान्त असतो. उदा०—'रामा पुस्तक वाचितो.' 'हरी बसतो.' 'गडी गाईला बांधील.' 'मूल रडतें.' 'सूर्य उगवला.'

३३८. द्वितीया विभक्ति प्रथमेप्रमाणें प्रत्ययविरहीत असते, किंवा 'स, ला, तें' इत्यादि प्रत्यय लागून होते. पहिली **अ-प्रत्यय द्वितीया** व दुसरी **स-प्रत्यय द्वितीया**. जसें,—'रामा **ब्राह्मण** किंवा **ब्राह्मणास** बोलावितो.' 'गोपाळा **गाय** किंवा **गाईस** हांकितो.' 'मी **पत्र** लिहीन.' [ कलम १५३, द्वितीया, इ. पाहा ].

३३९. कर्तरिप्रयोगांत क्रियापद सकर्मक असल्यास कर्मपदाची द्वितीया विभक्ति अ-प्रत्यय केव्हां करावी व स-प्रत्यय केव्हां करावी, याविषयींचे नियम असे आहेतः—

( १ ) मनुष्यवाचक विशेषनाम किंवा त्याचें सर्वनाम कर्मपद असल्यास स-प्रत्यय द्वितीया योजितात. जसें –'तो रामास बोलावितो.' 'मी विष्णूस भेटेन, व त्यास हें सांगेन.' 'अर्जुन जयद्रथास गांठून त्यास मारणार, असें कौरवांस वाटलें.' इ०.

( २ ) कर्मपद हें मनुष्येतर प्राणिवाचक नाम, मनुष्यवाचक सामान्यनाम, किंवा त्याचें सर्वनाम असल्यास द्वितीया कोणत्याही प्रकारें करितां येते. जसें,—'यमुना मैना किंवा मैनेस पाळिते.' 'हरी आपला चाकर किंवा आपल्या चाकरास गांवाला पाठवील.' 'तो आपला मुलगा किंवा आपल्या मुलग्यास पुण्यास धाडील आणि तेथें त्यास शाळेंत घालील.' 'मी आपला मुलगा शाळेंतून काढिला आहे, तो किंवा त्यास पुढील महिन्यांत शाळेंत घालीन.' 'विनू तो किंवा त्यास पाठवील.' 'मोतद्दार घोडा किंवा घोड्यास आणील.' 'रामा शेळ्या किंवा शेळ्यांस राखतो.' 'मी लोक किंवा लोकांना बोलावितों.' इ०.

( ३ ) कर्मपद निर्जीवपदार्थवाचक नाम किंवा त्याचें सर्वनाम असेल, तर त्याची द्वितीया अ-प्रत्यय असते. उदा०—'गोपाळा दूध पितो.' 'यमुना चोळी शिवते.' 'मी पुस्तक वाचितों.' इ०.

( ४ ) या तिन्ही नियमांचीं आणखी उदाहरणें:—'तूं पुस्तक देणार होतास तें दे.' 'काल रामा आला होता, त्यालाच आज बोलाव.' 'काल जो शिंपी आला होता तोच किंवा त्यालाच आज आण.' 'जो घोडा पसंत झाला आहे

तोच किंवा त्यास तो घेईल ' 'ही शालजोडी चांगली आहे, ती तो खुपीनें स्वीकारील. ' इ०.

( ५ ) ' धर्म द्रौपदी पणास लावितो. ' ' लक्ष्मण सीता वनांत सोडून गेला. ' ' आज रावण सीता चोरील. ' ' अर्जुन आज कर्ण मारील. ' या वाक्यांत द्रौपदी, सीता, व कर्ण या मनुष्यवाचक विशेषनामांची अ-प्रत्यय द्वितीया योजिली आहे, व तें वरील नियमाविरुद्ध आहे. यासंबंधानें साधारणतः असा नियम दिसतो कीं, पौराणिक कथा किंवा ऐतिहासिक गोष्टी सांगतांना किंवा नाटकांतील भाषेंत असे प्रयोग होतात. त्यांतील हेतु असा दिसतो कीं, ते ते प्रसंग आतांच घडले, घडत आहेत किंवा घडतील असें भासावें.

( ६ ) वाक्यांत दोन कर्में असून त्यांतलें एक जेव्हां संप्रदानार्थक म्हणजे चतुर्थ्यन्त असतें, तेव्हां कर्मपद जरी मनुष्यवाचक विशेषनाम किंवा त्याचें सर्वनाम असलें तरी त्याची अ-प्रत्यय द्वितीया करितात. उदा०—' मी तुला हरी दाखवितों. ' ' जनक रामास जानकी देतो. ' ' बळराम म्हणतो, सुभद्रा जर अर्जुनास प्रिय आहे, तर मी ती त्यास आनंदानें देतों. '

( ७ ) प्रथम-पुरुषवाचक व द्वितीय-पुरुषवाचक सर्वनामें हीं निर्जीव पदार्थांबद्दल योजलेलीं असलीं, तरी तीं कर्तरिक्रियापदाचीं कर्में असतां त्यांची द्वितीया प्रत्यय लावूनच केली पाहिजे. जसें,—'पृथ्वी विष्णूस म्हणते, भगवन् मला उद्धराल काय ? विष्णु उत्तर करितो, मी तुला वराहरूपानें वर उचलीन.' 'मी तूं पाहीन,' ' तो मी पाहील, ' असले प्रयोग होत नाहींत. तर ' मी तुला पाहीन, ' ' तो मला पाहील, ' असें असावें. परंतु, ' 'मी ती पाहीन, ' हें शुद्ध आहे; कारण कर्म तृतीय-पुरुष-वाचक सर्वनाम आहे.

( ८ ) वरील सर्व नियम कवितेंत पाळतातच असें नाहीं; निर्जीवपदार्थवाचक नामांबद्दल कवितेंत स-प्रत्यय द्वितीया पुष्कळ ठिकाणीं घालितात. जसें,–

' समयीं **पराक्रमातें** करिति शुभयशोधनाश समयज्ञ. '
' बरें तुजचि सोसवे स्तवन, कृत्तिवासा **गरा**,
न पी तरि कसें घडे हितकरा, दयासागरा. '
' परि प्रभुहि संग्रहीं **सकलवस्तुला** ठेविती,
**गुणा** न म्हणतां उणा-अधिक आदरें सेविती. '

'शल्य सुयोधन-वाक्यें कोपे, चोळी करें करा, डोळे—
आरक्त करी, चावे अधरातें, फार तो मनीं पोळे.' —मोरोपंत.

**टीप**—यासंबंधाची भाषेची मूळची व स्वाभाविक प्रवृत्ति सर्वत्र स-प्रत्यय द्वितीया करण्याची असावी; व हा जो भेद झाला तो पुढें झालेला दिसतो. कवितेंतील भाषा जुनी, म्हणून तींत स-प्रत्यय द्वितीयेची प्रवृत्ति विशेष. तंजावराकडील मराठे लोक सतराव्या शतकाच्या आरंभीं त्या प्रांतांत गेले. त्या वेळची मराठी भाषा फारच थोड्या रूपांतरानें अद्याप त्यांच्या वंशजांच्या बोलण्यांत आहे. त्यांच्या भाषेंत साध्या बोलण्यामध्येंसुद्धां निर्जीव पदार्थवाचक शब्दाची स-प्रत्यय द्वितीया करितात. उदाहरणार्थ,–' हरिश्चंद्र राजाची कथा सांगा.' या ठिकाणीं तिकडील मराठी भाषेंत,' हरिश्चंद्र राजाची कथास सांगा.' असें म्हणतात.

## ( २ ) कर्मणि प्रयोग आणि भावे-प्रयोग.

३४०. कर्मणिप्रयोगांत कर्माच्या अनुरोधानें क्रियापद फिरतें. अर्थात् कर्मपद उद्देश्य होतें, व त्याची प्रथमा विभक्ति असते. कर्तृपदाचा क्रियापदाशीं प्रत्यक्ष संबंध नसतो. तें तृतीयान्त ( कधीं चतुर्थ्यन्तही ) असतें. जसें,–' रामा पुस्तक वाचितो ' ( कर्तरि ). 'रामानें पुस्तक वाचिलें ' ( कर्मणि ). ' मला काम करवतें ' ( कर्मणि; कर्तृपद चतुर्थ्यन्त ). ' त्यानें वडिलांची आज्ञा मानिली, त्वांही तशीच मानावी,' ' गुराख्यानें गाई राखिल्या. ' 'विद्यार्थ्यानें आपले धडे केले. ' ' मनुष्यांनीं देवाची भक्ति करावी ' इ०.

**टीप**—धातु सकर्मक असल्याखेरीज हा प्रयोग होत नाहीं. कर्मपदाची प्रथमा झाली म्हणजे त्याचेप्रमाणें क्रियापद असतें, म्हणजे कर्मपद क्रियापदाचीं रूपें पालटणारें होतें. तसेंच हा प्रयोग व भावेप्रयोग क्रियापद ल-प्रत्ययान्त भूतकाळीं किंवा विध्यर्थी असतां मात्र होतात.

३४१. प्रयोजक क्रियापद असतां सकर्मक धातूवरून भूतकाळीं कर्मणि प्रयोग होतोच; परंतु अशा क्रियापदाचा वर्तमान व भविष्यकाळींही कर्मणि प्रयोग होऊन कर्तृपद चतुर्थ्यन्त असतें, किंवा त्याची च प्रत्ययान्त विशेषणाची तृतीया विभक्ति असते. जसें,—' माझ्यानें किंवा मला काम करवतें किंवा करवेल. ' क्रियापद अकर्मक असतां भावेप्रयोग होतो, व कर्तृपद वरचेप्रमाणेंच असतें. उदा०–' माझ्यानें किंवा मला जावतें अथवा जाववेल. '

३४२. भावे प्रयोगांत कर्तृपद तृतीयान्त व क्वचित् चतुर्थ्यन्त असतें; व क्रियापद स कर्मक असल्यास कर्मपद नेहमीं स-प्रत्यय द्वितीया विभक्तींत असतें, जसें,–' रामानें रावणास मारिलें. ' ' त्यानें आपल्या चाकरास धाडिलें. ' ' मला जाववतें. ' ' त्यानें जावें. ' इ०.

३४३. भावेप्रयोगांत क्रियापद वाक्यांतील कोणत्याही शब्दाच्या अनुरोधानें न चालतां, तें निरंतर नपुंसकलिंगी, तृतीयपुरुषी, एकवचनी असतें. याचा अर्थ असा कीं, भावेप्रयोगांत क्रियेचा कर्ता किंवा कर्म यांविषयीं मुद्दाम उल्लेख केलेला नसून अमुक अमुक क्रिया झाली, एवढेंच सांगावयाचें असतें. म्हणून या प्रयोगांत उद्देश्य नसतें.

**टीप**—कर्मणिप्रयोगांत क्रियापद सकर्मक असावें लागतें. भावेप्रयोग सकर्मक किंवा अकर्मक दोन्ही प्रकारच्या क्रियापदांवरून होतो.

३४४. सकर्मक क्रियापद भूतकाळीं व विध्यर्थी असतां कर्मणि किंवा भावेप्रयोग होतो, हें मागें सांगितलेंच आहे. परंतु अशा ठिकाणीं कर्मणि प्रयोग केव्हां करावा व भावेप्रयोग केव्हां करावा, याविषयींचे नियम असे आहेतः—

( १ ) निर्जीव पदार्थवाचक नाम किंवा त्याचें सर्वनाम कर्माचे जागीं असल्यास कर्मणिप्रयोग होतो. जसें,–' मीं पुस्तक आणिलें, व तें रामास दिलें. ' ' हरीनें पुस्तक आणावें, व तें रामास द्यावें. ' इ०.

( २ ) मनुष्यवाचक सामान्यनामें व इतर प्राणिवाचक नामें किंवा त्यांचीं सर्वनामें कर्माचे जागीं असतां कर्मणिप्रयोग किंवा भावेप्रयोग करावा. उदा०– ' त्यानें ब्राह्मण बोलवावा किंवा ब्राह्मणास बोलवावें. ' ' शिकाऱ्यानें वाघ मारिला किंवा वाघास मारिलें. ' ' शिकाऱ्यानें वाघ मारावा किंवा वाघास मारावें. ' ' त्यानें चाकर ठेविला, पण तो लगेच काढून टाकिला. ' ' त्यानें चाकराला ठेविलें, पण त्याला लगेच काढून टाकिलें. ' ' त्यानें चाकर ठेवावा व तो लगेच काढून टाकावा. ' ' त्यानें चाकराला ठेवावें व त्यास लगेच काढून टाकावें. ' इ०.

( ३ ) मनुष्यवाचक विशेषनामें व त्यांचीं सर्वनामें कर्माचे जागीं असतां

भावेप्रयोग करावा. जसें,–हरीनें विष्णूस गांवास पाठविलें व त्यास लौकर परत बोलाविलें.' 'हरीनें विष्णूस गांवास पाठवावें व त्यास लौकर बोलवावें.' इ०.

**टीप**—कवितेंत हे नियम पाळितात असें नाहीं. अशीं उदाहरणें पाहिजेत तितकीं सहज आढळण्यासारखीं असल्यामुळें तीं येथें देऊन विस्तार करीत नाहीं.

३४५. अकर्मक धातूवरून भूतकाळीं फक्त कर्तरिप्रयोगच होतो; पण विध्यर्थी अकर्मक धातूवरून कर्तरिप्रयोग किंवा भावेप्रयोग होतो. अकर्मक धातु असतां विध्यर्थी कर्तरिप्रयोग केव्हां करावा व भावेप्रयोग केव्हां करावा, याविषयींचे नियम असे आहेतः—

(१) मनुष्यवाचक विशेषनाम किंवा सामान्यनाम किंवा तद्वाचक सर्वनाम मूळचा कर्ता असतां कोणताही प्रयोग होतो. जसें,—'हरी आज मुंबईहून यावा.' किंवा 'त्यानें आज मुंबईहून यावें.' 'माझा भाऊ आज येथ असावा.' किंवा 'त्यानें आज येथें असावें.' 'रामा यंदा परीक्षेंत पास व्हावा.' किंवा 'त्यानें यंदा परीक्षेत पास व्हावें.' इ०.

**टीप**—यासंबंधानें भाषेचा प्रघात असा दिसतो कीं, अनुमान, संभव, तर्क, किंवा अजमास यांचा अर्थ असतां कर्तरिप्रयोग होतो; व कर्तव्याचा किंवा आज्ञेचा बोध होत असतां भावेप्रयोग करितात. जसें—'रामा आज मुंबईहून यावा' (संभव किंवा अनुमान). 'रामानें आज मुंबईहून यावें.' (कर्तव्य). 'तुम्ही आतां घरीं जावें' (आज्ञा). 'आज पाऊस पडावा' (तर्क अजमास). 'आज पावसानें पडावें,' असें होणार नाहीं.

(२) इतर शब्द कर्तृस्थानीं असतां कर्तरिप्रयोग करावा. जसें,—'घोडा उधळून जावा.' 'झाडावरून पक्षी उडावे.' 'आता हें फळ पिकावें.' 'आज पाऊस यावा.' 'पुस्तक आज जाऊन पोंचावें.' 'शेवटीं असा दिवस यावा ना?'

'शोकें रडतां डोळे जावे, गेले कधीं न यावे गा.'
'कांपावें मन कुजनीं, वृद्धपणीं कापतें जसें शिर तें.' —मोरोपंत.

**टीप**—मनुष्येतर प्राण्यांचीं वाचक सामान्यनामें मूळ कर्तृस्थानीं असतां क्वचित् भावेप्रयोगही होतो. जसें 'घोड्यानें उधळून जावें.' 'झाडावरून

पक्ष्यानें उडावें.' 'आतां या फळानें लौकर पिकावें.' 'पोपटानें बोलावें. मांजरानें चालावेंसें तुला वाटतें का?'

३४६. कर्मणिप्रयोगांत कर्मपद तृतीयपुरुषीं असतें; प्रथम व द्वितीयपुरुषीं कर्मपद गद्यांत फारसें येत नाहीं. कवितेंत मात्र तसें घातल्याचीं उदाहरणें फार आढळतात. जसें,—

'प्रद्युम्न म्हणे केलों पूर्वी ऐसाचि मी हरें काय?'
'प्रेमें रक्षितील सदा म्हणुनि दिल्यें मी ज्यांसि मत्तातें—
ते गंधर्व उपेक्षिति मज, का मारिति न आजि मत्तातें?'–मोरोपंत.
'इंद्रियाची दीनें। आम्ही केलों नारायणें.' –तुकाराम.
'तो तूं मूर्त निरीक्षिलासि नयनीं भाग्योदयें निश्चयें.' –विठ्ठल.
केलासि तूं उभा आजवरी संतीं.
धरविले हातीं कटे दों, देवा.' –तुकाराम.
'त्यातें प्रद्युम्न म्हणे, मायेसि तुम्ही दिलां उपायनसे.'–मोरोपंत.

टीप—याचीं आणखी उदाहरणें मागें दिलीं आहेत [क २१९ (४) पाहा].

३४७. (अ) प्रथम व द्वितीय पुरुषी कर्मपद ज्यांत आहे असे कर्मणिप्रयोग गद्यभाषेंत अगदीं आढळत नाहींत असें नाहीं. जसें—'रोगानें मी फार पिडलों.' 'खरजेनें तूं त्रासलास.' 'तापानें तुम्ही भाजलां.' इत्यादि. या वाक्यांत प्रथम व द्वितीयपुरुषी कर्मपद घातलें आहे. परंतु असे प्रयोग विरळा येतात.

(आ) वरील उदाहरणांतील 'रोगानें,' 'खरजेनें,' 'तापानें,' यांस कोणी करणी तृतीया म्हणतील; पण तें प्रशस्त दिसत नाहीं. कारण वरील वाक्यांचा कर्तरिप्रयोग केला असतां तेच शब्द वाक्यांत क्रियापदाचे कर्ते होतात. जसें,–'रोग मला पिडतो.' 'खरूज तुला त्रासिते.' 'ताप तुम्हांस भाजितो.' इ०.

३४८. क्वचित् कर्मणिप्रयोगांत क्रियापदाला पुरुषवचनांचे विकार कर्त्याच्या, त्याचप्रमाणें कर्माच्याही अनुरोधानें होतात. म्हणजे क्रियापदाला दुहेरी प्रत्यय लागून त्याचें रूप कर्ता व कर्म या दोहोंशीं जुळलेलें असतें. याचीं उदाहरणें

चालू ( गद्य ) भाषेंत त्याचप्रमाणें जुन्या कवितेंतही आढळतात., जसें,—' तूं काम केलेंस.' 'त्यानें त्यास पुस्तक दिलेन्.' 'तुम्ही पुस्तकें वाचलींत.' 'तुम्ही त्यांना पत्रें धाडलींत.' 'तूं त्यास आंबा दिलास.' 'त्यानें तुला पैसे दिलन् किंवा दिलेन् काय?' 'त्यांनीं तुला पुस्तकें दिलेनी कीं नाहीं?' 'तुम्ही त्या गोष्टी वाचल्यात कीं नाहींत?'

'विप्रें कथिलें मज कीं, वत्से लिहिलेस उत्तम श्लोक.'
'द्यूत प्रवर्ततां, तो भूप म्हणे, एकिलास कंकातें.,
कुरु जिंकिले कुमारें, वय तरि अद्यापि उचित अंकातें.'-मोरोपंत.
'दैन्य-वेष कासयासि घेतलात सांगिजे.' —सुदामचरित्र.

( अ ) या उदाहरणांत क्रियापद कर्माशीं जुळून शिवाय त्यास कर्त्याच्या पुरुष-वचनांचेही प्रत्यय लाविले आहेत. अशीं वाक्यें अशुद्ध आहेत असें समजण्याची वहिवाट आहे; पण तीं जर भाषेंत फार दिवसांपासून रूढ झालेलीं आहेत, व जुन्या कवितेंतही जर तीं आढळतात, आणि सुशिक्षित बोलणारेही त्यांचा नेहमीं उपयोग करितात, तर तीं चुकीचीं ठरविणें हें योग्य नाहीं. व्याकरणांत तीं मान्य करणें हेंच रास्त आहे, कारण व्याकरणाचे नियम सांगावयाचे ते भाषेंतील रूढीला अनुसरून सांगावयाचे असतात.

( आ) अशा वाक्यांचा प्रयोग कोणता मानावा, हा प्रश्न येतो. यांत वास्तविक कर्मणिप्रयोग करावयाचा असून, बोलणारा कर्त्याला प्राधान्य देऊन कर्तरिप्रयोग करितो. तथापि ल-प्रत्ययान्त रूप मूळचें कर्मणि विशेषण असल्यामुळें तें लिंगवचनांत कर्माशीं जुळतें; परंतु पुरुषासंबंधानें तें कर्त्याशीं जुळून, कर्त्याच्या वचनासंबंधानेंही त्यांत फेरफार होतात. तेव्हां एकंदर गोष्टींचा विचार करितां ज्या अर्थी अशा रचनेंत कार्याला प्राधान्य देण्याचा बोलणाराचा उद्देश स्पष्ट दिसतो, त्या अर्थी अशा वाक्यांचा कर्तरिप्रयोग मानावा.

( इ ) तृतीयपुरुषीं कर्ता असतां असे प्रयोग होतात, परंतु ते विशिष्ट प्रांतिक भाषेंत ( कोंकणांत ) होतात. तृतीयपुरुषी कर्ता असतां कर्मणिप्रयोगांत क्रियापदाला एकवचनी 'न्' आणि अनेकवचनी 'नी' जोडण्याची पद्धत कोंकणांत आहे. 'त्यानें काम केलेन्.' 'त्यांनीं काम केलेनी.' असें तिकडे म्हणतात. द्वितीयपुरुषीं असे प्रयोग सर्वत्र होतात. पण त्यांत तूं आणि तुम्ही यांची प्रथमा विभक्तिच असते. कारण 'त्वां पुस्तक दिलेंस,' असा प्रयोग होत

नाहीं. तर हें वाक्य ‘ त्वां पुस्तक दिलें, ’ किंवा ‘ तूं पुस्तक दिलेंस, ’ असेंच केलें पाहिजे.

( ई ) क्रियापद विध्यर्थी असतांही असे प्रयोग होतात जसें,–‘तूं हें काम करावेंस. ’ ‘ तुम्ही हीं कामें करावींत. ’ ‘ तूं पुस्तक द्यावेंस. ’ ‘ तुम्हीं पुस्तक द्यावेंत ’ ‘ तुम्ही पुस्तकें द्यावींत. ’ इ०.

३४९. त्याचप्रमाणें पुष्कळांचे बोलण्यांत कर्मपदीं स-प्रत्यय द्वितीयान्त शब्द येऊन क्रियापद त्या शब्दांशीं जुळलेलें असतें. म्हणजे क्रियापद भावी नसून कर्मणि असते. जसें,- ‘ त्यानें आपल्या मुलास शाळेंत पाठविला, ’ ‘ आईनें मुलीला निजविली. ’ तुलाच बोलवावा असें तो म्हणाला. ’ ‘ हरीनें आपल्या चाकराला गांवाला धाडला. ’ ‘ बापाने रामाला शाळेंत घातला आहे. ’ तुम्ही आपल्या मुलाला कोणच्या धंद्यांत घातलात ? ’ ‘ आम्हीं मुलीला कालच सासरीं पाठविली. ’

‘ काय दिनकरा केला कोंबड्यानें खरा ? ’ –तुकाराम.

‘ होहोरे म्हणाने ते वेळा, जगन्निवासें करें धरिला,
चोहों भुजांनीं आलिंगला हरिश्चंद्रास भगवंतें. ’–श्रीधर.

टीप १—हीं वाक्यें वास्तविक अशीं झालीं पाहिजेतः—‘ त्यानें आपला मुलगा शाळेंत पाठविला ’ (कर्मणि ). ‘त्यानें आपल्या मुलास शाळेंत पाठविलें’ ( भावी ). ‘ आईनें मुलगी निजविली ’ ( कर्मणि ). ‘ आईनें मुलीला निजविलें’ ( भावी ). ‘ तुलाच बोलवावें असें तो म्हणाला ’ ( भावी ). ‘हरीनें आपला चाकर गावास धाडला ’ ( कर्मणि ). ‘ हरीनें आपल्या चाकरास गांवांत धाडिलें’ ( भावी ). ‘ बापानें रामा शाळेंत घातला ’ ( कर्मणि ). ‘ बापानें रामास शाळेंत घातलें ’ ( भावी ). ‘ तुम्ही आपला मुलगा कोणत्या धंद्यांत घातला ? ’ (कर्मणि) ‘ तुम्हीं आपल्या मुलास कोणत्या धंद्यात घातलें ? ’ ( भावी ). ‘ आम्हीं मुलगी कालच सासरीं पाठविली ’ ( कर्मणि ). ‘ आम्हीं मुलीला कालच सासरीं पाठविलें ’ ( भावी ).

टीप २–अशा प्रकारचीं वाक्यें अगदीं व्याकरणाच्या नियमास अनुसरून नसलीं, तरी रूढ आहेत, यामुळें त्यांना चुकीचीं असें समजतां कामा नये. त्यांचा कर्मणि प्रयोग समजावा. मात्र यांतील कर्मपदाची द्वितीया विभक्ति असते.

३५० (अ) भावेप्रयोगांत उद्देश्य नसतें असें मागें सांगितलें. वाक्य म्हटलें म्हणजे त्यांत कोणत्या तरी गोष्टींचें विधान पाहिजे, म्हणजे कशाबद्दल तरी बोललें पाहिजे. तेव्हां वाक्यांत उद्देश्य नाहीं असें कसें होईल? अशा प्रकारचा प्रश्न उत्पन्न होणें अगदीं बरोबर आहे. पण तशी जर भाषेची रूढी आहे, तर व्याकरणांत तसा अपवाद मानणें रास्त आहे.

(आ) असे अपवादक प्रकार इतर भाषांतूनही असतात, आणि असावयाचेच. संस्कृतांतल्या भावेप्रयोगांतही उद्देश्य नसतें. 'सूर्येण प्रकाश्यते.' 'बालकै रुद्यते.' यांत उद्देश्य कोठें आहे? तसेंच इंग्लिश भाषेंत कांहीं क्रियापदांबद्दल असले प्रयोग होतात; पण त्या भाषेंत अशा ठिकाणीं कोणत्याही विवक्षित शब्दावरून न घातलेलें (म्हणजे impersonal) जसें it हें सर्वनाम घालून कार्य करून घेण्याची रीत पडली आहे. असें,–It rains.' 'It thunders.' 'It is very dark.' इत्यादि.

(इ) वास्तविक मराठींतल्या भावेप्रयोगघटित वाक्याची मूळची रचना पाहिली असतां तीं कांहीं वावगी नाहीं, असेंच दिसून येईल. उदाहरणार्थ, 'रामानें रावणास मारिलें.' हें वाक्य रचनेला खरोखरी पाहतां 'रामानें रावणास मारिलें' असें किंवा 'मारिलेले आहे.' असें आहे. यात 'मारिलेलें' हा क्रियार्थ म्हणजे क्रियेचा **भाव** '**आहे**' याचा कर्ता आणि वाक्यांतील उद्देश्य आहे. म्हणूनच यास भावे-प्रयोग असें नांव पडलें आहे. 'त्यानें जावें.' या वाक्याचीही 'त्यानें **जावें असें** आहे.' अशी रचना आहे. परंतु बोलताना अशी कृत्रिम रचना कोणी करीत नाहीं. व्याकरणानें पाहिजे तर आपल्या सोईप्रमाणें वाक्यरचना करून घेऊन व्यवस्था लावावी. तेव्हां वरीलप्रमाणें व्याकरणात रचना केली असतां भावे-प्रयोगघटित वाक्यांचे 'रामानें रावणास मारिलेलें आहे.' 'त्यानें आज गांवाला जावेसें आहे.' असे कर्तरिप्रयोग होतील.

(ई) मराठींतला कर्मणि प्रयोगही चमत्कारिक आहे; तो फक्त भूतकाळीं आणि विध्यर्थी तेवढा होतो. असें असण्याचें कारण मागें सांगण्यांत आलेंच आहे. ('क्रियापदविचार, कर्मणि आणि भावी रूपें' हें प्रकरण पाहा). अर्थात् मराठींतली प्रयोगव्यवस्था संस्कृत आणि इंग्लिश या भाषांतील प्रयोगरचनेप्रमाणें सार्वत्रिक आणि नियमबद्ध नाहीं. आतां 'हरीनें पुस्तक पाठविलें.'

यांतील ‘ पाठविलें ’ हें कर्मणि विशेषण आहे. तेव्हां तें **पुस्तक** याचें विधिविशेषण मानून पुढें ‘ **आहे** ’ असें अध्याहृत क्रियापद घेतलें असतां ‘ हरीनें पुस्तक पाठविलें (किंवा पाठविलेलें) आहे ’ अशी वाक्यरचना होऊन, ‘पुस्तक’ **हें** ‘ आहे ’ याचें उद्देश्य **होईल**, आणि हें वाक्य **कर्तरि** होईल. मग अर्थात् ह्या वाक्याचा कर्मणिप्रयोग मानण्याची गरज नाहीं. वास्तविक पाहिलें तर ‘ पुस्तक **हरीनें पाठविलेलें** आहे. ’ आणि ‘ पुस्तक **चांगलें** आहे. ’ या दोन वाक्यांच्या रचनेंत व्याकरणदृष्ट्या मुळींच फरक नाहीं. ‘त्यानें पुस्तक वाचावें’ याचीही रचना ‘ त्यानें पुस्तक वाचावेंसें आहे. ’ अशी मानून अशीच व्यवस्था करितां येईल. अशा प्रकारें सांप्रत आपण ज्या वाक्यांचा कर्मणिप्रयोग मानितों, त्याचा कर्तरिप्रयोगच होईल मग व्याकरणांत क्रियापदांच्या दृष्टीनें एक कर्तरिप्रयोग तेवढा राहील. असें केल्यानें अर्थात् आपल्या भाषेंतील कर्मणि आणि भावी प्रयोगांची विद्यार्थ्यांना कठीण वाटणारी व्यवस्था नाहींशी होईल. कर्मणि प्रयोगात क्रियापदाचें मुख्य रूप कर्मणिविशेषण मानलें, आणि भावेप्रयोगांत तेंच रूप मागें सांगितल्याप्रमाणें क्रियावाचक किंवा भाववाचक धातुसाधित नाम समजून तें उद्देश्य मानिलें म्हणजे झालें.

( उ ) मराठी भाषेचें व्याकरण जेव्हां प्रारंभींच रचिलें, तेव्हां अशी व्यवस्था झाली असती तर बरें झालें असतें परंतु त्या वेळीं व्याकरणाची रचना करणारांनीं भाषेंत खरी स्थिति काय आहे, याचा विचार न करितां संस्कृतांत तीन प्रयोग आहेत म्हणून मराठींतही ते आहेतच, असें गृहीत धरून व्यवस्था ठरविली, आणि मग त्याप्रमाणें उदाहरणें कल्पिलीं. यामुळें असा वास्तविक घोंटाळ्याचा—निदान ज्यांच्यासाठीं व्याकरण करावयाचें, त्या विद्यार्थ्यांना कठीण वाटेल असा—प्रकार झाला आहे, आणि तो फार दिवस रूढ झाल्यामुळें बदलतांही येत नाहीं. परंतु यासंबंधानें कोणी जर नीट विचार करील, तर येथें सुचविलेली व्यवस्था अगदीं साधी व सोपी आहे असें दिसून येईल.

## ( ३ ) उद्देश्य आणि कर्ता किंवा कर्तृपद.

३५१. उद्देश्य म्हणजे ज्याबद्दल आपण बोलतों, तद्दर्शक शब्द. वाक्यांत क्रियापद त्या शब्दाप्रमाणें म्हणजे त्याला जुळून असतें. आणि कर्ता म्हणजे

वाक्यांतील क्रियेचा व्यापार ज्याचेकडून घडला किंवा घडत असेल तो, अर्थात् तद्दर्शक शब्द.

३५२. कर्तरिप्रयोगांत उद्देश्य आणि कर्ता * हीं एकच असतात. कर्मणिप्रयोगांत कर्मपद क्रियापदाचें उद्देश्य म्हणजे त्याचीं रूपें फिरविणारें असतें. आणि ज्या शब्दानें मूळ क्रिया करणारा म्हणजे कर्ता दाखविला जातो, त्या शब्दाची तृतीया विभक्ति होते, त्यास कर्तृपद म्हणावें.

३५३. भावेप्रयोगांत क्रियापद कर्तृपद किंवा कर्मपद याप्रमाणें फिरत नाहीं. पण त्याचें निरंतर एक ठरींव रूप ( तृतीयपुरुषी, नपुंसकलिंगी, एकवचनी ) असतें. क्रिया करणाराचा दर्शक शब्द तृतीया किंवा चतुर्थी विभक्तींत असतो. तोच शब्द **कर्तृपद** होय. भावेप्रयोगांत उद्देश्य नसतें.

**टीप**—भाव म्हणजे स्वाभाविक स्थिति. तृतीयपुरुष, नपुंसकलिंग, एकवचन ही क्रियापदाची स्वाभाविक स्थिति मानली आहे. भावेप्रयोगयुक्त वाक्यांत क्रियापद ज्याच्याशीं जुळतें असा शब्द असत नाहीं, म्हणून त्याचें हें स्वाभाविक रूप घालितात.

**उदाहरणें**—' रामा पुस्तक वाचितो. ' यांत ' वाचणें ' ही क्रिया करणारा ' रामा ' आहे; व क्रियापदाचें रूप फिरविणारा शब्दही तोच आहे. म्हणून कर्ता तोच, व उद्देश्यही तोच आहे. हा प्रयोग कर्तरि होतो. परंतु ' रामानें पुस्तक वाचिलें किंवा वाचावें, ' या वाक्यांत क्रिया करणारा जो ' रामा ' तो ' वाचिलें ' किंवा ' वाचावें, ' या क्रियापदाचें उद्देश्य नव्हे. कारण याच्यामुळें क्रियापदाच्या रूपांत पालट होत नाहीं. या वाक्यांत ' पुस्तक ' या कर्मपदाप्रमाणें क्रियापद असतें. अर्थात् ' पुस्तक ' हा शब्द उद्देश्य आहे; व कर्मपद उद्देश्य आहे, म्हणून हा कर्मणिप्रयोग होतो. यांत ' रामानें ' हें कर्तृपद होय. ' रामानें रावणास मारिलें किंवा मारावें. ' या वाक्यांत क्रियापदास वागविणारा शब्द नाहीं. म्हणजे त्या क्रियापदास उद्देश्य नाहीं. ' रामानें ' हें कर्तृपद व

---

* कर्ता म्हणजे क्रिया करणारा. कर्तृपद म्हणजे कर्तृदर्शक पद म्हणजे शब्द. कर्ता म्हणजे प्रत्यक्ष क्रिया करणारा पुरुष; कर्तृपद म्हणजे त्याला दर्शविणारा शब्द. व्याकरणांत आपल्यास शब्दाशीं काम असतें.

'रावणास' हें कर्मपद असून क्रियापद त्याच्या स्वाभाविक स्थितींत (तृतीय-पुरुषी, नपुंसकलिंगी, एकवचनी) आहे.

३५४. कधीं कधीं वाक्यांत शुद्ध क्रियापद नसतें; पण धातुसाधित नामें, विशेषणें व अव्ययें यांचे योगानें क्रियेचा बोध होतो. या कृदन्तांचा कर्ता प्रथमान्त (क्वचित् तृतीयान्त किंवा चतुर्थ्यन्त) असतो. परंतु त्याचे योगानें क्रिया दाखविणारें जें कृदन्त त्याचें रूप पालटत नाहीं, म्हणून त्यास त्या क्रियादर्शक पदाचें **उद्देश्य** असें म्हणतां येणार नाहीं. त्यास त्याचें '**कर्तृपद**' असें म्हणावें. उदा०—'मी तेथें असतां रामा कांहींच बोलला नाहीं.' 'एक मनुष्य बोलत असतां दुसऱ्यानें मध्यें बोलूं नये.' या वाक्यांत 'मी' व 'मनुष्य' हे शब्द 'असतां' व 'बोलत असतां' यांचीं कर्तृपदें होत. अशा प्रकारच्या उद्देश्य न दर्शविणाऱ्या प्रथमेला **भावी प्रथमा** असें म्हणावें.

३५५. वरील विवेचनावरून उद्देश्य आणि कर्तृपद यांचे संबंधानें पुढें लिहिल्याप्रमाणें नियम बांधितां येतातः—

(१) उद्देश्य नेहमीं प्रथमा विभक्तींत असावयाचें.

(२) कर्त्याचा दर्शक शब्द म्हणजे कर्तृपद प्रथमा, तृतीया किंवा चतुर्थी या विभक्तींत असेल; किंवा त्यास कडून, करवीं, द्वारें, इत्यादि तृतीया विभक्त्यर्थक अव्ययें लागतील, अथवा त्याचें संबंधी विशेषण होऊन त्याची तृतीया विभक्ति होईल. उदा०—'रामानें पुस्तक वाचिलें' (तृतीया). 'मला हें रुचत नाहीं' (चतुर्थी). 'माझ्यानें हें काम करवत नाहीं' (संबंधी विशेषणाची तृतीया). कर्तृपद क्वचित् पंचम्यन्तही असतें, हें पुढें दिसून येईल.

## (४) प्रयोगांचे संबंधानें सामान्य विचार.

३५६. क्रियापद भूतकाळीं किंवा विध्यर्थीं असतां कर्मणिप्रयोग किंवा भावेप्रयोग होतो हें मागें क्रियापदप्रकरणीं सांगितलेंच आहे. याशिवाय इतर आख्यात-विभक्ति असतां वाक्यांचा फक्त कर्तरिप्रयोग होतो. क्रियापद अकर्मक असतां शुद्ध भूतकाळीं व विध्यर्थीं कर्तरिप्रयोग होतो.

३५७. जुन्या भाषेंत धातूला 'य' किंवा 'ज' जोडून सर्व आख्यात-विभक्तींचीं कर्मणि रूपें करीत असत. उदा०—कीजेल, बोलिजेल, धरियेलें,

लिहिजाति, करिजेल, कीजे, इ०. परंतु आतां तशीं रूपें करण्याची वहिवाट नाहीं. तीं रूपें जुन्या कवितेंत मात्र आढळतात. चालू गद्य किंवा पद्य भाषेंत त्यांचा उपयोग करीत नाहींत. तथापि भाषेंतल्या कित्येक जुन्या म्हणी किंवा वाक्यविशेष यांतमात्र तीं रूपें अजून आहेत.

३५८. कलम २१६ ( ४ ) यांत सांगितलेले 'उमज' गणांतील धातु सामान्य नियमाला अपवादक आहेत. क्रियापद भूतकाळीं असतांही त्यांचे योगानें निरंतर कर्तरिप्रयोग होतो. उदा०—' मी कारण उमजलों. ' ' विद्यार्थी पुस्तक पढला.' ' तो भात जेवला. ' ' पाखरूं बोल बोललें. ' ' तो संस्कृत शिकला. '' मी तुझी गोष्ट विसरलों. ' ' हरि पर्वत चढला. ' ' ती असें म्हणाली, ' इ०.

**टीप**—हे धातु म्हणजे त्यांच्या अर्थाचे धातुही घ्यावयाचे हें लक्षांत असावें.

३५९. या धातूंच्या उपयोगाचे संबधानें प्रांतिक मतभेद आहे. यांतल्या कित्येक धातूंवरून भूतकाळीं विकल्पेंकरून कर्तरि किंवा कर्मणि प्रयोग होतो.* उदा०—' मी धर्म आचरलों. ' किंवा ' म्यां धर्म आचारिला. ' ' हरी वेद पढला. ' किंवा 'हरीनें वेद पढले. ' ' मी जुगारांत शंभर रुपये हरलों. ' किंवा ' म्यां जुगारांत शंभर रुपये हरले. ' ' मीं इंग्रजी भाषा शिकली. ' किंवा ' मी इंग्रजी शिकलों. ' इत्यादि.

**टीप**—भूतकाळीं व विध्यर्थीं नेहमीं कर्मणिप्रयोग किंवा भावेप्रयोग होतो, असा सामान्य नियम मागें दिला आहे. तेव्हां उमज-गणातील धातु व विकल्पें-करून आचार-गणांतील धातु हे त्या सामान्य नियमाला अपवादक झाले. त्याचप्रमाणें भूतकाळ व विध्यर्थ असतां कर्मणिप्रयोग केव्हां करावा व भावे-प्रयोग केव्हां करावा, याविषयींचे नियम मागें सांगितलेच आहेत. ( क० ३४४ पाहा. )

३६०. भज, झोंब, लगट, बिलग, डस, चाव, शीव, भीड, इत्यादि

---

* हा जरी मतभेदाचा प्रकार आहे, तरी ज्या कांहीं, धातूंवरून विकल्पें दोन्ही प्रयोग खास होतात, असे धातु निराळे काढतां येतील. हे धातु—आचर, ओक, जप, जेव, थुंक, नेस, पढ, पांघर, शिकर, शीक, स्मर, हर, इत्यादि आहेत. यांचा निराळा वर्ग करून त्याला ' आचर—गण ' असें नांव द्यावें.

धातूंवरूनही 'उमज' गणांतील धातूंप्रमाणेंच भूतकाळीं कर्मणिप्रयोग होत नाहीं. या धातूंचा आणखी एक विशेष असा आहे कीं, त्यांच्या कर्मपदाची नेहमीं सप्रत्यय द्वितीया असते. उदा०—'मी परमेश्वरास भजलों.' 'साप माणसाला चावला.' 'मी त्याला शिवलों.' 'वाघ शिकाऱ्याला झोंबला.' 'तो त्याला लगटला किंवा बिलगला.' 'कुत्रा त्याला डसला.' इत्यादि.

३६१. (अ) गा, पी आणि ले या धातूंवरून भूतकाळीं विकल्पेंकरून कर्तरि किंवा कर्मणि प्रयोग होतो. उदा०—'मी गाणें गालों.' किंवा 'म्यां गाणें गालें किंवा गाइलें.' 'मी पाणी प्यालों.' किंवा 'म्यां पाणी प्यालें.' 'ती भूषणें ल्याली.' किंवा 'तिनें भूषणें ल्यालीं.' इ०. (आ) 'धू' धातूच्या कर्मपदीं आंग, तोंड, हात, पाय, इत्यादि शब्द असतां भूतकाळीं विकल्पेंकरून कर्तरि किंवा कर्मणि प्रयोग होतो. उदा०—'मी तोंड धुतलों,' किंवा 'म्यां तोंड धुतलें.' 'तो पाय किंवा हात धुतला.' किंवा 'त्यानें पाय किंवा हात धुतले.' इ०.

(इ) स्नान, आंघोळ, भोजन, फराळ, हे शब्द वाक्यांत कर्मस्थानीं असतां 'कर' या धातूवरून भूतकाळीं विकल्पें कर्तरि अथवा कर्मणि प्रयोग करितात. उदा०—'मी स्नान केलों.' किंवा 'मीं स्नान केलें.' 'मी आंघोळ केलों.' किंवा 'मीं आघोळ केली.' 'तो भोजन केला.' किंवा 'त्यानें भोजन केलें.' 'तूं फराळ केलास.' किंवा 'त्वां फराळ केला इत्यादि.

३६२. विध्यर्थ असतां या सर्व धातूंचे प्रयोग इतर सकर्मक धातूंप्रमाणें कर्मणिच होतात; म्हणजे विध्यर्थी हे सर्व धातु सामान्य नियमालाच अनुसरतात. उदा०—'म्यां हें उमजावें.' 'त्यानें भात जेवावा.' 'तुम्ही धर्म आचरावा.' 'ब्राह्मणांनीं वेद पढावा.' 'त्यानें गाणें गावें,' 'रामानें पाणी प्यावें.' 'तिनें भूषणें ल्यावीं.' 'म्यां तोंड धुवावें.' 'आपण पाय धुवावे.' इ०.

**टीप १**—मागें जे 'भज' वगैरे धातु सांगितले आहेत, त्यांवरून विध्यर्थी भावेप्रयोग होतो. उदा०—'म्यां परमेश्वरास भजावें.' 'सापानें माणसास चावावें.' 'त्यानें मला शिवावें.' 'म्यां त्याला झोंबावें.' 'त्यानें त्याला लगटावें किंवा बिलगावें.' 'कुत्र्यानें त्याला डसावें.' इ०.

**टीप**—विध्यर्थी ' भज ' या धातूवरून क्वचित् कर्मणिप्रयोगही होतो. जसें,—' मनुष्यांनीं राम भजावा. ' इ०.

३६३. धातु अकर्मक असून कर्तृपद प्राणिवाचक नाम किंवा सर्वनाम असल्यास विध्यर्थी कर्तरिप्रयोग किंवा भावेप्रयोग होतो; पण कर्तृपद निर्जीव वस्तुवाचक नाम असल्यास फक्त कर्तरिप्रयोग होतो. उदा०—' हा देवळाचा कळस असावा. ' ' आतां पाऊस पडावा. ' ' तो घरीं यावा. ' किंवा ' त्यानें घरीं यावें ' ' रामा आज मुंबईस असावा. ' ' रामानें आज मुंबईस असावें. '

' साधकाची दशा उदास असावी, उपाधी नसावी अंतर्बाह्य. ' —तुकाराम.

परि मन्निकट असावे मज साह्य वसंत, काम, पवमान. '
' शर्मिष्ठा तीस म्हणे, बैसावें जे सभेंत मत्तातें,
त्वत्तातें व्हावें तैं बंदी, तूं विसरलीस मत्ता तें. ' —मोरोपंत.

३६४. सकर्मक धातूंचा भावेप्रयोग शुद्ध भूतकाळीं व विध्यर्थी होतो. उदा०—' त्यानें वाघास धरिलें. ' ' रामानें त्यास धाडावें. ' इ०. परंतु अकर्मक धातूंचा भावेप्रयोग विध्यर्थी मात्र होतो. जसें,—' त्यानें बसावें. ' ' तिनें जावें. ' इ०.

३६५. सकर्मक शक्य क्रियापद असतां वर्तमान व भविष्यकाळींही कर्मणिप्रयोग होतो. भूतकाळीं तर नियमानेंच होतो. परंतु क्रियापद अकर्मक असतां भावेप्रयोगच होतो. उदा०—' माझ्यानें काम करवतें–करवलें–करवेल. ' ' माझ्यानें किंवा मला जाववतें–जाववलें–जाववेल. ' प्रयोजक क्रियापदांवरून वर्तमान व भविष्यकाळीं कर्तरिप्रयोगच होतात.

३६६. क्रियापदाचें कर्मपद कर्तरिप्रयोगांत द्वितीयान्त असतें व ती द्वितीया प्रत्यय लावून किंवा न लावितां करितात, हें मागें सांगितलें आहे (क० ३३९ पाहा.). त्या नियमांवरून लक्षांत येईल कीं, ज्या ठिकाणीं स–प्रत्यय द्वितीया करितात, त्याच ठिकाणीं भूतकाळीं क्रियापद असतां भावे–प्रयोग होतो.

३६७. कर्तरिप्रयोगांत अप्राणिवाचक नाम कर्मपदीं असतां त्याची अ-प्रत्यय द्वितीया योजावी, हा सामान्य नियम. परंतु ' शिवणें, ' स्पर्शणें, '

'धरणें' व क्वचित् 'फेंकणें' आणि 'टाकणें' इत्यादि क्रियापदें असतां स-प्रत्यय किंवा अ-प्रत्यय द्वितीया चालते. उदा०—मूल खांबाला किंवा खांब धरून उभें राहातें.' 'तो काठीला किंवा काठी धरतो.' 'गोविंदा दगडाला किंवा दगड फेंकतो.' 'मुलगा छत्रीला किंवा छत्री टाकतो.' 'शिवणें' किंवा 'स्पर्शणें' धातु असतां फक्त सप्रत्यय द्वितीया करितात. जसें,—'तो खांबाला शिवला.' इ०.

३६८. (अ) साधारणतः पाहिलें तर द्वितीया स-प्रत्यय किंवा अ-प्रत्यय असणें हा केवळ वाक्यरचनेचा भेद असून दोहोंच्या अर्थामध्यें विशेषसा फरक पडत नाहीं, असें म्हणण्यास चिंता नाहीं. उदा०—'तो पोर आणितो,' किंवा 'तो पोरास आणितो' 'तो गाय बांधतो,' किंवा 'तो गाईस बांधतो,' इत्यादि. परंतु कित्येक ठिकाणीं अर्थांतही बराच फरक पडतो. उदाहरणार्थ, कर्तरिप्रयोगात 'मार' धातूचें कर्मपद स-प्रत्यय द्वितीया विभक्तींत घातलें असतां अथवा भावेप्रयोग केला असतां त्या वाक्याचे दोन अर्थ संभवतील, उदा०—'तो पोरास मारितो,' म्हणजे (१) 'तो पोरास ठार मारितो.' किवा (२) 'पोराच्या शरीराला कशानें तरी ताडण करितो.' 'त्यानें पोरास मारिलें.' या भावेप्रयोगाचे तसेच दोन अर्थ होतात. परंतु अ-प्रत्यय द्वितीया केली असतां किंवा कर्मणिप्रयोग केला असता 'ठार मारणें' हा एकच अर्थ होईल. उदा०—'तो पोर मारितो.' किंवा 'त्यानें पोर मारिलें.

(आ) दुसऱ्या कित्येक धातूंच्यासंबंधानेंही असा अर्थामध्यें फरक होतो. उदा०—'तो घर बांधितो.' म्हणजे 'तो घराची नवीन इमारत तयार करितो.' परंतु 'तो घरास बांधितो,' असें म्हटलें असतां, 'दुसरी कांहीं तरी वस्तु आणून ती घरास बांधितो,' असा अर्थ होतो. तसेंच, 'तो घोडा किंवा गाडी हांकतो.' म्हणजे 'तो त्या वाहनावर स्वतां बसून हांकतो.' पण 'तो घोड्यास किंवा गाडीस हांकितो.' याचा अर्थ हांकण्याची क्रिया करितांना तो वाहनावर स्वतां बसला आहे, असा अर्थ नियमानें होत नाहीं.

**टीप**—अशा वाक्यांत पुष्कळ वेळां स-प्रत्यय द्वितीया ही अर्थावरून चतुर्थी मानावी लागेल. उदा०—'तो हात लावितो.' म्हणजे हातानें स्पर्श करितो.' परंतु 'तो हातास लावितो.' याचा अर्थ दुसरा कांहीं पदार्थ आणून

तो हाताला लावितो, असा आहे या ठिकाणीं ' हातास ' ही चतुर्थी आहे हें सहज लक्षांत येईल.

३६९. कर्तरिप्रयोगाचे व भावेप्रयोगाचे ' सकर्मक–कर्तरिप्रयोग ' व ' अकर्मक–कर्तरिप्रयोग,' 'सकर्मक–भावेप्रयोग' व 'अकर्मक–भावेप्रयोग, ' असे पोटभेद करण्याची चाल आहे. परंतु असले भेद अनवश्यक आहेत. कारण प्रयोग सांगणें म्हणजे क्रियापद कर्त्याशीं जुळून आहे, हें सांगणें होय. तें सांगतांना क्रियापद स-कर्मक आहे किंवा अ–कर्मक आहे, हें आणखी सांगण्याची जरूर नसते. शिवाय क्रियापद चालवितानां त्याची जात अगोदर सांगावी लागतेच. प्रयोग सांगतांना तो प्रयोग कोणत्या जातीच्या क्रियापदावरून झाला आहे, हें सांगण्याची जर कोणास जरूर वाटत असेल, तर तो कोणत्या काळाच्या' कोणत्या लिंगाच्या व कोणत्या वचनाच्या क्रियापदावरून झाला हें देखील सांगण्याची जरूर आहे, असें आणखी कोणास वाटेल. म्हणजे ' सकर्मक–कर्तरि, ' '–अकर्मक–कर्तरि, ' असे जर भेद करावयाचे, तर ' भूतकाळचा कर्तरि, ' ' भविष्यकाळचा कर्तरि, ' ' विध्यर्थाचा भावे ' ' पुल्लिंगी क्रियापदाचा कर्तरि, ' ' नपुंसकलिंगी क्रियापदाचा कर्मणि, ' ' द्वितीय पुरुषाचा कर्मणि, असले भेद व पोटभेदही मानावे लागतील; कारण ' सकर्मककर्तरि ' यासारखे भेद मानावयास जें कारण आहे, तेंच असले भेद मानावयासही आहेच. मग असे भेद कधीं संपावयाचेच नाहींत. तेव्हां जरूरीपेक्षां ज्यास्त गोष्टी सांगण्याचा हा प्रकार केवळ निरुपयोगी आहे.

३७०. तसेंच ' कर्मकर्तरि ' व ' भावकर्तरि ' असे आणखी दोन प्रयोगभेद कोणी मानीत असतात. त्यांचे आवश्यकतेविषयीं थोडा विचार करूं. ' कर्मकर्तरि, ' म्हणजे ज्यांत कर्म ' कर्ता ' म्हणजे क्रियापदाचें रूप फिरविणारें होतें तो प्रयोग. म्हणजे हा कर्मणिप्रयोग झाला. कारण कर्मणिप्रयोगांत कर्माच्या लिंगवचनांप्रमाणें क्रियापद फिरतें. [ गोडबोलेकृत व्याकरण, क० ६४३ पाहा.] ' शिपायाकडून चोर धरिला जातो. ' ' कालच्या सभेंत अर्ज वाचिला गेला. ' अशीं कर्मकर्तरिप्रयोगाचीं उदाहरणें देत असतात. या वाक्यात ' धरिला जातो ' व ' वाचिला गेला, ' हीं क्रियापदें अनुक्रमें ' चोर ' व ' अर्ज ' या शब्दाप्रमाणें वागणारीं आहेत; व ते शब्द कर्में असल्यामुळें हे कर्मणिप्रयोगच

होतात. ' कर्माणि ' व ' कर्मकर्तरि ' हे शब्दसुद्धां एकाच अर्थाचे वाचक आहेत. तेव्हां ' कर्मणि ' व ' कर्मकर्तरि ' यांमध्यें कांहींच भेद नाहीं. म्हणून ' कर्मकर्तरि ' असा निराळा भेद मानण्याचें कारण नाहीं.

( अ ) ' भावकर्तरि ' या शब्दाचा अर्थ ' क्रियापदाची स्वाभाविक प्रयोगरचना ' असा आहे. म्हणजे भावे आणि भावकर्तरि एकच. ' मला मळमळतें—कळमळतें. ' ' त्यास तेथेंच सांजावलें. ' ' तुला फावलें तर तूं ये. ' ' हल्लीं सात वाजतां उजाडतें. ' इत्यादि भावकर्तरिप्रयोगांचीं उदाहरणें देतात. पण हीं क्रियापदें अकर्मक व अकर्तृक आहेत. प्रयोगव्यवस्था कर्तृ-कर्म-पदें व क्रियापद यांच्या जुळणीच्या संबंधानें उत्पन्न झाली असल्यामुळें व हीं क्रियापदें कर्तृ-कर्मविरहित असल्यामुळें प्रयोगव्यवस्थेंत त्यांचा समावेश होतच नाहीं. हीं जीं चारपांच क्रियापदें आहेत त्यांचा एक निराळाच वर्ग मानावा, व त्यांना प्रयोग नाहीं असें म्हणावें. किंवा भावेप्रयोग व भावकर्तरि प्रयोग हे शब्द अर्थाला एकच असल्यामुळें पाहिजे तर अशा क्रियापदांच्या वाक्यांचा भावेप्रयोग आहे, असें म्हणावें.

३७१. वाक्याचा प्रयोग कोणचा आहे, यासंबंधानें संशय उत्पन्न झाल्यास कर्तृपद व कर्मपद यांस निरनिराळीं वचनें व लिंगें लावून व त्यांचे पुरुष बदलून वाक्यें करून पाहावीं, कर्तृदर्शक शब्दाप्रमाणें क्रियापद बदलत असलें तर कर्तरिप्रयोग, कर्मपदाप्रमाणें फिरल्यास कर्मणिप्रयोग, व दोन्ही पदांप्रमाणें तें फिरत नसून त्याचें रूप निरंतर नपुंसकलिंगी, एकवचनी आणि तृतीयपुरुषी कायम राहात असेल तर भावेप्रयोग, असे समजावें.

---

# प्रकरण २०.



## कारक—विचार.

**३७२ ( अ ) वाक्यांत प्रातिपदिकाचा क्रियापदाशीं किंवा क्वचित् इतर शब्दांशीं जो संबंध असतो, त्यास कारक असें म्हणतात.**

(आ) हा कारकसंबंध दाखविण्याकरितां प्रातिपदिकांना प्रत्यय किंवा शब्दयोगी अव्ययें लावून त्यांचीं रूपें तयार करितात. हीं जीं रूपें तयार करितात त्यांस विभक्ति असें म्हणतात, हें मागें सांगितलेंच आहे (क० ७८). विभक्तिसंबंधास कारक असें म्हणतात. हीं कारकें आणि त्यांचे आणखी होणारे भिन्न भिन्न प्रकार यांना विभक्तींचे अर्थ असें साधारणतः नांव देतात. विभक्ति-प्रत्यय व शब्दयोगी अव्ययें हीं नामांस लागतांना नामांचें सामान्यरूप होऊन, पुढें तो प्रत्यय किंवा शब्दयोगी अव्ययें आणि मूळचा शब्द, यांमिळून एकच शब्द होतो. सहा विभक्तींचीं सहा मुख्य कारकें आहेत. षष्ठी विभक्ति विशेषण-रूप असल्यामुळें तिला वास्तविक कारकांत गणूं नये. तिच्या रूपाचा प्रातिपदि-कांशीं विशेषण-विशेष्यसंबंध असतो. तथापि तें रूप षष्ठी विभक्तीचें म्हणून मानिलें आहे, म्हणून तो संबंध कारकामध्येंच गणतात. संबोधनाचा अर्थहि वास्तविक कारकांत येत नाहीं.

३७३. सामान्यरूप न होण्याचे प्रकारः—(अ) परभाषेंतील विशेषनामें किंवा सामान्यनामें यांस कांहीं प्रत्ययांपूर्वी–विशेषतः 'ला,' 'नें,' 'हून,' 'शीं,' 'ना,' आणि षष्ठीचा 'च,' यापूर्वी,–व कांहीं शब्दयोगी अव्ययांपूर्वी सामान्यरूप होत नाहीं. जीं नामें फार प्रचारांत नाहींत त्यांच्यासंबंधानें विशेषेंकरून असें होतें. उदा०—'टॉमला सांग.' 'जॉननें जेम्सशीं मारामारी केली.' 'तो लंडनहून किंवा इंग्लंडहून आला.' 'मुंबईच्या गव्हरनरला हा अधिकार आहे.' 'बेनचें व्याकरण.' 'टॉमची भूमिती.' 'त्या ब्यारोनेट-जवळ फारशी मालमत्ता नव्हती.' 'नेपोलियननें आस्टरलिङ्झच्या लढाईंत तीन एम्परर्सना हात दाखविला.' 'नेलसनबरोबर फ्रेंच आरमाराचा टिकाव लागेना.' 'आल्प्सवर बारा महिने बर्फ असतें.' 'ऐस्लंडमध्यें एक जागता ज्वालामुखी आहे.' 'जिब्राल्टरसमोर आफ्रिकेचें टोंक युरोपला फार जवळ आलेलें आहे.' इत्यादि.

(आ) परंतु हीं विशेषनामें किंवा सामान्यनामें भाषेंत विशेष प्रचारांतलीं झालीं म्हणजे त्यांचें विकल्पेंकरून सामान्यरूप करितात. परकी भाषेंतलीं सामान्यनामें तर भाषेंत पूर्णपणें रुळलीं म्हणजे त्यांचें विशेषेंकरून सामान्यरूप करण्याकडे प्रवृत्ति होते. उदा०—'अकबराचा किंवा अकबरचा स्वभाव दयाळू

होता.' 'औरंगजेबानें किंवा औरंगजेबनें आपल्या बापाला पदच्युत केलें.' 'निजामाच्या किंवा निजामच्या राज्यांत महापुरानें फार हानि झाली.' 'गव्हर्नराला किंवा गव्हर्नरला त्यानें तार केली.' 'जज्जाचें मन समतोल असावें लागतें.' 'साहेबांनीं असें सांगितलें खरें.' स्टुलाचा एक पाय मोडला.' 'स्टेशनचा किंवा स्टेशनाचा रस्ता फार चांगला आहे.' 'तो प्लेगला किंवा प्लेगाला बळी पडला.'

( इ ) परकी भाषेंतील शब्दाचें प्रथमतः सामान्यरूप न करण्याचें कारण तो परकी शब्द म्हणून आपण कांहीं दिवस त्याला जसा काय दूर ठेवितों. मग तो भाषेंत आला असें दिसलें, कीं त्यास स्वभाषेंतील शब्दाप्रमाणें मानण्यांत येतें.

( ई ) पावेतों, पर्यंत, भर, हीं शब्दयोगी अव्ययें अकारान्त स्थलवाचक नामांस लाविलीं असतां विकल्पेंकरून सामान्यरूप होतें. जसें,—'तळेगांव-पावेतों,' 'तळेगांवापर्यंत,' 'सुरत-भर,' 'सुरतपर्यंत,' 'सुरतेपर्यंत,' 'पुण्या-भर,' 'पुणेंभर,' इ०.

( उ ) पावेतों, पर्यंत, भर हीं अव्ययें कालवाचक नामांस लाविलीं असतां सामान्यरूप होत नाहीं. जसें,—दिवसभर, वर्षभर, रविवारपावेतों, सोमवार-पर्यंत, इ०.

( ऊ ) गांव, शहर, नगर, या शब्दांना 'भर' हें अव्यय लागतांना त्यांचें सामान्यरूप होत नाहीं. उदा०—गांवभर, नगरभर, शहरभर, इ०.

( ओ ) सामान्यरूपाचे अंतींचे 'ई' व 'ऊ' हे स्वर, व क्वचित् विभक्ति-रूपाचे शेवटीं असणारा 'ई' स्वर हे कवितेंत जुळणीसाठीं पुष्कळदां ऱ्हस्व करितात. उदा०—'हरीनें,' 'भानूला,' 'पापांनीं,' इत्यादि, यांचेबद्दल 'हरिनें,' 'भानुला,' 'पापांनि,' इ० असें लिहितात. कवितेंत हा प्रघात इतका आहे कीं, त्याचीं उदाहरणें देऊन विस्तार करण्याची गरज दिसत नाहीं.

( औ ) ऱ्हस्वाचें दीर्घ व दीर्घाचें ऱ्हस्व करण्याची मराठी कवींची फार चाल आहे. चांगले कवि तसा फेरफार शब्दाच्या मूळच्या स्वरांना सहसा करीत नाहींत. शब्दांत विशेष तऱ्हेनें आलेले जे स्वर त्यांना मात्र करितात. उदाहर-णार्थ, 'गुरु' यांतील 'गु' याचा ऱ्हस्व स्वर सहसा कोणी दीर्घ करीत नाहीं. परंतु हा नियम सर्वच कवि पाळीत नाहींत.

३७४. प्रथमेचा अर्थ **कर्ता** व द्वितीयेचा **कर्म** असतो. कर्ता व कर्म यांचे अर्थ उघडच आहेत. तृतीयेचा अर्थ **करण**. करण म्हणजे क्रियेचें साधन अथवा ज्याच्या साह्यानें क्रिया झाली तें. चतुर्थीचा अर्थ **संप्रदान**. संप्रदान याचा अर्थ हेतु. म्हणजे त्यावरून क्रिया कोणासाठीं केली असा बोध होतो. पंचमीचा अर्थ **अपादान**. अपादान म्हणजे वियोग. या विभक्तीवरून वियोग, स्थलांतर, इत्यादिकांचा बोध होतो. षष्ठीविभक्तीवरून **स्वामित्वाचा** बोध होतो. या विभक्तींचीं रूपें म्हणजे च-प्रत्ययान्त विशेषणें आहेत. सप्तमीचा अर्थ **अधिकरण**. अधिकरण म्हणजे स्थान. संबोधनाच्या रूपांचा हाक मारण्याकडे उययोग करितात. 'सं-बोधन' म्हणजे हांक मारणें, जागें करणें. हीं कारकें म्हणजे विभक्तींचे मुख्य अर्थ होत; यांवरून आणखी अनेक बारिकसारिक अर्थभेद उत्पन्न होतात. यासाठीं विभक्तींचें व त्यांच्या अर्थांचें विशेष विवरण पुढें केलें आहे.

**टीप**—शब्दयोगी अव्ययांचा विभक्तिप्रत्ययांप्रमाणेंच उपयोग करितात. म्हणून पुढील विवरणामध्यें तीं प्रत्ययाप्रमाणेच मानिलीं आहेत. तसेंच त्यांविषयीं निराळा विशेष विचारही पुढें केला आहे.

३७५. प्रथमा—

(१) प्रथमेचा मुख्य अर्थ **उद्देश्य** आहे. वाक्यांत ज्याच्याविषयीं आपण बोलतों, म्हणजे विधान करितों, त्याला **उद्देश्य** असें म्हणावयाचें उद्देश्य नेहमीं प्रथमा विभक्तींत असतें. जसें,—'**रामा** पुण्यांत असतो.' '**हरि** हुषार आहे.' '**तो** वर्गांत नेहमीं पहिला असतो.' '**पाऊस** आला.' '**सूर्य** उगवतो.' '**मी** त्यास पुस्तक देईन.' '**तो** गांवाला गेला.' इ०.

(२) कर्तरिप्रयोगांत जो क्रिया करणारा असतो त्याबद्दल आपण कांहीं तरी सांगतों किंवा विधान करतों; म्हणून तद्दर्शक शब्द उद्देश्य असतो. आणि तद्दर्शक जें पद तें प्रथमा विभक्तींत आपण घालितों. कर्मणिप्रयोगांत आपण कर्माला प्राधान्य देऊन बोलतों. तें कर्मपद प्रथमान्त असतें आणि त्याच्या-प्रमाणें क्रियापदाचें रूप फिरतें, म्हणून त्यास **उद्देश्य** असें म्हणावें. तेव्हां कर्तरिप्रयोगांत **कर्ता** उद्देश्य असतो, आणि कर्मणिप्रयोगांत **कर्म** उद्देश्य असतें. उदा०—'**रामा** (कर्ता व उद्देश्य) पुस्तक वाचितो' (कर्तरि).

'रामानें **पुस्तक** (कर्म व उद्देश्य) वाचिलें' (कर्मणि). 'मीं **गाई** बांधिल्या.' 'त्यानें **आंबा** खाल्ला' 'हरीनें **पत्र** लिहिलें.' हीं आणखी कर्मणि प्रयोगाचीं उदाहरणें आहेत.

(३) वाक्यांतला जो कर्ता किंवा जें उद्देश्य, त्याचे पर्यायवाचक शब्द त्याच्यासंबंधानें विशेष कांहीं सांगण्यासाठीं किंवा त्याचा विशेष बोध व्हावा म्हणून घातलेले असतात. हे शब्द नामें, सर्वनामें, किंवा विशेषणें असून प्रथमा विभक्तींत असतात. अशा प्रथमेचा अर्थ **उद्देश** समजावा. उदा०— 'तो गृहस्थ ब्राह्मण आहे.' या वाक्यांत 'गृहस्थ' हा शब्द 'आहे' या क्रियापदाचा कर्ता आणि उद्देश्य असून, 'तो' आणि 'ब्राह्मण' या प्रथमा विभक्तींचा अर्थ **उद्देश** होय. हीस **उद्देशार्थी प्रथमा** असें म्हणावें; हीस **विधानार्थी प्रथमा** असेंही नांव दिलें तरी चालेल. अशा वाक्यांत क्रियापद बहुधा 'अस' किंवा 'हो' धातूचें असतें.

(अ) विधानार्थी प्रथमेचीं आणखी उदाहरणें:—रावण हा लंकेचा **राजा** होता. तो रुपया **खोटा** निघाला. गोपाळराव **कारकून** (किंवा **कारभारी**) होणार. मुलगा **हुषार** आहे. माझा मित्र **रामा** आज गांवाहून येईल. गोदी गुणी **मुलगी** निपजली. ही मसलत **योग्य** वाटते. दिल्लीचा बादशहा **अकबर** मोठा **सुज्ञ** असे. हा चांगला **शिपाई** आहे. कोल्हा मोठा **ठक** (किंवा **कावेबाज**) असतो. इत्यादि.

(आ) उद्देश्य, आणि प्रथमेचा हा अर्थ '**उद्देश**' या दोन शब्दांतील भेद नीट लक्षांत ठेवावा. दोन शब्दांत घोंटाळा न व्हावा म्हणून 'उद्देशार्थी प्रथमा' यापेक्षां **विधानार्थी** प्रथमा असें म्हणावें हें बरें.

(४) उद्देशार्थी किंवा विधानार्थी शब्द पुष्कळ वेळां उपयोगावरून विशेषणार्थक असतात; म्हणून उद्देशार्थी प्रथमेस **विशेषणार्थी** प्रथमा म्हणण्यास चिंता नाहीं.

(५) असणें, होणें, शोभणें, बनणें, दिसणें, वाटणें, भासणें, इत्यादि व अशा अर्थाचीं दुसरीं क्रियापदें यांबरोबर उद्देशार्थी, विधानार्थी, किंवा विशेषणार्थी प्रथमेचा **उपयोग** होतो. उदा०—'रामा माझा वडील **भाऊ** होय.' 'मुंबई हें उत्तम **बंदर** आहे.' 'आपण शहाण्याचा **चाकर** व्हावें,

पण मूर्खाचा **धनी** होऊं नये.' 'कर्ण हा पांडवांचा शत्रु होता.' 'विष्णु त्याचा **यजमान** झाला किंवा बनला.' 'तूं त्याचा **भाऊ** शोभतोस.' 'हे या घरचे **यजमान** दिसतात किंवा भासतात.' 'मला तो त्याचा वडील **भाऊ** वाटतो.' इ०.

( ६ ) वजन, माप, अंतर, लांबी, रुंदी, उंची, कालमान, इत्यादिकांचें परिणाम दाखविण्याकरितां वाक्यांत जे शब्द आपण घालितों, ते प्रथमा विभक्तींत असतात. हा प्रथमेचा उपयोग 'अमुक पदार्थ अमुक आहे' अशाच अर्थाचा असतो. ही **परिमाणार्थी** प्रथमा होय. उदा०—'साखर रुपयाला चार **शेर** आहे.' 'गहूं दोन **पायली** मिळतात.' 'हें कापड वीस **वार** आहे.' 'या विहिरीची खोली दहा **वांव** असेल.' 'येथून मुंबई साठ **कोस** आहे.' 'मला आल्याला आठ **दिवस** झाले.' 'हरीचें वय एकोणीस **वर्षें** आहे.' इत्यादि. परिणामार्थी प्रथमाही वास्तविक उद्देशार्थी प्रथमेसारखीच आहे, हें उदाहणांवरून सहज लक्षांत येईल.

( ७ ) केव्हां वाक्यांत पूर्ण क्रियापद न येतां धातुसाधित विशेषणें किंवा अव्ययें यांचे योगानें क्रियापदाचें काम होतें. तेव्हां क्रियार्थाचा कर्ता प्रथमान्त असून वाक्यांत कोणत्याहि पूर्ण क्रियापदाशीं त्याचा संबंध नसतो. या प्रकारच्या प्रथमेस **भावी-प्रथमा** असें म्हणावें. उदा०—'**पंतोजी** येथें असून मुलांनीं दंगा केला.' '**मी रागें भरत असतां** त्याच्यानें ब्र काढवला नाहीं.' इत्यादि.

> 'उद्धरित्यासि न सज्जन गुंतविती, **गाय कष्टतां** पंकीं.'
> '**मी असतां** कां माझ्या बापें केशग्रहासि पावावें?' —मोरोपंत.
> 'ऐसे **नारद सांगतां** वर्तमान, त्याच्या गृहाप्रति पंचवदन
> कुश्चल अतीतवेष धरून, येता झाला ते समयीं.' —श्रीधर

( ८ ) क्वचित् माप वगैरे दाखविणाऱ्या शब्दापुढें 'भर' हा शब्द लावितात. उदा०—'पुण्याहून पर्वती **मैलभर** असेल.' 'त्यानें **वारभर** कापड घेतलें.' 'साप **वांवभर** लांब होता.' 'हल्लीं लोणी रुपयास **शेरभर** मिळतें.' इ०. यांत 'भर' याचा अर्थ '**भरेल इतकें**' असा असून, **मैलभर वारभर, वांवभर, शेरभर**, इत्यादि पदें विशेषणात्मक होतात. तेव्हां या उद्देशार्थी किंवा विशेषणार्थी प्रथमाच समजाव्या.

३७६. **द्वितीया**—

( १ ) द्वितीयेचा मुख्य अर्थ कर्म आहे. क्रियापद सकर्मक असतां वाक्यांत जो शब्द त्या क्रियापदाच्या कर्मस्थानीं असतो, तो द्वितीयान्त असतो. ही द्वितीया दोन प्रकारची असते. एक प्रथमेसारखी, म्हणजे तिला प्रत्यय लागलेले नसतात. दुसरी चतुर्थीसारखी म्हणजे स, ला, तें वगैरे प्रत्यय लागून झालेली. पहिलीस **अ-प्रत्यय द्वितीया** दुसरी **स-प्रत्यय द्वितीया** अशीं नांवें दिलीं आहेत ( क० ३३९ पाहा. ). उदा०–' रामा **काम** करितो. ' 'विद्यार्थी **पुस्तक** वाचील. ' ' बाप **मुलांस** पोशितो. ' ' तो **भात** जेवला. ' 'ही तुझी **लबाडी** मी तुझ्या बापास कळवीन. ' ' तो **तुला** पाठवील. ' इ०.

**टीप** १—कर्मणिप्रयोगांत कर्मवाचक शब्द प्रथमा विभक्तींत असतो, तेव्हां त्याला **उद्देश्य** असें म्हणावयाचें जसें,—' रामानें **काम** केलें. ' ' विद्यार्थ्यानें **पुस्तक** वाचिलें. ' इ०.

**टीप** २–द्वितीया विभक्तींत असणारें कर्मपद आणि मूळचा कर्मवाचक शब्द यांतील भेद नीट लक्षांत आणावा. कर्मणिप्रयोगांत मूळचें जें कर्म त्याचें खरें कर्मत्व गेलेलें असतें व त्याच्याकडे वाक्यांतलें प्रमुखत्व आलेलें असतें. वाक्यांतला प्रमुख शब्द प्रथमान्त असावयाचा, म्हणून कर्मणिप्रयोगांत कर्मवाचक शब्दाची प्रथमा होते.

( २ ) माप, किंवा वजन यांचें परिमाण दाखविण्याकरितां जे शब्द योजितात ते द्वितीया विभक्तींत असतात. हिला **परिमाणार्थी द्वितीया** असें म्हणावें. उदा०—' दोन तोळे सोनें आण. ' ' पांच बिघे जमीन विकली. '' चोरानें चार पायली तांदूळ नेले. इ०.'

( ३ ) कालवाचक नामांवरून जेव्हां कालाच्या अवधीचा किंवा मर्यादेचा बोध होत असेल, तेव्हां त्याची द्वितीया विभक्ति असते. ही **कालार्थी द्वितीया** होय. उदा०—' मी चार **दिवस** मुंबईस होतों. ' ' पांच **मिनिटें** पडदा पडेल. ' 'एक **घटका** थांब.' 'आज **आठ दिवस** पाऊस पडत आहे. '

' ऐशी सेवा बहुत **दिवस** । करीत असे निजप्रेमें. ' —महिपति.

' दास म्हणे सदा सावध असावें । दुश्चित्त नसावें **सर्वकाळ** '

—रामदास.

( ४ ) त्याचप्रमाणें दोन ठिकाणांमधील अंतराची मर्यादा दाखविणें झाल्यास नामाची द्वितीया योजितात. हिला **अंतरार्थी द्वितीया** म्हणावें. जसें,–' येथून चार कोस रान आहे. ' ' खंडाळ्याहून पुढें तीन कोस बरेच बोगदे लागतात. '

**टीप १**–वजन वगैरे दर्शविणारी, कालार्थी व अंतरार्थी, या तीन प्रकारच्या द्वितीयेस परिमाणार्थी असें एकच नांव योजण्यास चिंता नाहीं.

**टीप २**–परिमाणार्थी प्रथमा केव्हां मानावी व द्वितीया केव्हां मानावी, हें समजणें जरूर आहे. वजन, माप, अंतर, लांबी, रुंदी, उंची, कालमान, इत्यादींचे दर्शक शब्द जेव्हां उद्देशार्थी, विधानार्थी, किंवा विशेषणार्थी योजलेले असतात, तेव्हां त्यांची प्रथमा समजावी. अशा वेळीं वाक्यांत बहुधा असणें, होणें, साजणें, शोभणें, बनणें, दिसणें, वाटणें, भासणें इत्यादि किंवा अशा अर्थाचीं क्रियापदें असतात. जेथें ते शब्द असे विशेषणार्थी नसतात, पण त्यावरून परिमाणाचा, कालाच्या अवधीचा, किंवा अंतराच्या मर्यादेचा बोध होत असतो तेथें ती द्वितीया विभक्ति समजावी. साधारणतः असें म्हणतां येईल कीं, जेथें माप इत्यादि दाखविणाऱ्या शब्दांपुढें ' भर ' हा शब्द घालता येतो, तेथें प्रथमा समजावी, व जेथें ' पर्यंत ' हें शब्दयोगी अव्यय घालितां येतें, तेथें द्वितीया समजावी.

( ५ ) जाणें, फिरणें, हिंडणें, इत्यादि गतिवाचक क्रियापदें हीं वस्तुतः अर्थदृष्ट्या सकर्मक क्रियापदेंच होत; व त्या गतीचा व्यापार ज्या स्थलाकडे घडतो तद्दर्शक नामें त्यांचीं कर्में असतात. त्यांची सप्रत्यय किंवा अप्रत्यय द्वितीया असते. उदा०—' हरी **गांवास** किंवा **गांवाला** गेला.' ' मी या कामासाठीं **घरांघर** हिंडेन.' ' तो त्या औषधासाठीं **रानेवनें** फिरला. ' ' इतका **रस्ता** चालल्यावर तो अगदीं थकला. ' इत्यादि.

**टीप**—पहिल्या उदाहरणांतील ' गांवास ' किंवा ' गांवाला ' याची स्थलार्थी चतुर्थीही समजतात. म्हणजे स्थलवाचक किंवा कालवाचक नामास स–ला–प्रत्यय लागले असले, म्हणजे अशी चतुर्थी मानितात.

( ६ ) सकर्मक क्रियापदांवरून झालेलीं कृदन्तें वाक्यांत आलीं असतां सकर्मक क्रियापदांवरून त्यांची द्वितीयान्त कर्मपदें त्यांच्याबरोबर येतात.

उदा०—‘ **असें** म्हणून किंवा **हें** ऐकून तो निघून गेला.’ ‘हें **काम** तोच करूं जाणे.’ ‘तुम्ही हीं फळें फार खाऊं नका.’ इ०

( ७ ) उद्देशार्थी किंवा विशेषणार्थी प्रथमेसारखीच द्वितीयाही असते. तेव्हां कर्मपदाचा अर्थ स्पष्ट करण्याकरितां जेव्हां त्याचे पर्यायशब्द वाक्यांत येतात, तेव्हां ते कर्माप्रमाणेंच द्वितीयान्त असतात. ही उद्देशार्थी किंवा विशेषणार्थी द्वितीया. उदा०—‘ईश्वराचें नाम सकल **पातक भस्म** करितें.’ ‘मला **ब्राह्मणाला** बोलाव.’ ‘त्याला **लबाडाला** ठोकला पाहिजे.’ ‘त्याला **पोराला** काय विचारतोस?’ ‘**गरीबाला** धर्म कराल तर पुण्य जोडाल.’ इत्यादि.

( ८ ) करणें, बनविणें, नेमणें, मानणें, म्हणणें, म्हणविणें, समजणें, या आणि अशा अर्थाच्या क्रियापदांना दोन कर्में असतात. जें काय ‘नेमणें’ किंवा ‘मानणें’ किंवा ‘बनविणें’ इत्यादि, तद्दर्शक नामाची अप्रत्यय द्वितीया असून तें क्रियापदाचा भाग म्हणून त्याच्याजवळ येतें. आणि ज्याला नेमावयाचें इत्यादि, त्याची सप्रत्यय द्वितीया होऊन तें वाक्यांत कर्म असतें. उदा०—‘शाहूराजानें **बाजीरावास** पेशवा केलें किंवा पेशवा नेमलें.’ ‘मी **रामाला** आपला मित्र समजतों ( किंवा मित्र मानितों )’. ‘जर्मनीच्या **बादशहास** केसर म्हणतात.’ ‘हरी **आपल्याला** (किंवा स्वतांला) मोठा शहाणा समजतो.’ इत्यादि. यांतलीं क्रियापदाबरोबरचीं कर्मपदें यांची **उद्देशार्थी** किंवा **विशेषणार्थी** द्वितीया समजावी.

( ९ ) क्वचित् अशा वाक्यांतील कर्मपदांची अप्रत्यय द्वितीयाही करितात. जसें,—‘शाहूराजा **बाजीराव हा** आपला पेशवा करील असें सर्वांना वाटलें.’ ‘मी **रामा** आपला मित्र समजतों.’ ‘**द्रव्य हें** निर्वाहाचें साधन समजतात.’ ‘तो **रामराव** हा आपला **भाऊ** मानितो.’ ‘लोक **राजा** हा एक **देवच** समजतात.’ ह्या उद्देशार्थी द्वितीया होत. अशा वाक्यांत बाजीरावाला, रामाला, द्रव्याला, राजाला, अशी सप्रत्यय द्वितीया केलेली बरी दिसते.

३७७. **तृतीया**—

( १ ) तृतीयेचा मुख्य अर्थ **करण** होय. करण म्हणजे साधन. कोणतीही क्रिया करण्याचें जें साधन तें तृतीया विभक्तीनें दर्शविलेलें असतें. जसें,—‘शिकाऱ्यानें **तरवारीनें** वाघ मारिला.’ ‘मराठी **लेखणीनें** लिहितात व इंग्रजी **पेनानें**

लिहितात.' 'ईश्वर **भक्तीनें** वश होतो.' '**द्रव्यानें** सर्व मिळतें.' 'मी **डोळ्यांनीं** पाहातों व **कानांनीं** ऐकतों.' 'तो **पायीं** चालतो.' 'एवढा निरोप **तोंडीं** सांगा.' इ०.

(२) कर्मणि व भावी प्रयोगांत कर्तृपद तृतीयान्त असतें. हिला **कर्तृपदार्थी** तृतीया म्हणावें. उदा०—'**गोपाळानें** गाय बांधिली.' '**त्वां** काम केलें.' '**रामानें** रावणास मारिलें.' **त्यानें** जावें.' 'लहान **मुलांनीं** नित्य रडावें.'

'सत्यातें जोडावें **सुज्ञें** धर्मासि पळ न सोडावें,'
'निष्फळ होती **मेघें** त्यजिलीं, आलींहि जीविका शेतें.' —मोरोपंत.
'रामवृत रघुवंशवरातें सर्व वर्णुनि गुहाख्य **किरातें**,
लंघुनी सुरनदी, भरतातें ने ससैन्य रघुराजरतातें.' —वामन.

(३) शक्य क्रियापदाचें कर्तृपद तृतीया विभक्तींत असते. पण ततीयेचा प्रत्यय लागण्यापूर्वी कर्तृपदाचें च-प्रत्ययान्त किंवा संबंधी विशेषण होतें. जसें '**माझ्यानें** हें काम करवत नाहीं.' '**गोविंदाच्यानें** एकटें कसें राहावेल?' ही **कर्तृपदार्थी** तृतीयाच होय.

(४) जशी भावी प्रथमा तशी भावी तृतीयाही असते. तेव्हां तृतीयान्त कर्तृपदाचा संबंध वाक्यांत कोणत्याही पूर्ण क्रियापदाशीं नसून केवळ कृदन्ताशीं असतो, व तो सर्व वाक्यांश कर्मणि किंवा भावी अर्थाचा असतो. जसें,—'**त्यानें** असें सांगतांच, रामा तेथून निघून गेला.' '**चाकरानें** ही हकीकत कळवितांच सर्व घरभर रडारड झाली.'

'सर्वेंचि वरुणालागीं कोपें, म्हणे येणें पंथें चालतां **नृपें**,
सरितासरोवरांचीं आपें, नेऊनि शुष्क करावीं.' —मुक्तेश्वर.

(५) क्रियेचा हेतु, कारण, मूळ किंवा प्रसंग दाखविणारीं नामें तृतीयान्त असतात. उदा०—'आपल्या **कृपेनें** माझा सांभाळ झाला' 'त्या **बातमीनें** त्यास हुपारी आली.' 'अशा **दांडगाईनें** मी तुला काढून लावीन.' 'त्या स्त्रीनें **लज्जेनें** जीव दिला.' 'तें कुटुंब **दारिद्र्यानें** या दशेस आलें.—' इ०. ही **हेत्वर्थी** तृतीया.

(६) 'त्यास अनुसरून,, 'त्यावरून,' किंवा 'त्याप्रमाणें,' असा अर्थ असतां नामाची तृतीया योजितात. उदा०—'माझ्या **मतें** तो आज परत

येईल.' 'ही गोष्ट **कायद्यानें** तुला करितां येणार नाहीं.' 'त्याच्या **म्हणण्यानें** तूं लबाड ठरतोस.' इ०. ही **निदानार्थी** तृतीया होय.

( ७ ) कोणत्याही कार्याचें किंवा व्यंगाचें कारण तृतीयेंत घालितात. जसें,– 'दुष्टाचे **संगतीनें** फायदा होणार नाहीं.–' 'तो मनुष्य **व्यसनानें** फुकट गेला.–' '**रागानें** सगळें बिघडतें.–' 'हरिण एका **डोळयानें** आंधळें होतें.–' 'तो भिकारी **पायानें** लंगडा आहे.–'

'होत असे भला भल्याचे **संगतीं** । जाय अधोगती **दुष्टसंगें**.
'**मळत्यागें** झाला शरीरें निर्मळ । अंतरींचा मळ कैसा गेला ! ।'
—तुकाराम.

ही **निमित्तार्थी** तृतीया.

( ८ ) ज्या विशेषणांनीं गुणांची न्यूनता, आधिक्य, किंवा प्राप्ति दाखविली जाते, त्यांचे अगोदर तृतीया येते. जसें,—**पैशानें** उणा.' '**नांवानें** मोठा.' '**गर्वानें** फुगलेला.'

**टीप**—पोटकलमें ५, ६, ७ आणि ८ यांत सांगितलेली तृतीया, हिला साधारणतः **हेत्वर्थक तृतीया** असें नांव द्यावें.

( ९ ) एखाद्या क्रियेची रीत किंवा पद्धत दाखविण्यासाठीं तृतीया योजितात. जसें,–' त्यांनीं मोठ्या **ममतेनें** आमचें आगतस्वागत केलें.' 'तो **मिनतवारीनें** खर्च करितो, म्हणून श्रीमंत झाला आहे.' इ०. ही **रीति-दर्शक** तृतीया.

( १० ) 'सहित' किंवा बरोबर' असा अर्थ असतां तृतीया घालितात. जसें,—'एका **घोतरानें** जाऊं नको.' 'शिवाजी हजार **स्वारांनीं** किंवा **स्वारांनिशीं** शत्रूवर चालून गेला.' ' तो जिवानिशीं (जिवासहित, जीव राखून) सुटला.' इ०. ही **सहार्थी** तृतीया.

**टीप**—' शीं ' हा तृतीयेचा प्रत्यय संस्कृतांतील 'सह' या अव्ययावरून झाला आहे. 'सह' याच्यापूर्वी संस्कृतांत तृतीया विभक्ति येते; म्हणून मराठींत-ही तृतीयेचा 'सहित' किंवा 'बरोबर' असा अर्थ असतां 'शीं' याचे पूर्वी पुष्कळदां तृतीयेचा 'नीं' प्रत्यय लागतो. अशा ठिकाणीं त्याचा अनुस्वार जातो व तो ऱ्हस्वही लिहितात.

( ११ ) 'शीं' हा प्रत्यय लागला असतां केव्हां तृतीयेवरून **सान्निध्याचा** आणि कदाचित् **सादृश्याचा** अर्थ होतो. जसें,–'**घराशीं** घर भिडलें आहे.' 'तो **त्याच्याशीं** बोलत बसला आहे.' '**थोराशीं** गांठ पडली म्हणजे बरें.'

'स्वर्गी **इंद्रसभेशिं** तुल्य दुसरी धात्रीवरी शोभली.' –विठ्ठल.

'तुजकरितां **मजशीं** हो पावोनि विचार शीलसम राजा' –मोरोपंत.

( १२ ) गतिवाचक क्रियापद असतां 'मार्ग' या अर्थाचा जो शब्द असेल त्याची तृतीया असते. जसें,—'तो कोणत्या **रस्त्यानें** गेला?' 'मी सहज **वाटेनें** चाललों होतों.'

'प्राणी संसारासी आला, तितुका **मृत्युपंथें** गेला.' –तुकाराम.

'मना सज्जना **भक्तिपंथेंचि** जावें.' –रामदास.

'झेंप घाली सत्वरीं **गगनपंथ.**' –रघुनाथपंडित.

ही **अधिकरणी** म्हणजे स्थानदर्शक तृतीया.

( १३ ) कमीजास्त माप किंवा परिमाण दाखवावयाचें असतां तृतीयेचा उपयोग करितात. जसें,—'**पांचांनीं** उणें.' '**तिहींनीं** ज्यास्त.' 'तो **शेरानें** विकतो, **पायलीनें** विकीत नाहीं.' '**थेंबें थेंबें** तळें सांचे.' 'तो माझेपेक्षां दोन **वर्षांनीं** मोठा आहे.' हिला **परिमाणार्थी** तृतीया म्हणावें.

( १४ ) 'कालाचा नियमित भाग झाल्यावर,' असा अर्थ असतां कालबोधक नाम तृतीयान्त असतें. जसें —'मी चार **घटकांनीं** येईन.'

'तूं केवढ्या **वेळानें** येशील?'

'राजा वधाल पांडवबळ किति **दिवसां** असें वदे भीष्मा.'

–मोरोपंत.

'तपोधैर्याचा पर्वत; चूर्ण झाला **क्षणार्धें**'

–मुक्तेश्वर.

या तृतीयेचा अर्थ **अवधि**; अथवा ही **कालार्थी** तृतीया.

**३७८. चतुर्थी**—

( १ ) ज्याकारणानें किंवा ज्यासाठीं अथवा ज्यास उद्देशून क्रिया घडते, तद्दर्शक शब्द चतुर्थी विभक्तींत घालितात. चतुर्थीचा मुख्य अर्थ **संप्रदान** होय. उदा०–'राजा **ब्राह्मणांस** द्रव्य देतो.' 'त्यानें **शत्रूस** युद्धास बोलाविलें.'

'तुझ्या मनांतून **गुरूला** काय द्यावयाचें आहे?' 'मी **त्यास** ही बातमी सांगेन.' '**गरिबास** धान्य दे.' इ०.

(२) प्रमाण किंवा तुलना दाखविण्यास, किंवा कोणत्याही पदार्थाच्या विक्रीचा भाव सांगण्यास चतुर्थी योजितात. जसें,– '**पांचांस** जसे चार तसे **दहांस** आठ.' 'तो **जशास** तसा आहे.' '**जीवास** जीव घेणें.' '**शिवीला** शिवी देणें.' 'आंबे **पैशास** चार मिळतात.' 'गहूं **रुपयास** चार शेर आहेत.' 'बाजरीचा दर **पल्लयास** आठ रुपये आहे.' 'भाषांतर **शब्दास** शब्द असें करा.' 'हें घर तुम्हीं **केवढ्यास** घेतलें?'

'श्रीकृष्ण **रुक्मिणीला**, श्रीकृष्णा रुक्मिणी जशी, आतां—
**दमयन्तीस** नळ, नळा दमयन्ती, आयकों जनें गातां.' —मोरोपंत.

ही **तुलनार्थी चतुर्थी** होय.

(३) क्रियेची कोणत्याही स्थानीं गति किंवा स्थिति दाखविणें असतां स्थलवाचक नामाची चतुर्थी होते. जसें,—'तो **मुंबईस** किंवा **गांवाला** गेला.' 'गाडी पांच वाजतां **जबलपुरास** पोंचेल.' 'माझा मामा **वसईस** राहातो.' 'तुम्ही कधीं **सातार्‍यास** होतां काय?' '**काशीला** गेल्यानें गंगास्नान घडेल.' 'त्याचे एकदां गंगेस घोडे न्हाले.' इ०. ही **स्थलार्थी** किंवा **अधिकरणार्थी** चतुर्थी होय.

(४) '**डोक्यास** पागोटें घाला.' 'त्याचे **ढुंगणाला** कधीं जाडेंभरडें फडकेंही लागलें नसेल.' 'त्यानें **अंगाला** राख फांसली.' '**कानास** ठणका आणि **पायास** तूप.' इत्यादि उदाहरणें स्थलार्थी किंवा अधिकरणार्थी चतुर्थीचींच आहेत.

(५) सप्तमीचा अर्थ असतां किंवा 'अमुक वेळीं' असें सांगावयाचें असतां कालवाचक नामांची चतुर्थीही होते. **ही कालार्थी चतुर्थी होय.** जसें,–'मी **दिवसास** निजत नाहीं.' '**रात्रीस** जागल्यानें प्रकृतीला अपाय होतो; पण **पहांटस** उठणें प्रकृतीला चांगलें मानवतें.' 'आपण **रात्रीस** वस्तीला कोठें होतां?' 'उद्यां **चाराला** या. '**दहांना** पानें बसतील.' **पांचांना** उठून उद्योगास लागा.' 'तो **चतुर्थीला** गेला.' '**पौर्णिमेला** ग्रहण आहे.' इ०.

(अ) आणखी कालार्थी चतुर्थीचीं कांहीं उदाहरणें:—हें पागोटें मीं **दिवाळीला** घेतलें.' '**दसर्‍याला** सोनें वांटतात.' '**गणपतीला** तो घरीं

येईल.' '**पहांटेस** भूपाळ्या म्हणतात.' '**शिवरात्रीला** आपण कोठें असाल?' '**पाडव्याला** कडुनिंब खातात.' इ०.

( ६ ) कोणत्याही गोष्टीचा हेतु, कारण, उद्देश किंवा उपयोग दाखविण्यास नामाची चतुर्थी योजितात. हिला **हेत्वर्थी चतुर्थी** असें म्हणावें. जसें,—'तो तुमच्या **नाशास** कारण होईल.' 'मनुष्य **कीर्तीस** झटतो.' '**मुलांस** खाऊ आण.' 'विद्यार्थी **शिकावयास** शाळेंत येतात.' '**भुकेला** कोंडा आणि **निजेला** धोंडा.' '**भाजीला** कोबी आणा.' '**दुधाला** पैसे द्या.' '**भाड्याला** पांच रुपये पुरतील; पण **फराळास** बरेंच द्या.'

'तुवां जाऊनी तपोवना, कौशिक ऋषीच्या **दर्शना**.' —मुक्तेश्वर.

( अ ) केव्हां चतुर्थीला तृतीयेसारखा अर्थ असतो. त्या वेळीं तिच्यावरून कारणाचा किंवा हेतूचा बोध होऊन, तिचा अर्थ 'या कारणानें,—मुळें' असा असतो. अशा ठिकाणीं चतुर्थीचें अव्यय 'स्तव' याचा विशेष उपयोग करितात. जसें,—'हरीनें अशी दाडगाई केली, **यास** [ यास्तव ] त्याला शिक्षा होईल.' 'पाऊस न **पडल्यास** [ पडल्यानें ] दुष्काळ पडेल.' 'झाला क्षीण बहु **क्षुधेस्तव** [ क्षुधेमुळें-नें ] जरी, कीं व्यापिला वार्धकें.'

'उपजला तरि तोचि मला गमे
कुल समुन्नति **ज्यास्तव** घे, रमे.' —वामन.
'धाता करींच करिता, मृदु ते न होती,
या **कारणास्तव** मनोमय मूस ओती.'—रघुनाथपंडित.

ही देखील हेत्वर्थी चतुर्थीच होय.

( ७ ) चतुर्थीवरून सत्ता, स्वामित्व किंवा मालकी यांचाही बोध होतो. हिला **स्वामित्वार्थी** चतुर्थी म्हणावें. उदा०—'**त्यास** चार मुलें आहेत.' '**विष्णूला** पन्नास रुपये पगार आहे.' 'माझ्या **मामाला** हजार रुपयांचें उत्पन्न आहे.' इ०.

( ८ ) मुकणें, बुडणें ( नुकसान होणें ), घालाविणें, इत्यादि 'नुकसान पावणें' या अर्थाचीं क्रियापदें असतां ज्यासंबंधानें नुकसान होतें तद्दर्शक शब्दाची चतुर्थी येते. उदा०—'तो सावकार **दहा हजारांस** बुडाला.' 'तो

व्यर्थ **जिवास** मुकला.' 'मी **मिळकतीस** आंचवलों.' 'माझा भाऊ तीन **हजारांना** खालीं आला.' इ०. ही **वियोगार्थी चतुर्थी.**

( ९ ) योग्य, उत्तम, गोड, वाईट, कठीण, शोभेसें, उचित, वगैरे विशेषणांचे मागें चतुर्थी येते. जसें,—'हा तुमच्या **मुलीला** योग्य वर आहे.' '**हें** फळ **रुचीला** उत्तम आहे.' 'तो **बोलण्यास** गोड आहे.' 'हें धान्य **पोटाला** वाईट आहे.' 'हें करणें तुझ्या **कुळास** शोभेसें नाहीं.' '**पाहण्यास** वाईट.' '**समजण्यास** कठीण.' 'हें **तुला** उचित आहे काय?' या चतुर्थीवरून हेतु किंवा कारण याचा सामान्यपणें बोध होतो.

( अ ) हीं विशेषणें जेव्हां धातुसाधित नामांबरोबर येतात, तेव्हां त्या नामांची चतुर्थी असतेच; पण त्या धातुसाधित नामाचें जे कर्तृपद असतें तेंही चतुर्थी विभक्तींत असतें. या कर्तृपदाच्या चतुर्थीचा तृतीयेसारखा अर्थ असतो. जसें,–'हें फळ **तापकऱ्याला** [ तापकऱ्यानें ] खाण्यास योग्य नाहीं.'

'ध्रुव ध्रुव खरा, स्तवा उचित होय **विश्वास** तो.' –मोरोपंत.

**ही कर्तृपदार्थी** चतुर्थी होय.

( १० ) नमस्कार, रामराम, जोहार, इत्यादि नमनाचे प्रकार, किंवा आशीर्वाद, विनंती, यांचा अर्थ असतां ज्याला नमस्कार वगैरे करावयाचा, आशीर्वाद द्यावयाचा, किंवा विनंती करावयाची त्याची चतुर्थी घालितात. जसें,—**तुम्हांस** नमस्कार. '**लहानथोरांस** रामराम. '**विठोजीस** दंडवत. '**खोताला** जोहार.' '**मुलांना** आशीर्वाद.' '**सरकारला** विनंती.' इ०. हिलाही **संप्रदानार्थी चतुर्थी** म्हणावें.

( ११ ) रुचणें, वाटणें, भासणें, आवडणें, दिसणें, समजणें, येणें [ माहीत असणें या अर्थी ], साजणें, साधणें, शोभणे, खपणें, लागणें, इत्यादि इंद्रियगम्य व्यापारांचा बोध करून देणारीं क्रियापदें वाक्यात असतां, ज्याला त्या व्यापाराचें ज्ञान व्हावयाचें तद्दर्शक नामाची चतुर्थी येते. जसें, '**मला** हें रुचत नाहीं.' '**विष्णूस** भक्ति आवडते.' '**त्याला** असें वाटतें.' '**मला** तसें भासलें.' '**तुला** चांगलें दिसत नाहीं का?' '**देवाला** सर्व दिसतें.' '**हरीला** व्याकरण येतें, पण **रामाला** तें नीट समजत नाहीं.' 'असें बोलणें **मोठ्याला** साजत नाहीं.' '**तिला** स्वयंपाक चांगला साधतो.'

'त्याच्या **बापाला** हें कधीं खपणार नाहीं.' '**तुम्हांस** असें करणें शोभतें काय?' 'ते शब्द **त्यास** फार लागले.' इ०. ही **कर्तृपदार्थी चतुर्थी**. कारण हीं क्रियापदें सकर्मक असतां तर ज्याला ज्ञान वगैरे व्हावयाचें तद्दर्शक नाम कर्तृस्थानीं आलें असतें.

( १२ ) शक्य क्रियापद असतां कर्तृपदाची चतुर्थी असते. जसें,–'**मला** काम करवतें.' '**त्यास** जाववतें.' '**हरीला** बसवत नाहीं.' इ०. ही **कर्तृपदार्थी चतुर्थी** होय. येथें विकल्पेकरून तृतीयाही होते. मात्र तृतीयेचा प्रत्यय नामाच्या किंवा सर्वनामाच्या च-प्रत्ययान्त विशेषणाच्या सामान्यरूपाला लागतो. जसें,–'**माझ्यानें** काम करवतें.' '**त्यास** किंवा **त्याच्यानें** जाववतें.' '**हरीला** किंवा **हरीच्यानें** बसवत नाहीं.' इ०.

( १३ ) करावयास, जावयाचें, करावयाचें, जावें, बोलावें, बोलूं, करणें, करितां, जातां, जाऊं, इत्यादि धातुसाधित नामें किंवा विशेषणें वाक्यांत कर्तृपदीं असतां त्यांच्या धात्वर्थाचें कर्तृपद चतुर्थ्यन्त असतें. ही **कर्तृपदार्थी चतुर्थी**. जसें,—'**मला** मुंबईस जावयाचें आहे.' '**तुला** सभेंत बोलावयाचें आहे.' '**त्यास** जावें लागेल.' '**मला** जातां नये.' '**हरीस** जाऊं दे.' '**त्याला** बोलूं देऊं नको.' '**त्याला** असें करणें प्राप्त आहे.' इ०. अशा ठिकाणीं क्वचित् कर्तृपदाची तृतीयाही असते. जसें,–'**त्यानें** जाऊं नये' किंवा 'जातां कामा नये.' इ०.

३७९. **पञ्चमी**—

( १ ) पंचमीचा मुख्य अर्थ **अपादान** आहे. अपादान म्हणजे वियोग. या विभक्तीवरून ज्या स्थलाचा, वस्तूचा किंवा मनुष्याचा वियोग होतो, अथवा ज्यापासून कार्याची उत्पत्ति होते त्याचा बोध होतो. जसें,—'हरी **मुंबईहून** आला.' '**नाशकाहून** आज पत्र येईल.' 'ही बातमी मला **रामाकडून** समजली.' 'मीं कालच **रा(ज)जापासून** आपले पैसे घेतले.' इ०.

( २ ) ज्या पदार्थापासून किंवा स्थानापासून क्रियेची उत्पत्ति होते, तो पदार्थ किंवा स्थान पंचम्यन्त असतें. उदा०–'इंग्रज **ब्रिटन देशाहून** आले.' 'हें पुस्तक मीं **मद्रासेहून** मागविलें.' '**झाडावरून** पान पडतें.' '**हिमालयांतून** गंगा निघते.' '**आकाशांतून** दगड पडले.' 'तुझ्या **भावाकडून** पत्र आलें काय?' इ०. हीं उदाहरणें **अपादानार्थी** पंचमीचींच आहेत.

( ३ ) क्वचित् वियोगाचा अर्थ असतां, ज्यापासून वियोग झाला, त्याजकडेसच क्रियेचें कर्तृत्व असतें. अशा ठिकाणीं **कर्तृपदार्थी पंचमी** असें म्हणावें. जसें,–' **मजकडून** आज एक आंगठी हरवली. ' ' **त्याच्याकडून** पुस्तक कोठें गहाळ झालें. ' ' **रामापासून** किंवा **रामाकडून** काल शंभरांची नोट सांडली. ' इ०. या उदाहरणांत 'हरवली ' ' गहाळ झाली ' व ' सांडली ' या क्रियांचें जनकत्व अनुक्रमें ' मी, ' ' तो ' व ' रामा ' यांजकडे आहे.

( ४ ) मऊ, कठीण, उंच, ठेंगणा, काळा, गोरा, अन्य, वेगळा, निराळा, दुसरा, भिन्न, इत्यादि अर्थांचीं विशेषणें घालून दोन पदार्थांची तुलना करावयाची असतां पूर्वोक्त विशेषणांमागील नामे पंचम्यन्त असतात. उदा०– '**लोंकरीहून** मऊ.' '**दगडाहून** कठीण.' '**मजहून** वडील.' 'सांब **विष्णूहून** वेगळा का ?' 'तो **त्याहून** थोर आहे. ' '**दगडापेक्षां** वीट मऊ.' ' **गंगेहून** सिंधूनदी फार मोटी आहे. '

' किंवा कोणी दुसरा **मजहुनि** बहु दीन दास आढळला;
तच्छुभदैवसमीरें त्यावरि करुणाघन प्रभू वळला. ' –मोरोपंत.

ही **तुलनार्थी पंचमी** होय.

**टीप**—तुलनार्थी पंचमी असतां, तुलना दोनच पदार्थांमध्यें किंवा दोन पदार्थसमुदायांमध्यें केली असली पाहिजे, व ते पदार्थ किंवा समुदाय परस्परांपासून भिन्न पाहिजेत. पुष्कळ पदार्थांपैकीं एकाचीच बाकीच्यांशीं तुलना कर्तव्य असतां सप्तमी घालितात. जसें,–' तो आपल्या वर्गातील सर्व **मुलांत** उंच आहे.' येथें सर्व 'मुलां–पेक्षां–हून उंच आहे,' असें म्हणणें चुकीचें होईल. कारण ' सर्व मुलांत ' तो सुद्धा येतो.

( ५ ) दोन स्थळांमधील अंतर किंवा काळाचा अवधि दाखवावयाचा असतां ज्या स्थळापासून किंवा काळापासून मोजणी करावयाची तद्वाचक शब्दाची पंचमी योजितात. जसें,—' **काशीहून** मुंबई सातशें मैल आहे. ' ' **कालपासून** मला चैन पडत नाहीं. ' ' गेल्या **वर्षापासून** त्याची प्रकृति सुधारली. ' इत्यादि. हीस अर्थानुरोधानें **स्थलार्थी** किंवा **कालार्थी** पंचमी असें म्हणावें.

३८०. षष्ठी—

मराठींत च-प्रत्ययान्त विशेषणांचा उपयोग षष्ठीचा अर्थ दाखविण्यासाठीं करितात, आणि त्या विशेषणांस षष्ठीचीं रूपें असें म्हणतात. यासाठीं त्या विशेषणांचे जे निरनिराळे उपयोग, ते षष्ठीचे अर्थ होत.

३८१. षष्ठी विभक्तीचा मुख्य उपयोग स्वामित्वसंबंध दाखविण्यासाठीं होतो. हा संबंधवाची शब्द लगेच पुढें येतो. हा बहुधा नामवाचक असतो. जसें,—' आमचें घर. ' ' राजाचा वाडा. ' ' हरीचें पुस्तक. ' ' देवाचें नांव. ' ' राजाचा मुगूट. ' ' ईश्वराची कृपा. ' इत्यादि. या विशेषणांचे निरनिराळ्या अर्थीं होणारे उपयोग सांगतोः—

( १ ) पदार्थाशीं मालकाचा **स्वामित्वसंबंध**. जसें,—' राजाचा वाडा. ' मोंगलाचें राज्य. ' ' रामाचें धोतर. ' ' विष्णूचें देवालय. ' इ०.

( २ ) क्रियेशीं किंवा क्रियेच्या फळाशीं **कर्तृकार्यसंबंध**. जसें,–' पक्ष्याचें घरटें ( पक्ष्यानें बांधलेलें घरटें ). ' ' रामाचें पत्र ( रामानें लिहून धाडलेलें पत्र).' इ०.

( ३ ) मनुष्यांचा परस्परांशीं निकट किंवा **नात्याचा संबंध**. जसें,–'माझा भाऊ. ' ' कंपनीचा एजंट. ' ' रामाचा चाकर. ' इ०.

( ४ ) भागांशीं एकंदर पदार्थाचा **अंशांशी संबंध**. जसें,—' गाडीचीं चाकें. ' ' हाताचीं बोटें. ' ' सुपारीचें खांड. ' इ०.

( ५ ) वस्तूशीं गुणांचा **धर्मधर्मी संबंध**. जसें,—' योग्यतेचा माणूस.- ' रागाचा पुतळा. ' इ०.

( ६ ) ज्या द्रव्याचा एकादा पदार्थ बनविला असेल, त्याचा त्या पदार्थाशीं **प्रकृति-विकृति-संबंध**. जसें,–' लोखंडाची कांब. ' ' रेशमाचा कांठ. ' ' सोन्याची आंगठी. ' ' बरूची लेखणी. ' ' मोत्यांची कंठी. ' इ०.

**टीप**—' इतिहासाचें पुस्तक. ' ' वैद्यकीचा ग्रंथ. ' इत्यादि वाक्यांतील च प्रत्ययान्त विशेषणांचे उपयोग अशासारखेच आहेत, असें मानण्यास चिंता नाहीं.

( ७ ) जेथें पदार्थ ठेवावयाचा त्या स्थळाचा त्या पदार्थाशीं **आधारा' धेयसंबंध**. जसें,—' रुपयांची पिशवी. ' ' पुस्तकांचें कपाट. ' इ०.

(८) वंशांत किंवा गोत्रांत किंवा कुळांत उत्पन्न झालेल्या मनुष्याचा त्याशीं **कुलगोत्रसंबंध**. जसें,—' तो देशपांड्यांचा मुलगा. ' ' बिवलकराचा रामू. ' ' गोखल्यांचा सदू. ' इ०.

(९) ज्यांच्यापासून स्वाभाविक रागलोभभयादि विकार उत्पन्न व्हावयाचे त्यांचा त्या विकारांशीं **विकारकारणसंबंध**. जसें,—' वाघाची भीति. ' ' आईची माया. ' इ०.

(१०) ज्याच्या अंगचा गुण किंवा स्वभाव किंवा धर्म असेल, त्याचा त्या गुणाशीं **गुणगुणीसंबंध**. जसें,–' मनाचा मोकळा. ' ' हाताचा उदार. ' ' जिभेचा जड. ' ' मेंदूचा कमी. ' ' शरीराचा बळकट. ' इ०.

(११) कारण, उपयोग किंवा हेतु-संबंध. जसें,—' उन्हाची छत्री. ' ' स्नानाची जागा. ' ' गाडीचा घोडा. ' ' बसावयाची खोली. ' ' टेंकावयाची काठी. ' ' राहावयाचें घर. ' ' खाण्याचा पदार्थ. ' ' जाळावयाचीं लांकडें. ' ' विकावयाचा जिन्नस. ' इ०.

(१२) **स्थित्यंतरसंबंध** जसें,—' गरिबाचा श्रीमंत. ' 'या प्राकृत श्लोकाचें संस्कृत करा. ' इ०.

(१३) ' दोष, ' ' आरोप, ' इत्यादि अर्थांच्या शब्दांमागें ज्यासंबंधानें दोष, आरोप, वगैरे असेल त्याचा या विशेषणानें बोध करितात. जसें,–'बाल-हत्त्येचा दोष. ' ' खुनाचा आरोप. ' ' खोटें बोलण्याचा अपराध. ' ' चोरीचें पातक. ' इ०. तसेंच शिक्षेची मुदत किंवा प्रकार सांगण्यास हें विशेषण योजितात. जसें,—' फांशीची शिक्षा. ' ' आठ महिन्याची सक्त मजुरी. ' ' माराची, फटक्यांची किंवा उभें राहण्याची शिक्षा. ' इ०.

(१४) एखाद्या मिळकतीचें उत्पन्न किंवा वस्तूची किंमत सांगतांना ज्याचें उत्पन्न किंवा किंमत सांगावयाची त्याचें च-प्रत्ययान्त विशेषण घालितात. जसें,—'बागेचें उत्पन्न पांचशें रुपये आहे. ' ' या शेताचा खंड पन्नास रुपये येतो. ' ' या सिताफळाचे चार आणे येतील. ' इ.०

(१५) केव्हां संबंधी विशेषणावरून आंगच्या गुणाचा बोध होतो. जसें,–'मनाचा मोकळा. ' ' हाडाचा गरीब. ' ' हाताचा उदार किंवा सढळ. ' ' दृष्टीचा मंद. ' इत्यादि.

( १६ ) केव्हां मनुष्याच्या किंवा वस्तूच्या ठिकाणीं असलेला गुण दाखविण्याकरितां साधें विशेषण घालण्याचे ऐवजीं त्या गुणवाचक नामाचें च-प्रत्ययांत विशेषण घालितात. जसें—सचोटीचा माणूस ' 'शूरत्वाचे काम.' 'परोपकाराचें कृत्य.' 'तो स्वभावाचा शांत व जातीचा शंख आहे.' इ०

( १७ ) सकर्मक क्रियापदांपासून झालेल्या कर्तृवाचक नामांचें कर्म च-प्रत्ययान्त विशेषण असून तें त्या नामांच्या मागे येतें. ही कर्मणि षष्ठी. जसें,—'आंगरख्याचा शिवणारा.' 'तसबिरीचा पाहणारा.' 'मुलाचा शिकविणारा.' 'भवमहाहीचा मोहरा' इ०.

( १८ ) पदार्थांच्या किंमतीचा भाव किंवा दर सांगण्यास या विशेषणाचा उपयोग करितात. जसें,—'मी तीन शेरांचे गहूं घेतले.' 'तेरा छटाकांचें तूप घेऊन खावें कसें!' 'हे तादूळ हल्लीं विसांचे आहेत.' 'सोनें सध्यां फार महाग आहे; मी तें काल तिसांचें आणलें.' इत्यादि.

( १९ ) कोठें शब्दांची द्विरुक्ति होऊन पूर्व शब्दांचें संबंधी विशेषण होतें; आणि पुढला द्विरुक्त शब्द त्याचें विशेष्य असतो. या विशेष्याप्रमाणें त्या संबंधी विशेषणाचें रूप फिरणारें असतें. या संबंधी विशेषणांवरून समाहाराचा, अवधारणेचा, किंवा वैचित्र्याचा बोध होतो. जसें,—'दुष्काळानें गांवचे गांव ओस पडले.' 'पुरानें घरेंच्या घरें वसलीं.' 'पैशाच्या पैसा गेला, व बायकोपरी बायको गेली.' 'घरचे घरीं काय उद्योग होइल तेवढा मी करणार.' 'कोणाचें कोण आणि कशाचें काय!' 'हजारांचे हजार पाहिजे तें म्हणतील.' 'तुमचे तुम्ही, आमचे आम्ही.' 'ज्याचा तो.' इ०.

**टीप**—अशा ठिकाणीं बहुधा अकारान्त नामांचें सामान्यरूप न होतां त्यांस संबंधी विशेषणाचा प्रत्यय लागतो.' उदा०—'गांवचे गांव.' 'घरचे घरीं.' 'फणसचे फणस.' इ०.

( २० ) काळासंबंधानें नियमितपणा दाखवावयाचा असतां असाच द्विरुक्त संबंधी विशेषणाचा उपयोग करितात. उदा०—'तारखेच्या तारखेस.' 'तासाचे तासाला औषध घेण्याला चुकूं नका.' 'रोजचे रोज तो येतो.' 'मंगळवारच्या मंगळवारीं.' इ०.

( २१ ) कालवाचक नामाचा सप्तमीसारखा अर्थ असतां संबंधी विशेषण

घालितात. जसें,—' **रात्रीचा** जागतो आणि **दिवसाचा** निजतो.' '**आज सणवारचा** उपाशीं राहूं नकोस.' '**पावसाळ्याचें** रान फार माजतें.' इत्यादि.

( २२ ) कोठें या संबंधी विशेषणाचा उपयोग करणार्थी किंवा निमित्तार्थी असून पुढील शब्दानें पहिल्याचा परिणाम किंवा कार्य दर्शित होतें. जसें,— 'मनाचा मोकळा.' 'वजनाचा जड.' 'बुद्धीचा मंद.' 'अन्नाचा मारलेला खालीं पाहतो पण तरवारीचा मारलेला वर पाहतो.' इ०.

( २३ ) स्थळ व काळ यांची मर्यादा विवक्षित असतां या विशेषणांचा अधिकरणार्थी उपयोग करितात. अशा ठिकाणीं क्वचित् सप्तमी किंवा चतुर्थीही घालितात. उदा०—'मी घरचा [ घरीं किंवा घरास ] एकटा आहें.' 'तो दोन दिवसांचा उपाशीं आहे.' 'तो उद्यांचा माझे घरींच राहील.' इ०.

( २४ ) कोठें या विशेषणांचा अपादानार्थींही उपयोग होतो. जसें,–' असें करशील तर पंतोजीच्या हातचा मार मिळेल.' 'त्याच्या तोंडच्या शिव्यामात्र खाल्ल्यास.' इ०.

**३८२. सप्तमी—**

( १ ) ज्या स्थळीं क्रिया घडते त्यास **अधिकरण** म्हणतात. त्या स्थलाचा वाचक जो शब्द तो सप्तम्यन्त असतो. या सप्तमीचा अर्थ **अधिकरण.** जसें,– 'तो नेहमीं **घरीं** असतो.' 'श्रीमंत लोक **शहरांत** राहातात.' '**झाडाखालीं** गुरें विश्रांति घेतात.' '**घरावर** पोपट बसतात.' इ०.

( २ ) ज्या काळीं क्रिया घडते तो काळ दाखविण्याकरितां सप्तमी योजितात. उदा०–'तो **रात्रीं** जाईल.' '**वैशाखांत** लग्नें होतात.' '**बालवयांत** विद्या शिकावी.' 'गेल्या **वर्षीं** पाऊस चांगला पडला.' इ०. ही **कालार्थी सप्तमी.**

( ३ ) अनेक व्यक्तींतून एकच व्यक्ति विशिष्ट गुणांत श्रेष्ठ आहे, असें दाखवावयाचें असतां, अनेक व्यक्तींचा वाचक शब्द सप्तमींत घालितात. उदा०–' विष्णु आपल्या वर्गांतल्या सर्व **मुलांत** उंच आहे.' '**प्राण्यांत** मनुष्य श्रेष्ठ आहे.' '**पक्ष्यांत** काऊ आणि **माणसांत** न्हाऊ.' ही **तुलनार्थी सप्तमी.**

( ४ ) श्रद्धा, विश्वास, आसक्ति, प्रीति, वगैरे अर्थांचीं नामें किंवा क्रियापदें

वाक्यांत असतां, ज्याच्या ठिकाणीं श्रद्धा वगैरे दाखवावयाची त्याची सप्तमी होते. उदा०-'त्याची **विष्णूच्या ठायीं** किंवा **विष्णूवर** मोठी भक्ति आहे.' '**त्यावर** माझी श्रद्धा किंवा विश्वास नाहीं.' 'संसाराच्या **ठिकाणीं** फार आसक्ति असूं नये.' ही **अधिकरणार्थी सप्तमी.**

( ५ ) व्यग्र, तत्पर, चूर, वगैरे, 'गुंतलेला' किंवा 'गढलेला' अशा अर्थाचीं विशेषणें, व कुशल, निपुण, चतुर, धूर्त, प्रवीण, पटु, पंडित, हुषार, चपळ, पारंगत, इत्यादि विशेषणें, हीं ज्या कार्यांत गढलेला असें दर्शविणें असेल, त्याची किंवा ज्या गुणांत प्राविण्य वगैरे दाखवावयाचें असेल, त्याची सप्तमी घेतात जसें,—'दुःखांत व्यग्र.' 'कामांत तत्पर.' 'अभ्यासांत चूर.' 'शास्त्रांत निपुण.' 'बोलण्यांत चतुर.' 'लिहिण्यांत कुशल.' 'व्यवहारांत धूर्त.' 'वादांत प्रवीण.' 'व्याकरणांत पंडित.' 'गणितांत हुषार.' 'धावण्यांत चपळ,' 'वेदांत पारंगत.' इ०. हिलाही **अधिकरणार्थी सप्तमी** म्हणावें.

( ६ ) 'इ' हा सप्तमीचा प्रत्यय लागून झालेल्या नामांच्या रूपांना संबंधी विशेपणाचा 'च' प्रत्यय लागून विशेषणें होतात. जसें,—'मनींचा.' '**घरींचा.**' 'त्या दिवशींचा.' 'वनींचें.' 'ठायींचा.' 'लोकींचें.' 'स्वर्गींचें.'

'आतां वंदू संत-सज्जन, जे **वैराग्याचे** पंचानन.' —श्रीधर

'आमच्या **मनींचें** हितगुज कांहीं—' —तुकाराम.

**टीप**—हीं 'च' प्रत्यय लागून होणारीं विशेषणें विशेपतः स्थलार्थी आणि कालार्थी सप्तमीचीं रूपें असतील, तेंव्हांच होतात असें दिसून येईल.

## ( २ ) सामान्यविचार.

३८३. येथपर्यंत विभक्तींचे जे निरनिराळे व भिन्न भिन्न प्रकार सांगितले, त्यांमध्यें प्रत्येक विभक्तीच्या अर्थांत परस्परसाम्य फार आहे; व कोणत्याही विभक्तींचे जें मुख्य कारण त्याच्याशीं त्या विभक्तीचे इतर अर्थ जुळतात असें दिसून येईल. यासाठीं व्याकरण चालवितांना प्रत्येक विभक्तीचें मुख्य कारक व जरूर वाटल्यास कित्येक मुख्य मुख्य पोटअर्थ सांगावे. बारीकसारीक अर्थ नेहमींच सांगण्याची जरूर नाहीं. येथें निरनिराळे अर्थ केवळ वाक्यार्थाच्या निष्पत्तीकरितां सांगितले आहेत.

३८४. तृतीयेचा प्रत्यय जो 'नीं' त्याचे मागून आणखी 'शीं' हाही प्रत्यय क्वचित् लागतो, हें मागें सांगितलेंच आहे. क्वचित् दोन निरनिराळ्या विभक्तींचे प्रत्ययही एकदम लागतात. 'ईं' हा सप्तमीचा प्रत्यय लागून झालेल्या रूपाला च-प्रत्ययान्त विशेषणाचे प्रत्यय लागून स्थलवाचक विशेषणें बनतात, हेंही मागें सांगितलेंच आहे. 'ईं' प्रत्ययान्त सप्तमीच्या रूपाला 'हून' हा पंचमीचा प्रत्यय लागून पंचम्यन्त शब्द होतात. अशा ठिकाणीं सप्तमीचें रूप हें एक स्थलवाचक नामच आहे अशी समजूत असते. उदा०—

'दूतांनीं **यमसदनीं-हूनि** ढकलितां घडे तळीं पतन.'

—मोरोपंत.

३८५. (अ) शब्दयोगी अव्ययाचे योगानें विभक्ति झाली असतां, 'अमुक शब्दयोगी अव्ययाचे योगानें हें सामान्यरूप झालें' इतकें व्याकरण चालवितांना सांगण्याची चाल आहे. अशा ठिकाणीं ज्या विभक्तीचें तें शब्दयोगी अव्यय असेल ती विभक्तिही सांगावी हें चांगलें.

(ब) शब्दयोगी अव्यय क्वचित् शब्दाचे अगोदरही घातलेलें आढळतें. उदा०—'डोळां दिसे परि सत्याचिये.' —तुकाराम.

'विना—राक्षसी कैकयी काननातें.'

'निजमुख कवणाही आड—दृष्टी असेना.' —वामन.

'वरकड लोक **देखील तानाजी मालुसरा** गडावरी गेले.'

—सभासद शिवचरित्र.

**टीपः**—पुढें शब्दयोगी अव्ययांचें विभक्तीवार वर्गीकरण केलें आहे. त्यावरून कोणतीं अव्ययें कोणत्या विभक्तीचीं मानावीं, हें दिसून येईल.

३८६. एखाद्या वाक्यांत एकच विभक्तिप्रत्यय किंवा शब्दयोगी अव्यय अनेक नामांस एकदम लावणें झाल्यास, तीं सगळीं नामें प्रथमा विभक्तींत घालून त्यांच्या शेवटीं 'हा' या सर्वनामाचें योग्य विभक्तीचें रूप घालितात. त्या प्रत्येक नामाची उद्देशार्थी प्रथमा होते. अशा ठिकाणीं प्रत्येक पदार्थ मुद्दाम निरनिराळा दर्शविणें असेल, तर त्यांतील प्रत्येक नामास विभक्ति-प्रत्यय लावितात. उदा०—'रामा, हरी, विष्णु आणि गणू यांना बरोबर घेऊन या.' 'रामाला, हरीला, विष्णूला आणि गणूला बरोबर घेऊन या.'

'सुत, बंधु, जनक, जननी, गुरु, मित्र, कलत्र **यांसि** पाव कसा,
'म्यां पुसिलें कुशल असें **कर्णास**, सुयोधनासि सांगावें.'
'**रामातें, कृष्णातें, प्रद्युम्नातें**, महेषु नो हाणी.'
'**नेत्रांत, घ्राणांत, श्रवणांत, मुखांत** सर्व कटकाच्या—
बहु शिरकल्या इषीका, जेविं जगीं शक्ति विश्वघटकाच्या.'

—मोरोपंत.

२८७. कित्येक शब्द समासांत असल्यासारखे जोडीनें एकदम येतात; पण मध्यें समुच्चयार्थक अव्यय नसतें, किंवा त्यांचा प्रत्यक्ष समासही झालेला नसतो. अशा ठिकाणीं विभक्तिप्रत्यय शेवटच्या शब्दालामात्र लागतो व पहिल्या शब्दाचें नुसतें सामान्यरूप होतें. जसें,—'तो हातां-पायांनीं मजबूत आहे.' 'तो त्यांस हातां-बोटांवर खेळवील.' 'रामा बोलण्या-चालण्यांत मिट्ठा आहे.' 'त्याची हाता-तोंडाशीं गांठ पडली. इ०.

२८८. जेव्हां वाक्यांत एकाच विभक्तींत असलेले निरनिराळे शब्द समुच्चयार्थक अव्ययानें जोडलेले असतात, तेव्हां त्या विभक्तीचा एकच प्रत्यय किंवा शब्दयोगी अव्यय सर्वांना सारखें लागावें. एका नामाला एक प्रत्यय व दुसऱ्याला दुसराच प्रत्यय अथवा शब्दयोगी अव्यय, असें करूं नये. उदा०—'तो मुलांना आणि मुलींस बाहेर नेईल.' असें न म्हणतां 'मुलांना आणि मुलींना' किंवा 'मुलांस आणि मुलींस' असें म्हणावें. परंतु कवितेंत हा नियम पाळीत नाहींत. जसें,—

'प्रभु लोकसंग्रहार्थ **द्रोणा, भीष्मा, मलाहि** वंदील.' —मोरोपंत.

'**चापा, नृपा,** आणि **महोत्सवातें**.
आले पहाया **बलवैभवातें**.' —अनंत.

असले प्रयोग कवितेंत येतात खरे, परंतु गद्यभाषेंत वरील नियम वाक्याचे व्यवस्थेसाठीं पाळावा हें चांगलें.

२८९. कारकप्रकरणांतील कर्ता, कर्म यांच्या संबंधाच्या व्यवस्था पुन्हां पुढें सारांशरूपानें दिल्या आहेत:—

(१) उद्देश्यवाचक शब्द निरंतर **प्रथमान्त** असतो.

(२) **कर्तृपद** प्रथमा, तृतीया, चतुर्थी, किंवा पंचमी या विभक्तींत असतें.

तें प्रथमा विभक्तींत असेल तेव्हां तें उद्देश्य असतें. कारण ह्या वेळीं कर्तरिप्रयोग असतो. इतर विभक्तींचीं उदाहरणः—**तृतीया**–'**रामानें** रावणास मारिलें.' '**हरीनें** पुस्तक दिलें.' **चतुर्थी**–'**मला** आज जाववेल.' '**तुला हें** काम करवतें.' **पंचमी**—'**हरीपासून** ( हरीच्या हातून ) आज एक आंगठी हरवली.'

( ३ ) क्वचित् कर्तृपदाचें च-प्रत्ययान्त विशेषण करून नंतर त्याला तृतीयेचे प्रत्यय किंवा पंचम्यर्थक शब्दयोगी अव्यय लावितात. उदा०—'**त्याच्यानें हें** काम होणार नाहीं.' 'त्याच्यापासून आज एक पुस्तक हरवलें.' इ०.

( ४ ) **कर्मपद** स्वास्थतींत असतां त्याची द्वितीया विभक्ति असते. ती नियमांप्रमाणें स-प्रत्यय किंवा अ-प्रत्यय असते.

( ५ ) कर्मणिप्रयोग असतां आपण कर्मास उद्देशून बोलतों, म्हणून तें उद्देश्य होऊन प्रथमान्त असतें.

## ( ३ ) सामान्यरूप.

( ३९० ) नामादिकांचें सामान्यरूप होऊन व पुढें प्रत्यय लागून विभक्तींचीं रूपें सिद्ध होतात. परंतु जुन्या कवितेंत व क्वचित् जुन्या गद्य-भाषेंतही नामांच्या सामान्यरूपावरूनच द्वितीयेपासून सप्तमीपर्यंत सर्व विभक्तींचीं रूपें दाखविलेलीं आढळतात. असा उपयोग विशेषतः जुन्या कवितेंत फार होतो. अशा ठिकाणीं कोणती विभक्ति घ्यावयाची हें केवळ संदर्भावरून समजावयाचें. अशा प्रकारचीं कांहीं उदाहरणें खालीं दिलीं आहेतः—

( अ ) द्वितीयाः—

'अगा प्रणवत्सला, म्हणति त्या **जनां** पावलां,
म्हणोनि तुमच्याच मी नमितसें सदा **पावलां**.' —मोरोपंत.
'**हंसा** धरूं जवळि जाय कृशोदरी ते.' —रघुनाथ पंडित.
'जे कां ज्ञानें लाधले **सद्विचारा**, संपत्तीचा त्यांपुढें काय तोरा ?'—वामन.
'मग म्हणे अमात्य प्रधाना ( चतुर्थी ) **छत्र-मुद्रा-सिंहासना**
ऋपी-करीं वोपोनि **नमना**, करोनी बोले सेवकां' (चतुर्थी ).
'माझिया वेगळे **सायुज्यसदना**. भोगावया गेलेति.'— मुक्तेश्वर.

( आ ) तृतीयाः—

'उद्धवें विनविल्यावरी, **कृपा** कळवळला श्रीहरी.'

'**आवडी** कळवळलें चित्त, घाली साष्टांग दंडवत.'

'पत्र लिहिलें **रुक्मिणी** जेव्हां तुज चक्रपाणी.' —श्रीधर.

'मंगल वाद्यांचिया **ध्वनी**, नाद गगनीं न समाये.'

'तंव राजा कवळोनि **बाहे**, वीरबाहू आणीत.'

'भूपाळबाळ वडवियांसंगीं, सुमनें वेंचितां लक्षिला **भोगी**.
दैवें प्रेरिला असतां वेगीं त्यांचि सुमना ( चतु० ) पातला,'

'प्राण द्यावा तंव सुचलें, **ज्ञानदृष्टी** कौशिका ( चतु० ).'—मुक्तेश्वर.

'मना सत्य तें सत्य **वाचे** वदावें.' —रामदास.

'तुज ये **गोष्टी** ( नें ) यश नाहीं.' —शिवचरित्र.

'स्वामिचिया **सत्ते** ठेंगणें सकळ, समर्पूनी ठेवा असें पायीं.'

'होत असे भला भल्याचें **संगतीं**, जात अधोगती दुष्टसंगें.'

—तुकाराम.

'स्वकरें चंदन घासी, गंगेचें पाणि **कावडी** भरितो.'

'राजा वधाल पांडवबळ किति **दिवसां** असें वदे भीष्मा ( चतु० ).'

—मोरोपंत.

( इ ) चतुर्थीः—

'तुझा वियोग न साहवे **प्राणा**। परी तापसदक्षिणेचिया ऋणा ( द्वि० )।
नेदूं कशी तुजविणें.' —मुक्तेश्वर.

'जा जा उठा मुलीला पाहूं, वाहूं **वरा, घरा** आणा.
प्राणाधिक तो येना तरि घालाव्या मदंघ्रिच्या आणा.'—मोरोपंत.

'सत्कर्म **सिद्धी** गेलें, तरी फुगेना हें म्यां केलें.'

'तेवीं नमी सीता, आनंदित-चित्ता,

मग हो बोलता **रामा** मुनी.'

'बुद्धी ही **धाकटेपणा** ( ला ) योग्य केली.' —शिवचरित्र.

(ई) पंचमीः—

'कामें हरितल्या दृष्टी, धनुष्यें गळाली **मुष्टी** [पासून].'

'करितां श्रीहरिस्मरण, दारुण विघ्नें पळती उठोन,'

'कोटि **मुहूर्ता** [पेक्षां] विशेष पूर्ण, कृष्णचिंतन जाणावें.'—श्रीधर.

(उ) षष्ठीः—

'धराधीशा धर्मपाळा, तुझिया शुद्ध **यशाचळा** (चें)—
कीर्तिशृंग रविमंडळा, भेदूनि गेलें सतेज.'

'**शिकारी** (चीं) श्वापदें अपारें, तींही गहिंवरें दाटलीं.'–मुक्तेश्वर.

'गृहकृत्य करितां **चक्रपाणी** (चें), गीत गाती सर्वदा.'–श्रीधर.

'ज्याचा संग चित्तीं, तुका म्हणे तो त्या याती [चा].'-तुकाराम.

'तुझिये **माया** विचित्र उपाधी (तृ०) शरीरीं केली आत्मबुद्धी.'

(ऊ) सप्तमीः—

'शोक केला तो न माये **सृष्टी**, न वर्णवेची कोणातें.'–श्रीधर.

'जैसा इंद्र **अमरावती** शोभे, तैसा शोभला.'

'मज पाहतां सकळ **सृष्टी**, आणिकां दृष्टी (चतु०) न दिसे.'

'यासि ठेवावें **स्मशाना**, कार्य करितां **सदना**, योग्य नव्हे आमुच्या.'
—मुक्तेश्वर.

'मज नांदतां ये **सृष्टी**, कळी उघडूं न शके दृष्टी.'

'आनंदाची ठेव जनकभूपाळ, **अग्नी** पदतळ जळे त्याचा.'

**टीप**—विभक्तींचीं संस्कृत रूपें मराठी कवितेंत घातल्याचीं उदाहरणें आढळतात. केव्हां तर अगदींच चमत्कारिक रूपें घातलेलीं असतात. आणखी क्वचित् एका विभक्तीच्या रूपाबद्दल दुसऱ्याच विभक्तीचें रूप येतें. उदा.—पुढील वाक्यात चतुर्थी घालून सप्तमीचा अर्थ आणला आहेः—

'तंव मार्तंडदीप्ती प्रकाशली नभातें (नभांत).'–मुक्तेश्वर.

## (४) शब्दयोगी अव्ययें.

३९१. जेथें विभक्तिप्रत्ययाचे योगानें इच्छित किंवा योग्य अर्थाची प्राप्ति होत नाहीं, किंवा जेथें प्रत्ययांचा उपयोगच करितां येत नाहीं, तेथें विभक्ति-

प्रत्ययांचे ऐवजीं शब्दयोगी अव्ययें योजितात. उदा०—‘ घराकडून ’ या रूपांतील ‘कडून’ याचा अर्थ कोणत्याही प्रत्ययानें येणार नाहीं. त्याचप्रमाणें ‘ ई ’ हा सप्तमीचा प्रत्यय सगळ्या नामांना लागत नाहीं; म्हणून त्या नामांचीं त्या विभक्तीचीं रूपें आंत, मध्यें, इत्यादि शब्दयोगी अव्ययें लागून होतात.

३९२. कित्येक शब्दयोगी अव्ययें मूळचीं अव्ययें नसून शब्दांचीं विभक्तिरूपें आहेत; परंतु रूढीनें आतां तीं शब्दयोगी अव्ययें बनलीं आहेत. उदाहरणार्थ, पुढून, वरून, खालून, आंतून, मागून, हीं पंचमीचीं रूपें असून तीं मूळच्या स्थलवाचक अव्ययांना ‘ ऊन ’ प्रत्यय लागून झालेलीं आहेत तीं मूळचीं स्थलवाचक अव्ययें अर्थानें नामांसारखींच मानिलीं आहेत. कडेस ( कड+स ) हें चतुर्थीचें रूप आहे. ‘ प्रमाणें ’ आणि ‘ मुळें ’ हीं ‘ प्रमाण ’ आणि ‘ मूळ ’ या शब्दांचीं ‘एँ’ प्रत्यय लागून झालेलीं तृतीयेचीं रूपें आहेत. आणि मध्यें, मधीं, विषयीं, पाशीं, मधें ऐवजीं, हीं मूळचीं सप्तमीचीं रूपें आहेत.

३९३. मागील विभक्ति-विषयांत शब्दयोगी अव्ययें टिकाटिकाणीं आलींच आहेत. परंतु आतां प्रत्येक विभक्तीचीं शब्दयोगी अव्ययें त्याच्या अर्थासह विशेष रितीनें सांगतों:—

**द्वितीया:**—या विभक्तीचीं अव्ययें प्रत, प्रति, लागीं, लागून ( लागोन, लागोनी, लागूनी ) यांपासून कर्मपदाचा बोध होतो. उदा०—‘ हरीप्रत-हरीलागीं बोलाव. ’ इत्यादि. या सर्वांवरून व ‘ जवळ ’ यावरून अप्रत्यक्ष कर्मपदाचाही बोध होतो. उदा०—‘ त्यालागीं दिले ’ ‘ मी तुझा अपराध पंतोजीलागीं किंवा पंतोजीजवळ ( पंतोजीस ) सांगेन. ’ अशा टिकाणीं चतुर्थी विभक्ति मानण्यास चिंता नाहीं.

३९४. **तृतीया:**—(अ) करवीं, कडून, करून, द्वारें, हातीं आणि हातून यांवरून कर्तृपदाचा, म्हणजे क्रिया कोणाकडून घडली याचा, बोध होतो. उदा०—‘ हरीकडून मला ते पैसे पोंचले. ’

‘मजकरवीं न तुम्ही बुध, कुलमर्यादातिपात करवा हो. ’—मोरोपंत.

‘ तेणेंकरून. ’ ‘ त्यांकडून. ’ ‘ तद्द्वारें. ’ ‘ त्याहातीं. ’ ‘ चाकराहातीं. ’ ‘ चाकराहातून. ’ इ०.

( आ ) निमित्त, निमित्तें, योगें, मुळें आणि वरून, यांवरून क्रियेच्या कारणाचा, म्हणजे क्रिया कां झाली याचा बोध होतो. जसें'—रामानिमित्त किंवा रामानिमित्तें असें घडलें.' 'तापामुळें मी अशक्त झालों.' 'रामास बक्षीस मिळाल्यावरून कृष्णास वाईट वाटलें.' 'तुमच्या सांगण्यावरून मी तेथें गेलों.' 'विद्यायोगें गौरव येथें तैसाच होतसे नाकीं.' इत्यादि.

( इ ) बरोबर, सह, सहवर्तमान, सहीत, सवें, संगें, संगती आणि सुद्धां यांवरून साहचर्याचा किंवा सहार्थी तृतीयेचा बोध होतो. जसें,—गाड्या-बरोबर नळ्याला यात्रा.' 'तुजसह किंवा तुजसहवर्तमान.' 'चांगल्यासवें संगती धरीं.'

'तुजसंगती मी येईन। मज सोडून जाऊं नको.' —श्रीधर.

( ई ) बरोबर, सह आणि सहवर्तमान यांवरून फक्त साहचर्याचा किंवा 'अमक्याच्याबरोबर' इतकाच अर्थ होतो; परंतु सहित, संगती, सवें आणि संगें, यावरून 'अमक्याबरोबर' असा अर्थ असून शिवाय त्याचेंही त्या कामात अंग आहे, असा बोध होतो. सुद्धां, देखीत आणि देखील, यांवरून 'अमुक असून आणखी अमुक,' असा अर्थ होतो.

( उ ) तुलनार्थी तृतीयेचा अर्थ असतां परी ( परीस ), सदृश, सारखें, पाडें, प्रमाणें आणि अनुसार या अव्ययांचा उपयोग करितात. जसें,—'हरीप्रमाणें किंवा हरीसारखें तुला हें काम करितां येईल काय?'

'**पुष्पापरी** दों परिचीच साची, हे वृत्ति संभावित जे तयांची.'-वामन.

'सुख पाहतां **जवापाडें**, दुःख पर्वतायेवढें.'

'**देवापरीस** मोठा नाहीं जगीं कोणी, ऐसें सत्य मानी सर्वकाळ.'

—तुकाराम.

'**कर्मानुसार** घडते गति सर्व लोकां.' —वामन.

**टीप**—सारखी-खी-खें हें वास्तविक विशेषण आहे. परंतु 'सारखें' या नपुंसकलिंगी रूपाचा शब्दयोगी अव्ययासारखा उपयोग होतो. 'पाडें' हें तरी मूळचें नपुंसकलिंगी विशेषणच आहे.

(ऊ) गाळून, टाकून किंवा वगळून, असा अर्थ असतां पुढील शब्दयोगी अव्ययांचा उपयोग करितातः—खेरीज, खेरीजकरून, वगळून, सोडून, बगर, विणें, वीण, वांचून, शिवाय, इ०.

**टीप**—करून, द्वारें, विना, इत्यादि बरींच शब्दयोगी अव्ययें नामाच्या सामान्यरूपाला न लागतां क्वचित् त्याच्या विभक्तिरूपाला लागतात. जसें:—

'सांठवणें-वीण धान्य, धान्यावीण सांठवण,
+ + + + कामा नये वायां जाय.' —रामदास.
'बहु होउन प्रिया मी आलें तव अप्रिया विना-कलहें.'
—मोरोपंत.

'तेणेंकरून,' 'जेणेंकरून,' हीं सर्वनामांचीं रूपें अशाच प्रकारचीं आहेत.

३९५. **चतुर्थी**:—(अ) द्वितीयेचीं अव्ययें प्रत, लागीं, प्रति, लागोनी, जवळ, पाशीं, पासाव, यांचा अप्रत्यक्ष कर्मपद दाखविण्याकरितां चतुर्थीच्या अर्थीं उपयोग करितात. उदा०—'बापानें मुलाचा अपराध **पंतोजीजवळ** सांगितला.' '**मित्राप्रत** पत्र लिहिलें.' इ०. लागीं, लागोनी, पासाव, यांचा उपयोग विशेषतः कवितेंत होतो. उदा०—'फळ पत्नी **लागीं** दिलें.' '**सुखा-लागिं** आरण्य सेवीत जावें.' (रामदास), 'तिन्हीं निषाधा**पासाव** म्हणीजेलें.' (रघु० पं०.) इ०.

(आ) संप्रदानाचा अर्थ असतां कारणें, करितां, निमित्त, निमित्तें, साठीं, स्तव, यांचा उपयोग करितात. उदा०—'**हरीनिमित्त** किंवा **हरीनिमित्तें** मला एवढा त्रास पडला.' '**यासाठीं** किंवा **यास्तव** असें करूं नये.'

'धाता करींच करितां, मृदु ते न होती,
या **कारणास्तव** मनोमय मूस ओती.' —रघुनाथपंडित.

(इ) 'अमक्यासाठीं' किंवा 'अमक्याच्या जागीं' असा अर्थ असतां 'बद्दल' किंवा 'बदला' यांचा उपयोग होतो. उदा०—'त्याबद्दल किंवा त्या-बदला हें दे.' 'शिष्याबद्दल गुरूस शिक्षा पाहिजे.' इ०.

(ई) स्थलार्थी चतुर्थी असतां प्रत, लागीं, लागोनी, यांचा उपयोग करितात. उदा०—'तो गांवाप्रत किंवा गांवालागीं गेला.' इ०.

३९६. **पंचमीः**—(अ) आंतून, जवळून, पासून, पुढून, मधून, **मोहरून**, **वरून** आणि समोरून, यांवरून, स्थलवियोगाचा बोध होतो. उदा०–घरांतून, झाडावरून, माझ्या समोरून, तुझ्यापासून, त्याजवळून, त्यापुढून, इ०.

( आ ) अनेकांतून एका किंवा कांहीं वस्तूंची पसंती किंवा निवड कर्तव्य असतां, 'आंतून,' 'मधून,' व 'पैकीं,' यांचा उपयोग करितात. उदा०—'या सर्व **आंब्यांतून** तुला हवा तो घे.' 'त्या **पुस्तकांमधून** पांच पुस्तकें आण.' 'तुझ्या **मुलांपैकीं** थोरला मला चांगला वाटतो.' इ०.

( इ ) कडून, हातून, जवळून, पासून, यांवरून कर्तृपदार्थी पंचमीचा बोध होतो. उदा०–'**मजकडून** किंवा **माझ्या–हातून** हें काम होणार नाहीं.' 'ह**रीपासून** आज एक शंभरांची नोट हरवली.' इ०.

( ई ) वरून याचा 'स्थलापासून,' 'स्थलाजवळून' किंवा 'पार-पलीकडे' असा अर्थ होतो. उदा०—'तो **माडीवरून** खालीं आला.' 'तुझ्या **घरावरून** गेलों तर मी तुझ्याकडे येईन.' 'तो केवळ **उंटावरून** शेळ्या हांकीत आहे.' 'श्रीमंतांनीं ह**त्तीवरून** साखरा वांटल्या.' 'चोरानें **कुंपणावरून** उडी मारली.' 'तो **पर्वतावरून** गेला.' इ०.

( उ ) 'पेक्षां' व 'परीस' यांवरून तुलनेचा अर्थ होतो. उदा०—'रामापेक्षां हरी हुषार आहे' 'म्हणजे 'दोघांची जर तुलना केली, तर हरी रामापेक्षां जास्त हुषार आहे,' असें आढळून येईल. दुसरीं उदाहरणेंः—

'आला प्रकाश नेत्रीं अंधत्वाचा वरें तुरे गंध,
परि भूप पुत्रमोहें केला पहिल्यापरीसही अंध.' —मोरोपंत.
'मृत्यु-परीसही निर्धनता अति दारुण, तेज जनांत हरी.'
—परशुरामपंत.

( ऊ ) कालाच्या किंवा स्थलाच्या गतीची मर्यादा दाखविण्याकरितां 'पर्यंत' या अव्ययाचा उपयोग करितात. उदा०—'घरापासून **डोंगरापर्यंत तो** धांवत गेला.' 'परवांपासून **आजपर्यंत**.' 'पहिल्या तारखेपासून महिना-**अखेरपर्यंत**.' इ०.

**टीप**—यांतील 'पर्यंत' हें चतुर्थीचें अव्यय मानून ती स्थलवाचक किंवा कालवाचक चतुर्थी मानण्यास चिंता नाहीं.

३९७. **षष्ठीः**—या विभक्तीवरून स्वामित्व, मालकी किंवा संबंध दाखविला जातो; व तो अर्थ दाखविण्यासाठीं बद्दल, बाबद, बाबत, विषयीं, विशीं, संबंधीं, इत्यादि शब्दयोगी अव्ययांचा उपयोग करितात. उदा०—' घराबद्दल.' ' त्या कामाबाबद. ' ' अभ्यासाविषयीं, ' किंवा ' अभ्यासाविशीं. ' ' पुस्तका-संबंधीं, ' इ०.

**टीप**—याच अर्थी ' पैकीं ' या अव्ययाचा उपयोग होतो. जसें,–' त्यापैकीं कांहीं सांगा. ' येथें ' पैकीं ' याचा अर्थ ' विषयीं ' किंवा ' संबंधीं ' असा घ्यावयाचा. ' पैकीं ' याचा उपयोग सप्तमीसारखाही वाटतो. ' पैकीं ' याबद्दल क्वचित् ' पंकीं ' असा–विशेषतः बोलण्यांत–उपयोग करितात.

३९८. **सप्तमीः**–(अ) या विभक्तीवरून स्थलाच्या व कालाच्या अधिकरणाचा जो विशेषतः बोध होतो तो दाखविणारीं पुष्कळ शब्दयोगी अव्ययें आहेत. तीं अशीं:—अलीकडे, अलिकडे, अंतीं, आंत, अभ्यंतरीं, उपरि, कडे, खालतीं, खालीं, खालें, जवळ, ठायीं, पलीकडे, पार, पारें, पुढें, पुढ्यांत, पैल, बरोबर, बाहेर, भर, भीतरीं, भोंतीं, भोंवतीं, भोंतालीं, माजी, माझारी, मागुती, मागें, मागोमाग, लगत, लगत्यास, लागून, लागोलाग, वर, वरता, वरतीं, वरी, विरुद्ध, संनिध, समक्ष, समोर, सरशीं, सरसा, सरसून, इ०.

( आ ) हीं सर्व अव्ययें स्थल किंवा काल यांचा बोध करितात, हें त्यांचे अर्थावरून उघडच दिसणार आहे. कित्येकांवरून स्थल व काल या दोहोंचा, बोध होतो. उदा०–अलीकडे, पलीकडे, पुढें, मागें, इ०.

( इ ) ' भर ' यावरून स्थल व काल या दोहोंचा बोध होतो; व त्याचा अर्थ ' सर्वत्र' 'सगळा' किंवा 'एकंदर' असा असतो. उदा०—देशभर, दिवस-भर, रात्रभर, गांवभर, शेतभर, घरभर, घटकाभर, वर्षभर, इत्यादि.

( ई ) ' आंत ' याचा उपयोग ' वर ' अथवा ' त्या स्थळीं ' या अर्थी करितात. जसें,–' पायांत जोडा. ' ' डोकींत पागोटें. ' ' अंगांत आंगरखा. ' ' बोटांत आंगठी. ' ' हातांत काठी. ' ' पायांत जोडवीं. ' इ०.

**टीप**—' डोकींत पागोटें किंवा टोपी घालणें, ' याबद्दल ' डोकीस पागोटें किंवा टोपी घालणें, ' असें म्हणण्याचा प्रघात ज्यास्त आहे.

(उ) 'वर' व 'विरुद्ध' यांचा समानार्थी उपयोग होतो. उदा०–'त्यानें आपल्या **कुळावर** किंवा **कुळाविरुद्ध** फिर्याद केली.' इ०.

(ऊ) 'बरोबर' याचा 'तत्काळ' अशा अर्थी सप्तमीसारखा अर्थ असतो. उदा०—'तो असें बोलला, **त्याबरोबर** सर्वांना भय वाटलें.' सरसा, सरशी, किंवा सरसीं, यांचाही याच अर्थी उपयोग असतो. उदा०— 'मीं त्यास ही हकीकत सांगितली, **त्यासरसा** तो चालता झाला.'

**टीप**—'सरसा' हें मूळचें विशेषण असल्यामुळें त्याचीं लिंगाप्रमाणें रूपें बदलतात. उदा०—'त्यासरसा तो गेला.' 'त्यासरसी ती गेली.' 'त्यासरसें तें गेलें.' इ०.

(ए) 'अंतीं' याचा 'नंतर,' 'शेवटीं' किंवा 'परिणामीं' अशा अर्थी उपयोग असतो. उदा०—'अनुभवान्तीं सर्व कळून येईल.' 'उद्योगान्तीं द्रव्य मिळतें.' इ०.

(ऐ) 'नियमित संख्येंतून किंवा गोष्टींतून कांहीं' असा अर्थ असतां, किंवा 'प्रकार' दाखवावयाचा असतां 'पैकीं' हें अव्यय योजितात. उदा०– '**त्यांपैकीं** पांच आंबे मला दे.' '**पाहुण्यांपैकीं** कोण कोण जेवले?' '**शंभरांपैकीं** पन्नास रुपये गेले' '**त्यापैकीं** तुला किती ठाऊक आहे?' '**कशापैकीं** [किंवा कोणत्यापैकीं] गूळ देऊं?' इ०.

३९९. **संबोधन**—अगा, अगे, अगो, अजी, हे, गे, हीं एकवचनी, हो, अहो, नो, हीं अनेवचनी व अरे, रे, हो, हीं उभयवचनी संबोधनार्थक अव्ययें आहेत. यांपैकीं 'रे' हें अगोदर किंवा मागून येतें. 'हो,' 'नो' हीं संबोधनाचे रूपानंतर येतात. बाकीचीं संबोधनाचे रूपाच्या मागें किंवा पूर्वी येतात. उदा०—'रे देवा.' 'देवा रे.' 'अरे देवा.' 'हे मुला.' 'लोकहो,' 'लोकांनो.' 'अगा राया.' 'अजि–अजी दयानिधे.' इ०.

---

# प्रकरण २१.

## वाक्यांतील शब्दांची व्यवस्था.

### (१) पदानुक्रम.

४००. संस्कृत आणि मराठी भाषा यांत प्रातिपदिकें आणि क्रियापदें व कृदन्तें यांस बहुधा प्रत्यय लागलेले असतात, यासाठीं त्यांवरून तीं आणि त्यांचे वाक्यांतले परस्परसंबंध सहज ओळखतां येतात. यामुळें वाक्यांत पदानुक्रम अमुकच असावा, असा या दोन्ही भाषांत नियम नाहीं. तथापि अलीकडे इंग्रजी भाषच्या साहचर्यानें मराठी भाषेस तसे कांहीं व्यवस्थेचे नियम लागू झाले आहेत; परंतु ते अल्पच आहेत.

**टीप**—अनुक्रमाची रीत नसण्याचें दुसरें कारण असें दिसतें कीं, या दोन्ही भाषांत कवितेची चाल फार; आणि कवितेंत पदानुक्रम व्यवस्थित नसतो. पद्यांत अर्थानुसंबंधानें पदें लावावयाचीं असतात. शिवाय शब्दांचीं भिन्न भिन्न रूपें असतात. त्यांवरूनही एकेक शब्दाचें वाक्यांत अर्थसंदर्भाला योग्य स्थळ कोणतें, हें कळतें.

४०१. मराठी वाक्यांत शब्दांचा अनुक्रम साधारणपणें असा असतोः—पहिल्यानें कर्तृपद आणि उद्देश्य, नंतर कर्म, त्यानंतर क्रियाविशेषण आणि शेवटीं क्रियापद. उदा०–'तो काम मन लावून करितो.' 'हरी पुस्तक चांगलें वाचतो.' 'चाकरानें आपलें काम तेव्हांच केलें.' इ०.

४०२. मराठी भाषेंत वाक्यें कोणत्याही प्रकारचीं असलीं तरी विशेष कारण असल्याखेरीज त्यांच्या पदानुक्रमांत भेद असत नाहीं. उदाहरणार्थ, पुढील वाक्यें अर्थाला निरनिराळ्या तऱ्हेचीं आहेत, तरी त्यांत पदानुक्रम बहुधा सारखाच आहेः—

**विधानार्थक**—माझें पागोटें खोलींत आहे.

**प्रश्नार्थक**—माझें पागोटें खोलींत आहे ?

**आज्ञार्थक**—माझें पागोटें खोलींतून आण.

**उद्गारार्थक**—माझें पागोटें खोलींत आहे !

**संकेतार्थक**—( जर ) माझें पागोटें खोलींत आहे ( असेल ) तर—
**निषेधार्थक**—माझें पागोटें खोलींत नाहीं.

४०३. वरील वाक्यांवरून दिसून येईल कीं, प्रत्येक वाक्याचा अर्थ जरी निराळा आहे, तरी वाक्यांतलि शब्दानुक्रम कांहीं फिरला नाहीं अलीकडे विरामचिन्हें प्रचारांत आल्यापासून निरनिराळे अर्थ त्यांच्या साह्यानें दाखवितां येतात. बोलण्यांत किंवा भाषणांत हे अर्थ बोलणाराच्या स्वरावरून किंवा विवाक्षित शब्दांवर दिलेल्या जोरावरून समजतात.

४०४. वाक्यांत शब्दांचा अनुक्रम कसा असावा, याविषयींचे नियम साधारणतः असे मानितां येतीलः—

( अ ) वाक्यांत साधारणतः सर्व विभक्ति त्यांच्या अनुक्रमानें घालाव्या.

( आ ) वाक्यांत तृतीया व चतुर्थी या विभक्ति कर्तृपदात्मक असल्या तर त्या विभक्तींतले शब्द वाक्याचे आरंभीं घालावे.

( इ ) कर्मपद क्रियापदापूर्वी येतें. तें शक्य तितकें क्रियापदाचे जवळ घालावें.

( ई ) क्रियापदाला दोन कर्मे असतील, तर मुख्य किंवा द्वितीयान्त कर्मपद चतुर्थ्यन्त किंवा अ-प्रत्यक्ष कर्मपदापेक्षां क्रियापदाच्या अधिक जवळ घालावें.

( उ ) वरील नियमांचीं उदाहरणेंः—'त्यानें काम केलें.' 'मला असें करणें आवडत नाहीं.' 'रामा चाबकानें बैलास तडाखे देत आहे.' 'मी मुंबईहून काल सकाळीं आलों.' 'हरी विष्णूस दोन पुस्तकें देईल.' 'हरीपंत आम्हांला आपले मुख्त्यार नेमतील.' 'शाहूनें बाळाजी विश्वनाथास पेशवा केलें.' इ०.

४०५. स्थलवाचक व कालवाचक अव्ययें व तशा अर्थाचीं विभक्त्यन्त नामें वाक्यांत असतां त्यांच्यावर बहुधा बोलणाराचा विशेष रोंख असतो. म्हणून अशीं पदें वाक्यांत कर्त्याच्या नंतर लागलींच घालितात. उदा०—'विष्णु **वर** किंवा **माडीवर** आपल्या मित्रांस पत्रें लिहीत बसला आहे.' 'मी **दिवाणखान्यांत** रामाजवळ बोलत बसलों होतों.' 'गोविंदा **काल सकाळीं** **मुंबईहून** आला.' इ०.

४०६. वाक्यांत कोणताही शब्द विशेष महत्त्वाचा आहे, किंवा कांहीं शब्दांकडे ऐकणाराचें लक्ष विशेष गेलें पाहिजे, असें बोलणारास वाटलें, तर तो असा किंवा असे शब्द विशेष जोरानें उच्चारतो. जसें,—'तो घरांत बसला आहे.' या वाक्यांत बोलणारा ज्या शब्दावर विशेष जोर देईल, त्याच्याकडे विशेषेंकरून त्याला ऐकणाराचें लक्ष ओढावयाचें आहे, असें समजावें.—म्हणजे बोलणारा वरील वाक्य 'बसला' याचेवर जोर देऊन बोलेल तर 'तो घरांत **बसला** आहे,' या वाक्याचा अर्थ, 'तो निजला नाहीं, चालत नाहीं, किंवा उभा नाहीं.' इतकाच होईल.

४०७. लिहिण्यांत असा कांहीं प्रकार करितां येत नाहीं, म्हणून ज्या शब्दास महत्त्व द्यावयाचें असेल, किंवा ज्या शब्दाकडे विशेष लक्ष जावें, असें लिहिणारास वाटत असेल, तो शब्द वाक्यांत प्रमुखस्थानीं घालितात. अशा प्रकारचीं वाक्यांतलीं प्रमुखस्थानें मुख्यतः तीन मानलीं आहेत. (१) वाक्याचे आरंभीं, (२) कर्त्यानंतर, आणि (३) क्रियापदाचे पूर्वीं. उदाहरणें:—'**पुस्तक** मला पाहिजे.' 'मीं **रुपये** त्याला दिले.' 'रावसाहेब तुमच्या येथें **विड्याला** येतील.'

**टीप**—जर, तर, जेव्हां, तेव्हां, इत्यादि अव्ययें नेहमीं वाक्याचे आरंभींच असलीं पाहिजेत; तेव्हां वरील नियम लावतांना असले शब्द विचारांत घेऊं नयेत. तथापि केव्हां त्यांचे अगोदरही वाक्यांत दुसरे शब्द घालितात. उदा०—'रामा जर आला, तर मी येईन.' 'तो जेव्हां जाईल तेव्हां हा त्रास चुकेल.' इ०.

४०८. वाक्यांत अमुक शब्द अमुक ठिकाणींच असावे, अशी ठरींव व्यवस्था राहात नाहीं. अर्थाच्या धोरणानें शब्द मागें-पुढें योजितात. म्हणजे हे जे नियम सांगितले, ते नेहमीं पाळतात असें नाहीं. तथापि चांगले लेखक व वक्ते आपल्या लेखांत व भाषणांत अशा प्रकारची वाक्यरचना करितात. याशिवाय आणखी नियम बांधतां येत नाहींत; कारण ही गोष्ट लेखकांच्या व वक्त्यांच्या संवयीवर व प्रघातावर अवलंबून आहे. विशिष्ट शब्दांवर जोर देण्याकरितां केलेल्या निरनिराळ्या वाक्यरचना पुढील उदाहरणांवरून लक्षांत येतील.

( अ ) एकाद्या क्रियार्थावर विशेष जोर देऊन बोलावयाचें असतां, किंवा एखाद्या अर्थाचा प्रकर्ष दाखवावयाचा असतां क्रियापद आरंभीं घालितात; क्वचित् त्याची द्विरुक्तिही करितात. उदा०—‘ घे सुरी आणि घाल उरी. ’ यांत त्या विवक्षित क्रियेचा अतिशयपणा दाखविला आहे. ‘ **मर** आतां दुष्टा. ’ ‘ **भर** ओंजळ **घाल** भिक्षा; असें करून त्यानें सर्व धान्य संपविलें. ’ ‘ **दे दे** करून उच्छाद आणिला आहे. ’ ‘ **खा खा** चालविली आहेस, **माग** पुढें भिक्षा. ’ ‘ **पाहिली** नदी **घातली** उडी. ’ ‘ **असतील** शितें तर **मिळतील** भुतें. ’ ‘ **सांपडला** मऊ बिछाना निजले ताणून!’ ‘सभेंत **बोलावें** तर माधवरावजींनींच. ’ इत्यादि.

( आ ) आतां आणखी कित्येक उदाहरणें त्यांच्या अर्थाच्या स्पष्टीकरणासह सांगतों:—‘ **तूंच** जर जाशील तर काम होईलच. ’ यांत ‘ तूं ’ यावर विशेष जोर आहे. ‘ **जाशील** तर जा. ’ येथें ‘ जाशील ’ हा शब्द महत्त्वाचा आहे. ‘ **मार** त्याचे एक थोबाडींत. ’ यांत ‘ मारणें ’ हें मुख्यतः सांगितलें आहे. ‘ **पुस्तक** मीं हरीला दिलें. ’ यांत दुसरी कांहीं वस्तू मीं हरीला दिली असेल, पण **पुस्तक** दिलें खास असें बोलणारा विशेषेंकरून दर्शवितो. ‘ **घरांत** हरी आहे. ’ यांत सांगणारास घरांत कोण आहे हें विशेषतः सांगावयाचें आहे. ‘ **मुंबईहून** रामा काल सकाळीं आला. ’ यांत दुसरे कोठून केव्हांही आला असेल, पण मुंबईहून अमुक वेळेस आला हें मुख्यत्वेंकरून सांगावयाचें आहे. इ०.

## ( २ ) कर्तृपद आणि उद्देश्य.

४०९ ( अ ) वाक्यांतील कर्तृपद किंवा उद्देश्य हें नाम, सर्वनाम, विशेषण, नामवाक्य किंवा नाम–वाक्यांश असतें. उदाहरणें:—

‘ **व्यायाम** शरीरास हितकारक आहे. ’ ( नाम ).
‘ **शहाणा** कधीं आळशी असत नाहीं. ’ किंवा
‘ **शहाण्यानें** कधीं आळशी असूं नये. ’ ( विशेषण ).
‘ **तो** नित्य शाळेंत जातो. ’ किंवा
‘ **त्यानें** नित्य शाळेंत जावें. ’ ( सर्वनाम ).
‘ **मुलांनीं नित्य फिरावयास जावें हें** चांगलें. ’ किंवा

'**चांगले मुलगे मन लावून अभ्यास करितात**, हें त्यांस भूषण आहे.' ( नामवाक्य ).

'**फिरावयास जाणें**, आरोग्यास चांगलें.' ( नामवाक्यांश ).

**टीप**—नामवाक्य किंवा नामवाक्यांश उद्देश्य असल्यास 'हें' किंवा 'असें' त्यापुढें घालितात.

( आ ) उद्देश्याची नेहमीं प्रथमा विभक्ति असते; कर्तृपद उद्देश्य असतां प्रथमा विभक्तींत असतें; एरव्हीं तें तृतीया चतुर्थी, किंवा पंचमी विभक्तींत असतें.

( इ ) कर्मणि व भावी प्रयोगांत कर्तृपद तृतीयान्त असतें. उदा०–'चोरानें त्याचें घर फोडलें.' 'त्यानें रामास मारिलें.' इ०.

( ई ) शक्य क्रियापद असतां कर्तृपदाची तृतीया किंवा चतुर्थी असते. उदा०–' माझ्यानें किंवा मला बोलावतें.' इ०.

( उ ) करावें, बोलावें, इत्यादि विध्यर्थक विशेषणें, व करावयाचें, बोलावयाचें, इत्यादि धातुसाधित विशेषणें यांचें कर्तृपद चतुर्थ्यन्त असतें. जसें,—'मला बोलावें लागलें.' 'त्याला बोलावयाचें आहे.' इ०.

( ऊ ) पुढील वाक्यांत कर्तृपद पंचम्यन्त आहेः–' माझ्यापासून हें पुस्तक हरवलें. 'मज–पासून, कडून एक मोठी चूक घडली.' इ०.

४१०. वाक्यांत एकापेक्षां अधिक उद्देश्यपदें 'आणि' या अव्ययानें जोडलेलीं असलीं, म्हणजे क्रियापद अनेकवचनी असतें. उदा०- ' राम आणि लक्ष्मण वनास गेले.' 'धर्म, भीम आणि अर्जुन कुंतीचे पुत्र होते.' इ०.

( अ ) एकापेक्षां ज्यास्त उद्देश्यपदें असल्यास बहुत करून त्यांच्यापुढें 'हा' या दर्शक सर्वनामाचें किंवा 'असा' या प्रकारार्थक विशेषणाचें योग्य तें रूप घालितात. उद्देश्यपदें एकाच लिंगाचीं असल्यास या सर्वनामाचें किंवा विशेषणाचें त्याच लिंगाचें अनेकवचनी रूप घालितात; परंतु तीं भिन्न लिंगांचीं असल्यास त्याचें नपुंसकलिंगी बहुवचनी रूप घालितात. उदा०—'रामा, कृष्णा आणि विनू हे किंवा असे तेथें बसलेले होते.' 'हरी, मनी, विठू, रामू आणि गंगू हीं किंवा अशीं त्याचीं मुलें आहेत.' इ०.

( आ ) सर्व उद्देश्यपदें एकाच लिंगाचीं असल्यास क्रियापद त्याच लिंगाचें असतें. जसें,—‘ रामा आणि त्याचा बाप हे आले ’ ‘ वेणू आणि गंगा आज गांवास गेल्या. ’ इ०.

( इ ) परंतु उद्देश्यपदें भिन्न लिंगांचीं असल्यास क्रियापद नपुंसकलिंगी अनेकवचनी असतें. जसें,—‘ राम, लक्ष्मण आणि सीता वनवासास गेलीं. ’ ‘ हरीचा भाऊ व त्याची बायको आणि मुलें गांवास गेलीं आहेत. ’ इ०.

( ई ) एकापेक्षां ज्यास्त उद्देश्यपदें असून जर तीं मनुष्येतर प्राणिवाचक नामें असलीं, तर क्रियापद शेवटच्या उद्देश्याप्रमाणें असतें. जसें,—‘ आमची गाय आणि बैल सांपडला. ’ ‘ आमचा रामा गडी आणि हरवलेलें बकरें आतांच आलें. ’ इ०.

( उ ) मनुष्यवाचक नामें उद्देश्यस्थानीं असतांही अशी रचना असते; परंतु अशा वेळीं बहुधा दोहोंपेक्षां ज्यास्त कर्ते असतात. जसें,—‘विनू, नाना आणि कृष्णी आली. ’

( ऊ ) उद्देश्यपदें अथवा, वा, किंवा अगर, यांपैकीं कोणत्या तरी विकल्प-बोधक अव्ययानें जोडलेलीं असल्यास, क्रियापद एकवचनी असतें; व उद्देश्य-पदें भिन्न लिंगांचीं व भिन्न वचनांचीं असल्यास क्रियापद शेवटच्या उद्देश्या-प्रमाणें असतें. उदा०—‘ रामा किंवा गोविंदा येईल. ’ ‘ तेथें विष्णू किंवा सीता होती. ’ इ०.

( ए ) अनेक उद्देश्यें ‘ किंवा ’ या अव्ययानें जोडलेलीं असून क्वचित् तें अव्यय गुप्त असतें; अशी रचना असतांही शेवटच्या उद्देश्याप्रमाणें क्रियापद असतें. उदा०–‘ तूं, तो, ती, आली तरी चालेल. ’ ‘ चिंच, बोर, हिरवा आंबा खाल्ला तरी एकच. ’ इत्यादि.

४११. उद्देश्याची ज्यास्त माहिती सांगण्याकरितां एकापेक्षां ज्यास्त नामें वाक्यांत घातलीं असतां, तीं केवळ विशेषणाप्रमाणें असतात; त्यांचा विभक्त्यर्थ ‘ उद्देश, ’ ‘ विधान ’ किंवा ‘ विशेषण ’ असतो. त्यांच्या योगानें क्रियापदाचे लिंगादिकांत बदल होत नाहीं. उदा०—‘ चांगली कविता करितां येणें ही ईश्वराची देणगी असते. ’ ‘ उद्योगशीलता हें त्यांचें अधिदैवत होतें. ’ यांत क्रियापदें अनुक्रमें ‘ देणगी ’ आणि ‘ दैवत ’ यांप्रमाणें आहेत.

४१२. प्रयोजक क्रियापद असतां वाक्यांत दोन कर्तृपदें असतात; एकापासून क्रिया करणाराचा बोध होतो, व प्रयोजक क्रियापदाचे संबंधानें हेंच कर्तृपद मुख्य असतें. प्रयोग कर्तरि, कर्मणि किंवा भावी असेल त्याप्रमाणें त्याची प्रथमा अथवा तृतीया विभक्ति असते. परंतु दुसरें कर्तृपद, जें मूळची क्रिया करणाराचें दर्शक असतें, त्यास 'कडून' हें तृतीया विभक्तीचें अव्यय लावितात. उदा०—'**हरीनें गोविंदाकडून हें** काम करविलें.' '**त्यानें** आपले मुलाकडून गीता वाचून (वाचवून) घेतली.' इत्यादि.

## (३) कर्मपद.

४१३. कर्तृपदाप्रमाणेंच कर्मपद हें नाम, विशेषण, सर्वनाम, नामवाक्य, किंवा नामवाक्यांश असतें. उदा०—'तो **काम** करितो.'–(नाम).'एखाद्या **शहाण्यास** बोलाव.'–(विशेषण). 'तो **त्यास** बोलावितो.'–(सर्वनाम). '**तो लबाड आहे** हें मी समजतों.'–(नामवाक्य). '**त्याचें मुंबईस जाणें** त्यानें पसंत केलें नाहीं.'-(नामवाक्यांश). इ०.

**टीप**—कर्मपदाचे संबंधाचे सर्व विशेष नियम प्रयोगप्रकरणीं दिले आहेत.

४१४. [अ] एकाच वाक्यांत पुष्कळदां एकापेक्षां जास्त कर्मपदें असतात. उदा०—'तो पान आणि सुपारी खातो.' 'मी उद्यां ठाणें, कल्याण, मुंबई आणि अलिबाग पाहीन.' इ०.

[आ] कर्मणिप्रयोगांत 'आणि' व 'किंवा' या अव्ययांनीं जोडलेलीं कर्मपदें असल्यास, क्रियापद शेवटच्या कर्मपदाप्रमाणें असतें. जसें,—'मीं मुरंबा आणि पोळी खाल्ली.' 'त्यानें एक आंबा, दोन अंजीर किंवा पांचचार द्राक्षें खाल्लीं असतील.'

**टीप**—अशा वाक्यांत सर्व कर्मपदांचे शेवटीं 'हा' या दर्शक सर्वनामाचीं किंवा 'असा' या प्रकारार्थक विशेषणाचीं योग्य तीं रूपें घालितात. सर्व कर्में एकाच लिंगाचीं असल्यास या सर्वनामाचें किंवा विशेषणाचें रूप त्याच लिंगाचें पण बहुवचनी असतें; परंतु तीं भिन्न लिंगांचीं असल्यास तें रूप नपुंसकलिंगी बहुवचनी असतें.

४१५. कित्येक क्रियापदांस दोन कर्में असतात. यांतलीं कांहीं क्रियापदें मागें कारकप्रकरणीं [कलम ३७६ (८) यांत] सांगितलीं आहेत. तशा

प्रकारचीं आणखी क्रियापदें ( दान, धर्म, इ० ) करणें, देणें, शिकविणें, लिहिणें, सांगणें, पाठविणें इत्यादि आणि तशा अर्थाचीं आहेत. अशा क्रियापदांच्या वाक्यांत ज्यांच्यावर क्रिया प्रत्यक्ष घडते, तीं 'प्रत्यक्ष कर्मे' असून त्यांची आप्रत्यय द्वितीया असते; व ज्यांच्या संबंधानें किंवा ज्यांच्यावर अप्रत्यक्ष रितीनें क्रिया घडते तद्दर्शक शब्द याची चतुर्थी विभक्ति असते. उदा०–'राजा **ब्राह्मणांस धर्म** करितो.' 'विष्णू **हरीस पुस्तक** देईल.' 'तो आपल्या **बापास पत्र** लिहिणार आहे.' 'विष्णू **मला रुपये** देतां म्हणाला.' 'धनी **चाकरास काम** सांगतो.'

'भीड सुतेची भारी, विद्या संजीविनी **कचा** शिकवी.'–मोरोपंत.

**टीप**—वरील वाक्यांतील अप्रत्यक्षी कर्मपदांची चतुर्थी विभक्ति मानण्याची चाल आहे. या वाक्यांचे कर्मणिप्रयोग होतांना प्रत्यक्ष कर्मपदाचा कर्ता होऊन, अप्रत्यक्ष कर्मपदाची चतुर्थीच राहाते, व नंतर कर्मणिप्रयोग किंवा भावेप्रयोग होण्याचे जे नियम आहेत, त्याप्रमाणें प्रयोग होतात. उदा०—'राजानें ब्राह्मणांस धर्म केला.' 'विष्णूनें हरीस पुस्तक दिलें.' 'त्यानें आपल्या बापास पत्र लिहिलें.' 'विष्णू मला रुपये दिले म्हणाला.' 'धन्यानें चाकरास काम सांगितलें.' इत्यादि.

४१६. अप्रत्यक्ष कर्म व प्रत्यक्ष कर्म हीं दोन्ही किंवा त्यांतील एक मनुष्येतर प्राणिवाचक नाम, निर्जीववस्तुवाचक नाम किंवा क्वचित् मनुष्यप्राणिवाचक नाम असतांही कर्तरिप्रयोगांत दोन्ही कर्मांची अप्रत्यय द्वितीया होते; व भूतकाळीं क्रियापद असलें तर कर्मणिप्रयोग होतो. उदा०—'ईश्वराचें नाम सकल **पातक भस्म** करितें.' 'शाहूनें श्रीवर्धनचा **बाळाजी विश्वनाथ भट हा** आपला **पेशवा** केला.' इ०.

४१७. प्रत्यक्ष कर्म जेव्हां धातुसाधित नाम ( उदा०–करणें, बोलणें, इ० ) असतें, तेव्हां त्याबद्दल विध्यर्थक धातुसाधित नामाची ( उदा०—'करावें, बोलावें, इ०. ) किंवा त्याच धातुसाधित नामाची चतुर्थी घालितात. उदा०— 'मीं त्यास **लिहिणें** किंवा **लिहिण्यास** किंवा **लिहावयास** शिकाविलें.' 'तो आज चार महिने मुलांस शुद्ध **लिहिणें** किंवा **लिहिण्यास** किंवा **लिहावयास** पढवीत आहे.' 'त्याला लांब जिभा काढून **बोलणें** किंवा **बोलावयास** किंवा **बोलण्यास** सांगावयास नको.' इ०.

४१८. अशा ठिकाणीं 'लिहावयास,' 'बोलावयास,' 'लिहिण्यास,' 'बोलण्यास,' इत्यादि रूपें वास्तविक चतुर्थीचीं नव्हेत; तीं चतुर्थीचे जे प्रत्यय तेच लागून झालेलीं धातुसाधित नामें होत. तीं अर्थानुरोधानें प्रथमा किंवा द्वितीया विभक्तींत असतात असें समजावें.

४१९. अप्रत्यक्ष कर्मपद क्रियार्थबोधक धातुसाधित नाम असून जेव्हां **भावेप्रयोग** करावयाचा असतो, तेव्हां तां-तांना-प्रत्ययान्त किंवा ऊं-प्रत्ययान्त धातुसाधित अव्ययाचा बहुधा उपयोग करितात. उदा०—'मीं रामास सकाळीं रस्त्यानें **जातांना** पाहिलें.' 'हरीनें त्यास हें **करूं** सांगितलें.' इ०. या ठिकाणीं क्रियादर्शक कृदन्त हें नाम आहे असें समजावें.

४२०. करणें, समजणें, मानणें, म्हणणें, नेमणें, जाणणें, इत्यादि क्रियापदाचें अप्रत्यक्ष कर्मपद द्वितीयान्त नाम असतें; परंतु क्रियापद त्याच्याशीं जुळत नसल्यामुळें अशा ठिकाणीं कर्मणि-प्रयोग न होतां भावेप्रयोग होतो. तेव्हां अशा स्थितींत कर्तरि-प्रयोग किंवा भावे-प्रयोगच शक्य आहे. उदा०—'शिंदा बाजीरावास पेशवा करील.' 'शिंद्यानें बाजीरावास पेशवा केलें.' 'जर्मन लोकांनीं प्रशियाच्या राजास बादशहा केलें (म्हटलें).' 'सरकारानें त्यांस जज्ज नेमिलें.' इ०.

**टीप**—बोलण्यांत आणि क्वचित् लिहिण्यांतही अशा ठिकाणीं कर्मणि-प्रयोगही करितात. जसें,—'सरकारानें त्याला जज्ज नेमिला.' 'त्यानें तो आपला जिवलग मित्र मानिला आहे.' 'त्यांनीं प्रशियाचा राजा आपला बादशहा केला.' इत्यादि.

४२१. क्रियापदाचें कर्मपद जेव्हां वाक्य असतें, तेव्हां तें क्रियापदाचे पूर्वी किंवा मागाहून येतें. जेव्हां तें पूर्वी येतें तेव्हां '**हा**' आणि 'असा' यांचीं योग्य तीं रूपें किंवा 'म्हणून' हें अव्यय घालून त्याचा संबंध क्रियापदाशीं जोडतात. तथापि विशेषतः कवितेंत बरेच वेळां हे शब्द गाळलेले असतात. जसें,—'मी तुझें काम करीन असें किंवा म्हणून तो म्हणाला.' 'तो म्हणाला कीं मी तुझें काम करीन.' 'तो म्हणाला, मी तुझें काम करीन.'

'विश्वामित्र म्हणे, मी क्षत्रिय, आधार जाण तेजाचा.' —मोरोपंत.

'म्हणे विश्वामित्र स्वमनि' सकळांचें भरंवसे,
कळों आले, आतां मजजवळि विश्वंभर वसे.' —वामन.

## ( ४ ) उद्देश्य आणि विधेय.

४२२. वाक्यांत ज्याविषयीं आपण विधान करितों, म्हणजे ज्याला उद्देशून आपण कांहीं सांगतों अगर बोलतों, त्यास **उद्देश्य** असें म्हणतात. उदा०–'रामा लिहितो.' या वाक्यांत 'लिहितो' ही गोष्ट 'रामा' बद्दल सांगितली, म्हणून 'रामा' हें पद उद्देश्य होय.

४२३. कर्तरि–प्रयोगांत आपण कर्त्यास उद्देशून बोलतों, किंवा कर्त्याबद्दल विधान करितों; म्हणून तशा वाक्यांत कर्ता उद्देश्य असतो. कर्मणि-प्रयोगांत आपण कर्माबद्दल विधान करितों, किंवा कर्मास उद्देशून बोलतों, म्हणून तेथें कर्मपद 'उद्देश्य' असतें. भावे-प्रयोगांत आपण क्रिया झाली हें सांगतों; त्या प्रयोगांत कर्ता किंवा कर्म याविषयीं सांगत नाही, तर क्रियार्थाविषयीं सांगतों. तो क्रियार्थ निराळा उक्त नसून त्याचा क्रियापदांतच अंतर्भाव होतो. उदा०– 'रामा बसतो.' किंवा 'रामा काम करितो.' या वाक्यांत 'रामा' याबद्दल विधान केलें आहे, म्हणून तो शब्द उद्देश्य होय. परंतु 'रामानें काम केलें.' या वाक्यांत 'केलें' हें विधान 'काम' याबद्दल केलें आहे, म्हणून तो शब्द उद्देश्य होतो तसेंच 'मीं त्यास गांवाला पाठविलें.' यांत कर्ता किंवा कर्म याबद्दल विधान केलें नाहीं; तर 'पाठविलेलें आहे' असें क्रियार्थाबद्दल विधान केलें, म्हणून हा भावे-प्रयोग झाला. या वाक्यांत उद्देश्य निराळें नाहीं. त्याचा अंतर्भाव 'पाठविलें' यांतच झाला आहे. त्याची 'पाठविलेलें आहे' अशी फोड केली असतां तें क्रियावाचक नाम कर्ता होऊन हा कर्तरिप्रयोग होईल. याविषयीं जास्त विवेचन मागें प्रयोगप्रकरणीं (क० ३५०यांत) केलें आहे.

**टीप**—वाक्यांतलें **उद्देश्यपद** नेहमीं **प्रथमा विभक्तींत** असतें, हें यावरून स्पष्ट समजेल.

४२४. कळमळणें, मळमळणें, सांजवणें, उजाडणें, फावणें, हीं अकर्मक क्रियापदें आहेत, व त्यांस कर्त्याची–क्रिया करणाराचीही–जरूर नसते. म्हणून या क्रियापदांना उद्देश्यपद, कर्तृपद, किंवा कर्मपद लागत नाहीं. त्यांचा अर्थ त्यांच्यांतच पूर्ण असतो. हीं क्रियापदें प्रयोगव्यवस्थेच्या बाहेर आहेत.

४२५. ( अ ) वाक्यांतील उद्देश्य एकाकी शब्द असेल, किंवा तें अनेक शब्दांचें झालें असेल, म्हणजे त्याचा विस्तार केला असेल. उदा०—'**हरी** जातो ' या वाक्यांत उद्देश्य एकाकी आहे. परंतु ' गोविंदरावांचा मुलगा हरी,' किंवा ' शहाणा हरी,' अथवा ' आमचा हरी, ' असें कांहीं हरीसंबंधानें जास्त सांगितलें म्हणजे ' हरी ' या उद्देश्य-पदाचा विस्तार झाला.

( आ ) उद्देश्याचा विस्तार ( १ ) विशेषणें, ( २ ) सविभक्तिक शब्द, व ( ३ ) उद्देश्याचा अर्थ स्पष्ट करण्याकरितां उद्देशार्थी प्रथमेंत घातलेले शब्द, नामवाक्यें आणि विशेषणवाक्यें अथवा वाक्यांश यांच्या योगानें होतो. उदाहरणें—' आजारी, अशक्त, अथवा नुकताच दुखण्यांतून उठलेला मनुष्य खाण्यापिण्याचे संबंधानें जपून वागतो. ' ' कृष्णरावाचा मुलगा गोपाळराव काल इंग्लंडास गेला. ' ' ज्याविषयीं मीं तुला काल सांगितलें, तो मनुष्य आज मज-कडे येईल. ' इत्यादि.

( इ ) उद्देश्याचा विस्तार केला असतां त्यास **विस्तृत उद्देश्य** किंवा **संकीर्ण उद्देश्य** असें म्हणावें; व तें विस्तृत नसतां, त्यास **शुद्ध उद्देश्य** किंवा **असंकीर्ण–उद्देश्य** असें म्हणावें. उद्देश्यपदाचा अर्थ वाढविण्याकरितां किंवा त्याच्या अर्थाचा विस्तार करण्याकरितां जो किंवा जे शब्द घातलेले असतात त्यास किंवा त्यांस **उद्देश्य–विस्तार** असें म्हणावें.

४२६. ( अ ) वाक्यांत उद्देश्याच्या स्थितीबद्दल किंवा कृतीबद्दल जें कांहीं आपण म्हणतों, सांगतों, अथवा बोलतों, त्यास **विधेय** अथवा **आख्यात** असें म्हणतात. उदा०—'हरी जातो.' या वाक्यांत हरीबद्दल 'जातो' ही गोष्ट सांगितली, म्हणून 'जातो' हें **विधेय** अथवा **आख्यात** होय.

( आ ) विधेयपद बहुधा क्रियापद असतें. परंतु ' अस ' धातूचा अर्थ ' अस्तित्वांत असणें ' इतकाच नसून जेव्हां त्याच्या योगानें वाक्यांत उद्देश्या बद्दल कांहीं तरी विशेष विधान केलें असेल, तेव्हां त्या धातूबरोबर नाम सर्वनाम किंवा विशेषण येतें, व तेंही विधेयांत समाविष्ट असतें. उदा०—' ' हरी **गोविंदरावांचा मुलगा** आहे. '–( नाम ). ' काल मीं जो गृहस्थ पाहिला तो **हाच** होय.'–( सर्वनाम ). ' कृष्णा **हुषार** आहे.'–( विशेपण ).

( इ ) क्रियापद सकर्मक असल्यास विधेयाच्या अर्थाची पूर्तता होण्यास

वाक्यांत कर्मपद असतें, त्यास **विधेयपूरक** असें म्हणावें. उदा०—'हरी पुस्तक वाचितो.' या वाक्यांत 'वाचितो' या क्रियावाचक विधेय शब्दाच्या अर्थाची पूर्तता कांहीं तरी आणखी शब्द घातल्याखेरीज होत नाहीं. 'हरी वाचितो.' या नुसत्या दोन शब्दांनीं पूर्ण अर्थनिष्पत्ति होणार नाहीं. तें कार्य 'पुस्तक' शब्द घातल्यानें होतें; म्हणून 'पुस्तक' हा शब्द **विधेय-पूरक** होय.

**टीप**—ज्याला कर्मपद किंवा कर्म असें म्हणतात, तेंच नेहमीं 'विधेयपूरक' असतें; म्हणून त्यास 'विधेयपूरक' हा शब्द न लावितां 'कर्म' किंवा 'कर्म-पद' हाच शब्द लाविला तरी चालेल.

४२७. विशेषणें, नामें, सर्वनामें, सविभक्तिक शब्द, उद्देशार्थी शब्द' नामरूपी आणि विशेषणरूपी वाक्यें यांच्या योगानें उद्देश्यपदाप्रमाणेंच कर्म-पदाचाही विस्तार करितां येतो. अशा विस्तार करणाऱ्या शब्दांस **कर्मपद-विस्तार** असें म्हणावें. उदाहरणें–'मी तुला आपलें बक्षिस मिळालेलें उत्तम पुस्तक वाचावयास देईन.' 'ज्याची माझी फार गट्टी जमली आहे, तो माझा नवा मित्र आज तुला भेटवीन.' इत्यादि,

**टीप**—कर्मपद विस्तृत किंवा अविस्तृत असेल त्याप्रमाणें त्यास अनुक्रमें **विस्तृत-कर्मपद** किंवा **संकीर्ण-कर्मपद** अथवा **अविस्तृत-कर्मपद** किंवा **शुद्ध-कर्मपद** असें म्हणावें.

४२८. कित्येक क्रियापदांस संप्रदानार्थक अप्रत्यक्ष कर्मपदें असतात. **हीं अप्रत्यक्ष-विधेयपूरकें** होत; अथवा त्यांस विधेयविस्तार असेंही म्हणण्यास चिंता नाहीं.

४२९. उद्देश्याप्रमाणेंच विधेयपूरक किंवा कर्मपद हें नाम, सर्वनाम, विशेषण' नामवाक्य, किंवा नाम–वाक्यांश असेल. उदा०–'तो ब्राह्मणास **द्रव्य** देतो.'–( नाम ). 'धन्यानें **त्याला** गांवास धाडिलें.'–( सर्वनाम ). 'कोणा **शहाण्यास** पाठीव.'–( विशेषण). 'तो म्हणतो, **ही गोष्ट मला माहीत नाहीं.**'–( नामवाक्य ). '**कोणीं खोटें बोललेलें** परमेश्वरास आवडत नाहीं.'–( नामवाक्यांश ).

४३०. विधेयाच्या अर्थाचा विस्तार करण्याकरितां किंवा त्याचा अर्थ स्पष्ट करण्याकरितां वाक्यांत क्रियाविशेषणें, अव्ययें, अव्ययवाक्यें, किंवा अव्ययवाक्यांश घालितात. यांस **विधेयविस्तार** असें म्हणतात. उदा०— 'तो पुस्तक **चांगलें** वाचितो.'–( क्रियाविशेषण ). '**तूं येथें होतास** तेव्हां तो आला.'–( अव्ययवाक्य ). '**तूं घरीं असून** मला भेटला नाहींस.'— ( अव्ययवाक्यांश ).

४३१. विधेयविस्तारापासून अव्ययांप्रमाणेंच काल, स्थल, रीति, संकेत, आश्चर्य, कार्य, कारण, परिणाम, इत्यादिकांचा बोध होतो, त्या-त्याप्रमाणें त्यांस कालदर्शक, स्थलदर्शक, इत्यादि प्रकारचे विधेय-विस्तार असें म्हणावें.

४३२. वाक्यांत जीं शब्दांचीं सविभक्तिक रूपें असतात, त्यांपासून विधेयाच्या गुणाचा बोध होतो; म्हणून व्याकरणांतील निरनिराळ्या शब्दांच्या दृष्टीनें जरी तीं नामांचीं रूपें आहेत, तरी वाक्यार्थाचे दृष्टीनें तीं अव्ययरूप असतात. याकरितां प्रथमान्त व द्वितीयान्त यांशिवाय बाकी सर्व सविभक्तिक शब्द हे कांहीं विशेष कारणानें विशेषणरूप होऊन त्यांचा नामांकडे संबंध जात नसल्यास **विधेयविस्तारांत** गणावे.

४३३. कर्मणि व भावे प्रयोगांत कर्तृपद तृतीयान्त किंवा चतुर्थ्यन्त असतां तें क्रिया घडण्यास कारणीभूत किंवा साधनीभूत कोण झालें हें दर्शवितें, म्हणून त्याला विधेयविस्तारांत घालावें. अशा शब्दांस कर्तृपदें म्हणून उद्देश्याबरोबर किंवा उद्देश्य नसतां त्याच्या जागीं घालण्यास चिंता नाहीं. मात्र वाक्यपृथक्करण लिहितांना त्याचेपुढें कंसांत 'कर्तृपद' असें नेहमीं घालावें. ही केवळ व्यवस्थेची गोष्ट आहे. त्यांची खरी स्थिति म्हटली म्हणजे ती विधेयविस्तारापैकींच होत.

---

# प्रकरण २२.



## वाक्यांत सर्वनामांची व्यवस्था.

४३४. प्रथमपुरुष-सर्वनामें व द्वितीयपुरुष-सर्वनामें यांच्या अनेकवचनाचा अर्थ नामांच्या अनेकवचनाच्या अर्थापेक्षां निराळा असतो. आम्ही म्हणजे

मी+दुसरे; तुम्ही म्हणजे तूं+दुसरे. परंतु तृतीयपुरुषवाचक सर्वनामांच्या अनेकवचनाचा अर्थ नामांच्या अनेकवचनाच्या अर्थासारखाच असतो. 'ते' म्हणजे तृतीयपुरुषी अनेकजण असा अर्थ होतो.

४३५. प्रथम आणि द्वितीय, प्रथम आणि तृतीय, किंवा प्रथम, द्वितीय आणि तृतीय अशीं पुरुषवाचक सर्वनामें उद्देश्यपदाच्या ठिकाणीं असून तीं 'आणि' या अव्ययानें जोडलेलीं असतील, तर वाक्यांतील क्रियापद प्रथमपुरुषीं अनेकवचनीं घालितात. उदा०—'मी आणि तूं (=आम्ही) काल आलों.' 'मी आणि हरी (=आम्ही) रविवारीं मुंबईस जाऊं.' 'मी, तूं आणि हा (=आम्ही) असे मिळून उद्यां नगरास जाऊं.' इ०. त्याचप्रमाणें उद्देश्याच्या ठिकाणीं जेव्हां द्वितीय आणि तृतीय पुरुषवाचक सर्वनामें एकत्र येतात, तेव्हां क्रियापद द्वितीयपुरुषीं अनेकवचनीं योजितात. उदा०—'तूं आणि तो (=तुम्ही) कधीं आलांत?' इ०.

४३६. केव्हां वस्तुतः एका व्यक्तीसंबंधानें बोलावयाचें असून अनेकवचनी सर्वनाम योजितात. यास **आदरार्थी अनेकवचन** असें म्हणतात. याविषयीं आणि 'आपण' याच्या आदरार्थी अनेकवचनाविषयीं मागें सविस्तर विवेचन केलें आहे. (क० १४७, १६७ आणि १६८ पाहा).

४३७. केव्हां रागानें किंवा औपरोधिक रितीनें बोलतांना कमी दर्जाच्या मनुष्यासंबंधानें अनेकवचनी सर्वनामांचा उपयोग करितात. उदा०—'आपण फार शहाणे आहांत, आतां तोंड आटपा!' 'पुनः तुमची स्वारी येथें आली तर मारच खाईल!' 'तुम्ही आतां चला येथून!' 'हो! ते गेले, तुम्हीही चला!' 'त्यांनीं तसे दिवे लावले, तुम्ही असे लावीत आहां!' इ०.

४३८. ज्या नामासंबंधानें सर्वनाम योजलेलें असतें, तें नाम सर्वनामाच्या लागलेंच पुढें असून त्यास विभक्तिप्रत्यय लागला असतां मागील सर्वनामाचें सामान्यरूप होतें. म्हणजे अशा ठिकाणीं सर्वनामाचा विशेषणासारखा उपयोग होतो. जसें,—'त्या मनुष्यानें,' 'ज्या किंवा जे दिवशीं,' 'ह्या रितीनें,' 'ये रिती,' इत्यादि.

४३९. अशा ठिकाणीं प्रथम व द्वितीयपुरुष सर्वनामाचें सामान्यरूप न येतां विशेष्याप्रमाणें सविभक्तिक रूपच येतें. तसेंच अर्थ विशेष स्पष्ट करण्या-

साठीं केव्हां तृतीयपुरुष-सर्वनामाचेंही सविभक्तिक रूप घालितात. उदा०-'मला गरीब ब्राह्मणाला काय?' 'तुम्ही कुणब्यांनीं अलीकडे ताळ सोडला.' 'त्याला बाडग्याला सोंवळें कसलें?' 'तिला बिचारीला काय विचारतोस, गाय ती!' 'म्यां अज्ञ जनानें तुझें स्वरूप कसें ओळखावें?' 'त्यानें गुलामानें गुरूची सेवा चांगली केली.' 'त्वां विद्यार्थ्यानें इतकें बोलूं नये.' 'त्याला कसब्याला काय, तो कोठेंही पोट भरील.' इ०.

**टीप**—खरें पाहिलें तर वरील उदाहरणांतील सर्वनामें मुख्य शब्द किंवा विशेष्यें असून पुढील नामें विशेषणासारखीं आहेत.

(अ) विशेषणरूप सर्वनामाचें सामान्यरूप घालून केलेलें वाक्य व सविभक्तिक रूप घालून केलेलें वाक्य यांच्या अर्थांत कधीं कधीं फरक असतो. उदा०—'त्या ब्राह्मणानें वेद पढावा.' म्हणजे त्याच ब्राह्मणासंबंधानें पाहातां त्यानें वेद पढावा हें इष्ट आहे. परंतु 'त्यानें ब्राह्मणानें वेद पढावा.' म्हणजे तो ब्राह्मण असल्यामुळें वेद पढणें हें त्याचें कर्तव्य आहे, असा अर्थ. त्याचप्रमाणें 'त्या कुत्र्याला काय, तो हवें तें खाईल,' व 'त्याला कुत्र्याला काय, तो हवें तें खाईल;' या दोन वाक्यांच्या अर्थांत थोडा फरक आहे. पहिल्या वाक्यावरून असा बोध होतो कीं. बाकीचे कुत्रे हवें तें खाणारे नाहींत; पण या कुत्र्याला तशी कांहीं खोड नाहीं; तो हवें तें खातो. पण दुसऱ्या वाक्यावरून असा अर्थ निघतो कीं, कुत्र्याची जात वाटेल तें खाते, तिला कांहीं वर्ज्य नाहीं, व तो कुत्राच असल्यामुळें अर्थात् वाटेल तें खाईल.

[आ] विशेषणरूप सर्वनामाच्या पुढील नाम निर्जीववस्तुवाचक असलें, तर सर्वनामाचें फक्त सामान्यरूप होतें. उदा०-' त्या घराला.' 'या झाडावर. 'त्या डोंगराहून.' 'ज्या नदीचें.' इ०.

४४०. जो, जी, जें, या संबंधी सर्वनामांच्यापुढें त्यांच्या जोडीचीं दर्शकसर्वनामें [तो, ती, तें,] वाक्यांत आलीं पाहिजेत. तसेंच, ज्या गौणवाक्यांत हीं संबंधी सर्वनामें असतात, तीं वाक्यें मिश्रवाक्यांत आरंभीं घालितात. उदा० 'जो मनुष्य लोकांशीं तोऱ्यानें वागतो, त्याचा सर्व द्वेष करितात.' 'या मुंबई शहरांत जो पहावा तो उद्योगी.' इ०.

४४१. दर्शक किंवा संबंधी सर्वनामें प्रथमपुरुषी किंवा द्वितीयपुरुषी सर्वनामांबद्दल वाक्यांत घातलीं असतां, क्रियापद अनुक्रमें प्रथम किंवा द्वितीयपुरुषीं योजितात. उदा०—' मी जो आजच येथें आलों, तो सोबतीशिवाय कसा बाहेर पडूं ? ' ' जो तूं अजून अक्षर लिहावयास सुद्धां शिकला नाहींस, तो पत्र कसें लिहिशील ? ' इ०.

४४२. ( अ ) दर्शक किंवा संबंधी सर्वनाम ज्या नामाबद्दल घातलें असेल, त्या नामाचें लिंगवचन त्यास लागतें. विभक्तिसंबंधानें पाहिलें तर वाक्यांतील अर्थानुरोधानें त्याची कदाचित् एकच विभक्ति असेल, अथवा नामाची एक विभक्ति व सर्वनामाची दुसरीच असें होईल. उदा०—' जो मनुष्य त्वां आज पाहिला त्यास बोलाव. ' ' ज्याची आपण फार मार्गप्रतीक्षा करीत होतां, तोच हा मनुष्य. ' इ०.

( आ ) सर्वनाम भिन्न लिंगांच्या अनेक नामांबद्दल घातलें असल्यास त्याचें लिंगवचन त्याच्या अगदीं जवळच्या नामाच्या लिंगवचनाप्रमाणें असतें. उदा०- विद्यार्थ्यांस फार जरूरीचीं अशीं हीं पुस्तकें, कागद, दौत, वगैरे आणा. ' 'ही पेटी, फळा आणि बांक घेऊन जा. ' इ०.

४४३. कित्येक वेळां वाक्यांत संबंधी सर्वनाम गुप्त ठेवितात; व तद्दर्शित पदार्थ निरनिराळे दाखवावयाचे असतां किंवा त्यांचा ' प्रत्येक ' अथवा 'सर्व' जसा अर्थ असतां दर्शक व संबंधी सर्वनामांची द्विरुक्तिही करितात. उदा०— ' माझ्याजवळ पुस्तकें असतील तीं मी तुला पाहून देईन. ' ' घरांत जो जो पदार्थ होई, तो तो आधीं मैनेकडे येत असे. ' ' जें जें विचारावें तें तें तो नाहीं म्हणतो. ' इ०.

४४४. दर्शकसर्वनाम ' हा ' व प्रकारार्थक विशेषण ' असा ' हे शब्द किंवा या शब्दांचीं लिंगवचनांचीं योग्य तीं रूपें, वाक्यांत क्रियापदास अनेक कर्ते किंवा कर्मे असतां किंवा कर्तृस्थानीं व कर्मस्थानीं एखादें नामवाक्य असतां, त्याचे शेवटीं घालितात. उदा०—' रामा, हरी, कृष्णा हे किंवा असे आले. ' ' मी छत्री, जोडा, टोपी, दप्तर हीं किंवा अशीं घेऊन बाहेर पडलों. ' ' मुलानीं एकसारखें खेळावें, हें चांगलें नाहीं. ' 'तो गेला हें किंवा असें ऐकून माझी काळजी गेली. ' इ०.

४४५. ( अ ) एखाद्या पदार्थाचें लक्षण किंवा हकीगत सांगणें असल्यास त्याच्यापुढें लागलेंच 'हा' हें दर्शक सर्वनाम [ किंवा त्याचें योग्य तें रूप ] योजितात. उदा०—'**राम** हा अयोध्येचा राजा होता.' 'लंडन हें इंग्लंडच्या राजधानीचें शहर आहे.' 'लंका ही रावणाची नगरी.' इ०.

( आ ) अशा प्रकारचें लक्षण किंवा वर्णन, संबंधी सर्वनाम जो-जी-जें व त्याचे जोडीचें दर्शकसर्वनाम तो-ती-तें हीं वाक्यांत योजूनही करितात. त्या वेळीं सांगितलेलें लक्षण अधिक स्पष्ट किंवा जोरदार होतें. उदा०—'जो मुलगा मीं तुला सांगितला तो हाच,' 'भाकरी म्हणून जो पिठाचा पदार्थ करितात, तो खावयास फार चांगला असतो.' इ०.

( इ ) याप्रमाणें लक्षण किंवा वर्णन करितांना ज्या वाक्यांत वर्णन सांगितलें असेल, त्याचे आरंभीं सर्वनाम येईल; पण वर्णनपर वाक्यांतील नाम, आणि ज्या पदार्थाचें वर्णन केलें तद्बोधक नाम हीं भिन्न लिंगांची असल्यास पुढील दर्शक सर्वनाम कोणत्या लिंगाचें योजावयाचें हा प्रश्न उत्पन्न होतो, व लिहितांना किंवा बोलतांना त्यासंबंधानें चुका होतात. या संबंधानें विचार असा आहे कीं, पुढें येणाऱ्या नामाचें लिंग बोलणाराला ठाऊक नसतें; म्हणून वर्णन-पर वाक्यांत आलेलें नाम ज्या लिंगाचें असेल, त्या लिंगाचें पुढील दर्शक सर्वनाम योजावें. उदा०—'पृथ्वीवर पहिला ग्रंथ प्रकट झाला, ती ऋग्वेद-संहिता होय.' 'मीं काल जो प्राणी पाहिला तें मांजर होतें.' यांतील पहिल्या वाक्यांत 'ती' बद्दल तो पाहिजे. कारण बोलणारा 'ती' या सर्वनामाचा उपयोग करीत असतां त्याचे मनांत 'ग्रंथ' हा शब्द होता; 'संहिता' हा शब्द नव्हता. तेव्हां तें वाक्य असें केलें पाहिजेः—'पृथ्वीवर पहिला ग्रंथ प्रकट झाला तो (ग्रंथ) ऋग्वेदसंहिता होय. तसेंच, दुसरें वाक्य असें असावेंः— 'मीं काल जो प्राणी पाहिला तो ( प्राणी ) मांजर होता.' कारण बोलणारानें जेव्हां दर्शक सर्वनाम घातलें तेव्हां 'प्राणी' हा शब्द त्याचे मनांत विशेषें-करून होता; 'मांजर' हा नव्हता.

४४६. 'हा' व 'तो' यांपासून अनुक्रमें जवळच्या व दूरच्या व्यक्तीचा किंवा वस्तूचा बोध होतो. 'कोण' यापासून व्यक्तिवाचक नामांचा किंवा उच्च प्राणिवाचक नामांचा बोध होतो. 'काय' हें सर्वनाम निर्जीव वस्तू व

हलक्या प्रतीचें प्राणी, यांस लावितात. याचा उपयोग तुच्छता किंवा तिरस्कार दाखवावयाचा असतां व्यक्तिदर्शक नामासंबंधानें करितात. 'काय' हें आश्चर्य दाखवावयाचें असतांही योजितात. उदा०—'तो **कोण** मनुष्य आहे?' 'तें **काय** तेथें पडलें आहे?' 'तें **कोण** जनावर आहे?' '**काय** [किती, केवढा] मूर्ख मनुष्य आहेस रे तूं?' 'अबबब! **काय** रे हें!'

'**कोण** ज्ञाता राज्यस्वीकार करील, आधि ज्यामाजी?'
'ऐसा **कोण** प्राणी, ज्यातें न करील वश हरी नखरें?'
'हा **काय** रत्नभोक्ता! मारू अनुताप पावुनी हांका.'
'**काय** रुचिर! **काय** सुचिर! जाणों हे पिंड काय तेजाचे!'

(अ) 'कोण' व 'काय' यांचीं तिन्हीं लिंगांचीं रूपें सारखींच आहेत. 'कोण' याचा व्यक्तीकडे उपयोग गेला असतां व्यक्ति कोण-म्हणजे स्त्री कीं पुरुष–हें ठाऊक नसल्यास त्याचा नपुंसकलिंगी उपयोग करितात. उदा०— 'कोण तें?' 'तें तिकडे कोण आहे?' 'इकडून आतां कोण गेलें?' इ०.

(आ) 'काय' हें सर्वनाम संबंधी सर्वनामाबद्दल घालितात. उदा०— 'काय (जें) देईल तें घे.' इ०. अशा ठिकाणीं निरुपायाचा बोध होतो. यावरून आश्चर्य, प्रशंसा किंवा धन्यता यांचाही बोध होतो. उदा०—'काय हें धैर्य!' 'काय अचाट कल्पना!' 'त्याची कृति काय म्हणून सांगूं!'

(इ) ज्या व्यक्तीसंबंधानें बोलणाराला कांहीं माहीत नाहीं, तिच्याविषयीं चौकशी करितांना तो 'कोण' याचा उपयोग करितो. म्हणजे 'कोण' हें सर्वनाम अज्ञात व्यक्तीला लावितात. उदा०—'कोण हे गृहस्थ?' इ०.

(ई) नियमित व्यक्तींच्या किंवा वस्तूंच्या समुदायांतील विशिष्ट व्यक्ती-बद्दल किंवा वस्तूबद्दल चौकशी करणें झाल्यास 'कोणता-ती-तें' याचा उपयोग करितात. उदा०–'यांपैकीं तो मनुष्य कोणता?' 'तुला कोणती पेटी पाहिजे?' इ०. 'तो मनुष्य कोण?' व 'तो मनुष्य कोणता?' यांतील पहिल्या वाक्या-वरून असें दिसून येतें कीं, तो मनुष्य बोलणाराला अगदींच अज्ञात किंवा परकी आहे, व त्याच्या संबंधानें याला कांहीं माहिती पाहिजे आहे. दुसऱ्या वाक्यावरून असा बोध होतो कीं, बोलणाराला कांहीं नियमित मनुष्य ठाऊक

आहेत व त्यांपैकीं हा एक आहे हेंही माहीत आहे; पण हा अमुकच एवढें मात्र ठाऊक नाहीं.

**टीप**—कोणता हें कोण ह्यापासून झालेलें सर्वनामात्मक विशेषण आहे.

---

# प्रकरण २३.



## वाक्यांतील विशेषणांची व्यवस्था.

४४७. विशेषणाचा विशेष्याशीं निकट संबंध असल्यामुळें तें नेहमीं त्याचे पूर्वींच घालितात; परंतु 'अस' धातूचें क्रियापद असतां तें विशेष्यानंतर व क्रियापदाजवळ येतें. त्याचप्रमाणें विशेषणाचा जसा नामाशीं तसाच क्रियार्थाशींही संबंध असला, म्हणजे तें क्रियापदाजवळ येतें. या प्रकारच्या विशेषणास '**क्रियाविशेषण**' किंवा '**विधिविशेषण**' असें म्हणतात. उदा०—'तो गृहस्थ **चांगला** आहे.' 'तो **चांगला** किंवा **चांगलें** बोलतो.' 'या दांड्या **तिरप्या** बसल्या.' 'तो गवई धृपद **चांगलें** म्हणतो.'

४४८. आकारान्त विशेषणांस विशेष्यांच्या लिंगवचनांप्रमाणें विकार होतात; व विशेष्य साविभाक्तिक असल्यास विशेषणाचें सामान्यरूप होतें; हें सामान्यरूप विकल्पेंकरून 'आ' [ संधि होऊन 'या' ] किंवा 'ए' लागून होतें. उदा०—'तो चांगला मुलगा आहे.' 'ती चांगली मुलगी आहे.' 'तें चांगलें मूल आहे.' 'तीं चांगलीं मुलें आहेत.' 'त्या चांगल्या मुली आहेत.' 'ते चांगले मुलगे आहेत.' 'चांगले किंवा चांगल्या मुलांस शिक्षा करावी लागत नाहीं.' इ०.

४४९. ( अ ) चा-ची-चें प्रत्ययान्त संबंधी विशेषणें व ला-ली-लें प्रत्ययान्त विशेषणें यांचें सामान्यरूप असेंच दोन प्रकारांनीं होतें. उदा०—'रामाच्या किंवा रामाचे घरीं.' 'हरीचे किंवा हरीच्या हातावर' 'वरले किंवा वरल्या बाजूस.' इ०. अशा विशेषणाचें जें विशेष्य, त्याचें पुन्हां संबंधी विशेषण झालें असतां त्या विशेषणांचें सामान्यरूप होतें. उदा०—'हरीचे किंवा हरीच्या घराचें दार.' या दोन संबंधी विशेषणांचे मध्यें दुसरीं कितीही विशेषणें आलीं, तरी पहिल्या

संबंधी विशेषणाचें सामान्यरूप होतेंच. उदा०—'हरीच्या जुन्या, उंच मोठ्या हवाशीर घराचा मजला.' इ०.

(आ) कित्येक वेळा एका संबंधी विशेषणापुढें दुसरें संबंधी विशेषण येतें; तेव्हां पहिलें संबंधी विशेषण हें दुसरें विशेषण ज्या नामापासून झालेलें असतें, त्याचें विशेषण असतें, किंवा दोन्ही विशेषणांचा एकाच नामाकडे संबंध असतो. अशा वेळीं रचनेप्रमाणें अर्थामध्यें भेद होतो. उदा०—'घराच्या पुढचे खांब.' म्हणजे घराच्या पुढच्या जागेंत—आंगणांत वगैरे—असणारे खांब; त्यांचा प्रत्यक्ष घराशीं कांहीं संबंध नाहीं. आणि 'घराचे पुढचे खांब,' म्हणजे घराचा जो पुढचा भाग, त्याला असलेले खांब. दुसऱ्या उदाहरणांत दोन्ही संबंधी विशेषणें 'खांब' याचींच आहेत. त्याचप्रमाणें 'देवाचीं कोंबडीचीं पिलें,' म्हणजे 'देवाची ज्यावर सत्ता आहे अशीं कोंबडीचीं पिलें.' परंतु 'देवाच्या कोंबडीचीं पिलें,' म्हणजे 'देवाची जी कोंबडी आहे तिचीं पिलें.' इ०.

४५०. संबंधी विशेषणाचें विशेष्य केव्हां गुप्त असतें किंवा त्याचा त्या विशेषणांतच समावेश झालेला असतो. या वेळीं त्याचें नपुंसकलिंगी एकवचनी रूप असतें. उदा०—'माझें असें आहे (म्हणजे माझी स्थिति अशी आहे) कीं, मला रोज दोन तास फिरलें पाहिजे.' 'तुमचे घरचें (घरची व्यवस्था-स्थिति) कसें काय आहे?' 'मुंबईचें कांहीं (वर्तमान, हकीगत) समजलें का?' हीं मूळचीं विशेषणें असतां त्यांचा येथें नामांसारखा उपयोग केला आहे.

४५१. (अ) आकारान्त विशेषण असून त्याचा एकाच वेळीं अनेक नामांकडे संबंध असला, किंवा त्यांस अनेक विशेष्यें असलीं, तर तें जवळच्या विशेष्याप्रमाणें चालतें. उदा०—'त्याला **मोठा** भाऊ व बहीण आहे.'

'भलें सत्त्व, शांति, दया असे जयातें, तो श्रेष्ठ.' —मुक्तेश्वर.

(आ) अनेक विशेषणांचा जेव्हां एकाच नामाकडे संबंध असतो, म्हणजे विशेष्य एक पण विशेषणें मात्र अनेक असें जेव्हां असतें, तेव्हां सुद्धां वरील सर्व विकार त्यांस होतात; व त्यांचेपुढें 'असा' या प्रकारार्थ विशेषणाचें योग्य तें रूप घातल्यास त्यांस विकल्पें करून ते विकार होतात. उदा०—'चांगल्या

आणि शहाण्या मुलास.' 'चांगल्या आणि शहाण्या अशा मुलास.' किंवा ' चांगला आणि शहाणा अशा मुलास. ' इ०.

( इ ) जेव्हां विधिविशेषणाचा किंवा क्रियाविशेषणाचा अनेक विशेष्यांकडे संबंध असतो, तेव्हां तीं सर्व विशेष्यें एकाच लिंगांचीं असल्यास विशेषणांचें रूप त्याच लिंगाचें अनेकवचनी घालितात; परंतु विशेष्यें भिन्नलिंगी असल्यास विशेषण नपुंसकलिंगी, बहुवचनी असतें. उदा०—' रामा आणि गोविंदा **चांगले** आहेत. ' ' विष्णु आणि मनी **चांगलीं** आहेत. ' इ०.

( ई ) अशा ठिकाणीं क्रियाविशेषणास त्याच्या जवळच्या विशेष्याचीं लिंग-वचनें लावण्याचाही प्रघात आहे. परंतु विशेष्यें निर्जीव पदार्थवाचक नामें असल्यास अशी रचना बहुधा असते. उदा०—' त्या पक्ष्याचें डोकें आणि **मान पांढरी** होती. '

**टीप**—अशा ठिकाणीं ' असा ' किंवा ' हा ' याचा सर्व विशेष्यानंतर उपयोग करितात.

४५२. विशेषणाचा, तद्दर्शित गुणानें युक्त असा पदार्थ या अर्थी, कर्मपदीं नामाप्रमाणें उपयोग करितात. उदा०—'आपण कोणाचें वाईट करूं नये.' 'आज मीं **गोड** फार खाल्लें.' इ०. अशा विशेषणाचा वाक्यांत उपयोग करण्याच्या संबंधाचे विशेष नियम असे आहेतः—

( १ ) आकारान्त विशेषण क्रियापदाचें कर्म असल्यास तें नेहमीं नपुंसक-लिंगी एकवचनी असतें. उदा०—' देवा, सर्वांचें बरें कर. ' ' कोणाचेंही **चांगलें** करावें.' 'रामानें **खरें** सांगितलें.' '**खोटें** बोलूं नये.' इ०.

( २ ) आकारान्त विशेषण क्रियापदाचें अप्रत्यक्ष कर्म असून प्रत्यक्ष कर्म अप्रत्यय-द्वितीया विभक्तींत असलें, तर विशेषणाचें सामान्यरूप होत नाहीं; परंतु प्रत्यक्ष कर्माच्या लिंगवचनांप्रमाणें त्याचें लिंग-वचन असतें. उदा०— ' त्यानें आपले हात शाईनें **काळे** केले. ' इ०.

( ३ ) परंतु प्रत्यक्ष कर्म सप्रत्यय-द्वितीया विभक्तींत असल्यास विशेषण ( म्हणजे अप्रत्यक्ष कर्म ) नपुंसकलिंगी एकवचनीं असतें. उदा०—' लोक त्यास **चांगलें** म्हणतात. ' इ०.

(४) क्वचित् अशा ठिकाणीं दुसऱ्या नियमाप्रमाणेंही रूपें योजितात. उदा०—'गुरूनें त्यास **शहाणा** केलें.' 'लोक त्यास **चांगला** म्हणतात.' इ०. परंतु तिसऱ्या नियमाप्रमाणें रूपें करण्याचा प्रघात विशेष आहे. वाक्यांत 'कर' धातूचें क्रियापद असतां मात्र दुसऱ्या नियमाप्रमाणें रूपें होतात.

(५) करणें, समजणें, मानणें, इत्यादि कांहीं थोड्या क्रियापदांसच फक्त विशेषणात्मक अप्रत्यक्ष-कर्मपद असतें.

४५३. जेव्हां कर्त्यावर दुसरे शब्द अवलंबून असून ते उद्देशार्थी प्रथमा विभक्तींत असतात, किंवा जेव्हां 'हा' किंवा 'असा' यांचीं रूपें अनेक कर्तृवाचक नामांच्या पुढें घातलेलीं असतात, तेव्हां क्रियापदाचा जो खरा कर्ता किंवा उद्देश्य असेल, म्हणजे ज्याप्रमाणें क्रियापद फिरत असेल, त्याच्याप्रमाणें विशेषणाचीं रूपें असतात. उदा०—'गोविंदा, कृष्णा आणि विनू हीं रामरावांचीं **चांगलीं** मुलें माझ्या ओळखीचीं आहेत.' 'मुंबई बेट शंभर वर्षांपूर्वी इतकें **मोठें** नव्हतें.' 'विष्णु, कृष्णा आणि गोदू या चांगल्या मुलांनीं बापाची मर्जी राखिली आहे.' इ०.

४५४. **विशेषणांचा तारतम्यभाव**—मराठींत तारतम्य-भाव दाखविण्यासाठीं विशेषणांचीं निरनिराळीं रूपें होत नाहींत. संस्कृतांत तारतम्यभाव दाखविण्याचे प्रत्यय 'ईयस्' व 'इष्ठ' आणि 'तर' व तम' हे आहेत. हे प्रत्यय लागलेलीं संस्कृत विशेषणांचीं कांहीं रूपें मराठींत येतात. जसें:—श्रेष्ठ, वरिष्ठ, ज्येष्ठ, कष्टतर, उच्चतम, प्रथम, पुण्यतर, पुण्यतम, इ०.

**टीप**—'तर' आणि 'ईयस्,' यांवरून पहिल्यापेक्षां ज्यास्त असा अर्थ होतो. दोनच वस्तूंची तुलना कर्तव्य असतां हीं रूपें योजितात. 'तम' आणि 'इष्ट' यांवरून सर्वांत ज्यास्त असा अर्थ होतो. दोहोंपेक्षां ज्यास्त वस्तूंची तुलना कर्तव्य असतां या रूपांचा उपयोग करितात. अशीं संस्कृत रूपें मराठींत येतात, तीं कळावीं म्हणून हे प्रत्यय सांगितले आहेत. शुद्ध मराठींत तारतम्य भाव दाखविणें झाल्यास विशेषणांचे मागें 'अधिक,' 'पेक्षां,' 'कमी,' 'सर्वांत,' 'अगदीं,' 'सगळ्यांत,' असे शब्द घालितात. उदा०—'तो अधिक तांबडा आहे.' 'तो यापेक्षां तांबडा आहे.' 'तो यापेक्षां कमी तांबडा आहे.' 'तो सर्वांत—सगळ्यांत—तांबडा आहे.' इ०.

४५५. विशेषणांस सा [ असा ], सर, किंवा ट हा प्रत्यय लाविला, म्हणजे मूळ विशेषणावरून ज्या गुणाचा बोध होतो, त्या गुणाचें 'न्यूनत्व' किंवा 'कमीपणा' दाखविला जातो. उदा०—काळसर, ( साधारण, थोडासा किंवा किंचित् काळा )—काळासा, भोळसर, भोळवट, भित्रट, पिंवळवट, पिंवळसर, पिंगट, गोरासा, चांगलासा, इ०.

४५६. ( अ ) विशेषणप्रदर्शित गुणांचें आधिक्य किंवा प्रकर्ष याचा बोध करणें झाल्यास विशेषणाची द्विरुक्ति करितात. उदा०.—'येथें **मुख्य मुख्य** सगळे आले होते.' 'कांहीं **चांगले चांगले** आंबे मला दे.'

'**मोठे मोठेहि** मठद्वारांतुनि भेटि घेति पायांची.' —मोरोपंत.

( आ ) विशेषणाची द्विरुक्ति झाली असतां तीन प्रकारच्या अर्थांचा बोध होतोः-( १ ) निरनिराळी वांटणी. उदा०—'प्रत्येकास **एकेक** लाडू वाढा.' 'त्यानें आम्हांस **पांच पांच** नारळ दिले.' ( २ ) क्रमानें कमी किंवा ज्यास्ती होणें. उदा०—'**थोडें थोडें** इंग्रजी वाचीत जा.' '**पर्वत उंच उंच** होत गेला आहे.' ( ३ ) आधिक्य, किंवा प्रकर्ष. उदा०—'**सूर्य लाल लाल** दिसतो.' 'तो **गोड गोड** बोलतो.' इ०.

४५७. परस्परांशीं उलट अशा अर्थांचीं दोन विशेषणें घालून दोन्ही प्रकारच्या वस्तूंचा किंवा गोष्टींचा अंतर्भाव दाखवितात. उदा०—'**लहान-मोठीं** शंभर पानें होतील.' 'तो रागानें **हिरवापिवळा** झाला.' 'अशी त्यानें **खरी-खोटी** हकीकत सांगितली.' '**बरे-वाईट** काय तें एकदां होऊन जाऊं द्या.' इ०.

४५८. जेव्हां विशेषणांचीं विशेष्यें सहजच समजण्यासारखीं असतात, तेव्हां विशेषणें व विशेष्यें या दोहोंचा अर्थ फक्त विशेषणानें दाखवितात. जसें,—'**बऱ्यांची** ( बऱ्या लोकांची ) संगत धरावी.' '**शहाण्यास** ( शहाण्या माणसास ) मार शब्दांचा.' इ०.

४५९. 'च'—प्रत्ययान्त संबंधी विशेषण याचा षष्ठी विभक्तीच्या जागीं उपयोग होतो. याचे भिन्न प्रकारचे उपयोग होतात. ते षष्ठी विभक्तीचे अर्थ म्हणून त्यांचें मागें विवरण केलेंच आहे. ( कलमें ३८०।३८१ पाहा ).

४६०. कित्येक विशेषणें आणि अव्ययें संबंधी विशेषणापुढें आलीं असतां त्या संबंधी विशेषणाचें सामान्यरूप होतें. पुढील विशेषणें किंवा अव्ययें बहुधा स्थलवाचक असतात. जसें,–' माझ्या येथें आज कीर्तन आहे. ' ' हरीच्या तेथें मीं काल विष्णूस पाहिलें. ' इ०. या उदाहरणांत ' येथें ' व ' तेथें ' यांचा अर्थ ' घरीं ' अशासारखा आहे. तसेंच ' तुझें पुस्तक मीं हरीच्या स्वाधीन केलें. ' यांत ' स्वाधीन ' या विशेषणानें मागील संबंधी विशेषणाचें सामान्यरूप झालें आहे. याचा अर्थ, ' हरी जो स्वतां त्याच्या आधीन असें तें पुस्तक केलें. ' असा आहे. त्याचप्रमाणें ' तो शत्रूच्या हस्तगत झाला. ' येथेंही सामान्यरूप झालें आहे. कारण ' शत्रूच्या ' हें ' हस्तगत ' यांतील ' हस्त ' याचें विशेषण आहे; आणि ' हस्त ' हा शब्द पुढें ' गत ' हें पद येऊन समासाचे द्वारें सविभक्तिक झाला आहे; कारण ' हस्तगत ' म्हणजे हातीं–हातांत,–गत–गेलेला.

४६१. ( अ ) एका संबंधी विशेषणापुढें आलेलें नाम वाक्यांत दुसऱ्या संबंधीं विशेषणापुढें त्याच अर्थीं यावयाचें असल्यास तें गुप्त ठेवितात. मात्र संबंधीं विशेषणाचें सामान्यरूप होऊन त्याच्या पुढें गुप्त किंवा अध्याहृत ठेविलेल्या नामाला लागावयाचा विभक्तिप्रत्यय किंवा विभक्त्यर्थक अव्यय जोडितात जसें,–' गोविंदाचा तोंडवळा रामाच्याहून निराळा आहे. ' ' माझी छत्री निराळी, तुझी निराळी. ' ' आमचें घर तुमच्याहून मोठें आहे. ' ' त्याची कारकीर्द चांगली, यांचीही कांहीं वाईट नाहीं. ' इ०.

( आ ) संबंधी विशेषण ज्या नामास लाविलें असेल, त्याला आणखी विशेषण किंवा विशेषणें लावणें असल्यास तीं संबंधी विशेषणाचे नंतर घातलीं पाहिजेत. अगोदर घातलीं असतां तीं अर्थानें संबंधी विशेषण ज्या नामापासून झालें असेल त्या नामाचीं विशेषणें होतात. उदा०—' चमत्कारिक डोळ्यांचें औषध. ' किंवा ' फार-उत्तम डोळ्यांचें औषध. ' या वाक्यांत ' चमत्कारिक ' व ' फार-उत्तम ' हीं व्याकरणरीत्या 'डोळे ' या शब्दाचीं विशेषणें होतात. तीं ' औषध ' या शब्दांचीं विशेषणें करावयाचीं असल्यास, ' डोळ्यांचें चमत्कारिक औषध, ' किंवा ' डोळ्यांचें फार-उत्तम औषध, ' अशी वाक्यरचना करावयास पाहिजे.

**टीप**—अशा ठिकाणीं विकारी विशेषणांचा उपयोग करावयाचा असतां

अर्थातच तीं जेथच्या तेथें घालावीं म्हणजे असा घोंटाळा होत नाहीं. उदा०— ‘ चांगल्या डोळ्यांचें औषध. ’ किंवा ‘डोळ्यांचें चांगलें औषध. ’ इ०.

४६२. धातुसाधित संबंधी विशेषणांचा नामांप्रमाणें उपयोग होऊन तीं क्रियापदाच्या, कर्त्याचे किंवा कर्माचे जागीं येतात. उदा०—‘ मला आज मुंबईस जावयाचें आहे. ’ यांत ‘ जावयाचें ’ हा कर्ता. ‘ तो वाचायचें ऐकत नाहीं. ’ येथें ‘ वाचायचें ’ हें कर्म. पहिल्या उदाहरणांत ‘ जावयाचें ’ म्हणजे ‘ जावयाचें कारण किंवा कर्तव्य आहे. ’ व दुसऱ्यांत ‘ वाचायचें ’ म्हणजे ‘ वाचावयाचें काम ’ असा अर्थ आहे. तेव्हां अशा ठिकाणीं वस्तुतः ‘ जावयाचें कारण, ’ ‘ वाचावयाचें काम ’ अशी रचना असून हीं एक प्रकारचीं कृदन्तेंच आहेत. धातूस स, ला, तें इत्यादि चतुर्थीसारखे प्रत्यय लागून जशीं ‘करावयास’ ‘ जावयाला ’ इत्यादि कृदन्तें होतात, त्याप्रमाणें हीं च-प्रत्यय लागून ‘करावयाचें’ ‘ लिहावयाचें ’ वगैरे कृदन्तें होतात.

४६३. स्थलवाचक किंवा कालवाचक शब्दांस ‘ चा ’ हा प्रत्यय लागतांना त्यांचें सामान्यरूप होतें किंवा होत नाहीं. जसें,—घराचा, घरचा, गांवचा, गांवाचा, इ०. परंतु या दोन रूपांच्या अर्थांत फरक आहे. सामान्यरूप होतें तेव्हां पुढील विशेष्य या विशेषणाचा भाग असतें. जसें,—‘ घराचा वांसा. ’ परंतु जेव्हां सामान्यरूप होत नाहीं, तेव्हां त्या विशेषणाचा सप्तमीसारखा अर्थ असतो. जसें,—‘ घरचा मनुष्य. ’ ‘ मंगळवारचें पत्र. ’ ‘ दारची भाजी. ’ इ०.

( अ ) याच अर्थी अव्ययांना ‘ ला, ’ ‘ चा, ’ किंवा ‘ ईल ’ प्रत्यय लागून विशेषणें होतात. जसें,–वर–वरचा, वरला, वरील; खालीं–खालचा, खालला, खालील; तेथें–तेथचा, तेथला, तेथील, मध्यें–मधचा, मधला, मधील; इ०.

४६४. या विशेषणाचा संबंध स्थलवाचक किंवा कालवाचक अव्ययांशीं असतो; मात्र तेव्हां त्या विशेषणांवरून ‘ विशिष्ट स्थळ ’ किंवा ‘ नियमित्त काळ ’ यांचा बोध होतो. उदा०—‘ रविवारचे अगोदर. ’ ‘ घराचे बाहेर, ’ ‘ शनवारचे नंतर. ’ इ०.

४६५. इत्यादि, वगैरे, संबंधीं, विषयीं, या किंवा अशाच दुसऱ्या अव्ययापासून च-प्रत्ययान्त विशेषणें होतात; व तीं होतांना त्या अव्ययांना विकार होतात. उदा०—‘ वाघ, सिंह, वगैरेंचें किंवा इत्यादींचें वर्णन. ’ ‘ यासंबंधींचा

( विषयींचा ) विचार. ' इ०. ' विषयीं ' व ' संबंधीं ' हीं शब्दयोगी अव्ययें असल्यामुळें त्यांच्यापासून झालेल्या संबंधी विशेषणांनीं मागील नामांचें सामान्यरूप होतें.

४६६. **सर्वनामात्मक विशेषणें**—( १ ) ' असा ' यापासून जातीचा किंवा प्रकारचा बोध होतो. प्रश्नार्थक ' कसा ' व दर्शकसर्वनामाचें विशेषण ' तसा ' यांवरूनही तसाच जातीचा किंवा प्रकाराचा बोध होतो.

( २ ) कांहीं एक, कांहीं, कोणी एक, कांहीं तरी, कोणी तरी, कोणचाही, कोणता तरी, यांवरून अनिश्चित किंवा अनियमित वस्तूचा बोध होतो.

( ३ ) नियमित संख्येंतील पसंतीची वस्तू कळण्याकरितां ' कोणची ' किंवा ' कोणती ' या प्रश्नार्थक विशेषणाचा किंवा त्याच्या योग्य त्या रूपाचा उपयोग करितात. जसें,—' यांपैकीं कोणता आंबा, कोणती कांकडी, किंवा कोणतें फळ तुला पाहिजे ? ' ' या पुस्तकांतली कोणचीं तुला हवींत ? '

( ४ ) ' कांहीं ' याचा अर्थ ' थोडें ' किंवा ' थोडा नियमित भाग ' असा होतो. उदा०—' कांहीं लोक असें म्हणतात. ' ' कांहीं आंबे रामाला दे. '

' जधीं कांहीं कांहीं हरि, कवि, असे शब्द शिकलों. ' —वामन.

---

# प्रकरण २४.



## वाक्यांत क्रियापदाची व्यवस्था.

### ( १ ) संयुक्त क्रियापदें.

४६७. वाक्य पूर्ण होण्यास वाक्यांत धातूस कोणत्या तरी आख्यात विभक्तीचा प्रत्यय लागून झालेलें पूर्ण रूप म्हणजे क्रियापद असलें पाहिजे. परंतु पुष्कळ वेळां वाक्यांत कृदन्ताचा क्रियापदाप्रमाणें उपयोग करितात. उदा०— ' तो आज मुंबईस जाणार. ' ' मी असें **करणार**, मग तुझें काय **म्हणणें** ? '

' तों नंदयशोदा बोलत, मथुरेशीं नेतां कृष्णनाथ,
ते क्षणीं आमुचा प्राणान्त, होईल जाण निश्चयें. '

वरील वाक्यांत क्रियापदाचे ठिकाणीं घातलेल्या कृदन्तांपुढें ' अस ' धातूचें रूप **गुप्त** आहे. गद्य भाषेंत अशी रचना निश्चयबोधक असते. उदा०–' मीं असें **करणार**. ' म्हणजे ' मीं असें करण्याचा निश्चय केला आहे. '

**टीप**—धातुसाधित विशेषणांचा मात्र अशा रचनेंत उपयोग करितां येतो; अशा ठिकाणीं धातुसाधित अव्ययांचा उपयोग होत नाहीं. कारण त्यांपुढें ' अस ' धातूचें रूप अध्याहृत घेतां येत नाहीं.

४६८. साधारणतः वाक्यांतील क्रियापद म्हणजे आख्यात विभक्तीचें कोणतें तरी रूप असतें. परंतु पुष्कळदां अशा एकट्या रूपानें क्रियापदाचें काम पूर्णपणें होत नाहीं. तर अर्थ पूर्ण होण्याकरितां एक किंवा अनेक शब्द त्या रूपाच्या मागें घालावे लागतात. हे मागें येणारे शब्द म्हटले म्हणजे नामें किंवा नामांचीं सविभक्तिक रूपें, साधीं विशेषणें व धातुसाधित अव्ययें किंवा विशेषणें असतात. अशी रचना असतांना पुढें येणारीं क्रियापदेंही कांहीं नियमित धातूंचींच रूपें असतात. अशीं धातूंचीं रूपें व त्यांचे मागील शब्द मिळून जीं क्रियापदें होतात, त्यांस **संयुक्त-क्रियापदें** असें म्हणतात.

४६९. या क्रियापदांस संयुक्त-क्रियापदें असें नांव देण्याचें कारण असें आहे कीं, क्रियापदाचें रूप व त्याचे पूर्वीचे नामादि शब्द यांच्या जुळणीनें इष्ट कार्याची सिद्धि होते. अशा क्रियापदांत पुष्कळदां जें मुख्य क्रियापद असतें, त्याचा धात्वर्थ जाऊन त्याला कांहीं विशेष किंवा लाक्षणिक अर्थ येतो; व त्या अर्थाची पूर्तता मागलि शब्द त्या क्रियापदाबरोबर घेतल्याखेरीज होत नाहीं. उदा०–' रामा झोंप घेतो. ' ' हरी गप्पा मारितो. ' ' त्यानें काम करून टाकिलें. ' ' वक्ता बोलूं लागला. ' इत्यादि वाक्यांत घेणें, मारणें, टाकणें, लागणें यांचा जो मूळचा अर्थ आहे, त्यानें क्रियार्थ होत नसून मागलि शब्द जे झोंप, गप्पा, करून, बोलूं, ते बरोबर घेतल्यावर मग त्यांच्या जुळणीनें त्या त्या क्रियापदास कांहीं नियमित अर्थ आला आहे. असलीं संयुक्त क्रियापदें मराठी भाषेंत पुष्कळ होतात, आणि त्यांवरून अर्थनिष्पत्तिही चांगल्या प्रकारची होते. यामुळें भाषेमध्यें यांचा मोठा उपयोग आहे. यांना वाक्यरचनेच्या दृष्टीनें संयुक्त क्रियापदें म्हणावें; परंतु व्याकरण चालवितांना क्रियापदाचें पूर्ण रूप

तेवढेंच क्रियापद मानून मागील शब्दास योग्य असेल त्याप्रमाणें नाम, सर्वनाम किंवा विशेपण म्हणावें.

४७०. हीं संयुक्त क्रियापदें चार प्रकारचीं होतात. तीं अशीं:—

( १ ) नामाचें सविभक्तिक रूप व क्रियापद यांनीं होणारीं उदा०—युद्ध करणें, गोंधळ घालणें, पारख करणें, मार खाणें, अंगांत येणें, दम खाणें, डोकींत किंवा डोकीस घालणें, रागें भरणें, सिद्धीस नेणें, त्रागा करणें, इत्यादि.

( २ ) विशेषण व क्रियापद यांनीं होणारीं. उदा०—बरें करणें, गोड लागणें, नीट बसणें, ठार मारणें, गोड करून घेणें, इ०.

( ३ ) धातुसाधित विशेषण व क्रियापद यांनीं होणारीं. उदा०—जाणार आहे, बोलत बसला, लिहिला होता, करीता झाला, इ०.

( ४ ) धातुसाधित अव्यय व क्रियापद यांनीं होणारीं उदा०:—करून टाकिलें, बोलून गेला, सांगूं लागला, जेवूं घातलें, इ०.

**टीप** १—खरें पाहिलें तर सकर्मक क्रियापद व त्याचें कर्म यांचा अर्थाच्या दृष्टीनें असाच मिलाफ होतो; पण प्रत्येक सकर्मक क्रियापदाला संयुक्त क्रियापद म्हणतां येणार नाहीं. कर्मपदाशीं संयोग झाल्यानंतर ज्या सकर्मक क्रियापदांचा मूळ अर्थ जाऊन त्यांना कांहीं लाक्षणिक अर्थ प्राप्त होतो, त्यांनाच फक्त संयुक्त क्रियापदें म्हणावें. उदा०—'तो पुस्तक वाचितो,' यांत क्रियापदाचा मूळचा अर्थ कायम आहे; म्हणून हें संयुक्त-क्रियापद नव्हे. परंतु 'हरी गप्पा मारितो' या वाक्यांत 'मारितो' याचा मूळचा अर्थ नाहींसा झाला असून त्याच्या साह्याला 'गप्पा' हा शब्द घेतल्यावांचून त्याला अर्थ येत नाहीं. 'गप्पा' हा शब्द बरोबर घेतला म्हणजे त्याचा अर्थ, 'रिकाम्या गोष्टी सांगतो.' किंवा 'निराधार गोष्टी सांगतो.' असा होतो.

**टीप** २—संयुक्त क्रियापदें होतांना क्रियापदांच्या मागें एकापेक्षां जास्त शब्दही येतात. जसें,—'आम्ही तें गोड–करून–घेतलें.' 'तो बसत–बसत गेला.' इ०.

४७१. नामादि शब्दांशीं संयोग पावून ज्यांच्यावरून हीं संयुक्त क्रियापदें होतात, त्यांतले मुख्य धातु असे आहेतः—

| | | | |
|---|---|---|---|
| करणें | ठेवणे | बसणें | येणें |
| खाणें | देणें | बाळगणें | लागणें |
| घालणें | धरणें | मांडणें | लावणें |
| घेणें | फोडणें | मारणें | होणें, इ०. |

**टीप**—हे धातु मुख्य तेवढे सांगितले आहेत. यांच्या अर्थाच्या इतर धातूंचाही या यादींत समावेश केला पाहिजे.

४७२. ( अ ) मूळ क्रियापद सकर्मक असल्यास तें क्रियापद ज्या नामाशीं मिळून संयुक्त क्रियापद होतें, तें नाम त्याचें कर्म असतें व अर्थात् त्याची द्वितीया विभक्ति असते; आणि कर्मणिप्रयोगांत क्रियापद त्याच्याशीं जुळतें. उदा०—‘ तो झोंप घेतो. ’ ‘ चोर मार खाईल. ’ ( कर्तरि ). ‘ त्यानें झोंप घेतली. ’ ‘ चोराने मार खाल्ला. ’ ( कर्मणि ).

( आ ) पण कधीं कधीं संयोग पावणारें नाम द्वितीया विभक्तींत नसून दुसऱ्याच कोणत्या तरी विभक्तींत असतें; अशा वेळीं क्रियापद व मागील सविभक्तिक नाम यांमिळून सकर्मक क्रियापद झाल्यासारखेंच होऊन तिसरेंच नाम अर्थाप्रमाणें त्याचें कर्म होतें. उदा०—‘त्यानें आंगरखा अंगांत-घातला.’ ‘ तूं जोडा पायांत घाल. ’ इ०.

**टीप**—संयुक्तक्रियापदघटित शब्द जवळजवळच आले पाहिजेत, त्यांच्या मध्यें दुसरे शब्द येतां कामा नयेत असें कांहीं नाहीं. वाक्यांत पुष्कळदां ते एकमेकांपासून दूरही असतात. उदा०—‘ त्यानें **अंगांत** आंगरखा **घातला.** ’ ‘ तूं **पायांत** जोडा **घाल.** ’

( इ ) केव्हां कर्मासह मूळ क्रियापद जसें काय अकर्मक संयुक्त-क्रियापदच बनतें, व सर्व संयुक्त क्रियापदाचें जें नाम कर्म असावयाचें, त्याची अन्य कोणती तरी विभक्ति होते. जसें,—‘ आपण या **गोष्टीचा** विचार करूं.’ ‘त्यानें **मला** भय घातलें. ’ इ०.

**टीप**—अशा वेळीं वाक्यांत क्रियापद व त्याशीं संयोग पावणारें नाम हीं बहुधा जवळ जवळ येतात; परंतु विशिष्ट शब्दांवर जोर देऊन बोलावयाचें

असतां दुसरे शब्दही त्यांच्यामध्यें येतात. जसें,—' त्यानें भय **मला** घातलें, **तुला** घातलें नाहीं. ' इ०.

४७३. कृदन्तांचे साह्यानें जीं संयुक्त-क्रियापदें बनतात, त्यांचे अर्थावरून पुढें लिहिल्याप्रमाणें भेद करितां येतीलः—

१ अपूर्णकालदर्शक; २ पूर्णकालदर्शक; ३ रीतिदर्शक; ४ शक्यार्थबोधक किंवा शक्त्यर्थक; ५ कर्मणि; ६ प्रकर्षदर्शक; ७ सातत्यदर्शक; ८ इच्छादर्शक; ९ आज्ञार्थक; १० उपक्रमदर्शक; ११ अनुमोदक; १२ कर्तव्यबोधक; आणि १३ उद्देशार्थक.

४७४. या संयुक्त क्रियापदांच्या सर्व प्रकारांचें विशेष व पृथक् विवरण पुढें केलें आहेः—

( १ ) **अपूर्णकालदर्शक**—हीं संयुक्त क्रियापदें वर्तमान, भूत व भविष्य या काळीं व विध्यर्थी होतात. वर्तमानकाळीं कोणत्याही धातूच्या त-प्रत्ययान्त कृदन्तापुढें ' आहे ' याचें योग्य तें रूप घालावें, भूतकाळीं त्याच्यापुढें ' हो ' धातूच्या भूतकाळाचें रूप घालावें, भविष्यकाळीं त्याच कृदन्तापुढें ' अस ' धातूचें भविष्यकाळाचें रूप घालावें, व विध्यर्थी ' अस ' धातूचें विध्यर्थाचें रूप घालावें, म्हणजे त्या त्या काळाचीं व विध्यर्थाचीं अपूर्णकालदर्शक रूपें होतात. उदा०—' मी करीत आहें. ' ' तो बोलत होता. ' ' ती लिहीत असेल. ' ' तें येत असावें. ' इ०. या संयुक्त-क्रियापदांपासून साधारणतः त्या त्या काळीं क्रिया सुरू आहे, अपूर्ण आहे, किंवा चालली आहे, असा बोध होतो. याशिवाय त्यांपासून जे विशेष अर्थ निघतात तेः—

( अ ) वर्तमानकाळीं यांपासून क्रिया चालू आहे, इतकें समजतें. उदा०— ' मी त्याची वाट पाहात आहें.' यांपासून असाही बोध होतो कीं, क्रिया चालू आहे पण ती केव्हां संपेल हें बोलणारास ठाऊक नाहीं, किंवा सांगतां येत नाहीं. उदा०—' पृथ्वी फिरत आहे. ' ' मी हल्लीं नोकरी करीत आहें. ' तसेंच यांपासून क्रिया संपण्यासारखी असून अद्याप थांबली नाहीं, असाही बोध होतो. उदा०—' त्याला हींव येत आहे. ' ' तो घोड्यावर बसावयास शिकत आहे. ' हीं रूपें, ' शिकतो आहे, ' ' बोलतो आहे, ' ' लिहितो आहे, ' ' येतो आहे,' अशींही लिहितात.

**टीप**—या तिन्ही अर्थांतला भेद फारसा लक्षांत घेण्यासारखा नाहीं.

( आ ) भूतकाळीं यांपासून, क्रिया घडत होती परंतु पूर्ण झाली नव्हती. असा बोध होतो. उदा०—'तो बोलत होता.' क्रिया करण्याचा उद्देश होता, क्रिया व्हावयाची होती, परंतु ती झाली नाहीं, असाही बोध यांवरून होतो. उदा०—'तो त्यास रुपये देत होता, परंतु मीं तो लबाड आहे असें सांगितलें.'

( इ ) भविष्यकाळीं या रूपांवरून, होणारी क्रिया त्या काळीं संपली नसेल असा बोध होतो. उदा०—'हरी उद्यां पांच वाजतां वाचीत असेल.' 'मी तुझी वाट पाहात असेन.' इ०.

( ई ) विध्यर्थी या रूपांवरून, अनुमान, समजूत किंवा कल्पना, दिसून येते. उदा०—'तो लिहीत असावा.' 'विष्णू पत्र वाचीत असावा.' 'आज पाऊस पडावा.' 'तुमच्या गांवाला थंडी फार पडत असावी.' इ०.

**टीप** १—हीं रूपें असतां मुख्य क्रियापदांमागील रूपांना क्रियाविशेषणें किंवा विधिविशेषणें मानून त्याप्रमाणें त्यांचें व्याकरण करावें.

**टीप** २—संयुक्त क्रियापदाचे हे जे दोन अवयव ( कृदन्त व क्रियापद ) त्यांमध्यें कधीं 'बसला' हें कृदन्त येऊन रूपें होतात. उदा०—'तो लिहीत आहे, होता, किंवा असेल,' याबद्दल 'तो लिहीत बसला आहे, होता, किंवा असेल,' असेंही म्हणतात. अशा ठिकाणीं मागील दोन्ही कृदन्तें क्रिया-विशेषणें मानावीं.

**टीप** ३-केव्हां हीं संयुक्त रूपें करण्याला कृदन्तापुढें 'अस' वगैरे धातूंच्या रूपांऐवजीं 'बस' धातूचीं रूपें घालितात. जसें,—'तो लिहीत बसतो.' 'तो बोलत बसला.' 'तो सांगत बसेल.' इ०.

( २ ) **पूर्णकालदर्शक** ( अ )—हीं संयुक्त क्रियापदें 'आहे,' 'होता,' 'असेल,' आणि 'असावा,' या रूपांमागें ला-प्रत्ययान्त कृदन्त घालून करितात. हीं सकर्मक धातूंवरून झालीं असतां कर्मणि असतात. यांवरून त्या त्या काळीं क्रियेचें पूर्णत्व दिसून येतें.

( आ ) वर्तमानकाळीं या रूपांवरून असा बोध होतो कीं, क्रिया पूर्ण झाली खरी, परंतु तिचा परिणाम अद्याप कायम आहे. उदा०—'तो बरा

झाला आहे.' या क्रियापदांत 'आहे' असें वर्तमान काळाचें रूप असूनही त्याचा भूतकाळासारखा अर्थ होतो. उदा०-'मी परत चाललों आहें (होतों) इतक्यांत तो घरीं आला.' या रूपावरून कर्त्यानें क्रिया केली असून तो तिच्या परिणामाची वाट पाहात आहे असाही बोध होतो. उदा०-'मीं त्यांना पत्र लिहिलें आहे.' म्हणजे पत्र लिहून त्याचा इष्ट परिणाम होतो कीं नाहीं याची मी वाट पाहत आहें.

(इ) भूतकाळीं यांपासून एका घडून गेलेल्या क्रियेपूर्वी दुसरी क्रिया झाली असा बोध होतो. उदा०—'रामानें हें पुस्तक वाचिलें होतें.' 'तो काल पुण्यास गेला होता.' या दुसऱ्या उदाहरणाचा अर्थ असा होतो कीं, तो काल पुण्यास गेला होता, आणि आतां तो कदाचित् दुसऱ्या कोठें असेल.

(ई) नम्रता दाखवावयाची असतां पूर्ण वर्तमानाच्या ठिकाणीं पूर्णभूत घालितात. उदा०-'मी तुमच्याजवळ कांहीं रक्कम उसनी मागावयास आलों होतों, [म्हणजे आलों आहें].'

(उ) क्रिया झाली नसली तरी ती बहुतेक झाल्यासारखीच होती, असें सांगावयाचें असतां या क्रियापदांचा उपयोग करितात. उदा०-'मी बहुतेक निघून गेलोंच होतों, इतक्यांत तूं आलास.'

'सिंहासनीं बसविला सावित्रीच्या व्रतेंचि हा नियम;
वर सामर्थ्य म्हणा, परि गेला होता करोनि हानि यम.'

—मोरोपंत.

(ऊ) भविष्यकाळीं या क्रियापदांपासून क्रिया पूर्ण झाली असेल किंवा झाली असली पाहिजे, असा बोध होतो. उदा०—'तो आतां जेवला असेल.' यांवरून अटकळ किंवा अनुमान दाखविलें जातें. उदा०-'कोंकणांत हा पाऊस पडला असेल.' 'तो असें बोलला असेल यांत शंका नाहीं.'

(ए) या क्रियापदांवरून भविष्यकाळीं जो अर्थ होतो तोच अगदीं विध्यर्थीही होतो. उदा०—'तो आतां जेवला असावा.' 'हा पाऊस कोंकणांत पडला असावा.' अर्थात् यांवरून अनुमानाचा किंवा अटकळीचा बोध होतो.

**टीप**—या क्रियापदांमधील ल-प्रत्ययान्त कृदन्त हें क्रियाविशेषण असतें.

( ३ ) **रीतिदर्शकः**—( अ ) हीं संयुक्त-क्रियापदें 'अस' धातूच्या वर्तमान काळाच्या व रीतिभूत काळाच्या रूपांमागें त-प्रत्ययान्त कृदन्त घालून करितात; भविष्यकाळीं हीं रूपें संभवत नाहींत. यांपासून अमुक करण्याची रीत किंवा वहिवाट आहे किंवा होती असा बोध होतो.

( आ ) वर्तमानकाळीं यांपासून कर्त्याची अमुक अमुक गोष्ट करण्याची वहिवाट किंवा रीत आहे असा बोध होतो. उदा०—' मी रोज पहांटेस स्नान करीत असतों. ' ' तो पाणी तापवून पीत असतो. ' इ०.

( इ ) भूतकाळीं यांवरून गतकाळांतील रितीचा अथवा संवयीचा बोध होतो. उदा०—' तो नित्य पर्वतीस जात असे. ' ' मी मुंबईस असें तेव्हा तो मला रोज भेटत असे. ' इ०.

**टीप**—या संयुक्त क्रियापदांतील त-प्रत्ययान्त कृदन्त हें क्रियाविशेषण असून त्याचा कर्त्याकडे संबंध असतो. रीतिदर्शक भूतकाळ दाखविणारी एक स्वतंत्र आख्यात विभक्ति आहे, हें सांगावयास नकोच. ( क० २१८ पाहा. )

( ४ ) **शक्यार्थक** किंवा **शक्त्यर्थकः**—हीं संयुक्त-क्रियापदें मुख्यतः ' शकणें ' व ' येणें ' या क्रियापदांपासून होतात. ' शकणें ' धातु असतां त्याचे मागें ऊं प्रत्ययान्त धातुसाधित अव्यय येतें. व 'ये' धातु असतां, तां-प्रत्ययान्त धातुसाधित अव्यय किंवा विध्यर्थक धातुसाधित विशेषणाची चतुर्थी येते. जसें,-'मी करूं शकतों. ' ' तुझा भाऊ आज येऊं शकत नाहीं. ' ' मला बोलावयास किंवा बोलतां येत नाहीं. ' इ०.

**टीप**—' मी करूं शकतों, ' यांत ' करूं ' हें कृदन्त अव्यय आहे. आणि ' मला बोलतां किंवा बोलावयास येतें, ' यांतील ' बोलतां,' व ' बोलावयास ' हीं क्रियावाचक नामें असून तीं ' येतें ' या कियापदाचीं उद्देश्यें आहेत.

( ५ ) **कर्मणि संयुक्त क्रियापदें**:–हीं 'जा' धातूचे रूपामागें ला-प्रत्ययन्त धातुसाधित विशेपणें घालून करितात. हीं विशेपणें कर्मणि असल्यामुळें हीं संयुक्त-क्रियापदें फक्त सकर्मक धातूंवरून होतात. उदा०—' शिपायाकडून चोर धरिला गेला. ' ' सरते शेवटीं तो पकडला गेला. ' इ०.

( आ ) हीं रूपें जुन्या मराठी भाषेंत आढळत नाहींत, तीं कोणाच्या मतें फारशी भाषेंतून व कित्येकांच्या मतें इंग्रजी भाषेंतून मराठींत आलीं आहेत.

अशी जरी साधारणतः समजूत आहे, तथापि मोरोपंताच्या कवितेंत एके ठिकाणीं या रूपाचा प्रयोग आढळला आहेः—

'तो भगवान् कृष्ण म्हणे रे रे पार्था, पहा पहा गा तो,
सिंहें गजसा पार्षद गुरुपुत्रें शीघ्र मारिला जातो.'

—मोरोपंती भारत, कर्णपर्व, ३६–३८.

**टीप**—यांतील ल-प्रत्ययान्त कृदन्तें हीं कर्त्याचीं क्रियाविशेषणें आहेत.

(६) **प्रकर्षदर्शकः**—हीं क्रियापदें, 'ऊन'–प्रत्ययान्त धातुसाधित अव्ययांपुढें कित्येक धातूंचीं रूपें योजून करितात. ते धातुः—घेणें चुकणें, जाणें, टाकणें, ठेवणें, देणें, बसणें, येणें, राहणें, सोडणें, इत्यादि आहेत. यावरून क्रिया होऊन गेली आहे, किंवा तिचा परिणाम होऊन चुकला आहे, किंवा जें कार्य होणें त्याचा प्रकर्ष झाला आहे, असा बोध होतो. उदा०—'मी एकदां जेवून घेतों.' 'तळ्यांतलें पाणी आटून गेलें.' 'त्यानें कर्ज वारून टाकिलें.' 'मीं त्यास पांच रुपये देऊन ठेविले आहेत.' 'तो आपली धनदौलत खर्चून बसला.' 'त्यानें अगदीं बोल–बोलून सोडलें.' 'मी राग गिळून बसलों.' 'एवढे पांच श्लोक वाचून या किंवा ठेवा.' 'तो त्यांस असें सांगून चुकला.' इ०.

**टीप**—यांतलि 'बोलून,' 'चालून,' खर्चून,' हीं कृदन्तरूपें अव्ययें आहेत. 'जेवून घेतों,' यांत 'जेवून,' याचा उपयोग नामासारखा दिसतो.

(८) **सातत्यदर्शकः**—बोलत, बसत, लिहीत, करीत, इत्यादि वर्तमानकालवाचक धातुसाधित अव्ययांपुढें जाणें, बसणें,राहाणें, या धातूंचीं रूपें येऊन हीं संयुक्त कियापदें सिद्ध होतात. यांपासून क्रिया बराच वेळ चालू असल्याचा बोध होतो; किंवा ती क्रिया वारंवार घडत आहे, असेंही यांवरून समजतें. उदा०—'रोज पहांटेस उठत जा.' 'गांवांत आहेस तोंपर्यंत आमचेकडे येत जा.' 'तो चार तास गप्पा मारीत बसला,' 'रामा नुसता पाहात राहिला.'इ०.

**टीप**—यांतील 'उठत,' 'येत,' 'मारीत,' वगैरे शब्द अर्थानुरोधानें क्रियाविशेषणें किंवा अव्ययें मानावे.

(८) **इच्छादर्शकः**—ऊं–प्रत्ययान्त धातुसाधितापुढें किंवा विध्यर्थक विशेषणाच्या चतुर्थीच्या रूपापुढें 'पाहणें' किंवा 'इच्छिणें' या धातूंचीं रूपें

येऊन हीं क्रियापदें होतात. उदा०—' तो तुम्हांशीं बोलूं किंवा बोलावयास पाहातो किंवा इच्छितो. '

' घालूं पाहासि दंष्ट्रा, उपडाया अहिमुखांत आंगोळी. '

' पाहासि विकावया तूं केशरमौल्यें कसें हरिद्रेतें ? '

—मोरोपंत.

**टीप**—यांतील ऊं प्रत्ययान्त व स-प्रत्ययान्त कृदन्तें हीं क्रियावाचक नामें असून तीं ' पाहणें ' व ' इच्छिणें ' या धातूंचीं कर्में आहेत.

( ९ ) **आज्ञार्थकः**—( अ ) ल-प्रत्ययान्त कृदन्तांपुढें ' पाहिजे ' हें क्रियापद घालून हीं संयुक्त क्रियापदें करितात. क्रियापद सकर्मक असतां यांचा कर्मणि-प्रयोग असतो व अकर्मक असतां भावेप्रयोग असतो; आणि कर्तृपद तृतीयान्त किंवा चतुर्थ्यन्त असतें. उदा०—' त्वां किंवा तुला गेलें पाहिजे. ' ' रामानें किंवा रामाला आज हें पुस्तक वाचलें पाहिजे. ' इ०.

( आ ) विध्यर्थक विशेषणापुढें 'लाग' धातूचीं रूपें येऊन या क्रियापदाचीं दुसरीं रूपें होतात. हीं रूपेंही कर्मणि किंवा भावी असतात; व त्यांचें कर्तृपद चतुर्थ्यन्त असतें. उदा०—' तुला जावें लागेल. ' ' मला आज सभेंत बोलावें लागलें. ' ' त्याला शेवटीं पत्र धाडावें लागलें. ' इ०.

( इ ) या ठिकाणीं मूळ क्रियापदाच्या मागें आलेले धातुसाधित शब्द सकर्मक धातूंपासून बनले असल्यास, ते आपल्या कर्मांचीं विशेषणें असतात; व अकर्मक धातूंपासून झाले असल्यास ते क्रियावाचक नामें होतात. उदा०—' तुला पुस्तक दिलें पाहिजे किंवा द्यावें लागेल. ' या ठिकाणीं धातुसाधित शब्द विशेषणें असून त्यांचा, त्यांचेंच कर्म जें ' पुस्तक ' त्याकडे संबंध आहे. अर्थात् पुस्तक हें त्यांचें विशेष्य झालें. या विशेष्याप्रमाणेंच त्यांचीं रूपेंही बदलतात. तसेंच ' पुस्तक ' हा शब्द मुख्य क्रियापदाचा कर्ता आहे. परंतु ' मला गेलें पाहिजे किंवा जावें लागेल, ' या वाक्यांतील धातुसाधित शब्द क्रियावाचक नामें असून, ते 'पाहिजे' व 'लागेल' यांचे कर्ते [ उद्देश्य ] आहेत.

( १० ) **उपक्रमदर्शकः**—हीं संयुक्त क्रियापदें, ऊं—प्रत्ययान्त धातु-साधितापुढें किंवा विध्यर्थक विशेषणाचे चतुर्थीच्या रूपापुढें ' लाग ' धातूचीं रूपें घालून करितात. यावरून क्रियेच्या उपक्रमाचा किंवा आरंभाचा बोध

होतो. जसें,—' तो बोलूं लागला. ' ' मला मळमळूं किंवा मळमळावयास लागलें. ' इ०.

**टीप**—यांत 'बोलूं' हें कृदन्त अव्यय आहे; परंतु 'मळमळूं' व 'मळमळावयास' हीं क्रियावाचक नामें असून तीं 'लागलें' याचीं उद्देश्यपदें आहेत.

( ११ ) **अनुमोदक**—हीं संयुक्त-क्रियापदें ऊं-प्रत्ययान्त धातुसाधित किंवा विध्यर्थक विशेषणाच्या चतुर्थ्यन्त रूपापुढें ' दे ' धातूचीं रूपें घालून करितात. उदा०—' तो मला बोलूं किंवा बोलावयास देईल. ' ' मी तुला मुळींच येऊं देणार नाहीं. ' इ०.

**टीप**—या उदाहरणांतील कृदन्तें हीं क्रियावाचक नामें असून तीं त्या त्या क्रियापदांचीं कर्में आहेत. ' त्यानें मला बोलूं दिलें. ' या वाक्यांतील ' बोलूं ' हें मूळचें ' कर्म ' असून तें कर्मणिप्रयोगामुळें उद्देश्य झालें आहे. आणि 'मला' हें अप्रत्यक्ष कर्म ( चतुर्थी ) आहे.

( १२ ) **कर्तव्यबोधक**-णें-प्रत्ययान्त क्रियावाचक नामाची किंवा त्यापासून झालेल्या विध्यर्थक विशेषणाची चतुर्थी, किंवा त्याच्या संबंधी विशेषणाचें सामान्यरूप, यांच्यापुढें 'पड' धातूचीं रूपें येऊन हीं क्रियापदें होतात. जसें,—' मला उगाच तुजकडे खेपा घालण्यास किंवा घालावयास किंवा घालण्याच्या किंवा घालावयाच्या पडल्या. ' हीं रूपें व कलम ( ६ ) यांतील रूपें सारखींच आहेत असें म्हणण्यास चिंता नाहीं.

**टीप**—या उदाहरणांतील धातुसाधित शब्द अव्ययें आहेत. क्वचित् ते विशेषणेंही असतात. उदा०—' खेपा घालावयाच्या पडल्या. '

( १३ ) **उद्देशार्थक**—हीं क्रियापदें, णार-प्रत्ययान्त कृदन्त विशेषणापुढें ' आहे, ' ' होता, ' ' असेल, ' किंवा ' असावा ' हीं रूपें किंवा याच क्रियापदाचीं योग्य तीं रूपें योजून करितात. जसें,—'मी जाणार आहें.' 'तो पत्र लिहिणार होता. ' ' माझा भाऊ आज मुंबईस जाणार आहे. ' मुली आज गाणीं म्हणणार असतील. ' ' तीं भजन करणार असावीं. ' ' आम्ही फिरावयास जाणार आहों. ' इ०.

**टीप**—यांतील णार-प्रत्ययान्त रूपें विधिविशेषणें असून त्यांचा संबंध कर्त्याकडे आहे. हीं निरंतर कर्तरि असतात.

४७५. या जोड रूपांना संयुक्त-क्रियापदें असें जरी नांव दिलें आहे, तरी शब्दांचें व्याकरण करितांना, मुख्य क्रियापदांच्या मागें जीं नामें, विशेषणें, किंवा कृदन्तें घातलेलीं असतात, तीं स्वतंत्र किंवा वेगळीं मानावीं. कांहीं मराठी व्याकरणकार कृदन्तें व क्रियापदें यांनीं बनलेलीं संयुक्त क्रियापदें व्याकरण करतांना एकत्र घेऊन त्यांचे वर्तमानभविष्य, भूतभविष्य, भविष्य-भविष्य, असे मिश्रकाळ मानितात. मराठींत येणाऱ्या सर्व संयुक्त-क्रियापदांना अशीं नांवें देणें जर शक्य असतें, तर ती व्यवस्था बरीच सोयकर झाली असती, यांत शंका नाहीं. पण मराठींत येणारीं संयुक्त-क्रियापदें इतकीं पुष्कळ आहेत कीं, त्या सर्वांचें योग्य वर्गीकरण करणें व त्यांना नांवें देणें हें फार अवघड काम आहे. शिवाय इतका उपद्व्याप करून मराठींतील सर्व संयुक्त-क्रियापदांचीं व त्यांच्या मिश्रकाळांचीं नांवे विद्यार्थ्यांस घोकावयास लावण्यांत कांहीं विशेष फायदा आहे, असेंही नाहीं.

४७६. संयुक्त-क्रियापदांत मुख्य क्रियापदाच्या मागील शब्द जेव्हां नाम किंवा विशेषण असतो, तेव्हां त्याचें व्याकरण स्वतंत्रपणें करितात. उदा०— 'हरी झोंप घेतो.' यांत 'झोंप' हा शब्द 'घेतो' याचें कर्म आहे. 'तो जोडा पायांत घालतो.' यांत 'पायांत' याची सप्तमी विभक्ति आहे. 'वैद्यानें त्यास बरें केलें.' यांत 'बरें' हें क्रियाविशेषण आहे. त्याचप्रमाणें, जेव्हां कृदन्तांच्या साह्यानें संयुक्त-क्रियापदें होतात, तेव्हां प्रत्येक कृदन्त योग्य असेल त्याप्रमाणे नाम, विशेषण, किंवा अव्यय मानावें. उदा०—'आई मुलांस जेवूं घालिते.' येथें 'जेवूं' हें नाम होय. 'मला मुंबईस जावयाचें किंवा जाणें आहे.' यांत 'जावयाचें' व 'जाणें' हीं नामें आहेत. 'तो मारला गेला.' यांतील 'मारला' हें विशेषण आहे. मागें संयुक्त-क्रियापदांचें विवरण करतांना प्रत्येक ठिकाणीं शब्दांचें व्याकरण करण्याच्या संबंधाच्या सूचना केल्या आहेतच.

४७७. इंग्रजी भाषेच्या व्याकरणांत काळांचे बरेच पोटभेद मानिले आहेत; इंग्रजी आणि मराठी भाषांतील वाक्यांचा एकत्र विचार करण्याचा प्रसंग वारंवार येतो. म्हणून इंग्रजीचें अनुकरण करून कांहीं संयुक्त-क्रियापदें हीं निरनिराळ्या काळांचे पोटभेद आहेत असें मानितात. संस्कृत भाषेंत 'कर्तुमिच्छति,' 'कुर्वन्नास्ते,' 'कृतवानस्ति,' 'गतोऽस्मि' अशीं संयुक्त-क्रियापदें होतात.

परंतु अशा प्रकारच्या रचनेंत धातुसाधितांना नामें, विशेषणें, किंवा अव्ययें, जशीं असतील तशीं मानण्याची चाल आहे. इंग्रजीप्रमाणें मराठींत काळाचे पोटभेद मानावयाचेच असले, तर ते पुढीलप्रमाणें मानावेः—

**वर्तमानकाळ.**

**शुद्धवर्तमान**—तो करितो. तो शिकतो.
**अपूर्णवर्तमान**—तो करीत आहे. तो शिकत आहे.
**पूर्णवर्तमान**—तो शिकला आहे. त्यानें काम केलें आहे.
**रीतिवर्तमान**—तो करीत असतो. तो शिकत असतो.
**उद्देशवर्तमान**—तो करणार आहे. तो शिकणार आहे.

**भूतकाळ.**

**शुद्धभूत**—तो शिकला. त्यानें काम केलें.
**अपूर्णभूत**—तो शिकत होता. तो करीत होता.
**पूर्णभूत**—तो शिकला होता. त्यानें काम केलें होतें.
**रीतिभूत**—तो शिकत असे. तो करीत असे.
**उद्देशभूत**—तो करणार होता. तो शिकणार होता.

**भविष्यकाळ.**

**शुद्धभविष्य**—मी करीन. मी शिकेन.
**अपूर्णभविष्य**—मी करीत असेन. मी शिकत असेन.
**पूर्णभविष्य**—मी शिकलों असेन. त्यानें काम केलें असेल.

**विध्यर्थ.**

**शुद्धविध्यर्थ**—तो असावा.
**अपूर्णविध्यर्थ**—तो शिकत असावा. तो करीत असावा.
**पूर्णविध्यर्थ**—तो शिकला असावा.
**उद्देशविध्यर्थ**—तो शिकणार–करणार असावा.

**संकेतार्थ.**

**शुद्धसंकेतार्थ**—तो असता ( तर इ० ).
**अपूर्णसंकेतार्थ**—तो शिकत असता ( तर– ).

**पूर्णसंकेतार्थ**—तो शिकला असता, इ०.
**उद्देश्यसंकेतार्थ**—तो शिकणार असता, इ०.

## ( २ ) प्रयोजक व शक्य क्रियापदें.

४७८. प्रयोजक क्रियापदें नेहमीं सकर्मक असतात. प्रयोजक क्रियापद अकर्मक धातूपासून झालें असतां, मूळ धातूचा कर्ता, प्रयोजक धातूचें कर्म होतो. उदा०—' फळें पडतात. ' ' वारा फळें पाडितो. ' ' भाजी शिजते. ' ' आचारी भाजी शिजवितो. '

४७९. मूळ धातु सकर्मक असल्यास त्याचें जें कर्म तेंच प्रयोजक धातूचें कर्म असतें; व मूळचा जो कर्ता असतो त्याला ' कडून ' हें तृतीयेचें अव्यय लागतें; आणि क्रिया करविणारा तो कर्ता होतो. उदा०—'विद्यार्थी पुस्तक वाचितो.' ' गुरु विद्यार्थ्याकडून पुस्तक वाचवितो. ' इ०.

४८०. ( अ ) शक्य क्रियापदें हीं प्रयोजक क्रियापदांचींच कर्मणि व भावी रूपें होत. मूळ धातु सकर्मक असल्यास शक्य क्रियापद कर्मणि असतें व धातु अकर्मक असल्यास तें भावी असतें. उदा०—'मी तें काम करवितों'( प्रयोजक). ' तें काम मला करवतें ' ( शक्य ). ' मी जाववितों ' ( प्रयोजक ). ' मला जाववतें ' ( शक्य ). इ०.

( आ ) मूळ धातु सकर्मक असून प्रयोजक केल्यावर त्याचा अकर्मक उपयोग केला असतां, अथवा मूळ धातु अकर्मक असून भावी उपयोग केला असतां असा अर्थ उत्पन्न होतो. जसें,—' मी काम करितों, '—' मी काम करवितों ' [ प्रयोजक ]. ' माझ्यानें अथवा मला करवतें ' [ शक्य]—' मी जातों. ' —' मी जाववितों ' [ प्रयोजक ]. ' माझ्यानें अथवा मला जाववतें '[ भावी, शक्य ].

( इ ) या क्रियापदांवरून शक्तीचा अर्थ उत्पन्न होतो, म्हणून यांस शक्य क्रियापदें म्हणण्याची चाल पडली आहे. बाकी हा केवळ प्रयोजक क्रियापदांच्या उपयोगाचा प्रकार आहे. हा उपयोग अकर्मक धातूसारखा असल्यामुळें या वेळीं धातूला ' इ ' आगम होत नाहीं. उदा०—' माझ्यानें काम करवतें. ' ' त्याच्यानें धरवेल. ' इ०.

४८१. शक्य क्रियापद असतां क्रियेचें जें मूळचें कर्तृपद तें चतुर्थ्यन्त असतें, किंवा त्याचें च-प्रत्ययान्त विशेषण होऊन मग त्याला तृतीयेचे प्रत्यय लागतात. उदा०–' माझ्यानें किंवा मला काम करवतें.' ' रामाच्यानें किंवा रामास तेथें जाववतें.' इ०

४८२. सामान्यरूपें कर्मणि व भावी प्रयोग असतां क्रियापद भूतकाळीं किंवा विध्यर्थीं असतें. परंतु प्रयोजक क्रियापदाचा कर्मणि व भावी प्रयोग नियमाप्रमाणें भूतकाळीं होऊन, वर्तमान व भविष्यकाळींही होतो. उदा०–'रामाला काम करवतें किंवा करवेल.' ( कर्मणि ). ' रामाच्यानें जाववतें किंवा जाववेल.' ( भावी ). इ०.

४८३. शक्य क्रियापदें कर्मणि असल्यामुळें इतर कर्मणि क्रियापदाप्रमाणें नेहमीं तृतीयपुरुषीं असतात. [ क० २१९ ( ३ ), ( ४ ), व क० ३४६ पाहा. ] शक्य क्रियापद सकर्मक क्रियापदापासून झालें असल्यास तें बहुधा कर्मणि असतें, व अकर्मक क्रियापदापासून झालें असल्यास तें भावी असतें. परंतु कर्म जर प्रथमपुरुषवाचक किंवा द्वितीय-पुरुषवाचक सर्वनाम असलें, तर त्यास द्वितीयेचे प्रत्यय लागतात; व कर्तृपदाचें च-प्रत्ययान्त विशेषण होऊन त्यास तृतीयेचे प्रत्यय लागतात, आणि क्रियापद सकर्मक असतांही भावी होतें. उदा०—' माझ्यानें किंवा मला ( कर्तृपद ) तुला ( कर्म ) ओढवतें.' ' तिच्यानें किंवा तिला ( कर्तृपद ) मला ( कर्म ) धरवत नाहीं.' इ०.

४८४. मूळ क्रियापदाचा कर्ता सचेतन पदार्थ असतांना मात्र शक्य क्रियापद संभवेल; पण कर्ता अचेतन पदार्थ असतां या क्रियापदाचा उपयोग होणें अशक्य आहे. उदा०–' बेडकास पुष्कळ वेळ पाण्यांत राहववतें.' ' मुंगीस छताच्या खालच्या बाजूवरून चालवतें.' असे प्रयोग होतील. कारण यांतील कर्ते ' बेडूक ' व ' मुंगी ' हे शब्द सचेतनाचे वाचक आहेत. परंतु ' लांकडास पाण्यांत तरंगवतें.' ' पतंगास हवेंत उडवतें.' असे प्रयोग होणार नाहींत; कारण कर्ते अचेतन वस्तू आहेत.

४८५. उभयविध धातु असतां त्यांचें अकर्मक रूप शक्य क्रियापदांचे जागीं योजितात. उदा०– माझ्यानें अथवा मला हा धोंडा हालवतो.' 'त्याला

तें ओझें उचलवतें.' असें म्हणण्याचें ऐवजीं 'माझ्यानें अथवा मला हा धोंडा हालतो.' 'त्याला हें ओझें उचलतें,' 'मला दांत नाहींत, तरी भाकरी चावते (चाववते).' असे प्रयोग करितात.

४८६. कधीं सकर्मक धातूंसही अकर्मक मानून अशा रितीचे प्रयोग करितात. उदा०—'त्यास तीं अक्षरें वाचत नाहींत पण मला वाचतात.' 'दूरचा मनुष्य मला ओळखत नाहीं, पण तुला ओळखतो.' इ०.

४८७. शक्य क्रियापद असतां कर्तृपद तृतीयान्त असतें; किंवा च-प्रत्ययान्त विशेषणाचें सामान्यरूप पहिल्यानें येऊन पुढें तृतीयान्त विशेष्य असतें. उदा०—

'आम्हीं शक्तिहीनें कैसें करवेल तें नेणें.'
'आपुलिया बळें नाहीं बोलवत। सखा भगवंत वाचा त्याची.'
—तुकाराम.

## (३) आख्यात-विभक्तींचा उपयोग.

४८८. मागें सांगितलेल्या आठ आख्यात–विभक्ति किंवा काळ व अर्थ, यांचे जे मुख्य अर्थ आहेत, त्यांशिवाय त्यांना कांहीं विशेष अर्थ असतात; व त्यांचे उपयोगही निरनिराळ्या रितीनें होतात. त्यांविषयीं आतां विचार करूं.

४८९. **जुना वर्तमानकाळः**—(१) हा वास्तविक मराठी भाषेंतला मूळचा व खरा वर्तमानकाळ होय. दुसरा म्हणजे चालू वर्तमानकाळ, हा विशेषणरूप आहे. परंतु सध्यां मराठींत या मूळच्या वर्तमानरूपांचा उपयोग होत नाहीं. कवितेंत मात्र या रूपांचा उपयोग करण्याचा प्रघात आहे. कवितेंत वर्तमानकाळाचा उपयोग करणें तर बहुतेक हींच रूपें घालावीं अशी चाल आहे.

(२) कवितेंत या रूपांचा उपयोग भूतकाळाचे रूपांचे जागींही फार आढळतो. याचीं उदाहरणेंः—

'मुनि आश्रमांत नव्हता, त्याची कन्या शकुंतला होती;
पूजी नरदेवातें, करि तेव्हां स्ववपु दीपकज्योती.'
'जातां स्वर्गीं मिरविति, निज गुरुसुतरत्न देव यानीं तें.

वर्णिति दैत्यांतें किति, किति कवितें कितिक देवयानीतें.'

'सलील तई मंदराख्यहि नग स्वपृष्ठीं धरा.'

'वनोवनिं फिरा पिशापरि, म्हणा अहो रात्र हा!' —मोरोपंत.

( ३ ) जुन्या मराठींत या काळाचा उपयोग भविष्यकाळाच्या अर्थी होत असे. एकवेळ तर मराठींत निराळा भविष्यकाळ मुळींच नव्हता. [ क० २१३ ( ५ ) भविष्यकाळ पाहा ]. या काळाच्या रूपांपुढें 'ल' लावून भविष्यकाळचीं रूपें करण्याची चाल पडली. या रूपांचा भविष्यकाळीं झालेला उपयोग अगदीं अलीकडल्या कवितेंतही आढळतो. उदा०—

'सर्वेश्वरार्पणविधी करुनी अगण्यें,
केलीं जरी असति कीं, बहुजन्म पुण्यें.' —वामन.

( ४ ) या रूपांचा उपयोग जुन्या बखरींत व जुन्या लेखांत आढळतो. हल्लीं प्रचारांत असलेल्या म्हणी या भाषेंत जेव्हां प्रथमतः सुरू झाल्या, तेव्हां-पासून जशाच्या तशाच चालत आल्या आहेत, म्हणून त्यांतील ही जुनीं रूपें तशींच कायम आहेत. उदा०—'लेकी बोले सुने लागे.' 'राजा बोले सभा डोले.' 'दाम करी काम.' 'आयापेक्षां खर्च मोठा, त्याचा होई सदा तोटा.' इ०.

( ५ ) त्याचप्रमाणें म्हणींसारख्याच भाषेंत कायम झालेल्या भाषापद्धतींत या रूपांचा उपयोग करितात. उदा०—'कोण जाणे तो काय म्हणेल?' 'काय झालें, देव जाणे.' 'हें काम मीच करूं जाणें.' 'काय म्हणे मला गाडी पाठवा.' इ०.

( ६ ) 'न' व 'ना' हीं निषेधार्थक अव्ययें क्रियापदाबरोबर यावयाचीं असून वर्तमानकाळ घालायाचा असतां याच रूपांचा उपयोग करितात. परंतु तसें करितांना द्वितीयपुरुषाचें एकवचन व तृतीयपुरुषाचें अनेकवचन, या रूपांच्या अंतींचा जो 'ई' स्वर त्याचा लोप करितात. उदा०—'तूं बोलस-ना किंवा न बोलस त्याला मी काय करूं?' 'ते बोलत-ना किंवा न बोलत, तेथें माझा उपाय नाहीं.' 'त्याला या कामांत कांहीं बोलतां न-ये.' 'हरीनें आज जाऊं न-ये.' 'तो इतका घाबरला, कीं त्याच्यानें बोलवे-ना.' 'माझ्यानें तें काम होई-ना, म्हणून मीं तें त्यास सांगितलें.' 'रामास ही गोष्ट विचारली, पण तो कांहींच सांगे-ना किंवा न-सांगे.' 'तो घटकाभरसुद्धां बसे-ना.'

'हें मीं त्यास करावयास सांगितलें, पण तो करी-ना; व त्याचे भाऊही करीत-ना किंवा न करीत.' 'त्यास सांगावयास न-लगे.' 'मला तेथें कोणीच दिसे-ना.' इ०.

( ७ ) केव्हां 'ना' हें निषेधार्थक अव्यय शेवटीं येण्याचे ऐवजीं 'स' व 'त' या प्रत्ययांचे पूर्वी येतें उदा०—जाई-ना-स, करी-ना-स, बस-ना-त [ बसे-ना-त ], बोले-ना-त, जेवी-ना-स, इ०.

४९०. **चालू वर्तमानकाळ**—( १ ) या रूपांवरून सामान्यपणें क्रिया चालू आहे, असा बोध होतो. उदा०—'रामा वाचितो.' 'तो आहे.' इ०.

( २ ) क्रियेला आतां आरंभ होणार, असाही यापासून बोध होतो. उदा०- 'चल, मी तुला एक गोष्ट सांगतों.' इ०.

( ३ ) यापासून साधारणतः रीति, प्रघात, नियम, संवय किंवा प्रकार यांचा बोध होतो. उदा०— दुधांत साखर घातली असतां त्यास रुचि येते.' 'तो नित्य उजाडत स्नान करितो.' 'पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरते.' 'ज्याचें पोट दुखतें तो ओवा मागतोच.' 'लवंगेनें पित्त होतें.' 'पृथ्वी व सूर्य यांचेमध्यें चंद्र आला म्हणजे सूर्यग्रहण लागतें.'

(४) अमुक गोष्ट खचित होणार, असा बोलणारास भरंवसा असला, म्हणजे भविष्यकाळाचे जागीं या काळाचीं रूपें योजितात. उदा०–'उद्यां मी त्याचे-पासून आपली सर्व रक्कम घेतों.' 'आतां मी जाऊन तुझ्या बापास ही गोष्ट सांगतों.' इ०.

( ५ ) एखादी हकीगत किंवा इतिहासांतील गोष्ट सांगत असतां किंवा दुसऱ्याचे लेखाचें किंवा भाषणाचें अवतरण करावयाचें असतां भूतकाळाबद्दल वर्तमानकाळ योजितात. उदा०-'भोजराजा म्हणतो–' 'तो त्याचे बापाजवळ जाऊन सांगतो कीं—' 'तुका म्हणे—.' इ०.

४९१. **भूतकाळ**—( १ ) या काळापासून क्रिया गतकालीं किंवा पूर्वी घडली असा बोध होतो. उदा०-'तो काल गेला.' 'सकाळीं पाऊस पडला.' इ०.

( २ ) संकेतार्थक वाक्याच्या पहिल्या भागांत हा काळ आला असतां संभवाचा बोध होतो. उदा०—'माझा भाऊ आला तर मी येईन.' 'वारा सुटला तर पाऊस जाईल.' इ०.

( ३ ) क्रिया इतक्या लवकर करितों कीं ती झाल्यासारखीच आहे, असें बोलणारास दाखवावयाचें असतां, किंवा पुढील क्रियेचा खचितपणा दाखवावयाचा असतां भविष्यकाळाबद्दल भूतकाळाचा उपयोग करितात. उदा०—' मी हा आलोंच पाहा. ' 'हा मी जेवून उठलोंच समज.' 'मी पाणी पिऊन आलोंच.' ' असें बोलशील तर तो निघून गेलाच समज. ' इ०.

( ४ ) नम्रपणें कांहीं इच्छा दर्शविणें असल्यास वर्तमानकाळाबद्दल हा काळ योजितात. उदा०—' मला थोडी साखर पाहिजे होती. ' ' या दिव्यांत थोडें तेल घातलें तर बरें. ' इ०.

४९२. **रीतिभूतकाळ**—[ १ ] वर्तमान व भूतकाळीं रीतिदर्शक संयुक्त क्रियापदें कशीं होतात हें मागें सांगितलेंच आहे [ क० ४७४ ( ३ ) पाहा. ] त्या संयुक्त–क्रियापदाचा रीतिभूतकाळीं जो अर्थ असतो, तोच या शुद्ध रीतिभूतकाळाचा असतो. उदा०–' रामा रोज तेथें जात असे किंवा जाई.' इ०.

( २ ) जुन्या वर्तमानकाळाचे रूपांचा भूतकाळासारखा उपयोग होत असे. आतां त्यांचा रीतिभूतकाळासारखा उपयोग करितात. रीतिभूतकाळाचीं रूपें हीं बहुतेक जुन्या वर्तमानकाळाचीं रूपें आहेत; फक्त द्वितीयपुरुषाचें एकवचन व तृतीयपुरुषाचें अनेकवचन यांत किंचित् फरक आहे.

४९३. **भविष्यकाळ**—( १ ) या काळापासून पुढें होणाऱ्या क्रियेचा बोध होतो. उदा०—' मी तुला हें पुस्तक उद्यां देईन. ' ' पुढील सालीं तूं परीक्षेला जाशील. ' इ०.

( २ ) प्रश्नार्थक वाक्यांत या काळापासून शक्यतेचा अर्थ बोधित होतो. उदा०—' तो तेथें कसा जाईल ?' ' आतां मी कसें करूं ? ' केव्हां प्रश्नार्थक वाक्यापासून अशक्यतेचाही बोध होतो. उदा०–' मी कां पळेन ? मी काय भित्रा आहें ? ' ' तो उगाच तेथें कशाला जाईल ? ' इ०.

( ३ ) संकेताचा बोध असतां पहिल्या वाक्यांत हा काळ असल्यास विनंति कल्पना, अनुमान, किंवा बोलणाराची पुढील वाक्यांतील गोष्टीबद्दल बेपर्वाई दिसून येते. उदा०—' मला पांच रुपये उसने देशील तर पाहा. ' ' तो तेथें जाईल तर असें होऊं देणार नाहीं. ' ' जाशील तर जा. ' ' रागें भरतील

तर भरतील.' ( म्हणजे कोणी गेलें, किंवा रागें भरलें तर त्याची बोलणारास परवा नाहीं. )

( ४ ) याचा केव्हां वर्तमानकाळासारखा उपयोग होतो. उदा०–' जाशील तर जा,' म्हणजे ' जातोस तर जा.' ' तुला लागेल तेवढा भात खा,' म्हणजे 'जेवढा भात तुला पाहिजे आहे तेवढा तूं खा.'

( ५ ) आज्ञार्थी पण नम्रपणें किंवा आदरपूर्वक कांहीं सांगणें झाल्यास भविष्यकाळाचा उपयोग करितात. उदा०—' आपण एवढें वाचून पहाल काय ?' ' तेवढी छत्री इकडे घ्याल काय ?' ' माझें एवढें पत्र टपालांत टाकाल ?' इ०.

( ६ ) रागानें पण औपरोधिक रितीनें आज्ञार्थी बोलावयाचें असतां भविष्य काळ योजितात. उदा०—' आपण आतां चालते व्हाल काय ?' ' तुम्ही एक-दांचें कृष्ण कराल तर बरें.' इ०.

( ७ ) विशेष आग्रहाची विनंति किंवा प्रार्थना करावयाची असतां हा काळ योजितात. उदा०—' आपण एवढें वाचून पाहाल काय ?' ' आपण तेथपर्यंत याल तर मज गरिबावर फार उपकार होतील.' इ०.

४९४. **आज्ञार्थ व विध्यर्थ**–( १ ) प्रथमपुरुषीं आज्ञार्थाचा उपयोग प्रश्न करण्याकडे करितात. उदा०—' मी आज मुंबईस जाऊं ?' किंवा यापासून संमतीचा अथवा परवानगीचा बोध होतो. उदा०—' चला, आपण आतां फिरावयास जाऊं.' इ०.

( २ ) द्वितीयपुरुषीं यापासून आज्ञा किंवा हुकूम याचा बोध होतो. उदा०–' तूं आपलें काम कर.' ' शाळेस जा.' ' रामा, आपले धडे कर.' द्वितीय पुरुषीं याचा देवादिकांस विनंति किंवा प्रार्थना करणें अशा अर्थीही उपयोग होतो. उदा०—' देवा, माझें बरें कर.' ' ईश्वरा, राजाचें रक्षण कर.' ' अहो राजाधिराज, प्रजाजनांच्या कल्याणाची तजवीज करा.' इ०.

( ३ ) तृतीयपुरुषीं यावरून परवानगी, सवलत, आशीर्वाद, इच्छा किंवा शाप, यांचा बोध होतो. उदा०—' तो पत्र लिहो.' ' ईश्वर तुमचें कल्याण

करो.' 'मरो तो एकदांचा!' 'आग लागो त्या तोंडाला!' 'कांहीं होवो.' 'जगो तो बिचारा!' इ०.

( ४ ) केवळ रूपांचा विचार केला म्हणजे आज्ञार्थ व विध्यर्थ यांत मुळींच सादृश्य नाहीं. तथापि अर्थाच्या दृष्टीनें पाहातां विध्यर्थ हा आज्ञार्थाचें कर्मणि किंवा भावी स्वरूप आहे. उदा०--'तूं हें काम कर.' 'त्वां हें काम करावें.' 'रामा घरीं जा.' 'रामानें घरीं जावें.' इ०.

( ५ ) विध्यर्थापासून सभ्य रितीचा किंवा नम्रतेचा आज्ञार्थ बोधित होतो. उदा०-'तुम्हीं आपल्या प्रकृतीस थोडें जपावें.' रागाच्या पण विशेष औपरोधिक भाषणांतही याचा उपयोग करितात. उदा०-'आतां आपण तोंड आटपावें.' 'त्यांनीं आतां येथून चालतें व्हावें.' इ०.

( ६ ) यापासून धर्म, शक्यता, स्वभाव, संभव, योग्यता, अटकळ किंवा कल्पना, मागील आठवण, इत्यादिकांचा बोध होतो. उदा०—'रावसाहेबांना लागलीच दया यावी.' 'दोन आण्यांस इतके आंबे मिळावे.' 'राजानें रथांत बसावें.' 'आज पाऊस पडावा.' 'त्यानें नित्य प्रहर प्रहर रडावें.' इ०.

( ७ ) णें-कारान्त धातुसाधित नामाबद्दल या विशेषणाचा उपयोग करितात; परंतु अशा ठिकाणीं त्या विशेषणापुढें 'हें' किंवा 'असें' हें सर्वनाम येतें. उदा०-'तुम्हीं असें करावें हें (म्हणजे करणें) मला आवडत नाहीं.' 'त्यांनीं हा अधिकार इतक्यांत त्याला द्यावा हें [म्हणजे देणें] चांगलें नाहीं.' इ०.

( ८ ) प्रश्न असतां विध्यर्थापासून आश्चर्याचा किंवा दुःखाचा बोध होतो. उदा०-'तुम्हींसुद्धां असें करावें ना?' 'तुला काय म्हणावें बरें?' इ०.

( ९ ) 'उमज' धातूच्या गणांतलि धातूंवरून भूतकाळीं फक्त कर्मणिप्रयोग व 'आचर' धातूच्या गणांतलि धातूंवरून भूतकाळीं विकल्पेंकरून कर्मणि किंवा भावेप्रयोग होतो. परंतु विध्यर्थी या दोन्ही प्रकारच्या धातूंना फक्त कर्मणि-प्रयोग होतो. उदा०-'मीं किंवा मला हें उमजावें किंवा समजावें.' 'प्रत्येकानें स्वधर्म आचरावा.' 'विद्यार्थ्यांनीं संस्कृत शिकावें किंवा पढावें.' [क० ३६२ पाहा].

( १० ) धातु अकर्मक असतां विध्यर्थी कर्तरि किंवा भावेप्रयोग होतो. विध्यर्थी अकर्मक क्रियापद असून कर्तरिप्रयोग असतां त्यावरून अटकळ किंवा अजमास याचा बोध होतो; व भावेप्रयोग असतां कर्तव्य किंवा अजमास

याचा बोध होतो. उदा०–‘ तो आज मुंबईहून यावा ’ [ अजमास ]. ‘ त्यानें आज मुंबईहून यावें ’ [कर्तव्य]. ‘ आज पाऊस पडावा ’ [ म्ह० आज पावसानें यावें]. ‘ त्या पुस्तकास पांच रुपये पडावे. ’ इ० [क०३४५, ( १ ) टीप पाहा].

( ११ ) मराठींत वाक्य आज्ञार्थक किंवा विध्यर्थक करण्याचे मुख्य मुख्य प्रकार ठिकठिकाणीं सांगितलेच आहेत. सोईकरितां त्यांचें पुढें एकीकरण केलें आहेः—

( अ ) वाक्यांत आज्ञार्थ किंवा विध्यर्थ असतां क्रियापदाचीं त्या त्या अर्थांचीं योग्य तीं रूपें घालितात.

( आ ) कलम ४७४ ( ९ ) यांत सांगितल्याप्रमाणें संयुक्त क्रियापदाची रचना करून आज्ञार्थाचा अर्थ आणितात.

( इ ) नम्रपणाची आज्ञा असतां भविष्यकाळाच्या रूपांचा उपयोग करितात. मागें भविष्यकाळ ( ५ ) पाहा.

( ई ) ‘दे’ धातूच्या द्वितीयपुरुषीं आज्ञार्थी रूपांच्या मागें ‘ऊं–’ प्रत्ययान्त कृदन्त घालून आज्ञार्थाचीं रूपें करितात. त्यांवरून असा बोध होतो कीं, बोलणारा स्वतांकरितां किंवा दुसऱ्याकरितां परवानगी मागत आहे; त्या वेळीं ज्यांस परवानगी द्यावयाची त्याची चतुर्थी होते. उदा०—‘ मला आतां जाऊं दे. ’ ‘ त्याला तें काम करूं द्या. ’ इ०.

( उ ) ‘ नको ’ व ‘ नये ’ हे शब्द ऊंकारान्त कृदन्तापुढें घालून विध्यर्थ व आज्ञार्थ यांचीं निषेधार्थक रूपें करितात. ‘नको’ लागून होणारीं वाक्यें कर्तरि, व ‘ नये’ लागून होणारीं कर्मणि किंवा भावी असतात; म्हणून पहिलीं आज्ञार्थक व दुसरीं विध्यर्थक होत. वाक्यांत ‘ नको ’ असतां कर्तृपद प्रथमान्त असतें, व ‘ नये ’ असतां तृतीयान्त असतें. उदा०–‘ तूं आमचे घरीं अतःपर येऊं नको. ’ ‘ त्वां आमचे घरीं येऊं नये. ’ इ०.

( ऊ ) करितां, जातां, येतां, इत्यादि कृदन्त नामांपुढें ‘ नये ’ हें रूप घालून निषेधार्थक आज्ञार्थ करितात. उदा०–‘ मला या कामांत बोलतां नये. ’ ‘ त्याला आज जातां नये. ’ इ०.

**टीप**—वरील प्रकारच्या वाक्यांत क्रियापद संयुक्त असतां मुख्य धातुरूपास क्रियापद मानून कृदन्तास अर्थानुरोधानें विशेषण किंवा अव्यय मानावें.

( ए ) विध्यर्थी निषेधार्थक आज्ञेचा बोध होत असतां वाक्यांत क्रियापदाच्या मागें ' न ' घालितात. जसें,–' मीं असें न करावें. ' 'त्यानें न बोलावें.' ' तुम्हीं न जावें. ' इ०.

४९५. **संकेतार्थ**—( १ ) हा अर्थ असतां वाक्यांत नेहमीं ' जर ' व ' तर ' हीं अव्ययें येतात; परंतु गद्यलेखांत व कवितेंत पुष्कळदां ' जर ' गुप्त असतें. तसेंच ' तर ' हें विशेषेंकरून कवितेंत पुष्कळ वेळां गाळितात. उदा०–' मी [ जर ] मुंबईस नसतों तर कसें झालें असतें ? ' '[ जर ] रामा आला तर मीही येईन. '

' कीं पावावें समयीं, सदय मनांतून योजिलें जरि तें,
परि जेवि रुक्मिणीच्या चित्ता, माझें अधीर मन करितें. '
' कीं गमलें जरि आधीं म्हणतों दावा स्वपाद या लोकीं,
जो जो वांच्छिल जें जें, तें द्यावें हें मुधा दयालो कीं ? ' –मोरोपंत.

' दे आळवूनि जरि हस्तिप बाप भाई,
घेतोचि घांस गजराज, कशी बढाई ! ' –वामन.

( २ ) या अर्थाच्या रूपांवरून इच्छा, कल्पना किंवा अनुमान यांचा बोध होतो. उदा०–' असाच पावसाळा असता, तर बरें होतें. ' ' तो आज येता तर तुम्ही भेटलां असतां. ' ' नीट अभ्यास केला असलास तर पास होशील. ' इ०.

( ३ ) संकेतार्थाच्या स्वतंत्र रूपांचा उपयोग करून त्या अर्थाचा बोध होतोच; परंतु दुसऱ्या क्रियापदाबरोबर ' जर ' व ' तर ' किंवा दुसरे कित्येक शब्द यांचा उपयोग करून संकेतार्थाचा बोध होतो. उदा०–' तूं जर जाशील तर काम होईल. ' ' मी असतांना तुला भीति कसली ? ' ' तो आतांच गेला तर बरें. ' ' रामा घरीं आला असेल तर पाहा. ' इ०.

( ४ ) केव्हां भूतकाळीं या अर्थापासून अमुक होण्याचा रंग होता, किंवा अमुक घडलें असतें, असा बोध होतो. उदा०—' थोडक्यांत चुकलें नाहीं तर तो मेलाच होता. ' ' देवानें सांभाळलें, नाहीं तर आलीच होती वेळ.' यापासून अजमासही दाखविला जातो. उदा०—' तो मुंबईहून आला असला तर मला कळीव. ' इ०.

( ५ ) मराठींत वाक्याला संकेताचा अर्थ आणण्याचे निरनिराळे प्रकार असे आहेतः—

( अ ) वाक्यांत संकेतार्थाचें क्रियापद व ' जर ' आणि ' तर ' घालून.

( आ ) ' जर ' आणि ' तर ' हीं अव्ययें घालून व त्यांबरोबर दुसऱ्या क्रियापदांचा उपयोग करून.

( इ ) ' यास ' किंवा ' यानें ' हा प्रत्यय लावून केलेलें भूतकालवाचक कृदन्त घालून. उदा०—' मी मुंबईस गेल्यास तुझ्या भावाला भेटेन. ' ' तो आल्यानें आपणांस बरें वाटेल. ' इ०.

( ई ) भूतकाळीं क्रियापदापुढें ' असतां ' हें रूप घालून. उदा०—' तो पुण्यास आला असतां सोईचें पडेल. ' ' असतां ' याचे पुढें ' ही ' घातलें असतां ' जरी ' ' तरी ' यांच्या अर्थाचा बोध होतो. उदा०—' तो असतांही तूं जा. '

( उ ) ' म्हणजे ' हें अव्यय घालून. उदा०—' तूं तेथें गेलास ( जर गेलास तर ) म्हणजे माझें काम करून ये. ' पूर्ववाक्यांत आज्ञार्थ असतां ' म्हणजे ' याचाच विशेष उपयोग करितात. उदा०—'तूं अगोदर जा, म्हणजे मग पाहतां येईल. ' ' तूं खरी गोष्ट सांग म्हणजे सुटशील. ' इ०.

**टीप**—अशा ठिकाणीं ' म्हणजे ' या शब्दानंतर ' मग ' हा शब्द घालितात. क्रियापद भूतकाळीं असतां, ' म्हणजे ' न घालितां क्रियापदाला ' वर ' हा शब्द जोडितात. उदा०—' तूं अगोदर जा, म्हणजे मग पाहूं. ' ' तूं अगोदर गेल्यावर पाहूं. '

४९६. **संशयार्थ**—( १ ) या अर्थी धातूंना स्वतंत्र रूपें नाहींत. परंतु वाक्यांत जेथें संशयाचा किंवा अटकळीचा बोध होत असेल, तेथें ' संशयार्थ ' म्हणतात. अर्थात् हा अर्थ वाक्याचा आहे. उदा०—'—तो गेला असेल.' 'रामा जात असेल. ' ' तो आतां पत्र लिहीत असावा. ' ' आज पाऊस पडेल कीं काय न कळे. ' इ०.

( २ ) ' अस ' धातूच्या विध्यर्थाच्या किंवा भविष्यकाळाच्या रूपांमागें ' करीत, ' ' जात, ' ' गेला, ' इत्यादि रूपें येऊन जो संशयार्थ होतो, त्यामध्यें कर्तृपद प्रथमान्त असतें. उदा०—' तो करीत असेल. '' मी गेलों असेन.' इ०.

**४९७. मराठींतलें अकरणरूप**—( १ ) मराठी भाषेंत क्रियापदाचें अकरणरूप प्रत्यय लागून होत नाहीं. तर निषेधार्थक स्वतंत्र क्रियापदें आहेत तीं येऊन अथवा क्रियापदाच्या रूपाबरोबर न, ना, इत्यादि अव्ययें येऊन निषेधाचा अर्थ येतो. संस्कृत भाषेंत ह्याच प्रकार आहे.

( २ ) 'नाहीं', 'नस' आणि 'नहो' हीं मराठींत निषेधार्थक क्रियापदें आहेत.

( ३ ) ' नाहीं, ' याचा अर्थ ' आहे ' याच्या उलट आहे; व 'आहे' याच्याप्रमाणेंच त्याचीं फक्त वर्तमाकाळाचींच रूपें आहेत. तेव्हां दुसऱ्या कोणत्याही काळीं किंवा अर्थी त्याचा उपयोग होऊं शकणार नाहीं.

( ४ ) ' नस ' या धातूचीं रूपें भूतकाळाशिवाय सर्व काळीं ' अस ' धातूप्रमाणें होतात. भूतकाळींमात्र या धातूच्या रूपांबद्दल ' नहो ' याचीं रूपें योजितात. [ उदा०—नव्हता ]. ' अस ' धातूच्या भूतकाळाच्या रूपांना जसा संकेतार्थ अर्थ असतो, तसाच 'नस ' धातूच्या त्या काळच्या रूपांनाही असतो. [ उदा०—नसलों ].

( ५ ) ' नहो ' याचीं फक्त जुन्या वर्तमानकाळाचीं व भूतकाळाचीं रूपें आहेत.

( ६ ) ' असतो ' याप्रमाणेंच ' नसतो ' यापासूनही ' रितीचा ' किंवा ' वहिवाटीचा ' बोध होतो.

( ७ ) यावरून लक्षांत येईल कीं, मराठींतलीं निषेधार्थक क्रियापदें कोणत्याना कोणत्या तरी बाबतींत अपूर्ण आहेत; व म्हणून निषेध दर्शविण्याचें कार्य त्यांचेकडून पूर्णपणें होत नाहीं. तीं ' आहे ' ( प्राकृत ' आही ' ), 'अस' आणि ' हो, ' या धातूंच्या मागें ' न ' लागून झालेलीं आहेत.

( ८ ) ' न ' आणि ' ना ' हीं निषेधार्थक अव्ययें आहेत. निषेध दाखवावयाचा असतां सर्व काळीं व अर्थी कोणत्याही क्रियापदापूर्वी ' न ' योजितात. उदा०—' मी न करीं. ' ' मी न करितों, न केलें, न करूं, न करीन, न करावें. ' इ०. जुन्या वर्तमानकाळाच्या रूपांपुढें, किंवा वाक्य विध्यर्थी असतां ' ना ' योजितात. उदा०—' तो करी--ना. ' ' ती बसे--ना. ' ' मूल खाई-ना.' ' तो करीता ना तर कसें ? ' ' मी जातों ना [ न जातों ] तर तो काय करिता ? ' इ०.

( ९ ) निषेध दाखविण्याकरितां 'न' हें क्रियापदाच्यापूर्वी व 'ना' हें त्याच्यानंतर घालण्याची रीत जुनी असावी असें दिसतें; व आतां तरी ती रीत कांहीं काळांच्या बाबतींत नाहींशी झाली आहे. उदा०-'तो न करितो.' 'तो न करील.' 'त्यानें न केलें.' 'तूं न कर.' इत्यादि वाक्यांबद्दल आपण हल्लीं, 'तो करीत नाहीं.' 'तो करणार नाहीं.' 'त्यानें केलें नाहीं.' 'तूं करूं नको.' असें म्हणतों.

( १० ) क्रियापदाच्या रूपामध्यें न, ना, असें कांहीं निषेधार्थक अव्यय शिरून त्याला प्रत्ययाचें स्वरूप आलें, म्हणजे स्वतंत्र अकरणरूप झालें असें म्हणावयाचें. कानडींत असें अकरणरूप स्वतंत्र आहे. मराठींत क्रियापदाचें अंग आणि प्रत्यय यांच्यामध्यें निषेधार्थक अव्यय घालून [ करीनास, करीनात अशा प्रकारचीं ] रूपें करण्याचे प्रयत्न झाले आहेत. कोंकणी भाषेंत 'तो निदाना,' 'ते निदेनात' अशीं निषेधार्थक स्वतंत्र रूपें आहेत. परंतु एकंदर मराठींत अशीं रूपें करण्याचा प्रयत्न सफळ झाला नाहीं.

( ११ ) तेव्हां मराठींत निरनिराळ्या काळीं व अर्थीं निषेध दाखविण्याचे निरनिराळे प्रकार असे आहेतः—

( अ ) जुना वर्तमानकाळ व रीतिभूतकाळ यांच्या रूपांच्या पूर्वी 'न' किंवा रूपांच्या नंतर 'ना' घालून. उदा०—न करी, करीना, न करीस, करीस ना, इ०.

( आ ) रीतिभूतकाळ असतां पुष्कळदां 'ना' हें अव्यय प्रत्ययाचे पूर्वी घालितात. उदा०—करी-ना-स, करी-ना-त, इ०.

( इ ) चालू वर्तमान-काळाचें क्रियापद असतां, न-प्रत्ययान्त कृदन्तानंतर 'नाहीं' घालून. उदा०—करीत नाहीं. इ०.

( ई ) ला-प्रत्ययान्त भूतकाळीं रूपानंतर 'नाहीं' घालून. उदा०—केलें नाहीं. इ०.

( उ ) भविष्यकाळीं णार-प्रत्ययान्त कृदन्त विशेषणाचे पुढें 'नाहीं' घालून उदा०—करणार नाहीं. इ०.

( ऊ ) आज्ञार्थीं ऊं-प्रत्ययान्त कृदन्तापुढें 'नको' आणि 'नये' हीं घालून. उदा०—करूं नको, करूं नये, इ०.

(ए) विध्यर्थी क्रियावाचक विध्यर्थक विशेषणाचे पूर्वी 'न' घालून. उदा०—न करावें, न व्हावें, इ०.

(ऐ) संकेतार्थी क्रियापदाचे पूर्वी 'न' किंवा क्रियापदाचे नंतर 'ना' घालून. उदा०—'ते न जाते,' 'तो असता ना,' इ०.

(१२) 'करितो,' 'केलें,' आणि 'करील' यांचीं निषेधार्थक रूपें 'करीत नाहीं,' 'केलें नाहीं,' आणि 'करणार नाहीं,' अशीं जरी करितात, तरी त्यांचीं तीं खरीं निषेधार्थक रूपें नव्हत, हें लक्षांत असावें. 'करीत नाहीं,' 'केलें नाहीं,' व 'करणार नाहीं,' हीं रूपें खरें म्हटलें म्हणजे 'करीत आहे,' 'केलें आहे,' व 'करणार आहे,' यांचीं अनुक्रमें निषेधार्थक रूपें होत.

(१३) 'करीत नाहीं,' 'केलें नाहीं,' 'करणार नाहीं,' या रूपांवरून अपूर्णकाळाचा बोध होतो. पूर्णकालवाचक निषेधार्थक रूपें करावयाचीं असतां 'नाहीं' याबद्दल 'नव्हतों' घालितात. उदा०—करीत नव्हतों, केलें नव्हतें, करणार नव्हतों, इ०.

(१४) संयुक्तकाळांचीं निषेधार्थक रूपें करावयाचीं असतां 'आहे,' 'होता,' 'असेल,' -व 'असावा,' यांच्या जागीं अनुक्रमें 'नाहीं,' 'नव्हता,' 'नसेल' व 'नसावा,' हीं रूपें योजावीं.

---

# प्रकरण २५.



## धातुसाधित शब्दांचे उपयोग.

### (१) कृदन्तें.

४९८. (अ) 'इत' व अत' प्रत्ययांचीं वर्तमानकालवाचक कृन्दतें जीं 'करीत,' 'बोलत,' इत्यादि, तीं 'अस' व 'हो' धातूंचे रूपांमागें योजून अपूर्णक्रियावाचक व रीतिदर्शक संयुक्त क्रियापदें करितात. हीं कृदन्तें क्रियाविशेषणें किंवा विधिविशेषणें असतात. उदा०—'तो काम **करीत** आहे किंवा नाहीं,' 'रामा **बोलत** होता किंवा नव्हता.' 'तो चार तास **वाचीत** राहील.' 'रामा त्याच्या तोंडाकडे **पाहात** बसला.' 'मी त्या वेळीं **लिहीत** नव्हतों.' इ०.

( आ ) यांवरून पुढील क्रियेचें लक्षण किंवा तिचें स्वरूप-बोधन यांचाही अर्थ निष्पन्न होतो. उदा०-' तूं देवास **भजत** जा,' म्हणजे ' असा जा, वर्तन कर, किंवा वाग, कीं देवाची भक्ति तुझ्याकडून घडेल. ' ' तूं नित्य अभ्यास **करीत** जा. ' 'आतां **वाचीत** बैस.' इ०.

( इ ) वाक्य अकरणरूपी किंवा निषेधार्थक असतां त्यावरून इच्छा किंवा आवड यांचा बोध होतो. उदा०—' तो तुजजवळ बोलत नाहीं. ' ' तो अलीकडे माझ्याशीं नीट वागत नाहीं. ' इ०.

( ई ) यांचा उपयोग बहुधा क्रियाविशेषणांसारखा होतो. तथापि यांचा वाच्यविशेषणांसारखाही उपयोग होतो, व तेव्हां त्यांस लिंगादि विकारही होतात. उदा०- **रांगतें** मूल.' '**चालता बोलता** मनुष्य.' '**जळत्या** घराचा **पोळता** वांसा.' ' तुला **नसती** उठाठेव कोणीं सांगितली ? ' इ०.

४९९. ( अ ) ' करितां-तांना, ' ' बोलतां-तांना, ' इत्यादि जीं ' तां ' व ' तांना ' प्रत्ययान्त वर्तमानकालवाचक धातुसाधित अव्ययें, त्यांवरून मुख्य क्रियापदाची जी क्रिया प्रदर्शित होते ती त्या अव्ययांच्या धात्वर्थानें बोधित होणारी क्रिया चालू असतां घडली असा अर्थ होतो. उदा०—' तो घोड्यावरून **जात असतां** किंवा **असतांना** पडला. ' इ०.

( आ ) असा अर्थ असतां या अव्ययाची केव्हां द्विरुक्ति करितात. उदा०- ' तो **चालतां चालतां** बसला.' 'त्यानें **बोलतां बोलतां** प्राण सोडला.' इ०.

( इ ) या कृदन्तानें बोधित होणारी क्रिया घडण्याचा काळही यावरून दाखविला जातो. उदा०-'बारा **वाजतां** या.' 'तो त्यास न **कळतां** बोलला.'

' **जातां** स्वर्गीं मिरविति, निज-गुरु-सुत-रत्न देव यानीं तें. '

—मोरोपंत.

( ई ) या अव्ययाचा क्रियेच्या अप्रत्यक्ष कर्माचे जागीं उपयोग करितात. उदा०—' मी त्यास असें **बोलतां** ( **तांना** ) ऐकतों, तर त्यास मीं दाबलें असतें. ' ' रामास मीं घोड्यास **मारतांना** पाहिलें.' या दुसरे वाक्याचा भावे प्रयोग आहे.

( उ ) मुख्य क्रियापद ' ये ' या धातूचें रूप असतां यांचा धातुसाधित

नामासारखा उपयोग होऊन तीं कर्तृस्थानीं असतात. उदा०—'मला **बोलतां** येतें.' 'त्यास घोड्यावर **बसतां** येतें.' 'म्हातारी **उडतां** नयेचि तिजला.' इ०.

( ऊ ) वरील दोन्ही प्रकारचीं धातुसाधितें [ इत, अत, आणि तां व तांना प्रत्ययान्त ] एकदम आलीं असतां धातुसाधितानें बोधित होणारी क्रिया चालू असतां मुख्य क्रिया घडली, असा अर्थ होतो. उदा०–'धर्मराजा राज्य **करीत असतां** प्रजा फार सुखी होती.' इ०.

( ए ) भूतकाळाचे रूपापुढें 'असतां' किंवा 'असतांही' आलें, तर संकेतार्थाचा बोध होतो. उदा०—'तुम्ही **गेलां असतां** [ जर गेलां तर ] काम होईल.' 'मी जाऊं नको म्हणून **सांगितलें असतांही** [ जरी सांगितलें होतें तरी ] तो गेला.' इ०.

५००. ( अ ) 'केला' आणि 'केलेला,' इत्यादि जीं भूतकालवाचक विशेषणें आहेत त्यांपैकीं पहिल्या प्रकारच्या विशेषणांचा मराठींत भूतकाळाच्या रूपांचे जागीं उपयोग करितात; व दुसऱ्यांचा विशेषणांसारखा उपयोग होतो. तथापि 'केला' इत्यादि रूपें मूळचीं विशेषणें आहेत; आणि कवितेंत व गद्य भाषेंतही त्यांचा विशेषणांसारखा उपयोग होतो. उदा०–'**पिसाळला** कुत्रा.' '**वाळलें** गवत.' '**केलें** काम सगळें फुकट गेलें.' '**केला** धर्म परमेश्वराकडे रुजू होतो.' '**मेल्या** माणसाचे दोष काढूं नये.' '**दुखल्या** देवा दंडवत.'

'कीं **आठविला** नामप्रतिनिधि, हा अमृत उधळितो स्वैर.'
'कीं बहुकाळ **विसरला**, फारचि **संकोचला** सखा लाजे.'
'जशी पदरजें शिळा, परि असे नव्हे **शापिली**
धवें हरि–मनोहराकृति सती अघें **व्यापिली**.'
'निष्फळ होती मेघें **त्यजिलीं**, **आलींहि** जीविका शेतें.'
'जरि उकिरड्यांत **पडला, मळला,** न हिरा तथापि सामान्य.'

–मोरोपंत.

( आ ) गौण वाक्याचे शेवटीं भूतकाळाचे क्रियापद असून, त्या वाक्यास विभक्तिप्रत्यय लावावयाचा असतां, त्या क्रियापदास विशेषण मानून त्यास प्रत्यय लावितात. उदा०—'रानटी लोकांत पंचमहाभूतांसच **देव मानिल्याचें** [ किंवा **मानिलेलें** ] आढळतें.' या वाक्यांत 'मानिल्याचें' व

'मानिलेलें' या शब्दांचा क्रियावाचक नामांसारखा उपयोग असून, ते 'आढळतें' या क्रियापदाचे कर्ते आहेत. 'म्हातारी **मल्याचें** दुःख नाहीं, पण काळ सोकावतो.' '**गेल्याचा** शोक वथा न करावा.' इ०.

(इ) या विशेषणांपुढें 'असतां' हें अव्यय आलें म्हणजे (१) पहिली क्रिया दुसरीचें कारण आहे असा अर्थ होतो; किंवा (२) या विशेषणाची चतुर्थी केली असतां जसा संकेतार्थाचा बोध होतो, तसाच संकेतार्थाचा अर्थ होतो; अथवा (३) 'जरी' या अव्ययाचा अर्थ उत्पन्न होतो. उदा०—(१) 'रामा **आला असतां** त्याची बुद्धि फिरली.' (२) 'उपाय **केला असतां** (केल्यास) तो सुधारेल.' (३) 'इतकें **सांगितलें असतां** [जरी सांगितलें तरी] तो गेला.' इ०.

**टीप**—तिसरे उदाहरणांत 'असतां' यापुढें बहुधा 'ही' घालितात. या तिन्ही उदाहरणांतील 'आला,' 'केला,' व 'सांगितलें,' हीं रूपें विशेषणें आहेत; व 'रामा,' 'उपाय' व 'इतकें,' हे शब्द त्यांचीं विशेष्यें असून ते 'असतां' यांचीं कर्तृपदें आहेत. त्यांची भावी-प्रथमा विभक्ति आहे.

५०१. (अ) 'करून,' 'बोलून' इत्यादि जीं ऊन-प्रत्ययान्त भूतकाल-वाचक अव्ययें आहेत त्यांचा अर्थ, त्यांच्या मूळ धातूवरून बोधित होणारी क्रिया झाल्यानंतर, असा बोध होतो. व दोन क्रिया 'आणि' या अव्ययानें जोडिल्या असून, त्या एकाच काळीं घडल्या असल्या तर, पहिल्या क्रियापदाबद्दल हें अव्यय योजितात. उदा०—'त्यानें रामाचे पायां **पडून** (तो पायां पडला आणि त्यानें) आपलें काम साधून घेतलें.' 'तो रामाचे पायां **पडून** (पायां पडेल आणि) आपलें काम करून घेईल.' 'तो रविवारीं **येऊन** (येतो आणि) जातो.' 'उद्यां आमच्याकडे **येऊन** (ये आणि) जा.' इ०.

**टीप**—ऊन-प्रत्ययान्त धातुसाधित अव्ययानें जी क्रिया दाखविली जाते, ती कर्तरि असल्यास, कर्तृपद प्रथमान्त असतें; व कर्मणि किंवा भावी असल्यास तें तृतीयान्त असतें. उदा०—'तो असें **बोलून** गेला.'—(कर्तरि). 'त्यानें काम **करून** टाकिलें.'—(कर्मणि). 'त्यानें एवढें काम **करून** निघून जावें.'—(भावी). इ०.

( आ ) या अव्ययावरून पुढील क्रियार्थाच्या कारणाचा बोध होतो. उदा०—'तो ताप येऊन मेला.' 'गोळी लागून त्याचीं बोटें गेलीं.'

( इ ) दोन क्रिया एकामागून एक लागल्याच झाल्या असतां, किंवा दुसऱ्या क्रियेच्या अर्थास जोर आणावयाचा असतां, पहिल्या क्रियापदाच्या जागीं या अव्ययाचा उपयोग करितात. उदा०—'बोलून जा.' 'धुऊन टाक.' 'करून घे किंवा टाक.' 'मी हें जाणून आहें.' 'तो नुकताच जपान देश पाहून आला.' इ०.

५०२. ( अ ) 'ऊं'-प्रत्ययान्त धातुसाधित अव्ययावरून पुढील क्रियापदावर अवलंबून राहणाऱ्या क्रियेचा आरंभ आहे असा बोध होतो. उदा०—'तो बोलूं लागला,' म्हणजे 'त्यानें बोलणें आरंभिलें.' इ०.

( आ ) यांचा उपयोग नामांप्रमाणें होतो; व तीं अकर्मक क्रियापदांपासून झालीं असल्यास त्यांचीं कर्तृपदें चतुर्थ्यन्त असतात; उदा०—'मला आज घरीं जाऊं दे.' 'त्यानें मला आपलेकडे येऊं दिलें.' इ०.

( इ ) धातु सकर्मक असल्यास कर्तृपदाची चतुर्थीच होते. तेव्हां त्यांना कर्मही असतें; व कर्माची स-प्रत्यय द्वितीया केव्हां होते व अ-प्रत्यय केव्हां होते, यासंबंधाचे नियम जे प्रयोगप्रकरणीं सांगितले आहेत, तेच येथेंही लागतात.

( ई ) या अव्ययांनंतर विशेषत: इच्छिणें, जाणें, पाहाणें, देणें, शकणें, लागणें, इत्यादि आणि या अर्थांच्या धातूंचीं रूपें क्रियापदाचे जागीं येतात.

५०३. ( अ ) 'णार'-प्रत्ययान्त भविष्यकालवाचक विशेषणाचा असा अर्थ होतो कीं, त्यानें दर्शित अशी क्रिया करण्याचा कर्त्याचा उद्देश आहे. उदा०—'तो आज माझे घरीं येणार आहे.' इ०.

( आ ) पुष्कळदां वाक्यांत या विशेषणानंतर 'आहे' हें क्रियापद गुप्त असतें. उदा०—'आज पाऊस खास पडणार.' इ०. अशा ठिकाणीं असा अर्थ असतो कीं, क्रिया होणार अशी बोलणाराची खात्री असते.

५०४. ( अ ) 'णें'-प्रत्ययान्त धातुसाधित नामांचा इतर नामांप्रमाणें उपयोग होतो. तीं बहुधा एकवचनी असतात; तथापि तत्प्रदर्शित गोष्टींचे अनेक प्रकार दाखविणें असल्यास भाववाचक नामांप्रमाणेंच यांचेंही अनेकवचन होतें. उदा०—'त्याचीं आमचीं यासंबंधानें पुष्कळ बोलणीं झालीं.' इत्यादि.

(आ) व्याकरणांत क्रियार्थांचा उल्लेख करावयाचा असतां या नामांचा उपयोग करितात. आज्ञार्थी, द्वितीयपुरुषी, एकवचनी रूपें घालूनही तें कार्य होतें. उदा०—'करणें,' 'बोलणें,' 'चालणें,' इत्यादि धातू; अथवा 'कर' 'बोल,' 'चाल,' इत्यादि धातू.

(इ) सभ्य रितीनें व नम्रपणे विनंति, आज्ञा, किंवा हुकूम करावयाचा असतां, 'जावें,' 'बोलावें,' 'लिहावें,' इत्यादि विध्यर्थक रूपांचा जसा उपयोग करितात, तसाच या धातुसाधित नामांचाही करितात. अशाठिकाणीं क्रियापद गुप्त असतें. उदा०—'वारंवार पत्र पाठवीत **जाणें**.' 'आपण आज आमचेकडे भोजनास **येणें**.' इ०.

(ई) 'अस' धातूच्या किंवा 'आहे' या क्रियापदाच्या रूपांशीं यांचा संयोग असतां, जरूरीचा किंवा कर्तव्याचा बोध होतो. उदा०—'कधीं तरी आपणास **मरणें** आहे.' 'तुला काय **करणें** असेल तें कर.' इ०.

'कृष्णांला कर्ण न भी, तनु टाकुनि एकदां असे **जाणें**.'
'आज द्वैरथयुद्धीं विजयाचे प्राण निश्चयें घेणें.' —मोरोपंत.

## (२) क्रियावाचक नामें.

५०५. शुद्ध क्रियेचा किंवा क्रियार्थाचा ती ती क्रिया म्हणून बोध कर्तव्य असतां, धातुसाधित नामें व इतर कृदन्तें यांचा उपयोग करितात. तेव्हां त्यांस **क्रियावाचक नामें** किंवा **विधिवाचक नामें** असें म्हणावें.

५०६. हीं क्रियावाचक नामें खालीं लिहिल्याप्रमाणें आहेत:—

(१) मूळचा धातु, म्हणजे आज्ञार्थाचें द्वितीयपुरुषाचें एकवचनाचें रूप, याचा पुष्कळदां क्रियार्थक नामाप्रमाणें उपयोग करितात. उदा०—'**कर** नाहीं त्याला **डर** कशाला पाहिजे?' 'त्याची **ऊठबस** माझ्यानें करवणार नाहीं.' 'तुमच्या घरची **ने--आण** कोण करितो?' इ०.

(२) 'णें'-प्रत्ययान्त कृदन्ताचा नामाप्रमाणें उपयोग होतो. हा उपयोग 'वा' प्रत्ययान्त विध्यर्थक विशेषणाच्या उपयोगासारखाच आहे. उदा०–'तुम्हीं असें **करणें** किंवा **करावें** हें चांगलें नाहीं.' इ०.

(अ) अशा ठिकाणीं येणाऱ्या विध्यर्थक रूपास आतां क्रियापद मानण्याची

चाल पडली आहे. पुढील उदाहरणांतील उपयोग मात्र शुद्ध नामासारखा आहेः--' बाजीरावास इंग्रजांना पुणें **द्यावें** लागलें. ' ' तुला पायीं **चालावें** लागेल. ' इ०.

( ३ ) विध्यर्थक विशेषणांस व ' णें ' प्रत्ययान्त धातुसाधित नामांस चतुर्थीचे प्रत्यय ' स, ' ' ला, ' व ' तें, ' हे लागून नामें होतात. उदा०-' मला **हें** पुस्तक **वाचावयास** किंवा **वाचण्यास** येतें.' 'हरीला इंग्रजी **वाचावयास** येतें, पण **लिहिण्यास** येत नाहीं. ' ' त्याला **बोलायाला** फार पाहिजे.' इ०.

**टीप**--जे प्रत्यय चतुर्थीला लागतात, तेच येथें लागतात. यावरून ही चतुर्थी विभक्ति आहे असें समजूं नये. प्रत्यय तेच आहेत, एवढेंच. ' वाचावयास ' आणि ' वाचण्यास ' यांबद्दल अनुक्रमें ' वाचायास ' आणि ' वाचणेंस ' असेही योजितात.

( ४ ) ' तां ' व ' तांना '-प्रत्ययान्त वर्तमानकालवाचक अव्ययांचा नामांप्रमाणें उपयोग करितात. उदा०-' त्यास चांगलें **चालतां** येतें; पण **बोलतां** येत नाहीं. ' ' त्यास कोणीं **बोलतां** नये. ' ' तुला जर हें काम **करितांना** येत नव्हतें तर तूं त्या भानगडींत कां पडलास ?' ' तुला जर इंग्रजी **लिहितां** येतें, तर मग बरेंच. ' इ०.

( ५ ) ' ऊं ' प्रत्ययान्त धातुसाधित अव्ययांचा नामांप्रमाणें उपयोग करितात. उदा०-' आईनें मुलास **जेवूं** घातलें. ' ' त्यानें मला हें काम **करूं** सांगितलें. ' ' ही गोष्ट मीच करूं जाणें. ' इ०.

( ६ ) अशा ठिकाणीं धातुसाधित नामांस ' स, ला, तें,' प्रत्यय लावितात. आणि मग त्यांचा नामांप्रमाण [ वरील कलम ३ पाहा ] उपयोग करितात. उदा०—' जेवावयास घातलें. ' ' करण्यास किंवा करावयास सांगितलें. ' ' छापण्यास दिलें. ' इ०.

( ७ ) विध्यर्थक विशेषणांस ' च '–प्रत्यय लागून नामें होतात. उदा०— ' रामाला मुंबईस **जावयाचें** आहे. ' ' मला तुझ्याशीं कांहीं **बोलावयाचें** होतें. ' इ०.

**टीप**—' जावयाचें ' इत्यादि रूपें ' जायचें, ' ' जायाचें, ' ' बोलायचें, ' ' बोलायाचें, ' अशींही लिहितात.

( ८ ) हीं क्रियावाचक नामें वाक्यांत आलीं असतां त्यांच्या क्रियार्थाचें कर्तृपद नेहमीं चतुर्थ्यन्त असतें; परंतु कलम [ ५ ] यांतील उदाहरणांत तें तृतीयान्त किंवा प्रथमान्तही असतें. त्यांच्या उपयोगाप्रमाणें हीं नामें पुढील क्रियापदाचे कर्ते किंवा कर्में असतात. तीं सकर्मक धातूंपासून साधलीं असल्यास त्यांस कर्में असतात. 'णें'–प्रत्ययान्त नामांस सर्व विभक्ति लागून रूपें होतात; परंतु क्रियावाचक नामांच्या, वाक्यांतील अर्थाप्रमाणें, केवळ प्रथमा व द्वितीया विभक्ति मात्र होतात.

( ९ ) 'च–प्रत्ययान्त क्रियावाचक नामांचा 'पड' या धातूच्या किंवा 'आहे' या क्रियापदाच्या रूपाशीं योग असतां, जरूरी किंवा कर्तव्य यांचा बोध होतो. उदा०—'मला हें काम **करावयाचें** पडेल असें दिसतें.' 'त्यास उद्यां मुंबईस **जावयाचें** आहे.' इ०.

( अ ) अशा ठिकाणीं 'णें' प्रत्ययान्त धातुसाधित नामांचाही उपयोग करितात. उदा०—'तुला हें **करणें** पडेल असें दिसतें.' 'त्यास **जाणें** आहे.' इ०.

( आ ) निश्चय किंवा खात्री आणि संभव यांचा अर्थ असतां क्रियापद घातल्याखेरीज यांचा उपयोग करितात. उदा०—'तो काल **मरायचाच**, पण आयुष्याची दोरी बळकट होती, म्हणून वांचला.' 'हा व्रात्य पोर एखादे वेळ पंचाईत **करावयाचा**.' 'असें कर, नाहीं तर सगळेंच फुकट **जावयाचें**.' इ०.

**टीप**—व्याकरण करितांना यांस क्रियाविशेषणें किंवा विधिविशेषणें मानून त्यांचेपुढें 'अस' धातूचें योग्य तें रूप अध्याहृत घ्यावें.

( १० ) क्रियावाचक नामें व धातुसाधित नामें यांतील भेद असा आहे कीं, धातुसाधित नामें हीं धातूंपासून प्रत्यय लागून साधलेलीं असतात. उदा०—कृति, कर्म, कार्य, भावना, भूत, विभूति, पराभव, इत्यादि हीं 'कृ' व 'भू' या धातूंवरून साधलेलीं नामें आहेत. यांपासून क्रियार्थाचा बोध क्वचित् होईल, पण तो बोध प्रत्यक्ष रितीनें कधींच होणार नाहीं. परंतु क्रियावाचक नामें हीं, तीं ज्या धातूंवरून साधलीं असतात त्या धातूंचा क्रियार्थ किंवा व्यापार प्रदर्शित करणारीं नामें असतात. जसें,—'हें काम करावयास पडलें.' म्हणजे 'काम करण्याचा व्यापार करणें भाग पडलें.' असा अर्थ समजावयाचा.

आणखी असें लक्षांत ठेवावें कीं, क्रियावाचक नामें सकर्मक क्रियापदांवरून झालीं असल्यास त्यांना कर्मपद असतें; धातुसाधित नामांना तें असत नाहीं. ह्या दोहींतला फरक विशेष लक्षांत ठेवण्यासारखा आहे.

( ११ ) 'च'-प्रत्ययान्त व 'वा'-प्रत्ययान्त क्रियावाचक शब्द हे मूळचे विशेषणें आहेत; ते सकर्मक क्रियापदांवरून झाले असतां कर्मणि असून कर्माचीं विशेषणें असतात; आणि अकर्मक क्रियापदांवरून होतात तेव्हां नामें असतात उदा०—'बाजीरावास **पुणें द्यावें** लागलें.' 'मला हक्क सोडून **द्यावा** लागला.' 'मला हीं **पुस्तकें** त्यास **द्यावयाचीं** आहेत.' इत्यादि. यांत हीं विशेषणें आहेत. पण 'मला तेथें काल **बसावें** लागलें.' 'त्याला आज घरींच **बसावयाचें** आहे.' या उदाहरणांत 'बसावें' आणि 'बसावयाचें' हीं नामें आहेत; कारण तीं अकर्मक क्रियापदांपासून झालीं आहेत.

**टीप**—या क्रियावाचक शब्दांचें व्याकरण करितांना त्यांचा वाक्यांत जसा उपयोग झाला असेल त्याप्रमाणें त्यांस नामें किंवा विशेषणें मानावें. यांची व्यवस्था पुढें 'व्याकरण चालविणें' या प्रकरणांत स्पष्ट केली आहे.

---

# प्रकरण २६.



## गौणवाक्यें.

५०७. ( अ ) नामवाक्य मिश्र वाक्यांत येऊन तें वाक्यांत क्रियापदाचा कर्ता असलें, तर त्याचेपुढें 'हें' किंवा 'असें' हें दर्शक सर्वनाम येतें; व तें कर्मपद असलें, तर क्रियापदापुढें 'कीं' हें अव्यय येऊन पुढें तें वाक्य घालितात. जसें,—'**रामा आज आला,** हें चांगलें झालें नाहीं.' '**रामा गेला असें** त्यानें ऐकिलें.' 'कोणी म्हणतात, कीं **हिमालयावर पांढरे कावळे आहेत.**' इ०.

**टीप**—हें दर्शकसर्वनाम व अव्यय कवितेमध्यें व पुष्कळदां गद्यांतही गुप्त असतें. विरामचिन्हांची रीत पडल्यामुळें हे शब्द गुप्त ठेवण्याचा प्रघात ज्यास्त पडला आहे.

( आ ) विशेषणवाक्याचे आरंभीं ' जो ' हें संबंधी सर्वनाम असतें. तें उक्त किंवा गुप्त असतें. उदा०—' जो मुलगा मीं काल पाहिला, तोच हा आहे.' ' मीं पाहिला तो मुलगा हाच. ' इ०.

५०८. अव्ययवाक्यें पांच प्रकारचीं असतात. तीं अशीं:—

( १ ) स्थानदर्शक–' जेथें कीर्तन करावें, तेथें अन्न न सेवावें. '

—तुकाराम.

( २ ) कालदर्शक–' जंव चाले मोठा धंदा, तंव बहीण म्हणे दादा. '

—तुकाराम.

( ३ ) प्रकारदर्शक—

' पाणी तेविं न मरणहि जननयनीं व्यसन जेविं आणीतें. '

( ४ ) कारणदर्शक—

' कां न सदन बांधावें, कीं त्यांत पुढें बिळें करिल घूस ? '

' प्राकृत-संस्कृत-मिश्रित यास्तव कोणी म्हणेल ही कंथा. '

( ५ ) संकेतदर्शक—

' प्राकृत पंडित पांडव असते तरि, हेहि केविं न भ्रमते ? '

—मोरोपंत.

**टीप**—' असें कीं, ' ' कारण कीं, ' ' अशासाठीं कीं, ' ' कां कीं, ' ' ज्या अर्थीं, ' ' यासाठीं कीं, ' ' म्हणून, ' इत्यादि शब्द कारणदर्शक वाक्याची खूण आहेत. उदा०–'ज्या अर्थीं तूं साफ बोलत नाहींस त्या अर्थीं तूं लबाड आहेस. ' ' तूं कपटी आहेस, कां कीं तूं साफ बोलत नाहींस. ' इ०.

५०९. [ अ ] संकेतदर्शक वाक्यापुढें अनुमानदर्शक वाक्य असतें. हीं दोन्ही वाक्यें ' जर, ' ' तर, ' ' जरी, ' ' तरी, ' या अव्ययांनीं जोडिलीं असतात. यांस अनुक्रमें पूर्ववाक्य व उत्तरवाक्य असेंही म्हणावें. उदा०—' तूं आलास तर मी येईन, ' यांतील ' तर ' याच्या मागील वाक्य संकेतबोधक किंवा पूर्व वाक्य असून पुढलें अनुमानदर्शक किंवा उत्तरवाक्य आहे.

[ आ ] संकेतदर्शक वाक्य भूतकाळीं किंवा भविष्यकाळीं असतां त्यांतील अर्थाच्या खरेपणाचा संशय असतो. अशा ठिकाणीं अनुमानदर्शक वाक्य

भविष्यकाळीं असतें. उदा०—' जर तूं आलास [ किंवा येशील ] तर ती येईल. ' इ०.

[ इ ] कधीं पूर्ववाक्य भूतकाळीं असतां, उत्तरवाक्य त्याच काळीं असतें. आणि त्या वेळीं असा अर्थ असतो कीं, पूर्व वाक्यांतील संकेत खरा झाला असता, तर उत्तर वाक्यांतील अनुमान खरें झालें असतें. उदा०—' जर मी तेथें असतों, तर त्यास असें करूं दिलें नसतें. '

' प्राकृत पंडित पांडव असते, तरि हेहि केविं न भ्रमते ? '

' असतों जरि मी, तरि न व्यसनमळें धर्मपादतळ मळतें. '

—मोरोपंत.

[ ई ] परंतु जेव्हां दोन्ही वाक्ये स्वार्थी व वर्तमानकाळीं असतात, तेव्हां पूर्ववाक्यांतील संकेत खरा असण्याचा संभव असतो. उदा०—' जर गोविंदा येतो [ येत आहे ], तर मीहि येतों. '

[ उ ] 'जर,' 'तर,' यांबद्दल पूर्ववाक्याचे शेवटीं असलेल्या भूतकाळाच्या क्रियापदाला ' यास ' हा प्रत्यय जोडितात. उदा०—' तो गेल्यास मी जाईन,' म्हणजे ' जर तो गेला तर मी जाईन. ' ' गेल्यास ' हें जरी भूतकालवाचक विशेषण झालें आहे, तरी व्याकरण चालविण्याचे सोईकरितां त्या विशेषणास भूतकाळाचें क्रियापद समजून मागील नामवाक्याची चतुर्थी झाली, असें मानण्यास चिंता नाहीं.

[ ऊ ] पूर्ववाक्यांत आज्ञार्थ असतां ' जर—तर ' यांबद्दल ' म्हणजे ' घालितात. उदा०—' तूं खरी गोष्ट सांग, म्हणजे सुटशील, ' म्हणजे, ' जर तूं खरी गोष्ट सांगशील तर सुटशील. '

[ ए ] पूर्ववाक्यांतील गोष्टीच्या विरुद्ध गोष्ट जेव्हां उत्तरवाक्यांत सांगितलेली असते, किंवा पूर्ववाक्यांतील गोष्ट खरी आहे, असें जेव्हां बोलणारास कबूल असतें, तेव्हां ' जर—तर ' यांबद्दल ' जरी—तरी, ' ' यद्यपि—तथापि, ' ' किती कां—पण, ' हे शब्द येतात. उदा०—' राजानें जरी मला बोलाविलें, तरी मी येणार नाहीं. ' ' यद्यपि तो शहाणा आहे, तथापि त्यास लौकिक नाहीं. ' ' तो वयानें किती कां लहान असेना, पण त्याचें धैर्य मोठें. '

[ ऐ ] कालदर्शक अव्ययवाक्य असतां त्यापुढें ' पर्यंत, ' ' पावेतों, ' ' तों,' इत्यादि शब्दयोगी अव्ययें येऊन मागील क्रियापदाचें जुन्या वर्तमानकाळाचें रूप असतें. परंतु द्वितीयपुरुषीं एकवचनीं व तृतीयपुरुषीं अनेकवचनीं शेवटल्या ' ई ' चा लोप होतो. व द्वितीयपुरुषीं अनेकवचनाचें रूप ईकारान्त ( उदा०— जाई) असतें. अशा वाक्यावरून अर्थानुरोधानें तिन्ही काळांचा बोध होतो. उदा०—' मी जाईपर्यंत तो थांबला, ' ' तूं जासपर्यंत तो अक्षर बोलला नाहीं. ' ' तुम्ही जाईपर्यंत मी बसतों. ' ' ते जातपावेतों मी स्वस्थ होतों. ' ' आम्ही जाऊं तों बहुधा सर्व तयारी असेल ' इ० या प्रत्येक उदाहरणांत शब्दयोगी अव्यय मागील सर्व नामवाक्यास लागलें आहे. शब्दयोगी अव्यय लागल्यानंतर तें नामवाक्य अव्ययात्मक झालें आहे.

५१०. **भूतकाळाचें गौणवाक्य**—[ अ ] ज्याचे शेवटीं ला-ली-लें प्रत्ययान्त क्रियापदाचें रूप आहे, अशा गौण वाक्यांत त्या क्रियापदरूपाला तृतीयेपासून सर्व विभक्तींचे प्रत्यय व शब्दयोगी अव्ययें लागतात; हीं लागतांना त्या क्रियापदाच्या रूपाचें सामान्यरूप ' या ' लागून होतें. उदा०— ' मी तेथें **गेल्यानें** काम होईल.' ' तूं **आल्यास** बरें.' ' शिक्षक **आल्यावर** मुलें गप्प बसलीं. ' ' गुन्हेगारास गुन्हा **केल्याचा** पश्चात्ताप झाला. ' इ०.

[ आ ] अशा वाक्यांचें व्याकरण करितांना वाक्यें संपल्यावर त्यांच्यापुढें ' हा ' या सर्वनामाचें 'या' हें सामान्यरूप घातलें आहे, असें मानितात; परंतु असें केल्यानें मागील ल-प्रत्ययान्त क्रियापद कोणत्याही पुरुषीं किंवा वचनीं असलें, तरी ' या '-शीं संधि पावतांना त्याच्या अंत्याचा लोप होतो असें मानावें लागेल. पण असें मानण्यापेक्षां मागील सर्व वाक्याचेंच सामान्यरूप होऊन पुढें त्यास प्रत्ययादि लागतात, असें मानणें विशेष प्रशस्त दिसतें. हें मागील वाक्य मूळचें नामवाक्य असून पुढील प्रत्ययादिकांनीं त्यास अव्ययाचा अर्थ येतो.

[ इ ] या भूतकालवाचक नामवाक्यांस तृतीयेचा प्रत्यय ' नें ' किंवा चतुर्थीचा प्रत्यय ' स ' लागून संकेतार्थाचा बोध होतो. उदा०—' तो आज **आल्यानें** किंवा **आल्यास** [ जर आला तर ] बरें होईल. ' ' त्याला शंभर रुपये **दिल्यानें** किंवा **दिल्यास** तो आपलें काम करील. ' इ०.

[ इ ] अशाच वाक्यांस ' वर, ' ' नंतर ' हीं शब्दयोगी अव्ययें लागून ' जेव्हां-तेव्हां ' हीं कालवाचक अव्ययें वाक्यांत असल्याप्रमाणें अर्थ उत्पन्न होतो. उदा०—' तुम्ही **आल्यावर** किंवा **आल्यानंतर** [ म्हणजे याल तेव्हां ] विचार करूं. ' इ०.

[ उ ] या वाक्यांना ' प्रमाणें, ' ' सारखें,' हीं अव्ययें लागल्यापासून 'जसें-तसें, ' यांचा बोध होतो; क्वचित् ' ज्यापेक्षां-त्यापेक्षां, ' ' ज्याअर्थी-त्याअर्थी,' यांचाही बोध होतो. उदा०—' तो **बोलल्या**प्रमाणें [ जसें बोलला तसा ] वागेल. ' ' आम्हीं तेथें **गेल्यासारखें** [ ज्यापेक्षां जात आहों त्यापेक्षां ] काम झालें तर बरें. ' इ०.

[ ऊ ] यांना ' स-ला-तें ' हे प्रत्यय लागले असतां ' ऊन '-प्रत्ययान्त धातुसाधितासारखा किंवा ती क्रिया झाली आहे असा बोध होतो. उदा०— ' तो मुंबईस **गेल्यास** किंवा **गेल्याला** चार दिवस झाले,' म्हणजे 'तो **जाऊन** चार दिवस झाले. ' किंवा ' चार दिवसांपूर्वी ती [ जाण्याची ] क्रिया झाली. ' असा अर्थ.

**टीप**—या गौण वाक्यांतील भूतकालिक क्रियापद हें वस्तुतः विशेषण आहे, हें यावरून दिसून येईल.

[ ए ] कित्येक ठिकाणीं या वाक्याचे शेवटीं भूतकाळाचे क्रियापदास 'चा-ची-चें ' हे प्रत्यय लावून किंवा त्याचें ' लेलें '–प्रत्ययान्त रूप करून त्याचें क्रियावाचक नाम किंवा विशेषण करितात. उदा०—' मला वचन **दिल्याचा** पश्चात्ताप झाला. ' ' असें **केल्याचा** परिणाम नीट होणार नाहीं. ' 'तो घरीं **गेल्याचें** [ गेला हें ] ऐकल्यानें माझा जीव स्वस्थ झाला. ' ' त्याला मुंबईस **गेल्याला** [ गेलेल्याला ] चार दिवस झाले. ' इ०.

---

# प्रकरण २७.

## अव्ययें.

५११. (अ) कित्येक स्थलवाचक व कालवाचक अव्ययांमध्यें स्थलवाचक व कालवाचक नामांच्या अर्थाचा समावेश झालेला असतो; त्यांस **सर्वनामात्मक अव्ययें** असें म्हणावें. तीं अशीं आहेतः—

(१) **दर्शकसर्वनामात्मकः**—येथें, इथे, काल, उद्यां, परवां, तई, तधीं, एव्हां, तेथें, तिथे, इ०.

(२) **संबंधीसर्वनामात्मकः**–जेथें, जिथे, जेव्हां, जधीं, जई, जेधवां, इ०.

(३) **प्रश्नार्थकसर्वनामात्मकः**—कोठें, कुठे, केव्हां, कई, केधवां इ०.

(आ) कधीं कधीं हीं अव्ययें स्थलवाचक व कालवाचक नामांच्या पुढें येतात. तेव्हां तीं नामें द्वितीया किंवा सप्तमी विभक्तींत असून त्यांचा पुढील अव्ययांशीं उद्देशसंबंध असतो. जसें,—'पुणें येथें विठ्ठलपंत म्हणून एक गृहस्थ राहात असे.' 'तुम्ही मुंबईस कोठें राहातां?' 'सकाळीं केव्हां तो तुला भेटेल?' 'दिवसास जेव्हां तो घरीं असेल तेव्हां त्याच्याकडे जा.' इ०.

५१२. (अ) 'जेथें,' 'जेव्हां,' इत्यादि संबंधदर्शक अव्ययें, व त्यांच्या जोडीचीं 'तेथें,' 'तेव्हां,' इत्यादि अव्ययें, यांचा वाक्यांत परस्परांशीं संबंध असतो, म्हणून पहिलीं आलीं कीं त्यांच्या मागून दुसरीं येतातच. परंतु पुष्कळदां वाक्यांत दोहोंपैकीं कोणतें तरी एक गुप्तही असतें.

(आ) 'जेव्हां' याची द्विरुक्ति झाली असतां क्रिया पुनः पुनः झाली असा अर्थ असतो. अशा ठिकाणीं क्वचित् दुसऱ्या 'जेव्हां' बद्दल 'केव्हां' ही घालितात. उदा०—'जेव्हां जेव्हां किंवा जेव्हां केव्हां तो येतो, तेव्हां तूं घरीं नसतोस.' इ०.

५१३. '**आणि**' व '**व**'—(अ) समुच्चयवाचक अव्ययें 'आणि' व 'व' यांच्या अर्थांमध्यें विशेषसा भेद नाहीं; परंतु उपयोगांत थोडासा भेद आहे. 'आणि' याचा उपयोग बोलण्यांत आणि लिहिण्यांतही होतो; परंतु 'व' याचा उपयोग रोखे, दस्तऐवज, वगैरे कागदपत्रांत विशेष होतो असें

दिसतें. साध्या बोलण्यांत 'व'–पेक्षां 'आणि'–चा उपयोग विशेष होतो. असा भेद होण्याचें कारण असें दिसतें कीं, 'आणि' हें मूळ संस्कृत सर्वनाम 'अन्यत्' यापासून झालें असून 'व' हें मूळचें फारशी भाषेंतलें आहे. आणि बरेच दिवसपर्यंत पत्रें, यादी, रोखे, दस्तऐवज, वगैरे कागद त्याच भाषेंत ( फारशींत ) लिहीत असल्यामुळें व पुढें मराठींतही त्याच भाषेच्या धर्तीवर लिहिण्याची पद्धत पडल्यामुळें 'व'–चा लेखी भाषेंत स्वाभाविकपणें विशेष उपयोग सुरू झाला.

टीप—बोलण्यांत 'आणि' याचीं 'आणि,' 'अन्' व 'न' अशींही रूपें होतात. उदा०—'तूं जा आणि त्याला सांग कीं—' 'रामा अन् मी–' 'तो न मी–' इ०.

( आ ) मराठींत विरामचिन्हें घालूं लागण्याचे अगोदर 'आणि,' 'किंवा,' 'व' यांनीं जोडावयाच्या प्रत्येक शब्दाचे किंवा वाक्याचे नंतर हीं अव्ययें पुनः पुन्हां घालीत असत. संस्कृतांतलि समुच्चयवाचक अव्यय जें 'च' त्याचे संबंधानेंही त्या भाषेंत असाच नियम आहे. परंतु आतां फक्त दोन शब्द किंवा वाक्यें जोडावयाचीं असल्यास शेवटच्या शब्दाच्या किंवा वाक्याच्या अगोदर एक वेळ मात्र हें अव्यय घालून मध्यंतरीं प्रत्येक शब्दाचे किंवा वाक्याचे पुढें स्वल्पविरामाचें चिन्ह (,) घालितात.

( इ ) एकामागून एक झालेल्या गोष्टी एकदम सांगावयाच्या असतां पुष्कळदां हीं अव्ययें न घालितां एकसारखी हकीगत सांगत जातात; किंवा सांगावयाच्या प्रत्येक गोष्टीकडे ऐकणाऱ्याचें विशेष लक्ष जावें, असा उद्देश असतांही तसें करितात. उदा०—'यमनी मैनेस पिंजऱ्यांत घालून, साऱ्या घरभर फिरवून, आईस, बापास, भावास, चाकरांस, दाखवीत सुटली.' इ०.

( ई ) 'आणि' किंवा 'व' यांनीं जोडावयाचे शब्द व्याकरणदृष्ट्या एकाच जातीचे, एकाच योग्यतेचे, किंवा एकाच रूपाचे असावे. दोन निर-निराळ्या विभक्तींत असलेले शब्द, किंवा दोन भिन्न जातीचे ( उदा०—एक विशेषण व एक नाम असे ) शब्द 'आणि' किंवा 'व' यानें जोडतां येणार नाहींत. उदा०—'हरी आणि रामानें हें काम केलें.' असें म्हणतां येणार नाहीं. तर 'हरीनें आणि रामानें' किंवा 'हरी आणि रामा यांनीही

काम केलें, ' असें म्हटलें पाहिजे. त्याचप्रमाणें ' चांगला आणि हरी, ' असें न म्हणतां ' चांगला मुलगा आणि हरी, ' असें म्हणावे. तसेंच ' रामा आणि गोविंदास,' ' विष्णू आणि त्रिंबकानें, ' असें म्हणणें अशुद्ध आहे. तर ' रामास आणि गोविंदास, ' किंवा ' रामा आणि गोविंदा यांस, ' तसेंच ' विष्णूनें आणि त्रिंबकानें, ' किंवा ' विष्णू आणि त्रिंबक यांनीं, ' असे उपयोग प्रशस्त व शुद्ध होत.

५१४. **पण** आणि **परंतु**—( १ ) ' पण ' आणि ' परंतु ' यांचा अर्थ सारखाच आहे. तथापि ' पण ' याचा ' असें असूनही, ' किंवा ' सुद्धां ' असा दुसरा एक अर्थ आहे. उदा०—' तो आला, पण (म्हणजे तो आला असूनही) रामा त्यास भेटला नाहीं. ' ' तूं पण ये, ' म्हणजे ' तूं सुद्धां ये. ' इ०.

( अ ) ' पण ' व ' परंतु ' यांनीं जोडावयाचीं जीं दोन वाक्यें, त्यांपैकीं एक अकरणरूपी व दुसरें करणरूपी असलें, किंवा त्या दोहोंचा एकमेकांच्या विरुद्ध अर्थ असला, तर हीं अव्ययें गुप्त असतात. उदा०—' विष खाल्यानें मनुष्य वांचणार नाहीं, मरेल. ' इ०.

( आ ) अशा वाक्यांत क्वचित् ' आणि ' किंवा ' व ' घातल्यानें समुच्चयाचा अर्थ येऊन आणखी ' पण ' आणि ' परंतु ' यांचाही अर्थ येतो. उदा०—' मुलगा अशक्त आणि निरोगी आहे. ' ' तो जमदग्नि आणि ती चिडखोर मग काय ! ' इ०.

५१५. ' **जर** ' आणि ' **तर** '—( अ ) यांवरून संकेतार्थाचा बोध होतो. म्हणजे ' जर ' आणि ' तर ' यांनीं जोडलेल्या दोन वाक्यांतील एक वाक्य अर्थाला दुसऱ्यावर अवलंबून असतें. उदा०—' जर तूं घरीं आलास तर मी येईन. ' इ०.

( आ ) वाक्यांत पुष्कळदां या दोन अव्ययांपैकीं एक घालून दुसरें गुप्त ठेवितात. बहुधा ' जर ' हें गुप्त ठेवण्याचा विशेष प्रघात आहे.

( इ ) ' जर ' आणि ' तर ' यांचा ज्या वाक्यांत उपयोग असतो, त्यांतील क्रियापद भूतकाळीं किंवा भविष्यकाळीं असलें, तर संकेत, आज्ञा, किंवा ताकीद, अशा अर्थाचा बोध होतो. उदा०—तूं येथून हाललास किंवा हालशील तर खबरदार. ' इ०.

( ई ) वाक्यांत भूतकाळीं क्रियापद असतां ' जर ' आणि ' तर ' यांवरून कल्पना, अजमास, किंवा अनुमान ध्वनित होतें. उदा०–' तो माझे घरावरून गेला तर मजकडे येईल ' इ०. अशा ठिकाणीं 'तर ' याबद्दल क्वचित् 'म्हणजे-' ही घालितात.

( उ ) ' जर ' आणि ' तर ' या प्रत्येकांत ' ही ' मिळून ' जरी ' आणि ' तरी ' अशीं रूपें होतात. त्याचा अर्थ असा असतो कीं, पहिल्या वाक्यांतील गोष्ट घडली आहे, असें बोलणारास ठाऊक आहे, किंवा त्यांतील आशय त्यास कबूल आहे, अथवा त्या वाक्यांतील गोष्ट खरी आहे, असें गृहीत धरून तो बोलत आहे. ' जर ' आणि ' तर ' यांमध्यें तसा अर्थ नसतो. तीं वाक्यांत असलीं म्हणजे पहिल्या वाक्यांतील अर्थ खरा असेल तर दुसऱ्यांतील खरा मानावयाचा असतो. उदा०—' जर तो माझा स्नेही असेल, तर माझें काम करील. ' या वाक्यांत ' काम करणें ' ही गोष्ट ' स्नेही असणें किंवा नसणें, ' यावर अवलंबून आहे. परंतु ' जरी तो माझा स्नेही आहे, तरी मी त्यास पैसे देणार नाहीं. ' यांत ' तो स्नेही आहे ' ही गोष्ट बोलणारास मान्य आहे; पण तसें असूनही मी त्यास पैसे देणार नाहीं, असें त्याचें म्हणणें आहे.

( ऊ ) ' जर-तर ' आणि ' जरी-तरी ' यांच्या अर्थामध्यें जरी असा फरक आहे, तरी दोहोंपासूनही संकेताचा बोध सारखाच होतो उदा०—' इतकें मीं सांगितलें, तरी त्यानें माझें ऐकलें नाहीं. ' ' जरी त्याची मुद्रा खिन्न झाली होती, तरी त्या मुलाचे ते मौजेचे शब्द ऐकून त्यास हंसूं आलें. ' इ०.

( ए ) ' जरी–तरी ' यांबद्दल ' यद्यपि–तथापि ' हीं घालितात. उदा०—' जरी तुम्ही असें सांगता, तरी तो लबाड आहे या म्हणण्यावर माझा विश्वास अजून बसत नाहीं; ' किंवा ' यद्यपि तुम्ही असें सांगतां तथापि तो लबाड आहे या म्हणण्यावर माझा विश्वास अजून बसत नाहीं. '

( ए ) ' जरी ' आणि ' तरी ' यांचा जो अर्थ गद्यांत असतो, तोच पद्यांतही असतो; परंतु कवितेंत जुळणीकरितां क्वचित् ' जर–तर ' यांचेबद्दलच ' जरी–तरी ' अशीं रूपें घालितात; तरी पण त्यांच्या अर्थामध्यें कांहीं फरक होत नाहीं.

( ओ ) भूतकाळीं क्रियापदाचे रूपास ' यास ' किंवा ' यानें ' जोडल्यानें अथवा तशा क्रियापदाचे रूपापुढें ' म्हणजे ' घातल्यानें ' जर–तर यांचा अर्थ येतो; आणि त्या प्रत्येकापुढें आणखी ' ही ' हें अव्यय घातल्यास 'जरी–तरी ' यांचा अर्थ येतो. उदा०–' असें केल्यासही किंवा असें केल्यानेंही किंवा असें केलें म्हणजेही त्यास संतोष होईल. ' इ०.

---

# प्रकरण २८.



## विरामचिन्हें.

५१६. वाक्य उच्चारितांना मध्यें विश्रांति मिळावी, व वाक्याचा अर्थ वाचकांच्या लक्षात बरोबर यावा, म्हणून वाक्याचे किंवा वाक्यावयवाचे विभाग करितात. त्या निरनिराळ्या विभागांच्या ठिकाणीं कमीजास्ती वेळ थांबावयाचें असतें. हीं विश्रांतीचीं भिन्न भिन्न स्थानें वाचकांना समजावीं, आणि कोणत्या ठिकाणीं किती वेळ थांबावयाचें हें त्यांच्या लक्षांत यावें, म्हणून कांहीं ठरीव खुणा किंवा चिन्हें करितात. त्यांस **विरामचिन्हें** असें म्हणतात.

टीप—पूर्वी मराठी भाषेंत अशा प्रकारचीं कांहीं चिन्हें नसत. अलीकडे तीं इंग्रजी भाषेवरून मराठी गद्य–भाषेंत घेतलीं आहेत; व पद्यांतही तीं घेण्याचा प्रघात पडला आहे.

५१७. मुख्य विरामचिन्हें हीं आहेतः—१ स्वल्पविराम [ , ], २ अर्धविराम [ ; ], ३ अपूर्णविराम [ : ], ४ पूर्णविराम [ . ], ५ प्रश्नचिन्ह [ ? ], ६ उद्गारचिन्ह [ ! ], ७ अपसारणचिन्ह [ — ], ८ कंस ( ) किंवा [ ], ९ विग्रहचिन्ह [ - ], आणि १० अवतरणचिन्हें [ ' ' किंवा " " ].

५१८. **स्वल्पविरामः**—( अ ) स्वल्पविरामाची योजना पुढील ठिकाणीं करितातः—[ १ ] एकाच जातीचे दोहोंपेक्षां ज्यास्त शब्द जोडावयाचे असतां; मात्र अशा ठिकाणीं शेवटच्या दोन शब्दांमध्यें समुच्चयवाचक अव्यय असतें. [ २ ] भिन्न जातींचे शब्द निरनिराळे करावयाचे असतां; [ ३ ] लांब वाक्य असल्यास मध्यें थांबतां यावें म्हणून; ( ४ ) निरनिराळ्या पोट वाक्यांचा

अर्थ चटकन लक्षांत यावा, त्यांचा गोंधळ होऊं नये, म्हणून तीं एकमेकांपासून वेगळीं करण्याकरितां; इत्यादि. उदा०—'रामा, गोविंदा व कृष्णा, तशीच मनी, हीं त्यांचीं मुलें आहेत.' 'जमिनीवर, घरांवर आणि झाडांवर बर्फ पडलें होतें.' 'अशा प्रकारें मोठ्या त्वरेनें तो जात असतां, त्याचा चाकर त्यास वाटेंत भेटला.' 'जो मनुष्य एकदां खोटें बोलला असेल, त्याच्यावर कोणी पुन्हां विश्वसत नाहीं, हें साहजिक आहे.' इत्यादि.

(आ) संबोधन विभक्तींत असणारें नाम वाक्यांतील इतर शब्दांपासून वेगळें दाखविण्याकरितां त्याच्यापुढें स्वल्पविराम योजितात. उदा०—'अरे रामा, तूं काल कोठें गेला होतास?' 'मुला, तुझें नांव काय?' इ०.

(इ) गौणवाक्यें मुख्य वाक्यांपासून स्वल्पविरामानें वेगळीं करितात. उदा०—'मला ठाऊक नाहीं, असें तो म्हणाला.' इ०.

**टीप**—गौणवाक्यें नेहमींच अशा रितीनें निराळीं करीत नाहींत. अर्थ विशेष स्पष्ट करण्याची जरूरी असली तर मात्र तसें करितात.

(ई) जर वाक्यांत अनेक कर्ते किंवा कर्तृपदें, अनेक कर्मपदें, अथवा व्याकरणदृष्ट्या एकाच प्रकारचे अनेक शब्द एकामागून एक असे आले, तर प्रत्येकाचे पुढें स्वल्पविराम घालितात. उदा०—'रामा, गोविंदा, कृष्णा व गोपाळा, यांनीं कुत्रा, कोंबडा, मांजर व हत्ती पाहिला.' 'हरीस लिहितां, वाचतां, घोड्यावर बसतां, चित्रें काढतां, गातां व हिशोब करितां येतात.' इत्यादि.

(उ) प्रथमा किंवा द्वितीया विभक्तींतला एक शब्द प्रथम येऊन पुढील शब्द उद्देशार्थी प्रथमा किंवा द्वितीया विभक्तींत आला, तर त्या दोन्ही शब्दांपुढें स्वल्पविराम घालितात; बाकी असा प्रचार विशेष आहे असें नाहीं. उदा०—'मुसलमानांचा पैगंबर, महमद, अबरस्तानांत जन्मला.' 'हरीचा भाऊ, रामा, यास बोलाव.' इ०.

(ऊ) नामवाक्याचे आरंभीं असणारें 'कीं' याचे अगोदर स्वल्पविराम घालितात. तें अव्यय वाक्यांत क्वचित् गुप्त असलें, तरीही स्वल्पविराम येतो. उदा०—'तो म्हणाला, [कीं] मी उद्यां येईन.' इ०.

**टीप**—स्वल्पविराम योजण्याचे संबंधानें साधारणतः असा नियम ठेवावा, कीं त्याच्या योगानें भिन्न केलेले शब्द किंवा वाक्यें एकाच प्रकारचीं असावीं.

भिन्न प्रकार सांगावयाचे असतां समुच्चयार्थक किंवा इतर अव्ययांचा उपयोग करावा किंवा निरनिराळीं वाक्यें करावीं, हें वाक्यरचनेच्या व्यवस्थेस योग्य आहे.

५१९. **अर्धविरामः**—( अ ) स्वल्पविरामानें जोडावयाचीं वाक्यें मोठीं असलीं, किंवा अगोदर एकदोनदां स्वल्पविराम येऊन गेला असला, तर अर्धविराम योजितात. उदा०—'तूं आपल्या अभ्यासाबद्दलचा दाखला, बापापासून वर्तणुकीबद्दलचा दाखला, व शाळेतून आपल्या परीक्षेच्या मार्कांचें पत्रक भरून आण; मग पाहतां येईल तुला जागा देण्याचें.'

( आ ) निरनिराळ्या वाक्यांवर जोर देण्याकरितां, किंवा पुढील वाक्यांत सांगावयाच्या कारणाचें अनुमान करितां यावें म्हणून अर्धविराम घालितात. उदा०—'मी गांवीं जातांच अगोदर रावसाहेबांना भेटलों; नाहीं तर त्यांची तब्यत जायची एखादी!' इ०.

( इ ) वाक्य जरी पूर्ण झालें, तरी पुढील वाक्याशीं त्याच्या अर्थाचा निकट संबंध असल्यास अर्धविराम देतात.

५२०. **अपूर्णविरामः**—साधारणपणें अर्धविरामाचे ठिकाणीं अपूर्णविराम घालितात.

( अ ) पहिल्या विधानाच्या स्पष्टीकरणार्थ, किंवा पुष्टीकरणार्थ दुसरें विधान करावयाचें असतां अपूर्णविराम योजितात. उदा०—'आतां आम्हांस येथें मुक्काम केलाच पाहिजेः पुढें गेलों तर रात्र होईल.' इ०.

( आ ) अवतरण द्यावयाचें असतां, किंवा एखाद्या नियमाचें उदाहरण सांगावयाचें असतां, पहिल्यानें अपूर्णविराम घालून पुढें अवतरण किंवा उदाहरण देतात. अशा ठिकाणीं अपूर्णविरामाचे पुढें अपसारणचिन्हही घालितात. उदा०—"तुकाराम म्हणतोः—'त्याची ( परमेश्वराची ) कोण जाणे कळा, वागवी पांगुळा पायांवीण.'" "विशेषणाचा पुष्कळदां नामाप्रमाणें उपयोग करितात. जसें:—'कोणा शहाण्यास बोलाव.'" इ०

५२१. **पूर्णविरामः**—वाक्य पूर्ण झालें, अर्थही पुरा झाला, व पुढील वाक्याच्या अर्थाशीं त्याचा विशेष निकट संबंध नसला, म्हणजे तेथें पूर्णविराम देतात.

५२२. **प्रश्नाचिन्हः**–ज्या वाक्यांत प्रश्न असतो त्याचे शेवटीं हें योजितात. उदा०–‘ रामा आज आला काय ? ’

५२३. **उद्गारचिन्हः**—हर्ष, आनंद, भीति, चमत्कार, इत्यादि मनोविकारांचा आकस्मिक भाव व्यक्त करणाऱ्या शब्दांपुढें किंवा वाक्यांपुढें हें चिन्ह देतात. उदा०— ‘ वाहवा ! ’ ‘ शाबास ! ’ ‘ अरेरे ! ’ ‘ ओहो ! ’ ‘ अहाहा ! काय चांदणें स्वच्छ पडलें आहे ! ’ ‘ वारा किती गार येतो आहे पण ! ’ ‘ वाः ! मोठेच शहाणे आपण ! ’ ‘ हाय हाय ! आतां आमचें कसें होईल ? ’ इ०.

५२४. **अपसारणचिन्हः**—पूर्वी सांगितलेली गोष्ट ज्यास्त स्पष्ट करावयाची असतां किंवा सांगत असलेली गोष्ट जरा एकीकडे ठेवून मध्येंच आठवलेली दुसरी गोष्ट अगोदर सांगावयाची असतां हें चिन्ह घालितात. याच्या अगोदर स्वल्पविराम किंवा अर्धविराम देण्याची चाल आहे. उदा०—‘ रामा असें म्हणाला असेल खचित;—तो इतका दांडगा आहेच. ’ ‘ रात्र निरभ्र व शांत होती.–शरदृतूंतीलच रात्र ती ! ’ इ०.

५२५. **कौंसः**—वाक्यांतील अर्थ स्पष्ट करण्यासाठीं मध्येंच जेव्हां एकादें प्रक्षिप्त वाक्य किंवा शब्द घालावयाचा असतो, व जेव्हां तें वाक्य किंवा तो शब्द गाळिला असतां पूर्व वाक्याचे अर्थास तादृश धक्का पोंचत नाहीं, तेव्हां तें वाक्य किंवा तो शब्द कंसांत घालितात. कौंस वाटोळा ( ) असा किंवा चौकोनीही [ ] असा करितात. क्वचित् वाक्य किंवा शब्द कौंसांत घालण्याचे ऐवजीं त्याचे आरंभीं व शेवटीं अपसारणचिन्हही घालितात. उदा०—‘ हवेंत भरपूर असणारा हा वायु ( ज्यास ‘ प्राणवायु ’ असें अन्वर्थक नांव दिलें आहे तो ) मनुष्याच्या जीवनास अत्यंत जरूरीचा आहे. ’ ‘ राज्याचा खरा वारस शिवाजी ( संभाजीचा मुलगा ) हा त्या वेळीं सहा वर्षांचा होता, म्हणून राजाराम हा राज्याधिकारी--राज्यव्यवस्था पाहणारा--म्हणून कारभार करूं लागला. ’ इ०.

५२६. **विग्रहचिन्हः**—सामाजिक शब्दाचे अवयव जोडावयाचे असतां त्यांमध्यें, किंवा ओळीचे शेवटीं एखादा शब्द अर्धाच तुटला असतां त्यापुढें हें चिन्ह योजितात. जसें–‘ राज्य–वियोग ’ ‘ दाय–भाग, ’ ‘ सुवर्ण–कांत, ’ ‘ धनुष्य -बाण, ’ ‘ वाग्–बाण, ’ इ०.

५२७. **अवतरणचिन्हें**:—एकादा लेख किंवा ग्रंथ लिहितांना दुसऱ्या एखाद्या ग्रंथकाराच्या पुस्तकांतून एकादें वाक्य किंवा वाक्यें जशींच्या तशींच मध्यें घातलीं, किंवा एखाद्याच्या भाषणांतील कांहीं भाग जशाचा तसा मध्यें दिला, किंवा दुसऱ्याच्या तोंडचे शब्द अगदीं बरोबर सांगावयाचे असले, म्हणजे अशा उताऱ्याच्या आरंभीं व शेवटीं [ " " ] अशीं किंवा [ ' ' ] अशीं चिन्हें करितात, त्यांस अवतरणचिन्हें असें म्हणतात. एक शब्द किंवा एखादें लहानसेंच वाक्य उताऱ्यांत घेतलें असल्यास एकेरी चिन्ह करितात; अथवा वाक्यांत एकादा शब्दच इतर शब्दांहून निराळा दाखवावयाचा असतांही त्या शब्दाला हें एकेरी चिन्हच घालितात. उदा०—'रामा म्हणाला, " मी खचित तुझ्याबरोबर येणार नाहीं. " ! ' " ऊन " हा कृदन्ताचा एक प्रत्यय आहे. ' " नाम " म्हणजे पदार्थमात्राचें नांव.' इ०.

५२८. कवितेंत पद्याचा एक चरण संपल्यावर त्याच्यापुढें एक [ । ] अशी उभी रेघ, दुसऱ्या चरणाचे शेवटीं दोन उभ्या रेघा [ ॥ ], तिसऱ्या चरणाचे शेवटीं पुन्हा एक उभी रेघ [ । ] आणि पद्य संपल्यावर चौथ्या चरणाचे शेवटीं दोन दोन उभ्या रेघा आणि त्यांचेमध्यें पद्याचा आंकडा [ ॥ १ ॥ ] घालून विरामचिन्हें दाखविण्याची जुनी चाल आहे. उदा०:—

" स्वामी मातें नेति गोदावरीतें ।
यद्वार्तेही चित्त मोदा वरीतें ॥
भावोर्जीनीं निर्मिली पर्णशाला ।
तैसें दे ना रत्न वा स्वर्ण शाला ॥ १ ॥ "

[ अ ] क्वचित् पहिल्या व तिसऱ्या चरणांचे शेवटीं उभी रेघ न देतां स्वल्पविराम देतात, दुसऱ्या चरणाचे शेवटीं दोहोंच्या ऐवजीं एक रेघ देतात, व पद्याचे शेवटीं दोन दोन रेघांमध्यें किंवा नुसताच पद्याचा आंकडा घालितात. विरामचिन्हें उपयोगांत आल्यापासून ही रेघांची चाल मागें पडत चालली आहे.

# प्रकरण २९.



## वाक्यपरिच्छेद.

५२९. ' परिच्छेद ' याचा अर्थ ' फोड करणें ' असा आहे. व्याकरणांत हा शब्द अनेक ठिकाणीं लावतां येण्यासारखा आहे. उदा०—संधिपरिच्छेद ( जसें,–रामाश्रय=राम+आश्रय ); समासपरिच्छेद ( जसें,–चक्रपाणि=चक्र आहे पाणच्या ठायीं म्हणजे हातीं ज्याच्या तो; याला विग्रह म्हणतात ); शब्दपरिच्छेद म्हणजे शब्दांतील उपसर्ग, मूळ शब्द आणि प्रत्यय यांची फोड करणें ( जसें,–अनुकरणीय=अनु–उपसर्ग+कर ' कृ ' धातूपासून कर+अनीय-प्रत्यय ); वाक्यपरिच्छेद; इ०. या ठिकाणीं आपल्यास वाक्यपरिच्छेदाचा विचार कर्तव्य आहे.

५३०. ' वाक्यपरिच्छेद ' म्हणजे एखादें वाक्य घेऊन त्याचे निरनिराळे अवयव व त्या अवयवांचा परस्परसंबंध, याची व्यवस्थित रितीनें फोड करून सांगणे.

५३१. वाक्यांचे तीन प्रकार आहेतः—( १ ) **शुद्धवाक्य**, ( २ ) **मिश्रवाक्य** आणि ( ३ ) **संयुक्तवाक्य**.

**टीप**—मिश्रवाक्य आणि संयुक्तवाक्य असे निराळे भेद न मानितां शुद्ध आणि मिश्र असे दोनच भेद मानावे, हें वास्तविक योग्य आहे. परंतु ही गोष्ट अजून मान्य झाली नाहीं.

( अ ) शुद्ध-वाक्याचा परिच्छेद करणें म्हणजे उद्देश्य,उद्देश्यविस्तार, विधेय, कर्म किंवा विधेयपूरक आणि विधेयविस्तार, इत्यादि जे त्याचे निरनिराळे अवयव किंवा भाग असतात, ते व्यवस्थित रितीनें वेगळे करून दाखविणें होय.

( आ ) मिश्र किंवा संयुक्त वाक्याचा परिच्छेद करणें म्हणजे त्याचीं घटक वाक्यें वेगळीं करून त्यांचा परस्परसंबंध सांगणें व त्या प्रत्येक घटक वाक्याचे शुद्ध वाक्याप्रमाणें निरनिराळे विभाग किंवा अवयव वेगळे वेगळे करून दाखविणें होय.

५३२. आपण आतां शुद्धवाक्याच्या परिच्छेदाचा विचार करूंः—

(१) प्रथमतः शुद्धवाक्याचे उद्देश्यांग आणि विधेयांग असे दोन मुख्य भाग असतात. उद्देश्याचे जे कांहीं संबंधी-शब्द असतात त्यांना उद्देश्य-विस्तार असें म्हणावें.

(२) विधेय जर सकर्मक क्रियापद असेल, तर त्याला कर्म किंवा विधेय-पूरक असतें. आणखी शिवाय विधेयाचे संबंधी शब्द असतात त्यांना विधेय-विस्तार असें म्हणतात. उद्देश्याचे जसे संबंधी शब्द असतात तसेच कर्माचेही असतात; त्यांना कर्मपद-विस्तार असें म्हणतात. हीं सर्व शुद्ध वाक्याचीं अंगें होत.

(३) तेव्हां शुद्ध वाक्याचे निरनिराळे अवयव असे होतातः—

(अ) उद्देश्य. जसें,–'**पक्षी** घरटें बांधितो.'

(आ) उद्देश्यविस्तार. जसें, **मोठा** पक्षी घरटें बांधितो.'

(इ) विधेय. जसें,–' पक्षी घरटें **बांधितो.**'

(ई) विधेयविस्तार. जसें,–' पक्षी **उंच वृक्षावर** घरटें बांधितो.'

(उ) कर्म. जसें,–' पक्षी **घरटें** बांधितो.'

(ऊ) कर्मपदविस्तार. जसें,–' पक्षी **आपलें सुंदर** घरटें बांधितो.'

आतां हें सर्व वाक्य असें झालें:—' मोठा पक्षी आपलें सुंदर घरटें उंच वृक्षावर बांधितो.'

(४) वाक्यांतील क्रियापद जर बनणें, असणें, होणें, लागणें, शोभणें, इत्यादि धातूंचें रूप असेल, तर त्याच्या बरोबर त्याचा अर्थ पूर्ण करण्या-करितां एक किंवा अनेक शब्द येतात; नाहीं तर विधेयाचा अर्थ पूर्ण होत नाहीं. अशा शब्दाला किंवा शब्दांना विधेयपूरक असें म्हणावें. उदा०–'तो **हरीचा भाऊ** आहे.' 'विष्णू त्याचा **चाकर** झाला.' 'तो अलीकडे **साधू** बनला आहे.' 'तो **माझा मामा** लागतो.' 'तूं **गोविंदाचा सोबती** शोभतोस.' इ०.

**टीप**—वाक्यपरिच्छेदांत क्रियापद व विधेयपूरकें मिळून विधेय होतें, हें लक्षांत ठेवावें, म्हणजे वरील उदाहरणांत अशीं विधेयें होतातः—' हरीचा

भाऊ आहे.' 'त्याचा चाकर झाला.' 'साधु बनला आहे.' 'माझा मामा लागतो.' 'गोविंदाचा सोबती शोभतोस.'

(५) विधेय—हें क्रियापद असतें; अथवा तें अनेक शब्दांचें झालें असल्यास, त्यांपैकीं एक शब्द क्रियापद असला पाहिजे. तेव्हां वाक्यांत क्रियापद हा सर्वांत महत्त्वाचा शब्द होय. म्हणून वाक्यपरिच्छेद करितांना क्रियापद म्हणजे विधेय शोधून काढणें, हें पहिलें काम असतें. वाक्यांत दुसरा महत्त्वाचा शब्द म्हटला म्हणजे उद्देश्य होय. उद्देश्य म्हणजे ज्याविषयीं किंवा ज्याला उद्देशून आपण बोलतों तें. क्रियापद सकर्मक असल्यास त्याला कर्म असतें. नंतर वाक्यांतील हे जे निरनिराळे मुख्य अवयव सांगितले, त्यांचे प्रत्येकाचे जर कांहीं संबंधी शब्द असतील, तर ते शोधून काढावयाचे.

(६) उद्देश्य व कर्म हीं नामें, सर्वनामें, किंवा नामांचें कार्य करणारे इतर शब्द असतात. विशेषणें बहुधा कांहीं तरी विशेष सांगतात, म्हणून तीं उद्देश्यविस्तार व कर्मपदविस्तार होतात. विशेषण-वाक्यें आणि विशेषण-वाक्यांश यांचाही तसा उपयोग करितात. त्याचप्रमाणें विधेय-विस्तार हा क्रियाविशेषणें, अव्ययवाक्यें व अव्ययवाक्यांश यानीं झालेला असतो.

(७) कर्तरिवाक्यांत क्रियेचे कर्तृत्व दाखविणारा जो शब्द असतो, तोच उद्देश्य असतो; कर्मणिवाक्यांत कर्मपद उद्देश्य होतें; व भावेप्रयोग असता वाक्यांत उद्देश्य नसतें. उदा०—

कर्तरिप्रयोगः—'रामा पुस्तक वाचितो.' [ उद्देश्य 'रामा' ].

कर्मणिप्रयोगः—' रामानें पुस्तक वाचिलें. [ उद्देश्य 'पुस्तक,' तें मूळचें कर्म; 'रामानें' हें कर्तृपद. ]

भावेप्रयोगः—' रामानें रावणास मारिलें. ' उद्देश्य नाहीं. रामानें हें कर्तृपद आणि रावणास हें कर्म. 'मारिलेलें आहे,' असें करून मारिलेलें [ असें ] हें उद्देश्य होईल.

५३३. आतां अगदीं सोपीं अशीं शुद्ध-वाक्यांचीं उदाहरणें घेऊं:—

| | |
|---|---|
| तारे चकाकतात. | ती ओरडली. |
| पुस्तक उपयोगी आहे. | सूर्य मावळला. |
| पाऊस पडत आहे. | चंद्र उगवेल. |

(अ) या वाक्यांत उद्देश्य व विधेय यांशिवाय कांहीं नाहीं. कोष्टक मांडून यांचा परिच्छेद असा करावा:—

| उद्देश्य | विधेय | उद्देश्य | विधेय |
|---|---|---|---|
| तारे | चकाकतात | ती | ओरडली |
| पुस्तक | उपयोगी आहे | सूर्य | मावळला |
| पाऊस | पडत आहे | चंद्र | उगवेल |

(ब) आतां ज्यांत कर्मपद आहे अशीं वाक्यें घेऊं:—

तो घर विकतो.
गाय गवत खाईल.
विष्णू बक्षीस मिळवील.
तो दुःख करितो.
लोक विहिरी खणतात.
पक्षी घरटीं बांधितात.

| उद्देश्य | कर्म | विधेय | उद्देश्य | कर्म | विधेय |
|---|---|---|---|---|---|
| तो | घर | विकतो | तो | दुःख | करितो |
| गाय | गवत | खाईल | लोक | विहिरी | खणतात |
| विष्णू | बक्षीस | मिळवील | पक्षी | घरटीं | बांधितात |

(क) पुढील उदाहरणांत विधेय-पूरकें विधेयाबरोबर घ्यावयाचीं. कधीं असल्या क्रियापदांना कर्मे व विधेय-पूरकें अशीं दोन्ही असतात. उदाहरणें:—

| उद्देश्य | कर्म (असेल तर) | पूरकासह विधेय |
| --- | --- | --- |
| औरंगजेब | ——— | प्रबळ बादशहा झाला |
| वैद्य | त्यास | बरा करील |
| तो | ——— | मोठ्यानें बोलत होता |
| मुलगा | धडा | म्हणत होता |
| आम्ही | त्याला | इमानी समजलों |
| लोक | त्यास | राजा करतील |
| हरि | ——— | साधू बनला |
| मी | तें पुस्तक | त्याच्या स्वाधीन करीन |
| तो | आपलें काम | करून टाकितो |
| विठू | पुस्तक | हातीं देईल |

**टीप**—संयुक्त क्रियापदें होण्याकरितां क्रियापदांबरोबर जे शब्द येतात, ते पूरकाप्रमाणेंच होत. उदा०—' **पाठवून** देणें. ' ' **पायांत** घालणें. ' ' **गम** खाणें. ' ' **प्रगट** होणें. ' ' **गप्पा** मारणें. ' इ०.

( ड ) कर्मणि आणि भावी प्रयोगांच्या वाक्यांचा परिच्छेद असा करावा.

**कर्मणिप्रयोग.**

| कर्तृपद | उद्देश्य | विधेय |
| --- | --- | --- |
| हरीनें | पत्र | लिहिलें |
| मीं | हें | वाचिलें आहे |
| मला | काम | करवेल |
| आमच्यानें | पुस्तक | वाचवणार नाहीं |

## भावेप्रयोग.

| कर्तृपद | कर्मपद | विधेय |
| --- | --- | --- |
| रामानें | रावणास | मारिलें |
| मुलांनीं | ——— | खेळावें |
| तुम्हीं | त्यास | धाडावें |
| तुम्हांला | ——— | बसवतें |

**टीप**—हें लक्षांत ठेवावें, कीं कर्मणिप्रयोगांत कर्म उद्देश्य होतें, व भावेप्रयोगांत उद्देश्य मुळींच असत नाहीं; आणि कर्तरिप्रयोगांत उद्देश्य असणारा जो मूळ क्रियेचा कर्ता तो ( कर्मणि व भावी ) दोन्ही प्रयोगांत कर्तृपद होतो. हे कर्तृपदवाचक शब्द विधेय-विस्तारांत घालावे.

५३४. पुढील वाक्यांतील जाड अक्षरांतले शब्द विधेय-विस्तार समजावेः—

( १ ) क्रियाविशेषण,–'तो **लौकर** येईल.'

( २ ) नामांचीं सविभक्तिक रूपें,—'तो **रागानें** किंवा **जलदीनें** गेला.' 'मी **रविवारीं** येईन.' 'तो **वर्षभर** पुण्यास होता.' '**तुझ्यापुढें** कोण बोलेल?' इ०.

( ३ ) धातुसाधित अव्ययें,–' मीं तो धडा **वाचून** टाकला.' 'मी त्याला **असें सांगून** चुकलों.' इ०.

( ४ ) अव्ययवाक्यें किंवा अव्ययवाक्यांशः—[ १ ] '**जेथें तो असेल** तेथें मनुष्य पाटवा.' [ २ ] '**तूं घरीं नसतां**, मी येणार नाहीं.' इ०.

**टीप**—प्रथमा व द्वितीया विभक्तींशिवाय बाकी सर्व विभक्तींचीं रूपें क्रियाविशेषणांप्रमाणें मानून, वाक्यपरिच्छेद करितांना तीं विधेयविस्तारांत घालावीं.

वाक्यांतील अर्थान्वयें त्यांवरून काळ, स्थळ, रीत, संकेत, साधन, कारण, साहित्य, इत्यादींचा बोध होईल.

५३५. आतां बरींच कठीण अशीं शुद्ध वाक्यांचीं कांहीं उदाहरणें घेऊं:—

( १ ) चांगले विद्यार्थी रोज सकाळीं लवकर उठून आपला अभ्यास मन लावून करितात.

( २ ) त्याला असें म्हणावयास कांहीं योग्य कारण नाहीं.

( ३ ) त्या कडक पंतोजीनें उनाड मुलांस चांगला मार दिला.

( ४ ) असें बोलून तो लगेच चालता झाला.

( ५ ) गांवांतलीं गुरें सर्व मिळून रानांत जाऊन कोंवळा चारा यथेच्छ खातात.

( ६ ) मीं त्याला तें पुस्तक वाचावयास दिलें.

( ७ ) हरीनें आपल्या मुलास कामासाठीं गांवाला धाडिलें.

( ८ ) शहाण्या मुलांनीं आपले हातपाय स्वच्छ धुवावे.

( ९ ) देशांतिल लोकसंख्या कळण्यासाठीं देशाचें सरकार दर दहा वर्षांनीं सर्वांची शिरगणती करितें.

( अ ) या वाक्यांचा परिच्छेद करितांना, उद्देश्य, उद्देश्यविस्तार कर्म, कर्मपदविस्तार, विधेय, विधेयविस्तार व विधेयपूरक, असे त्यांचे निरनिराळे अवयव क्रमानें सांगावे; किंवा पुढील पृष्ठांत केल्याप्रमाणें कोष्टकरूपानें त्यांचा परिच्छेद करावा:—

( आ ) या वाक्यांचा कोष्टक करून परिच्छेद केला आहे, त्यामध्यें पुढील टीपांत सांगितलेली व्यवस्था लक्षात ठेवावी:—

**टीप १**—' कर्तृपद ' उद्देश्याचे सदरांत घातलें तरी चालेल. परंतु तें विधेयविस्ताराच्या सदरांत घालणें योग्य होय.

**टीप २**—अप्रत्यक्ष कर्मपद विधेयविस्तारांत घातलें तरी चालण्यासारखें आहे; त्याच्यापुढें ' अप्रत्यक्ष कर्म ' असें लिहावें.

**टीप ३**–विधिविशेषण क्रियापदाबरोबर घालावें; किंवा तें उद्देश्यविस्तारांत घालून त्याच्यापुढें ' विधिविशेषण ' असें लिहावें.

| वाक्यांक | उद्देश्य | त्याचा विस्तार | कर्म | त्याचा विस्तार | विधेय | त्याचा विस्तार |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | विद्यार्थी | चांगले | अभ्यास | आपला | करितात | रोज सकाळीं [ काल ]<br>लौकर उठून, मन लावून [ रीत ] |
| २ | कारण | कांहीं योग्य | . | . | नाहीं | त्याला असें म्हणावयास<br>[ कारण किंवा हेतु ] |
| ३ | मार | चांगला | . | . | दिला | उनाड मुलांस [ अप्रत्यक्ष कर्म ]<br>त्या कडक पंतोजीनें [ कर्तृपद ] |
| ४ | तो | . | . | . | चालता झाला | लगेच [ काळ ]<br>असें बोलून [ रीत ] |
| ५ | गुरें | गांवांतलीं | चारा | कोंवळा | खातात | १ सर्व मिळून<br>रानांत जाऊन, २ यथेच्छ [ रीत ] |
| ६ | पुस्तक | तें | . | . | दिलें | त्याला [ अप्रत्यक्ष कर्म ]<br>वाचावयास [ हेतु ]; मीं [ कर्तृपद ] |
| ७ | . | . | मुलास | आपल्या | धाडिलें | कामासाठीं [ हेतु ]<br>गांवाला [ स्थळ ]; हरीनें [ कर्तृपद ] |
| ८ | हातपाय | आपले | . | . | धुवावे | स्वच्छ [ रीत ]<br>शहाण्या मुलांनीं [ कर्तृपद ] |
| ९ | सरकार | देशाचें | शिरगणती | सर्वांची | करितें | देशांतील लोकसंख्या कळण्यासाठीं<br>[ हेतु ]; दर दहा वर्षांनीं [ काळ ] |

५३६. कांहीं वाक्यें शुद्धवाक्यांसारखीं दिसतात; त्यांत एकाच विधेयाला दोन निरनिराळीं उद्देश्यें असतात; पण क्रियापद मात्र एकदांच येतें. जसें,—'तो आणि मी उशिरां शाळेस गेलों.' 'कृष्णा किंवा गोविंदा येईल.' इ०.

(अ) हीं संक्षिप्त वाक्यें आहेत. यांचा परिच्छेद करितांना जरूर ते शब्द मध्यें घालून तीं पुरीं करून घ्यावीं, म्हणजे अव्ययांनीं जोडलेलीं अशीं दोन निरनिराळीं शुद्ध वाक्यें तयार होतील. अशा रितीनें त्या दोन वाक्यांनीं बनलेल्या संपूर्ण वाक्याचें संयुक्तवाक्य मानावें. जसें,—

(१) 'तो आणि मी उशिरां शाळेस गेलों,' म्हणजे 'तो उशिरां शाळेस गेला आणि मी उशिरां शाळेस गेलों.'

(२) 'कृष्णा किंवा गोविंदा येईल,' म्हणजे 'कृष्णा येईल किंवा गोविंदा येईल.'

(३) 'कृष्णा आणि गोविंदा येतील,' म्हणजे 'कृष्णा येईल आणि गोविंदा येईल.'

(४) बाजीराव आणि त्याचें सैन्य एक महिन्यानें नर्मदेवर जाऊन पोहोंचलें,' म्हणजे 'बाजीराव एक महिन्यानें नर्मदेवर जाऊन पोहोंचला, आणि त्याचें सैन्य एक महिन्यानें नर्मदेवर जाऊन पोहोंचलें.'

(ब) केव्हां दोन प्रथमान्त नामें 'आणि' या अव्ययानें जोडलेलीं असून त्यांमिळून एकच संयुक्त उद्देश्य होतें. जसें,—'माधव आणि रमा नवराबायको आहेत.' 'गोदी आणि बाळू बहीणभावंडें होतीं.' 'वरण आणि भात हें मुख्य अन्न मानिलें आहे.' 'या चित्रांत मनुष्यें आणि झाडें खुबीनें जुळवून घातलीं आहेत.' 'हा कुत्रा आणि हें मांजर जिवलग मित्र बनलीं आहेत.' हीं शुद्ध वाक्यें आहेत; आणि वरील (अ) कलमांत सांगितलेल्या उदाहरणांत क्रियापद जसें प्रत्येक कर्त्याबरोबर निरनिराळें करून घालतां येतें, तसें या उदाहरणांत घालतां येणार नाहीं.

५३७. **मिश्रवाक्यें**:—मिश्रवाक्यांत अनेक वाक्यें अव्ययांनीं जोडलेलीं असतात; पण त्या सर्वांत एकच प्रधान किंवा मुख्य वाक्य असून बाकीचीं सर्व वाक्यें अवलंबी किंवा गौण असतात. उदा०—'तो मला म्हणाला कीं, मी उद्यां सकाळीं तुझ्या घरीं येईन आणि मग काय व्यवस्था करावयाची ती

सांगेन.' यांत 'तो म्हणाला,' हें मुख्य किंवा प्रधान वाक्य आहे; आणि दुसरीं दोन वाक्यें अवलंबी किंवा गौण आहेत.

५३८. मिश्रवाक्यांत येणारीं गौण किंवा अवलंबी वाक्यें तीन प्रकारचीं असतातः—[ १ ] नामवाक्यें, [ २ ] विशेपण वाक्यें,–आणि [ ३ ] अव्यय वाक्यें.

( १ ) नामवाक्य नामाचें कार्य करितें; व तें क्रियापदाचा कर्ता किंवा कर्म असतें. तें जेव्हां कर्तृस्थानीं असतें तेव्हां त्याच्यापुढें 'हें' किंवा 'असें' हें सर्वनाम येतें: व जेव्हां तें कर्मपद असतें तेव्हां त्याच्यापूर्वी 'कीं' हें अव्यय किंवा त्याच्यापुढें 'असें' हें सर्वनाम येतें. उदा०—'तूं घरीं जावें, हें आतां बरें दिसतें' [ कर्ता ]. 'रामा म्हणाला कीं, मी आतां घरीं जाईन' [ कर्म ]. 'मी आतां घरीं जाईन, असें रामा म्हणाला.' [ कर्म ] इत्यादि.

( २ ) विशेषणवाक्याचा विशेपणासारखाच उपयोग असतो; त्याचे आरंभीं बहुधा संबंधी सर्वनाम असतें. जसें,—'जो मनुष्य मीं काल पाहिला, तो हाच होय.'

( ३ ) अव्ययवाक्य हें अव्ययाचें काम करितें; त्यावरून अव्ययाप्रमाणेंच काल, स्थल, रीत, संकेत, इत्यादींचा बोध होतो. त्याच्या आरंभीं कोणतें तरी अव्यय असते. उदा०–'जेव्हां तो तेथें गेला, तेव्हां काम झालें.' 'जर तो तेथें जाईल, तर काम होईल.' 'ज्या अर्थी तो तेथें आहे, त्या अर्थी काम होईल.' इ०.

**टीप**—मिश्रवाक्यांत गौणवाक्यांच्या आरंभीं येणारे अव्ययादि शब्द पुष्कळ वेळां गाळितात. उदा०—'तो म्हणाला, मी जाईन.' 'तो तेथें जाईल, तर काम होईल.' इ०.

५३९. **संयुक्तवाक्यें**:—[ अ ] दोन अथवा अधिक प्रधान वाक्यें उभयान्वयी अव्ययानें जोडून त्यांचें एक वाक्य बनविलें असलें, म्हणजे त्या एकंदर वाक्याला संयुक्तवाक्य असें म्हणतात.

( आ ) संयुक्त वाक्याचे घटकावयव पुढीलप्रमाणें असतातः—

[ १ ] दोन अथवा अधिक शुद्धवाक्यें; किंवा [ २ ] दोन अथवा अधिक मिश्रवाक्यें; किंवा [ ३ ] एक अथवा अधिक शुद्धवाक्यें व एक अथवा अधिक मिश्रवाक्यें; किंवा [ ४ ] एक अथवा अधिक शुद्धवाक्यें व एक अथवा अधिक संयुक्तवाक्यें. उदाहरणें:—

( १ ) 'तो तेथें आला आणि लगेच गांवाला निघून गेला.'

( २ ) 'तो म्हणाला, कीं मी घरीं जाईन, आणि बापाला तुझ्याबरोबर खेळायला जाऊं काय, म्हणून विचारीन.'

( ३ ) 'मला असें वाटतें, कीं जर तो चांगला अभ्यास करील, तर यंदांच परीक्षेंत पास होईल.'

( ४ ) 'तो असें म्हणाला आणि लगेच चालता झाला; कारण कीं त्याचे घरीं पाहुणे यावयाचे होते व लग्नसमारंभ व्हावयाचा होता.'

५४०. मिश्र किंवा संयुक्त वाक्याचें पृथक्करण किंवा परिच्छेद करितांना त्यांतील निरनिराळीं वाक्यें शोधून काढावीं, व त्यांस 'अ,' 'ब,' 'क,' अशीं नांवें द्यावीं; मग त्या वाक्यांचा काय संबंध आहे, हें सांगावें. नंतर प्रत्येक वाक्याचें निरनिराळें पृथक्करण करावें. निरनिराळ्या वाक्यांचा संबंध सांगितल्यानंतर, पृथक्करण करितांना प्रत्येक वाक्य स्वतंत्र आहे, असें मानावें.

५४१. वाक्याचें पृथक्करण करितांना उद्देश्य, विधेय, वगैरे गोष्टी क्रमानें सांगाव्या; किंवा पूर्वी सांगितल्याप्रमाणें कोष्टकरूपानें वाक्यपरिच्छेद करावा.

५४२. मिश्रवाक्य व संयुक्तवाक्य यांमधील फरक असा आहे कीं, पहिल्यांत फक्त एकच मुख्य, स्वतंत्र, किंवा प्रधान वाक्य असतें, व बाकी सर्व वाक्यें त्यावर अवलंबून असतात; आणि संयुक्तवाक्यांत दोन अथवा अधिक स्वतंत्र किंवा प्रधानवाक्यें असून त्यांपैकीं कांहींवर दुसरीं वाक्यें कदाचित् अवलंबून असतील.

५४३. **सामान्य सूचनाः**—वाक्याचें पृथक्करण करूं लागण्यापूर्वी विद्यार्थ्यांनीं पुढील सामान्य सूचना लक्षांत ठेवाव्याः—

( १ ) ज्या वाक्याचें पृथक्करण करावयाचें तें शुद्ध आहे, मिश्र आहे, कीं संयुक्त आहे, हें पहिल्यानें पाहावें. वाक्य जर मिश्र असेल, तर प्रधानवाक्य

निवडून काढावें; तशींच अवलंबी किंवा गौण वाक्येंही काढावीं. जर वाक्य संयुक्त असेल, तर त्यांतील निरनिराळीं सामानवाक्यें काढावीं. नंतर निरनिराळ्या वाक्यांना 'अ,' 'ब,' 'क,' 'ड,' अशीं नांवें द्यावीं.

**टीप १**—संयुक्त वाक्यांत जीं निरनिराळीं वाक्यें असतात, त्यांस 'समानाधिकरणवाक्यें,' किंवा 'समान-वाक्यें,' असें म्हणतात.

**टीप**–मिश्रवाक्य व संयुक्तवाक्य यांत जीं निरनिराळीं वाक्यं असतात, तीं आणखीं मिश्र, संयुक्त किंवा शुद्ध अशींही असतील.

( २ ) कधीं वाक्य पूर्ण होण्यास लागणारे सर्व शब्द वाक्यांत सांगितलेले नसतात; त्यांपैकीं कांहीं गाळलेले असतात. परिच्छेद करूं लागण्यापूर्वी असे शब्द जेथल्या तेथें भरून घ्यावे. याला 'संक्षिप्तवाक्यें पूर्ण करणें' असें म्हणतात.

( ३ ) शुद्धवाक्यांत पहिल्यानें विधेय पाहावें, मग उद्देश्य, मग असल्यास कर्म, मग उद्देश्य व कर्मपद यांचे विस्तार, आणि शेवटीं विधेयविस्तार.

( ४ ) वाक्य अवलंबी असल्यास वरीलप्रमाणेंच करावें; तसेंच तें वाक्य कशावर अवलंबून आहे व त्याचा त्याच्याशीं काय संबंध पोंचतो हेंही पाहावें.

( ५ ) प्रत्यय किंवा शब्दयोगी अव्ययें यांच्या योगानें झालेलीं शब्दांचीं सविभक्तिक रूपें, हीं नेहमीं विधेयविस्तारांतच जातात असें नाहीं. ज्या शब्दांकडे किंवा वाक्यांशाकडे त्यांचा संबंध लागत असेल, त्यांबरोबर तीं लक्षपूर्वक सांगावीं.

( ६ ) असणें, होणें, करणें, नेमणें, समजणें, मानणें इत्यादि अपूर्णक्रियावाचक जीं क्रियापदें आहेत, तीं एकटीं कधीं विधेयें होणार नाहींत. हीं क्रियापदें असतां क्रियापदाचें रूप आणि विधेयपूरक यांमिळून विधेय होतें.

( ७ ) कर्तरिप्रयोगांत कर्तृपद प्रथमान्त असतें; व कर्मपद द्वितीयान्त असतें. ही द्वितीया नियमाप्रमाणें सप्रत्यय किंवा अप्रत्यय असते. कर्मणिप्रयोगांत मूळचा कर्ता—जो आतां कर्तृपद झालेला असतो तो—तृतीयान्त असतो; व आतां उद्देश्यपदीं आलेलें मूळचें कर्मपद प्रथमान्त असतें. आणि भावेप्रयोगांत क्रियापदाला उद्देश्य नसून तें स्वतंत्र असतें; व कर्तृपदीं आलेला मूळचा कर्ता तृतीयान्त असून कर्म सप्रत्यय द्वितीया विभक्तींत असतें.

( ८ ) वाक्यें निरनिराळीं करून त्यांना नांवें दिलीं म्हणजे उभयान्वयीं अव्ययें व इतर संयोगी शब्द, त्याचप्रमाणें वाक्यांत कांहीं संबोधनवाचक शब्द असल्यास ते, हीं गाळून टाकावीं; कारण पृथक्करणांत त्यांचें महत्त्व नसतें.

( ९ ) प्रत्येक वाक्यांत महत्त्वाचे भाग दोनः—उद्देश्यांग आणि विधेयांग. ( १ ) नाम, ( २ ) सर्वनाम, ( ३ ) विशेषण किंवा कृदन्त, ( ४ ) नामवाक्यांश, आणि ( ५ ) नामवाक्य ( शुद्ध वाक्य नसतां ); यांपैकीं कांहीं तरी उद्देश्याचे जागीं असतें.

( १० ) विधेय हें क्रियापदाचें रूप असून कधीं त्याच्याबरोबर विधेयपूरक असतें. क्रियापद सकर्मक असल्यास त्याला कर्म असतें. उद्देश्याप्रमाणेंच कर्मपदीं नामादि येतात.

( ११ ) कर्त्याच्या किंवा कर्माच्या संबंधी शब्दांनीं त्यांचा विस्तार होतो. एकादें नाम किंवा सर्वनाम कर्त्याचे किंवा कर्माचे ठिकाणीं असलें, म्हणजे त्याचा विस्तार पुढीलपैकीं कशानें तरी झालेला असतोः—( १ ) विशेषण, ( २ ) नामाचें किंवा सर्वनामाचें षष्ठीचें किंवा दुसऱ्या कोणत्या तरी विभक्तीचें रूप, ( ३ ) उद्देशार्थी नाम, ( ४ ) विशेषण वाक्य किंवा वाक्यांश.

**टीप**—कर्त्याचे किंवा कर्माचे ठिकाणीं एकादें सकर्मक धातूचें कृदन्त असलें, तर आपल्या कर्मपदानें तें विस्तृत असेल.

( १२ ) विधेयाचे जे संबंधी शब्द असतात, त्यांना विधेयविस्तार म्हणतात. विधेयाचा विस्तार पुढीलपैकीं कशानें तरी होतोः—

( १ ) क्रियाविशेषण अव्यय.

( २ ) प्रत्यय किंवा शब्दयोगी अव्ययें यांनीं झालेलीं नामांचीं किंवा सर्वनामांचीं सविभक्तिक रूपें.

( ३ ) अव्ययवाक्य किंवा अव्ययवाक्यांश [ शुद्धवाक्य नसेल तर ].

५४४. आतां निरनिराळ्या जातींचीं कांहीं कठीण कठीण वाक्यें घेऊन पृथक्करण करून दाखवूं:—

(अ) **शुद्धवाक्यें**—[ १ ] " एका खेडेगांवचा रामराव देशमुख एके दिवशीं आपल्या दोन मुलांस बरोबर घेऊन कसब्यास जावयास निघाला. "

[ २ ] " हरीचें असें बोलणें ऐकतांच मीं लगेच कागद-लेखणी घेऊन त्याचे भावाला पत्र लिहिलें. "

[ ३ ] " तुझा वडील भाऊ या संबंधाची सायंत हकीगत उद्यां खचित सांगेल."

| वाक्य | उद्देश्य | उद्देश्य विस्तार | विधेय | कर्म | विधेयविस्तार |
|---|---|---|---|---|---|
| १ | रामराव देशमुख | एका खेडे-गांवचा | निघाला | | (१) एके दिवशीं (काल) (२) आपल्या २ मुलांस बरोबर घेऊन (परि.) (३) कसब्यास (स्थल) (४) जावयास (हेतु) |
| २ | पत्र | | लिहिलें | हरीचे भावाला (अप्रत्यक्ष) | (१) मीं (कर्तृपद) (२) असें हरीचे बोलणें ऐकतांच लगेच (काल) (३) कागदलेखणी घे-ऊन (परिवार) |
| ३ | भाऊ | तुझा वडील | सांगेल | (१) या संबंधा-ची सायंत हकी-गत (प्रत्यक्ष) (२) तुला (अप्रत्यक्ष) | (१) उद्यां (काल) (२) खचित (निश्चय) |

(ब) **मिश्रवाक्यें**—

" गाई गृहासि आल्या, मावळला रविहि, कच न आढळला,
तेव्हां सोडुनि धृति–नग, शुक्रसुता–बुद्धि–भूमिला ढळला. "

यात निरनिराळीं अशीं वाक्यें आहेत—

( अ ) गाई गृहासि आल्या.

( ब ) मावळला रविहि.

( क ) कच न आढळला.

( ड ) तेव्हां सोडुनि धृति नग शुक्र-सुता-बुद्धि-भूमिला ढळला.

यांत ( ड ) हें प्रधानवाक्य असून ( अ ), ( ब ) व ( क ) यांमिळून एक संयुक्त अव्ययवाक्य आहे; व तें ( ड ) या वाक्यावर अवलंबून आहे.

टीप १—या एकंदर वाक्याचे आरंभीं, 'तेव्हां' याचें संबंधी अव्यय जें 'जेव्हां' तें अध्याहृत धरलें आहे; म्हणून हें मिश्रवाक्य झालें. तसें धरलें नाहीं, तर तें संयुक्तवाक्य होईल.

| वाक्य | उद्देश्य | उद्देश्य विस्तार | विधेय | कर्म | विधेयविस्तार |
|---|---|---|---|---|---|
| अ | गाई | . | आल्या | . | गृहासि ( स्थल ) |
| ब | रवि | . | मावळला | . | हि ( निश्चय ) |
| क | कच | . | आढळला | . | न ( रीत ) |
| ड | धृति-नग | . | ढळला | . | [ १ ] तेव्हां ( काल ) [ २ ] शुक्रसुता बुद्धि-भूमिला सोडुनि ( रीत ) |

( १ ) "( अ ) मी असें ऐकतों, ( ब ) कीं हरीच्या बापानें त्याला पुस्तकें घेण्यासाठीं म्हणून जे पैसे दिले, ( क ) ते त्यानें काल आपली मंडळी जमल्यावर ( ड ) जुगारांत घालविले."

यांत ( अ ) हें प्रधानवाक्य आहे; ( ब ), ( क ) आणि ( ड ), यांमिळून मिश्रनामवाक्य होत असून तें ( अ ) या वाक्यावर अवलंबून आहे. ( ब ) व ( क ) हीं ( ड ) या वाक्यावर अवलंबून आहेत. ( ब ) हें विशेषणवाक्य आहे; व ( क ) हें अव्ययवाक्य आहे.

| वाक्य | उद्देश्य | उद्देश्य विस्तार | विधेय | विधेय-पूरक | विधेयविस्तार |
|---|---|---|---|---|---|
| अ | मी | . | ऐकतों | असें | . |
| ब | पैसे | जे | दिले | त्याला (अप्रत्यक्ष) | [१] पुस्तकें घेण्यासाठीं म्हणून [ हेतु ] [२]हरीच्याबापानें[कर्तृ-] |
| क | मंडळी | आपली | जमली | . | काल [ काल ] |
| ड | ते | . | घालविले | . | [ १ ] त्यानें [ कर्तृपद ] [ २ ] यावर [ काल ] [ ३ ] जुगारांत [ रीत ] |

( क ) संयुक्त-वाक्यें:-[१] " (अ) बुडी मारण्याची घांट हें एक मोठें पात्र आहे; ( ब ) त्यांत वायू भरून, मनुष्यास आंत बसून खोल पाण्यांत जातां येतें; आणि ( क ) आंतला वायू नाहींसा होईपर्यंत ( ड ) पाण्यांत राहतां येतें. "

हें सर्व संयुक्त वाक्य आहे. त्यांत निरनिराळीं चार स्वतंत्र वाक्यें आहेत. ( अ ) आणि ( ब ) मिळून संयुक्तवाक्य आहे; आणि (क) आणि (ड) मिळून मिश्रवाक्य आहे. (अ) व ( ब ) यांमिळून झालेलें एक वाक्य आणि ( क ) व ( ड ) यांमिळून झालेलें एक वाक्य, हीं दोन्ही समानवाक्यें आहेत. ( क ) हें कालवाचक अव्ययवाक्य असून तें ( ड ) या वाक्यावर अवलंबून आहे.

टीप १—एकाच मोठ्या वाक्यांत निरनिराळीं पोटवाक्यें असल्यास त्यांना जोडणारे अव्ययरूप शब्द वाक्यपरिच्छेद करितांना त्या पोट-वाक्याची जात ओळखण्याला उपयोगीं पडतात. एरव्हीं वाक्याचा परिच्छेद करितांना ते निरर्थक आहेत. तेव्हां ते सोडून द्यावे.

टीप—वाक्यांतील क्रियावाचक शब्द जरी मूळचा क्रियापदरूप नसला, तरी अर्थाला बाध न येतां त्याचें पूर्ण क्रियापद करून घेतां येत असल्यास तसें करण्यास चिंता नाहीं. उदा०—' त्यांत भरून–' याबद्दल, 'त्यांत वायू भरितात.

व–;' 'मनुष्यास आंत बसून–' याबद्दल, 'मनुष्य आंत बसतो व मग त्यास–;' अशीं वाक्यें पूर्ण करून घेतल्यास चालेल. भावी-प्रथमायुक्त जीं वाक्यें असतील तीं नेहमींच अशा रितीनें पूर्ण करून घ्यावीं.

**टीप ३**—गौणवाक्याचे पुढें शब्दयोगी अव्यय असलें, तर तें अव्यय-वाक्य होतें.

| वाक्य | उद्देश्य | उद्देश्य-विस्तार | विधेय | विधेय-पूरक | विधेयविस्तार |
|---|---|---|---|---|---|
| अ | हें | बुडी मारण्याची घांट | एक मोठें पात्र आहे | . | . |
| ब | जातां | . | येतें | . | [१] त्यांत वायू भरून [रीत]<br>[२] आंत बसून [रीत]<br>[३] खोल पाण्यांत [रीत] |
| क | वायू | आंतला | नाहींसा होइ | . | पर्यंत [ काल ] |
| ड | राहता | . | येतं | . | पाण्यांत [ स्थल ] |

[ २ ] "मी तेथें जातों, तों तो माझ्या दृष्टीला पडला." "जेवण झाल्यावर पाणी पिणें चांगलें; अगोदर वाईट." "त्याला पैसे उसने देऊं नको, तो लबाड आहे." हीं वाक्यें जरी मिश्रवाक्यें आहेत असें वाटतें, तरी तीं संयुक्त आहेत; कारण प्रत्येकांतील दुसरें वाक्य पहिल्या वाक्यांत आलेल्या कोणत्याही गोष्टीची व्याख्या करण्याकरितां, स्पष्टीकरण करण्याकरितां किंवा कांहीं विशेष संबंध सांगण्याकरितां घातलेलें नसून त्यांत पहिली क्रिया झाल्याबरोबर दुसरी एक स्वतंत्र क्रिया सांगितली आहे. म्हणून हीं निराळीं स्वतंत्र वाक्यें आहेत. तथापि अशा वाक्यांची जात ठरविणें हें त्यांच्या अर्थावर अवलंबून राहील. उदाहरणार्थ, वरील वाक्यांपैकीं शेवटचें वाक्य मिश्र आहे, असेंही म्हणतां

येईल, व त्याचवेळीं 'त्याला पैसे देऊं नको, कारण तो लबाड आहे,' असा त्याचा अर्थ असेल.

[ ३ ] " कच येतां बहु हर्षे, धन्य म्हणे मीच कन्यका, मातें—
वांचविला त्वांचि दिला हा, देइल कोण अन्य कामातें ?"

यांत निरनिराळीं वाक्यें अशीं आहेतः—

( अ ) कच आला. [ १ ]

( ब ) [ तेव्हां देवयानी ] [ २ ] बहु हर्षे.

( क ) [ ती ] [ २ ] म्हणे.

( ड ) मीच कन्यका धन्य [ आहें ] [ २ ]

( इ ) त्वांचि हा वांचविला.

( ई ) [ त्वां हा ] [ २ ] मातें दिला.

( उ ) कामातें अन्य कोण देईल ?

टीप १—निरनिराळ्या वाक्यांना नांव देतांना संक्षिप्त वाक्यें पूर्ण करून घ्यावीं; वाक्यांशांत क्रियापदाच्या ऐवजीं जर नुसतें कृदन्त असेल, तर त्या कृदन्ताचें शक्य असल्यास, पूर्ण क्रियापद करून त्या वाक्यांशाचे पूर्ण वाक्य करून घ्यावें. ज्या वाक्यांशांत भावीप्रथमान्त नाम असतें, त्याचें अशा रितीनें पूर्ण वाक्य नेहमीं करितां येतें. वरील निरनिराळ्या वाक्यांत जेथें गुप्त असलेले शब्द भरीस घालून पूर्ण वाक्यें केलीं आहेत, तेथें समजुतीकरितां [ २ ] असा आंकडा घातला आहे; व कृदन्ताचें क्रियापद करून जेथें वाक्य पुरें केलें आहे तेथें [ १ ] असा आंकडा घातला आहे.

टीप २—हें सर्व वाक्य संयुक्त आहे. ( अ ) आणि ( ब ) या दोहोंमिळून एक मिश्रवाक्य; आणि बाकीच्या वाक्यांमिळून दुसरें एक मिश्रवाक्य होतें; व हीं दोन्हीं मिश्रवाक्यें समानवाक्यें आहेत. पहिल्या मिश्रवाक्यांत ( ब ) हें मुख्य वाक्य असून ( अ ) हें अव्ययवाक्य आहे. व दुसऱ्या मिश्रवाक्यांत ( क ) हें मुख्य असून पुढील चारी वाक्यें त्याचीं कर्में आहेत.

| वाक्य | उद्देश्य | उद्देश्यविस्तार | विधेय | कर्म | विधेयविस्तार |
|---|---|---|---|---|---|
| अ | कच | . | आला | . | . |
| ब | [देवयानी] | . | हर्षे | . | बहु [ रीत ] |
| क | [ ती ] | . | म्हणे | . | . |
| ड | मी | कन्यका | धन्य [ पूरक ] आहें | . | च [ निश्चय ] |
| इ | हा | . | वांचविला | . | [१]त्वा [कर्तृपद] [२]चि [निश्चय] |
| ई | [ हा ] | . | दिला | मातें [अप्रत्यक्ष] | . |
| उ | कोण | अन्य | देईल | कामातें | . |

[ ४ ] " ( अ ) शीघ्रकोपी दुर्वास हातीं कमंडलू धारण करून कण्वऋषीच्या आश्रमाप्रत आला; ( ब ) तेव्हां विरहानें भ्रान्तचित्त झालेल्या शकुंतलेनें त्यास दुरून पाहिलें; ( क ) परंतु तिचें मन ठिकाणीं नव्हतें; ( ड ) यासाठीं तिनें त्याचेकडे दुर्लक्ष केलें; व ( इ ) मुनीनें रागावून तिला कडक शाप दिला; ( ई) कीं तुझा प्रियपति तुला दीर्घकाल विसरेल."

हें सर्व संयुक्तवाक्य आहे. यांत निरनिराळीं सहा वाक्यें असून पहिलीं दोन दुसरीं दोन व तिसरीं दोन, यांमिळून झालेलीं तीन वाक्यें परस्परांना समान-वाक्यें आहेत; परंतु त्या तीन वाक्यांपैकीं प्रत्येक वाक्य मिश्र आहे. ( ब ) हें मुख्य वाक्य असून [ अ ] हें त्यावर अवलंबून असणारें अव्ययवाक्य आहे; तसेंच [ ड ] हें मुख्यवाक्य असून [ क ] हें त्याच्यावर अवलंबून असणारेंच कारणदर्शक अव्ययवाक्य आहे; व [ इ ] हें मुख्यवाक्य असून [ ई ] हें नाम-वाक्य त्यावर अवलंबून आहे. त्या सबंध वाक्याचा ' शाप ' या शब्दाकडे उद्देश्य संबंध आहे.

| वाक्य | उद्देश्य | उद्देश्य-विस्तार | विधेय | विधेय-पूरक | विधेयविस्तार |
|---|---|---|---|---|---|
| अ | दुर्वास | शीघ्रकोपी | आला | . | कण्वऋषीच्या आश्रमाप्रत [स्थान] हातीं कमंडलू धारण करून [ रीत ] |
| ब | . | . | पाहिलें | त्यास | [ १ ] विरहानें भ्रांतचित्त झालेल्या शकुंतलेनें [कर्तृ.] [२] तेव्हां [ काल ] [३] दुरून [ स्थान ] |
| क | मन | तिचें | नव्हतें | . | ठिकाणीं [ स्थान ] |
| ड | दुर्लक्ष | . | केलें | . | [१] तिनें [ कर्तृ० ] [२] यासाठीं [ कारण ] [३] त्याकडे [ स्थान ] |
| इ | शाप | कडक | दिला | तिला [अप्रत्यक्ष] | [१] मुनीनें [ कर्तृपद ] [२] रागावून [ कारण ] |
| ई | पति | तुझा प्रिय | विसरेल | तुला | दीर्घकाल [ काल ] |

५४५. आतां आणखी कांहीं वाक्यें देऊन त्यांचें पृथक्करण कसें करावें हें संपूर्ण सांगतों:—

( १ ) ' शाहूनें बाजीरावास पेशवा केलें. '-बाजीरावास-अप्रत्यक्षकर्म; पेशवा-प्रत्यक्षकर्म. दोन्ही विधेयपूरकें.

( २ ) ' हरीला आज+मुंबईस जावयाचें आहे. '—जावयाचें—उद्देश्य. हरीला—उद्देश्यविस्तार. आहे—विधेय. आज व मुंबईस हे अनुक्रमें कालदर्शक व स्थलदर्शक विधेयविस्तार.

+ क्रियावाचकनामांचीं जीं तृतीयान्त किंवा चतुर्थ्यन्त कर्तृपदें असतात, तीं त्या नामांचीं विशेषणें आहेत असें समजून त्यांस उद्देश्यविस्तार असें म्हणावें.

( ३ ) ' मला मळमळून येतें. '-मळमळून-उद्देश्य. मला- उद्देश्यविस्तार.

( ४ ) ' आम्हांस पर्वतीजवळ सांजावलें.'-सांजावणें हें अकर्तृक क्रियापद असल्यामुळें या वाक्यांत उद्देश्य नाहींच; तेव्हां वरील वाक्याला ' आम्हांला पर्वतीजवळ सांजावणें झालें,' असें रूप देऊन नंतर त्याचा रितीप्रमाणें परिच्छेद करावा. तो असाः—सांजावणें-उद्देश्य. आम्हांस—उद्देश्यविस्तार. पर्वतीजवळ विधेयविस्तार ( स्थलवाचक ). झालें—विधेय.

( ५ ) ' त्याला घर बांधावयाचें आहे.'–त्याला–कर्तृपद. घर–उद्देश्य. बांधावयाचें आहे–विधेय. बांधावयाचें–विधेयपूरक.

( ६ ) ' मी आज जावयाचा आहें. '–मी–उद्देश्य. जावयाचा आहें–विधेय. जावयाचा–विधेयपूरक. आज—विधेयविस्तार ( कालवाचक ).

( ७ ) ' तो निघून गेल्याचें ऐकून मला वाईट वाटलें. '—या वाक्यांत ' गेल्याचें ' याच्यापुढें ' वर्तमान ' हा शब्द अध्याहृत घ्यावयास पाहिजे. ' तो निघून गेला, ' हें मूळचें नामवाक्य असून तें पुढें ' चें ' लागून विशेषण झालें आहे.

( ८ ) ' हरीला हें काम केलें पाहिजे. '–'केलें'–विधेयाबरोबर विधेयपूरक म्हणून घ्यावयाचें.

( ९ ) ' विश्वासराव लढाईत मारला गेला. '–मारला–विधेयपूरक.

( १० ) ' तो आज आलाच पाहिजे. '-आला किंवा आलेला-उद्देश्यविस्तार.

( ११ ) 'त्यांनीं आज गेलें पाहिजे. '–'गेलें'–धातुसाधित नाम, ' पाहिजे ' याचें उद्देश्य.

( १२ ) ' मला गुजराथी वाचावयास येतें. '—' गुजराथी वाचावयास ' उद्देश्य. मला–विधेयविस्तार, [ ' वाचावयास ' याचें कर्तृपद ].

( १३ ) 'तो परत आल्याचें मला कळीव. '—'तो परत आला' असें वाक्य तोडून घ्यावें; ' याचें ' हें कळीव याचें कर्म५८. किंवा ' आल्याचें ' याच्यापुढें ' वर्तमान ' शब्द गुप्त घ्यावा.

( १४ ) ' मुलांनीं फार बोलूं नये. '–' मुलांनीं '–बोलणें याचें कर्तृपद; म्हणून ' बोलूं ' याचा विस्तार. बोलूं–' नये ' याचें उद्देश्य.

( १५ ) 'असें करून तो निघून गेला.'='त्यानें असें केलें आणि तो निघून गेला.' 'मी असतां त्याच्यानें व्र काढवला नाहीं.'='मी होतों आणि [ म्हणून ] त्याच्यानें व्र काढवला नाहीं.'

( १६ ) 'तो बोलावयास लागला '—' बोलावयास ' हें ' लागला ' या विधेयाबरोबर घ्यावें; किंवा तें विधेय-विस्तारांत घालावें.

( १७ ) 'तो असें बोलून चुकला.'–'बोलून चुकला'–विधेय. 'असें '–कर्म.

( १८ ) ' तळ्याचें पाणी अगदीं आटून गेलें. '—आटून गेलें–विधेय. किंवा आटून—विधेयविस्तार.

( १९ ) ' तो तें काम करिता झाला.'—करिता झाला–विधेय. ' करिता ' हें या ठिकाणीं विधिविशेषण आहे. ' काम '—कर्म.

( २० ) ' मला केव्हांपासून मळमळतें. '—क्रियापद अकर्तृक आहे; तेव्हां या वाक्यांत उद्देश्य नाहींच. परिच्छेदाचे सोईकरितां ' मला केव्हांपासून मळमळ होत आहे किंवा मळमळत आहे, ' असें वाक्याचें रूपांतर करावें. मळमळत हें धातुसाधित नाम असून ' आहे ' याचें उद्देश्य आहे.

---

# प्रकरण ३०.



## व्याकरण करणें.

५४६. **व्याकरण करणें** अथवा **व्याकरण चालविणें** याचा अर्थ वाक्यांतील प्रत्येक शब्दाची अथवा कोणत्याही एका शब्दाची व्याकरणसंबंधीं पूर्ण माहिती सांगणें, असा आहे. ती सांगतांना शब्दाची जात व त्याचा वाक्यांतील इतर शब्दांशीं विभक्त्यादि संबंध, हीं सांगावयाचीं असतात. तेव्हां **व्याकरण करणें** यांत **शब्दविचार** व **वाक्यविचार** या दोहोंचाही संबंध पोंचतो, हें उघड आहे.

५४७. एकाद्या वाक्याचें व्याकरण करावयाचें असतां, पहिल्यानें तें वाक्य कोणत्या जातीचें आहे, हें पाहावें. नंतर त्या एकंदर वाक्याचा व त्यांत

अनेक वाक्यें असल्यास त्यांतील प्रत्येकाचा प्रयोग सांगावा. त्याचप्रमाणें त्या वाक्यांतील कर्ता, उद्देश्य, कर्म असल्यास तें, आणि क्रियापद हीं सांगावीं.

५४८. निरनिराळ्या जातींच्या शब्दांचें व्याकरण करितांना पुढील गोष्टी सांगाव्याः—

(१) प्रथमतः शब्दाची जात सांगितली पाहिजे. ही जात अर्थावरून व लक्षणावरून ओळखावी. एकच शब्द अर्थावरून पुष्कळदां निरनिराळ्या जातीचा असेल. तेव्हां शब्दांच्या जाती कांहीं ठरलेल्या नाहींत. ज्या शब्दास विवक्षित स्थळीं नामाचें लक्षण लागेल, त्यास त्या ठिकाणीं नाम म्हणावें; विशेषणाचें लक्षण लागू पडल्यास विशेषण म्हणावें. याप्रमाणें वाक्यार्थाकडे लक्ष देऊन विवक्षित शब्द त्या वाक्यांत ज्या जातीचा असेल, ती त्याची तेवढ्यापुरती जात मानावी.

(२) नामः—नामाचा प्रकार, लिंग, वचन, विभक्ति, विभक्तीचा अर्थ किंवा कारक, हीं सांगून त्या नामाचा वाक्यांतल्या शब्दाशीं काय संबंध आहे तें सांगावें. नाम प्रथमान्त असल्यास तें कोणत्या क्रियापदाचा कर्ता व उद्देश्य आहे, व द्वितीयान्त असल्यास तें कोणत्या क्रियापदाचें कर्म आहे तें सांगावें. त्याच विभक्ति असून त्यांचे अन्य अर्थ असल्यास ते सांगावे; किंवा दुसऱ्या विभक्ति असल्यास त्या सांगून त्यांचे अर्थ किंवा कारकें सांगावीं. शब्दाचें नुसतें सामान्यरूपच झालें असल्यास तें कशामुळें झालें, हें सांगावें. नामापुढें विभक्त्यर्थक अव्यय असल्यास त्याचेमुळें नामास कोणत्या विभक्तीचा अर्थ आला तें सांगावें. नामाचा अन्त्य सांगण्याची चाल आहे. परंतु अन्त्य सांगण्यापासून कांहीं विशेष उपयोग आहे, असें नाहीं. याकरितां तो प्रघात मोडला तरी चालेल.

(३) सर्वनामः— जात; कोणत्या नामाबद्दल तें घातलें आहे तें; बाकी सर्व गोष्टी नामाप्रमाणें.

(४) विशेषणः—जात; वाच्यविशेषण कीं विधिविशेषण; त्याचें विशेष्य; त्याचें सामान्यरूप झालें असल्यास तें कां झालें, किंवा त्यास विभक्ति-प्रत्यय लागला असल्यास तो कां लागला.

टीपः—विशेषणाचा पुष्कळ वेळां नामासारखा उपयोग केलेला असतो; तेव्हां त्याच्या संबंधाच्या सर्व गोष्टी नामाप्रमाणेंच सांगाव्या.

(५) **क्रियापद**:—मूळचा धातु, प्रकार (सकर्मक कीं अकर्मक), अर्थ, काळ, पुरुष, लिंग, वचन, कर्ता, उद्देश्य व असल्यास कर्म. वाक्याचा प्रयोग आरंभींच सांगितलेला असतो; प्रयोग हा क्रियापदाला असत नाहीं, वाक्याला असतो. वाक्याचा प्रयोग असेल त्याचप्रमाणें क्रियापद कर्तरि, कर्मणि किंवा भावी असतें; तेव्हां या तिहींपैकीं क्रियापद कोणत्या प्रकारचें आहे, तें सांगावें. धातु सिद्ध असल्यास तो 'सिद्ध' म्हणून सांगण्याची जरूर नाहीं; पण तो साधित असल्यास 'प्रयोजकधातु' किंवा 'नामधातु' वगैरे जसा असेल तसें सांगावें.

**टीप १**—क्रियापद आज्ञार्थी, विध्यर्थी, किंवा संकेतार्थी असतां काळ सांगण्याची जरूर नाहीं.

**टीप २**—सर्व आख्यात-विभक्तींत क्रियापद लिंगाप्रमाणें फिरत नाहीं. तेव्हां ज्या विभक्तींत तें फिरत असेल त्या असतां मात्र लिंग सांगावें; एरवीं तें सांगण्याची गरज नाहीं.

(६) **अव्यय**:—जात; शब्दयोगी अव्यय असल्यास त्यानें कोणत्या शब्दाचें सामान्यरूप झालें व विभक्ति कोणती झाली हें सांगावें; इतर प्रकारचें अव्यय असल्यास त्याची जात सांगून त्याचे योगानें वाक्यांत जें कांहीं विशेष कार्य होत असेल तें सांगावें, म्हणजे त्यावरून काल, स्थल, रीत, इत्यादिकांपैकीं कशाचा बोध होतो तें सांगावें; किंवा तें शब्द किंवा वाक्यें जोडण्याचें कार्य करीत असल्यास जोडलेले शब्द किंवा वाक्यें सांगावीं.

(७) **कृदन्तें** आणि **धातुसाधितें**:—हीं वाक्यांत अर्थावरून नामें, विशेषणें, किंवा अव्ययें असतील, त्याप्रमाणें सांगावीं. क्रियावाचक नामाचें लिंग व वचन सांगावयास पुष्कळदां अडचण पडते; कारण त्याचेवरून फक्त क्रियार्थाचा बोध होतो. एखाद्या विवक्षित वस्तूचा बोध झाल्याखेरीज शब्दास लिंगादिक असत नाहींत. क्रियावाचक नाम नेहमीं नपुंसकलिंगी, एकवचनी असावयाचें. सकर्मक धातूपासून साधलेल्या कृदन्तास कर्मपद असतें, तें सांगावें. कित्येक वेळां कृदन्ताशीं भावी प्रथमेचा संबंध असेल, तसा असल्यास सांगावा.

५४९. आतां उदाहरणार्थ कांहीं वाक्यें घेऊन त्यांचें व्याकरण करून दाखवितों:—

(१) " अंताजीपंताचा मुलगा गोविंदा ओटीवर पुस्तक वाचीत बसला आहे, असें रस्त्यांतून पाहून मी घरांत गेलों. "

यांत दोन वाक्यें आहेत. पहिलें नामवाक्य असून तें 'पाहून' याचें कर्म आहे. दोन्ही वाक्यें स्वार्थी असून दोहोंचाही कर्तरिप्रयोग आहे.

**अंताजीपंताचा**--हें 'अंताजीपंत' या विशेषनामापासून झालेलें संबंधी विशेषण आहे; याचें विशेष्य 'मुलगा.'

**मुलगा**--हें 'मुलगा' या पुल्लिंगी सामान्यनामाचें प्रथमेचें एकवचन; या प्रथमेचा अर्थ कर्ता व उद्देश्य, 'आहे' या क्रियापदाचा.

**गोविंदा**--हें विशेषनाम, पुल्लिंगी, प्रथमेचें एकवचन; अर्थ उद्देश मुलगा या शब्दाकडे.

**ओटीवर**--'ओटी,' सामान्यनाम, स्त्रीलिंग, एकवचन; 'वर' या सप्तमीच्या अव्ययाच्या योगानें सामान्यरूप.

**पुस्तक**--सामान्यनाम, नपुंसकलिंगी, द्वितीयेचें एकवचन; अर्थ कर्म, 'वाचीत' यांतील 'वाच' धातूचें.

**वाचीत बसला**--धातुसाधित क्रियाविशेषण; याचें विशेष्य 'मुलगा' किंवा--

**वाचीत**--हे वर्तमानकालवाचक धातुसाधित अव्यय; अथवा हें 'मुलगा' याचें क्रियाविशेषण.

**बसला**--हें 'बस' धातूपासून साधलेलें भूतकालवाचक क्रियाविशेषण, याचें विशेष्य 'मुलगा.'

**आहे**--हें कर्तरि, अकर्मक क्रियापद; 'आहे' या धातूचें, स्वार्थी, वर्तमानकाळीं, तृतीयपुरुषाचें एकवचन; याचा कर्ता व उद्देश्य 'मुलगा.'

**असें**--हें मागील वाक्याचें दर्शकसर्वनामात्मक विशेषण; नपुंसकलिंगी, द्वितीयेचें एकवचन; अर्थ कर्म, पाहून यांतील 'पाहा' धातूचें.

**पाहून**--'पाहा' धातूपासून झालेलें भूतकालवाचक क्रियार्थक अव्यय; याचा 'गेलों' या क्रियापदाकडे संबंध.

**मी**--प्रथमपुरुषवाचक सर्वनाम, पुल्लिंगी, प्रथमेचें एकवचन; अर्थ कर्ता व उद्देश्य, 'गेलों' या क्रियापदाचें.

**घरांत**—' घर ' सामान्यनाम, नपुंसकलिंगी, सामान्यरूप; ' आंत ' या शब्दयोगी अव्ययाचे योगानें.

**गेलों**—हें कर्तरि अकर्मक क्रियापद: ' जा ' या धातूचें; स्वार्थी, भूतकाळी, पुल्लिंगी, प्रथमपुरुषाचें एकवचन; याचा कर्ता व उद्देश्य ' मी. '

( २ ) " **त्यानें तुला पत्र पाठविल्यास मला खपणार नाहीं.** "

यांत दोन वाक्यें आहेत. पहिलें नामवाक्य असून त्यास ' स ' हा प्रत्यय लागून तें अव्ययवाक्य झालें आहे. पहिल्या वाक्यांत कर्मणिप्रयोग असून दुसऱ्यांत कर्तरिप्रयोग आहे. दोन्ही वाक्यें स्वार्थी असून दुसरें अकरणरूपी आहे. दोन वाक्यें निराळीं केल्यावर पहिल्या वाक्यास लागलेला सामान्यरूपाचा प्रत्यय ' या ' व विभक्ति–प्रत्यय ' स ' हे व्याकरण करितांना विचारांत घेऊं नयेत.

**त्यानें**—' तो ' या दर्शकसर्वनामाचें पुल्लिंगी, तृतीयेचें एकवचन; हें ' पाठविलें ' या क्रियापदाचें कर्तृपद.

**तुला***—' तूं ' या द्वितीयपुरुषवाचक सर्वनामाचें चतुर्थीचें एकवचन; हें अप्रत्यक्ष कर्मपद.

**पत्र**—सामान्यनाम, नपुंसकलिंगी, प्रथमेचें एकवचन; अर्थ उद्देश्य; ' पाठविलें ' या क्रियापदाचें. हें मूळचें कर्मपद.

**पाठविलें**—हें कर्मणि क्रियापद; ' पाठव ' या सकर्मक प्रयोजक धातूचें, स्वार्थी, भूतकाळीं, नपुंसकलिंगी, तृतीपुरुषाचें एकवचन; याचें कर्तृपद ' त्यानें,' व ' पत्र ' हें उद्देश्य.

**मला**—' मी ' या प्रथमपुरुष-सर्वनामाचें चतुर्थीचें एकवचन; हें 'खपणार' यांतील ' खप ' धातूचें कर्तृपद.

---

*प्रथम व द्वितीयपुरुष सर्वनामांचें व ' आपण ' वगैरे कित्येक शब्दांचें पुष्कळ वेळां लिंग समजणें अवघड पडतें; विशेषतः क्रियापदाचें रूप लिंगावरून फिरणारें नसल्यास याचा लिंगनिर्णय करणें कठीण असतें. अशा ठिकाणीं त्या सर्वनामाचें व क्रियापद त्याच्याशीं जुळणारें असल्यास त्याचेंही लिंग सांगूं नये.

**खपणार**—हें भविष्यकालवाचक धातुसाधित विशेषण; याचें विशेष्य 'तें' हें अध्याहृत† सर्वनाम.

**नाहीं**—हें कर्तरि अकर्मक क्रियापद; 'नाहीं' या धातूचें स्वार्थी, वर्तमानकाळीं, नपुंसकलिंगी, तृतीयपुरुषाचें एकवचन; याचा कर्ता 'तें' हें अध्याहृत सर्वनाम. हें 'त्यानें तुला पत्र पाठविलें' या वाक्याबद्दल घ्यावयाचें.

( ३ ) **"तुझ्यानें आपलीं मुलें पोसवत नसलीं, तर माझ्या स्वाधीन कां करीनास?"**

हें संबंध वाक्य संकेतार्थक असून त्यांत दोन वाक्यें आहेत. पहिलें अवलंबी वाक्य आहे. दोन्ही वाक्यांचा कर्तरिप्रयोग आहे, व एकंदर वाक्य प्रश्नार्थक आहे.

**तुझ्यानें**—हें 'तुझें' या सर्वनामात्मक संबंधी विशेषणाचें तृतीयेचें एकवचन; हें 'पोसवत' याचें कर्तृपद.

**आपलीं**—हें सर्वनामात्मक संबंधी विशेषण; याचें विशेष्य 'मुलें.'

**मुलें**—'मूल' सामान्यनाम, नपुंसकलिंगी, प्रथमेचें अनेकवचन; अर्थ कर्ता, 'नसलीं' या क्रियापदाचा.

**पोसवत**—हें 'पोसव' या प्रयोजक धातूपासून साधलेलें कर्मणि क्रियाविशेषण; याचें विशेष्य 'मुलें.'

**नसलीं**—हे कर्तरिक्रियापद; 'नस' या अकर्मक धातूचें, संकेतार्थी, नपुंसकलिंगी, तृतीयपुरुषाचें अनेकवचन; याचा कर्ता 'मुले.'

**तर**—संकेतबोधक अव्यय.

---

† वाक्यांत नाम किंवा सर्वनाम उघड समजण्यासारखें असल्यामुळें बोलणारा त्याचा संक्षेप करितो; अथवा वाक्याचा अर्थ समजण्यास तशा एखाद्या शब्दाची गरज नसल्यास बोलणारा तो शब्द वाक्यांत घालीत नाहीं; परंतु व्याकरण करतांना तो शब्द घेतल्याखेरीज वाक्य नीट जुळत नाहीं. असा शब्द गुप्त राखणें यास 'अध्याहार' असें म्हणतात; व त्या शब्दास 'अध्याहृत शब्द' असें म्हणतात.

**माझ्या**—हें 'मी' या पुरुषवाचक सर्वनामापासून झालेल्या संबंधी विशेषणाचें सामान्यरूप; 'स्वाधीन' या विशेषणामुळें.

**स्वाधीन**—हें क्रियाविशेषण, 'मुलें' याचें. किंवा,

**माझ्या स्वाधीन**—सामासिक सर्वनामात्मक विशेषण; विशेष्य 'मुलें.' हा कर्मधारय समास.

**कां**—कारणबोधक अव्यय.

**करीनास**—याचें खरें रूप 'करीस-ना-करिशी-ना' असें आहे; करीस (करिशी) हें कर्तरि सकर्मक क्रियापद; 'कर' या धातूचें, स्वार्थी, वर्तमान-काळाचें (जुन्या), द्वितीयपुरुषाचें एकवचन; यांत 'तूं' हा अध्याहृत कर्ता, 'तीं' ('मुलें' याबद्दल) हें अध्याहृत कर्म; 'ना' हें निषेधार्थक अव्यय.

(४) "**कृष्णानें साहाय्य करून पांडवांचें रक्षण केलें, अशी कथा काल आम्हीं श्रवण केली.**"

यांत दोन स्वार्थी वाक्यें आहेत. पहिलें उद्देशार्थी नाम-वाक्य असून त्याचा संबंध 'कथा' याकडे आहे. दोन्ही वाक्यांचा कर्मणिप्रयोग आहे.

**कृष्णानें**—'कृष्ण' विशेषनाम, पुल्लिंगी, तृतीयेचें एकवचन; हें 'केलें' या क्रियापदाचें कर्तृपद.

**साहाय्य**-भाववाचक नाम, नपुंसकलिंगी, प्रथमेचें एकवचन. अर्थ 'कर्म' करून याचें.

**करून**—भूतकालवाचक क्रियार्थक अव्यय.

**पांडवांचें**—संबंधी विशेषण, याचें विशेष्य 'संरक्षण.'

**संरक्षण**—सामान्यनाम, नपुंसकलिंगी, प्रथमेचें एकवचन; अर्थ उद्देश्य, 'केलें' या कर्मणि क्रियापदाचें; हें मूळचें कर्मपद.

**केलें**—हें 'कर' धातूचें कर्मणि, सकर्मक क्रियापद; स्वार्थी, भूतकाळीं, नपुंसकलिंगी, तृतीयपुरुषाचें एकवचन; याचें कर्तृपद 'कृष्णानें;' उद्देश्य 'रक्षण.'

**अशी**—हें प्रकारार्थक विशेषण, याचें विशेष्य 'कथा'.

**कथा**—सामान्यनाम, स्त्रीलिंगी, प्रथमेचें एकवचन; अर्थ उद्देश्य 'केली' या कर्मणि क्रियापदाचें.

**काल**—कालवाचक अव्यय.

**आम्हीं**—मी या प्रथमपुरुषवाचक सर्वनामाचें तृतीयेचें अनेकवचन; हें 'केली' याचें कर्तृपद.

**श्रवण**–विधिविशेषण, याचें विशेष्य 'कथा.'

**केली**—हें 'कर' धातूचें कर्मणि, सकर्मक क्रियापद; स्वार्थी, भूतकाळीं, स्त्रीलिंगी, तृतीयपुरुषाचें एकवचन; याचें कर्तृपद 'आम्हीं;' उद्देश्य 'कथा.'

(५) "**मी असतां कां माझ्या तातें केशग्रहासि पावावें ?**
**मग कैसें बापांनीं पुत्रांपासोनि सौख्य इच्छावें ?**"

या आर्येंत दोन वाक्यें असून तीं परस्परसंबंधानें समानाधिकरणवाक्यें आहेत. अर्थात् सगळें वाक्य संयुक्त आहे. पहिल्या वाक्यांत भावेप्रयोग असून दुसऱ्यांत कर्मणिप्रयोग आहे.+

**मी**—भावी प्रथमा; 'असतां' याकडे संबंध.

**असतां**—वर्तमानकालवाचक धातुसाधित अव्यय

**कां**—करणबोधक अव्यय.

**माझ्या**—संबंधी विशेषणाचें सामान्यरूप; 'तातें' या सविभक्तिक विशेष्यामुळें.

**तातें**—तृतीया विभक्ति; अर्थ कर्तृपद, 'पावावें' या भावी क्रियापदाचें.

**केशग्रहासि**—'केशग्रह' सामासिक सामान्यनाम; द्वितीया विभक्ति, अर्थ कर्म 'पावावें' याचें.

**पावावें**—हें 'पाव' या धातूचें भावी सकर्मक क्रियापद; विध्यर्थी, नपुंसकलिंगी, तृतीयपुरुषाचें एकवचन; 'तातें' कर्तृपद; 'केशग्रहासि' हें कर्म.

**मग**—कालवाचक क्रियावि० अव्यय.

**कैसें**—प्रकारार्थक क्रियाविशेषण, याचें विशेष्य 'सौख्य.'

**बापांनीं**—तृतीया विभक्ति, अनेकवचन; 'इच्छावें' याचें कर्तृपद.

**पुत्रांपासोनि**—'पुत्रां' हें अनेकवचनी सामान्यरूप; 'पासोनि' या पंचमीच्या शब्दयोगी अव्ययाच्या योगानें.

---

+ येथून पुढें प्रत्येक शब्द पूर्णपणें न चालवितां त्याच्या संबंधाच्या महत्त्वाच्या गोष्टी तेवढ्या सांगितल्या आहेत.

**सौख्य**—प्रथमा विभक्ति; ' इच्छावें ' या कर्मणि क्रियापदाचें उद्देश्य; मूळचें कर्मपद.

**इच्छावें**—हें ' इच्छ ' या धातूचें कर्मणि सकर्मक क्रियापद; विध्यर्थी, नपुंसकलिंगी, तृतीय पुरुषाचें एकवचन; ' बापांनीं ' हे कर्तृपद; ' सौख्य ' उद्देश्य.

( ६ ) " **हांसत कर्म करावें, भोगावें रडत तेंचि परिणामीं.** "

यांत दोन वाक्यें आहेत. दोन्ही विध्यर्थी असून दोहोंचाही कर्मणिप्रयोग आहे. दोन्ही वाक्यांत ' आपण ' किंवा ' मनुष्यानें ' हें कर्तृपद अध्याहृत घेतलें पाहिजे.

**हांसत**—वर्तमानकालवाचक धातुसाधित अव्यय; याचा संबंध ' करावें ' याकडे.

**कर्म**—हें नाम, मूळचें कर्मपद; ' करावें ' या क्रियापदाचें उद्देश्य.

**करावें**—हें कर्मणि सकर्मक क्रियापद; विध्यर्थी; ' कर्म ' हें उद्देश्य.

**भोगावें**—हें कर्मणि सकर्मक क्रियापद; विध्यर्थी; याचें उद्देश्य ' तें ' ( अध्याहृत, ' कर्म ' याबद्दल ).

**रडत**—वर्तमानकालवाचक धातुसाधित अव्यय.

**तें**—' भोगावें ' याचें उद्देश्य; मूळचें कर्मपद.

**चि**—( च ) अवधारणाबोधक अव्यय.

**परिणामीं**—' परिणाम ' या नामाची सप्तमी.

( ७ ) " **श्रीपति झाला दशरथसुत राम दशाननासि माराया** "

हें स्वार्थी शुद्धवाक्य असून याचा कर्तरिप्रयोग आहे.

**श्रीपति**—सामासिक विशेषनाम, 'झाला' याचा कर्ता. षष्ठीतत्पुरुष समास.

**झाला**—' हो ' या अकर्मक धातूचें कर्तरि क्रियापद; भूतकाळ.

**दशरथसुत**—सामासिक सामान्यनाम, प्रथमा विभक्ति, अर्थ उद्देश ' श्रीपति ' याकडे. ष० त० समास.

**राम**—विशेषनाम, प्रथमा विभक्ति, अर्थ उद्देश ' दशरथसुत ' याकडे.

**दशाननासि**—सामासिक विशेषनाम, द्वितीया विभक्ति; ' माराया ' याचें कर्म.

**माराया**—धातुसाधित नाम, चतुर्थी विभक्ति, अर्थ ' हेतु. '

( ८ ) "**कर्ता देव एक, तेणें केलें सर्व, तयापाशीं गर्व कामा नये.**" यांत तीन स्वार्थी वाक्यें आहेत. पहिल्या व तिसऱ्या वाक्याचा कर्तरिप्रयोग असून दुसऱ्याचा कर्मणिप्रयोग आहे. पहिल्या वाक्यांत ' आहे ' हें क्रियापद गुप्त आहे.

**सर्व**—' केलें ' याचें उद्देश्य; मूळचें कर्मपद.

**गर्व**—' ये ' याचा कर्ता.

**कामा**—ही चतुर्थी विभक्ति.

**न**—निषेधार्थक अव्यय.

**ये**—हें जुन्या वर्तमानकाळाचें रूप आहे.

[ बाकीच्या शब्दांचें व्याकरण सुलभच आहे ].

**टीप**—पुढील सर्व वाक्यांतील विशेष कठिण शब्दांचेंच व्याकरण करून दाखविलें आहे.

( ९ ) " तो आज आ**लाच** पाहिजे. "–यांत ' आला ' हें 'तो' याचें भूतकालवाचक विधिविशेषण करावें, व 'पाहिजे' एवढेंच क्रियापद समजावें.

( १० ) " **रामाला** आज मुंबईस गेलें पाहिजे. "–" रामाला, " याची चतुर्थी असून, तें 'गेलें' याचें कर्तृपद. ' गेलें ' हें क्रियावाचक नाम, ' पाहिजे ' या क्रियापदाचा कर्ता व उद्देश्य.

( ११ ) " **हरीनें** किंवा **हरीला** हें काम **केलें** पाहिजे. "—' हरीनें ' किंवा ' हरीला ' हें ' केलें ' याचें कर्तृपद. ' केलें ' हें भूतकालवाचक विशेषण ' काम ' याचें. ' काम ' हा पाहिजे याचा कर्ता. हा कर्तरिप्रयोग.

( १२ ) " विश्वासराव लढाईत **मारला** गेला. "—' मारला ' हें भूतकालवाचक विशेषण, ' विश्वासराव ' याचें.

( १३ ) " अर्जुन कर्णास **मारिता** झाला. "—' मारिता ' हें कर्तृवाचक विधिविशेषण; याचें विशेष्य ' अर्जुन. '

( १४ ) " **हरीला** मुंबईस **जावयाचें** आहे. "— ' हरीला ' ही चतुर्थी विभक्ति असून, तें ' जावयाचें ' याचें कर्तृपद आहे. ' जावयाचें ' हें क्रियावाचक नाम असून तो ' आहे ' याचा कर्ता.

( १५ ) " हरी आज मुंबईस **जावयाचा** आहे. " —' जावयाचा ' हें क्रियावाचक संबंधी विशेषण, याचें विशेष्य ' हरी '.

( १६ ) " **मला** पत्र **लिहावयाचें** आहे. "—' मला ' ही चतुर्थी विभक्ति असून तें ' लिहावयाचें ' याचें कर्तृपद आहे. ' लिहावयाचें ' हें विधिविशेषण असून त्याचें ' पत्र ' हें विशेष्य आहे. ' त्याचें पत्र **लिहावयाचें** झालें. ' ' लिहावयाचें ' विधिविशेषण, विशेष्य ' पत्र; ' किंवा, दोन्ही वाक्यांतील ' लिहावयाचें ' हा शब्द क्रियावाचक नाम करावा. पहिला ' आहे ' याचा कर्ता, व दुसरा ' झालें ' याचा कर्ता. आणि मग दोन्ही वाक्यांतील ' पत्र ' हा शब्द ' लिहावयाचें ' याचें कर्मपद होईल.

( १७ ) " हें **काम** तोच **करूं** जाणे. "—' काम ' हें ' करूं ' याचें कर्म. ' करूं ' हें क्रियावाचक नाम, द्वितीया विभक्ति ' जाणे ' याचें कर्म.

( १८ ) " **मला गुजराथी वाचावयास** येतें, पण **बोलतां येत** नाहीं. "—' मला ' हें ' वाचावयास ' व ' बोलतां ' यांचें चतुर्थ्यन्त कर्तृपद. ' गुजराथी ' हें ' वाचावयास ' व ' बोलतां ' यांचें कर्म. ' वाचावयास ' व ' बोलतां ' हीं क्रियावाचक नामें असून तीं अनुक्रमें ' येतें ' व ' नाहीं ' यांचें कर्ते आहेत. ' येत ' हें विधिविशेषण असून त्याचें विशेष्य ' गुजराथी. ' किंवा ' गुजराथी ' हें ' येतें ' आणि ' नाहीं ' यांचा कर्ता. ' वाचावयास ' व 'बोलतां' हीं क्रियाविशेषणें ' गुजराथी ' याचीं.

( अ ) " **मला** लेखण्या **करितां** येतात. "–' मला ' हें ' करितां ' याचें कर्तृपद. ' करितां ' हें क्रियार्थक अव्यय; किंवा ' लेखण्या ' याचें विधिविशेषण.

( १९ ) " **रामाला** घरीं **जावें** लागलें "—' रामाला ' हें ' जावें ' याचें कर्तृपद; ' जावें ' हें क्रियावाचक नाम, ' लागलें ' याचा कर्ता.

( २० ) " तो घरीं **जाऊं** लागला. " " तो लगेच **बोलूं** किंवा **बोलावयास** लागला. "—' जाऊं, ' ' बोलूं ' आणि ' बोलावयास ' हीं धातुसाधित अव्ययें आहेत.

(२१) "हरीनें बापाचें उगाच **बोलून** घेतलें."–'बोलून' हें क्रियावाचक नाम असून तें 'घेतलें' या कर्मणि क्रियापदाचें उद्देश्य आहे; मूळचें कर्मपद. हा कर्मणिप्रयोग आहे.

(२२) "तो **असें** सहज **बोलून** गेला."—'असें' हें 'बोलून' याचें कर्म. 'बोलून' हें भूतकालवाचक धातुसाधित अव्यय.

(२३) "मी आज **येऊं शकत** नाहीं." —'येऊं' हें धातुसाधित अव्यय. किंवा क्रियावाचक नाम; हें 'शकत' याचें कर्म. 'शकत' हें विधिविशेषण; याचें विशेष्य 'मी'.

(२४) "आई मुलांस **जेवूं** घालिते."—'जेवूं' हें क्रियावाचक नाम, 'घालिते' याचें कर्म. 'मुलांस' ही चतुर्थी. 'आईनें मुलांस **जेवूं** घातलें.' 'जेवूं' हें क्रियावाचक नाम, 'घातलें' याचें उद्देश्य, हा कर्मणिप्रयोग. 'मी हें **करूं** शकतों.'—'हें' हें 'करूं' याचें कर्म. 'शकतों' हें क्रियापद. याचा कर्ता 'मी.' 'करूं' हें अव्यय किंवा 'करूं' हें क्रियावाचक नाम, 'शकतों' याचें कर्म. 'मी **बोलूं** इच्छितों.'—'बोलूं' हें क्रियावाचक नाम, 'इच्छितों' याचें कर्म.

(२५) "**माझें असें** आहे कीं, मला **कोणीं बोललेलें खपत नाहीं.**" –'माझें' हें मूळचें प्रथमपुरुष सर्वनामाचें एकवचनी संबंधी विशेषण; पण येथें तें नाम (माझें=माझा स्वभाव) असून 'आहे' याचा कर्ता आहे. 'असें'–उद्देशार्थी प्रथमा, 'माझें' याकडे. 'कोणीं' याची तृतीया विभक्ति असून तें 'बोललेलें' याचें कर्तृपद. 'बोललेलें' हें क्रियावाचक नाम, 'नाहीं' ह्याचा कर्ता. 'खपत' हें क्रियाविशेषण, याचें विशेष्य 'बोललेलें.'

(२६) "या औषधापासून तुला **बरें** वाटेल."— 'बरें' (बरेपणा) भाववाचकनाम, 'वाटेल' याचा कर्ता; 'तुला' चतुर्थी वि०.

(२७) "तो उपयोगी आहे **असेंच म्हटलें** पाहिजे."—या वाक्यांत 'असें' हें मागील वाक्याबद्दल घातलें आहे; हें 'म्हटलें' याचें कर्म; परंतु या ठिकाणीं कर्मणिप्रयोग आहे म्हणून तें 'म्हटलें पाहिजे' याचें उद्देश्य. किंवा 'असें' हा 'पाहिजे' याचा कर्ता; व 'म्हटलें' हें कर्मणि विशेषण, याचें विशेष्य 'असें.'

( २८ ) " **घालूं** पाहसि **दंष्ट्रा** उपटाया अहिमुखांत **आंगोळी** "— 'घालूं' हें क्रियावाचकनाम, 'पाहसि' याचें कर्म; 'दंष्ट्रा' हें 'उपटाया' याचें कर्म; 'आंगोळी' हें 'घालूं' याचें कर्म.

( २९ ) " **गेल्याचा** शोक वृथा न करावा. "—'गेल्याचा' हें 'गेला' या भूतकालवाचक विशेषणापासून झालेलें [ गेल्याचा=गेलेल्या पदार्थाचा ] संबंधी विशेषण, याचें विशेष्य 'शोक.' हा कर्मणिप्रयोग आहे.

( ३० ) " तो आज परत **आल्यास** ( आल्याचें किंवा आल्यावर ) तुला कळवीन. "—या ठिकाणीं 'स' किंवा 'चें' हा प्रत्यय किंवा 'वर' हें शब्दयोगी अव्यय. 'तो आज परत आला,' या वाक्यास लाविलेलें आहे. क्वचित् अशा ठिकाणीं 'यास,' 'याचें,' 'यावर' असा पदच्छेद करण्याची चाल आहे. परंतु आणखी एक सर्वनाम, अशा वाक्यांत अध्याहृत घेण्यापेक्षां विभक्तिप्रत्यय किंवा शब्दयोगी अव्यय हें मागील सर्व नामवाक्यास लागलें आहे, व तें लागतांना त्याचें सामान्यरूप झालें आहे, असें मानणें अधिक प्रशस्त दिसतें. व्याकरण करितांना प्रत्यय किंवा शब्दयोगी अव्यय काढून टाकावें. 'तो आज परत आल्याचें ( वर्तमान )' हें सबंध वाक्य 'कळवीन' याचें कर्म.

( ३१ ) " पुणें **येथें** रामराव **म्हणून** एक गृहस्थ राहतो. "—'पुणें' याची द्वितीया विभक्ति; द्वितीयेचा अर्थ उद्देश, 'येथें' या स्थलवाचक अव्ययाकडे. 'म्हणून' धातुसाधित अव्यय.

(३२) " तो इतका अशक्त आहे, कीं त्याला नेहमीं वैद्य जवळ **बाळगावे** लागतात किंवा **बाळगिले** पाहिजेत. "—या वाक्यांत 'वैद्य' हा 'लागतात' किंवा 'पाहिजेत' याचा कर्ता आहे. 'बाळगावे' हें 'वैद्य' याचें विध्यर्थक विशेपण. 'बाळगिले' हें 'वैद्य' याचें क्रियाविशेपण.

( ३३ ) " त्याच्यानें स्वहित किंवा परहित कांहीं **व्हावयाचें** नाहीं. "— 'व्हावयाचें' हें क्रियावाचक विशेपण, 'कांहीं' याचें. 'कांहीं' हा 'नाहीं' याचा कर्ता. 'स्वहित' आणि 'परहित' या उद्देशार्थी प्रथमा, 'कांहीं' याकडे संबंध.

( ३४ ) " **बाजीरावास** इंग्रजांना **राज्य द्यावें** लागलें. "—'राज्य'

हा ' लागलें ' ह्याचा कर्ता. ' यावें ' विध्यर्थक कर्माणि विशेषण, याचें विशेष्य ' राज्य. ' ' बाजीरावास ' हें यावें याचें कर्तृपद.

( ३५ ) ' करूं न-ये, ' 'बोलूं न-ये, ' ' करतां न-ये, ' इत्यादि शब्द ज्यांत आहेत, अशा वाक्यांत न-ये हें क्रियापद मानण्याची चाल आहे. परंतु यांत ' न ' हें अव्यय असून ' ये ' हें जुन्या वर्तमानकाळाचें रूप आहे; म्हणून ' करूं, ' ' बोलूं, ' ' करितां ' इत्यादि क्रियावाचक नामें 'ये' याचे कर्ते होत.

( ३६ ) " बोले-ना, ' ' येई-ना, ' ' करी-ना, ' यांच्यासंबंधानेंही असेंच समजावें. यांत ' ना ' हें अव्यय आहे. ' तो येई ना ' यांत ' तो ' हा ' येई ' या क्रियापदाचा कर्ता. ' ना ' हें अव्यय. ' न-लगे ' यांत ' लगे ' ( लागे ) हें क्रियापद; ' न ' हें अव्यय. ' त्यास सांगणें न-लगे. '—यांत ' सांगणें ' हा ' लगे ' याचा कर्ता.

टीप—' न-लगे ' ' न-ये ' यांना सोईकरितां संयुक्त क्रियापदें मानण्यासही अडचण पडणार नाहीं.

( ३७ ) " शाहूनें बाजीरावास पेशवा केलें. "—हा भावे-प्रयोग आहे. ' पेशवा ' याची उद्देशार्थी प्रथमा आहे, याचा संबंध ' बाजीरावास ' याकडे आहे. ' पेशवा ' हें ' केलें ' या क्रियापदाचें ' पूरक ' आहे. ' शाहूनें बाजीराव पेशवा केला, ' असें याचें कर्मणि वाक्य करितां येईल.

( ३८ ) " नाम म्हणजे पदार्थाचें नांव. "—या वाक्यांत ' आहे ' किंवा ' होय ' हें क्रियापद गुप्त आहे. ' म्हणजे [ म्हणिजे ] ' हें मूळचें ' म्हण ' धातूचें तृतीय-पुरुषीं वर्तमानकाळीं एकवचनीं कर्मणि रूप आहे. तेव्हां तसें घेतल्यास ' नाम ' हें ' म्हणिजे ' याचें उद्देश्य होईल, आणि ' नांव ' याची उद्देशार्थी प्रथमा. पण आतां ' नाम ' हें ' आहे ' किंवा ' होय ' या क्रियापदाचा कर्ता मानावयाचें, आणि ' म्हणजे ' हें अव्यय; ' नांव ' याचा ' नाम ' याकडे उद्देशार्थी-संबंध.

( ३९ ) " तुला असें कधींही **करावयास यावयाचें** नाहीं, किंवा **करितां यावयाचें** किंवा **करितां येणार** नाहीं. "—या वाक्यांत 'करावयास' किंवा ' करितां ' हें क्रियावाचक धातुसाधित नाम असून तें ' नाहीं ' याचा कर्ता आहे; व ' यावयाचें ' किंवा ' येणार ' हें क्रियाविशेषण आहे.

( ४० ) "त्यानें मला अगदीं बोल–बोलून सोडलें."—हा भावे-प्रयोग आहे. 'बोल–बोलून' हें अव्यय.

---

# प्रकरण ३१.



## काहीं किरकोळ गोष्टी.

### ( १ ) द्विरुक्त शब्द.

५५०. मराठी भाषेंत पुष्कळ शब्दांची द्विरुक्ति करून मग त्यांचा वाक्यांत उपयोग करितात. केव्हां द्विरुक्त शब्दाचे दोन्ही अवयव सारखेच असतात; केव्हां प्रथमावयवाच्या अंत्याक्षरांत फेरफार होतो, किंवा प्रथमावयवाचा अनुकरणवाचक शब्द द्वितीयपदीं घालून द्विरुक्त शब्द करितात. असे द्विरुक्त शब्द भाषेंत इतके आहेत, कीं त्यांची थोडक्यात सर्व व्यवस्था सांगणें कठीण आहे. तथापि येथें त्यांचें दिग्दर्शन केलें आहे.

#### नामें.

५५१. वस्तूंच्या समुदायांतून एकेक पदार्थ भिन्न दाखवावयाचा असतां त्यांच्या नांवांची द्विरुक्ति करितात. अशा द्विरुक्त शब्दांचा कांहीं ठिकाणीं 'प्रत्येक' असा अर्थ असतो, व कांहीं ठिकाणीं त्यांवरून 'प्रमाण' दाखविलें जातें. उदा०—'तो घर घर फिरला.' 'मीं झाड–झाड शोधिलें, पण तसलें फूल सांपडलें नाहीं.' 'माणूस–माणूस प्रकृतीनें भिन्न असतें.' 'ती ओंजळ–ओंजळ तांदूळ घालिते.' 'शिंपी बोट–बोट कापड कापितो.' 'माझा जीव तुझ्यासाठीं तिळ–तिळ तुटतो.' 'पळ–पळ, क्षण–क्षण आयुष्य जात आहे.' इ०.

५५२. अशा अर्थी 'हा' हें दर्शकसर्वनाम व पुरुषवाचक सर्वनामें यांच्याशिवाय सगळ्या सर्वनामांची द्विरुक्ति करून उपयोग करितात. उदा०-'जो जो मनुष्य ज्या ज्या राजाच्या अमलाखालीं ईश्वरी संकेतानें असतो, तो तो

त्या त्या राजाची एकनिष्टपणें सेवा करीत असला, म्हणजे त्यास राजनिष्ठ असें म्हणतात.' इ०.

५५३. द्विरुक्तीनें कोणत्याही वस्तूचे 'अगदीं लहान लहान भाग' असा अर्थ होऊन सामान्यपणें त्या द्विरुक्त शब्दांवरून 'अगदीं' किंवा 'पूर्णपणें' असा बोध होतो. त्याचप्रमाणें मोठ्या समुच्चयांतील एकेक व्यक्ति किंवा त्यांतला अल्प समुदाय पृथक्पणें दाखविणें असल्यास नामांची द्विरुक्ति करितात. पण या दोन्ही अर्थी द्विरुक्त शब्दाचे बहुधा अनेकवचन असतें. उदा०—'त्याच्या ठिकऱ्या-ठिकऱ्या झाल्या.' 'त्यानें तरवारीनें त्याचे तुकडे-तुकडे केले' 'तिनें लुगड्याच्या चिंध्या-चिंध्या केल्या.' लाडवाचा चूर-चूर झाला.' 'त्यांतली प्रकरणें-प्रकरणें काढून वाच.' 'पस्र-पस्र निराळे काढ.' 'ब्राह्मण-ब्राह्मण निराळे, वाणी-वाणी निराळे.' इ०.

५५४. एका टिकाणाहून लगेच दुसरे टिकाणीं, असा सारखा फिरण्याचा बोध करावयाचा असता स्थलवाचक नामाची द्विरुक्ति करितात, तेव्हां प्रथमावयवाच्या अंत्यस्वरास ओकार होतो. उदा०—'दारोदार,' 'गावोगाव,' 'घरोघर' 'शहरोशहर,' 'वनोवन,' इ०.

५५५. कोठें द्विरुक्तीवरून अतिशयत्वाचा बोध होतो. जसें,—'रेवडी-रेवडी,' 'घाम-घाम,' 'फजिती-फजिती,' 'गार-गार,' 'आंबट-आंबट,' 'कडू-कडू,' 'तिखट-तिखट,' इ०. याचीं कांहीं उदाहरणें वर तिसऱ्या कलमांत आलीं आहेत.

टीप—असले अतिशयार्थक द्विरुक्त शब्द होतांना कित्येक टिकाणीं प्रथमावयवाचे अंत्याक्षरास दीर्घत्व येतें. जसें.—'मारामार,' 'झोडाझोड,' 'बुक्काबुक्की,' 'आपटाआपट,' 'तोडातोड,' 'लाथालाथी,' 'गोळागोळी,' इ०.

५५६. द्विरुक्तीनें जोडलेल्या नामांनीं, त्यामधील नात्याचा वगैरे परस्पर संबंध, एक जातित्व अथवा समान धर्म, हीं दर्शविलीं जातात. उदा०—'बहिणी-बहिणी मिळाल्या म्हणजे सासरच्या गोष्टी चालतात.' 'भाऊ-भाऊ भांडत नसतात.' 'सवती-सवती रोज भांडतात.' 'बायका-बायका मिळाल्या म्हणजे जशी मंडई भरते.' इ०.

५५७. विकल्पार्थ किंवा साकल्यार्थ असतां एका नामापुढें त्यावरूनच

साधलेलें निषेधार्थक नाम घालून द्विरुक्त नामें करितात. 'पात्रापात्र (पात्र-अपात्र).' 'न्यायान्याय (न्याय-अन्याय),' 'भक्ष्याभक्ष्य,' 'ग्राह्याग्राह्य,' 'भवति-न-भवति,' 'सारासार,' 'होय-ना,' इत्यादि. हे सर्व द्वंद्व समास आहेत, हें उघड आहे.

५५८. सांप्रत भाषेंत कित्येक द्विरुक्त नामें अशीं आहेत कीं, त्यांना द्विरुक्तपणींच काय तो अर्थ असतो; नुसत्या अवयवास मुळींच अर्थ असत नाहीं. हीं मूळचीं निरनिराळीं नामें असावीं, म्हणजे यांच्या एकेरी शब्दांना मूळचा स्वतंत्र अर्थ असावा. उदा०—कटकट, हळहळ, चळवळ, वटवट, किरकीर, कुरकूर, पिरपीर, मिरमीर, इ०.

## सर्वनामें.

५५९. सर्वनामें नामांप्रमाणेंच द्विरुक्त होतात; त्यांवरून क्वचित् अनिश्चितार्थ निघतो. उदा०—'तो मी मी म्हणत आहे, पण पुढें काय काय करणार आहे कोण जाणे.' 'तेथें कोण कोण आले आहेत, व ते काय काय करीत आहेत, तें पाहा.' यानप्रमाणें 'जो जो,' 'तो तो' इत्यादि उपयोग होतात. पण अशा अर्थी 'तूं तूं' असा उपयोग होतो, असें दिसत नाहीं.

## विशेषणें.

५६०. अनेक वस्तूंच्या समुदायांतून विशिष्ट गुणांनीं युक्त अशांची निवड दाखवावयाची असता त्या गुणाचा बोध करणाऱ्या विशेषणाची द्विरुक्ति करितात. उदा०—'भिकाऱ्यामधले अशक्त अशक्त पाहून त्याना हे पैसे वाट.' 'गोड गोड आंबे निवड.' 'जाड जाड काठ्या मला पाहिजेत.' 'जसजसें वर जावें, तसतसें वातावरण विरळ विरळ होतें.' 'दिवसें-दिवस त्याचें दुखणें जड जड होत आहे.' इ०.

५६१. संख्यावाचकाची द्विरुक्ति केली असतां एकेक वेळीं तितके पदार्थ एकदम, असा अर्थ होतो. उदा०—'समयांत चार चार वाती लावा.' 'पेशव्यानीं रमण्यांत लाख लाख रुपये दक्षणा वाटली.' इ०.

५६२. (अ) आकारान्त विशेषणांची द्विरुक्ति केली असतां पुष्कळदा पूर्वावयवाचा अंत्यस्वर ऱ्हस्व करितात. उदा०—थोडथोडा, मोठमोठा,

जसजसा, तसतशी, इ०. कांहींची अशीं रूपें होतही नाहींत. उदा०—चांगला-चांगला, गोरागोरा, निराळानिराळा, वेगळावेगळा, इ०. अशा विशेषणांची द्विरुक्ति होतांना शेवटच्या अक्षराचा कधीं लोप होतो व उपान्त्य स्वर दीर्घ असल्यास तो ऱ्हस्व होऊन मग तें लघुरूप पूर्वपदीं येतें. उदा०—वेगवेगळा, निरनिराळा, वांकवांकडा, इ०.

(आ) द्विरुक्ति करून अर्थाचा विशेष स्पष्टपणा दाखविणें असल्यास हा स्वर ऱ्हस्व करीत नाहींत; म्हणजे मूळ विशेषण जसेंच्या तसेंच द्विरुक्त करितात. उदा०—'थोडें थोडें वाच म्हणजे लवकर ध्यानांत राहील.' 'मोठे मोठे आंबे निवडून काढ.' 'तेथें तऱ्हेतऱ्हेचे पदार्थ पडले आहेत.' इत्यादि.

(इ) क्वचित् द्विरुक्तीमध्यें एक अवयव थोडा विकृत होतो. उदा०—'खराखुरा.' वास्तविक हें अनुकरण आहे.

## क्रियापदें.

५६३. क्रियापदाची द्विरुक्ति झाली असतां क्रियेचें सातत्य दिसून येतें; किंवा कधीं कधीं द्विरुक्त क्रियापदांवरून आधिक्य, संशय, वानवा, आदर, आग्रह इत्यादींचा बोध होतो. केव्हां द्विरुक्तीच्या ठिकाणीं क्रियापदाची तीनदां आवृत्ति होते. उदा०—'तो खा-खा-खातो.' 'त्यानें त्याला 'मार-मार-मारलें.' 'भर-भर-भरतो.' इ० आणखी कांहीं उदाहरणें:- 'तो बोलतो बोलतो, पण त्याच्याकडे कोणी लक्षच देत नाहीं.' 'हें काम तूं करतोस करतोस तरी किती दिवस?' 'ते देतील देतील किती, तें मला समजतें.' 'तो चालेल चालेल म्हणजे फार तर कोसभर.' 'तो येतो येतो किंवा येईन येईन म्हणतो, पण येईल तेव्हां खरा.' 'काशीस जाऊं जाऊं चाललें आहे, जाणें घडेल तेव्हां खरें.' 'तो आज दहा वर्षें घर बांधूं बांधूं म्हणत आहे.' 'बसावें बसावें तरी किती वेळ?'

'आला आला, प्राणि जन्मास आला,
झाला झाला, वाढला थोर झाला,
केला केला, व्यापही सर्व केला,
गेला गेला, बापुडा व्यर्थ गेला.
'गेला गेला जन्म वृथा.'

५६४. आज्ञार्थी, द्वितीयपुरुषी क्रियापदाच्या द्विरुक्त रूपांवरून त्वरा, चमत्कार, आग्रह, तिरस्कार, प्रार्थना, आग्रहाची विनंती, उपदेश इत्यादि अर्थ निष्पन्न होतात. उदा०—'ये ये लवकर.' 'पाहा पाहा तो कसा बोलत आहे!' 'द्या द्या एवढें.' 'जा जा, तर हा चाललों!'

'रत रत रे सखया राघवनामीं.' —विठ्ठलनाथ.

'घेंई घेंई माझे वाचे। गोड नाम विठोबाचें.' —तुकाराम.

'सोड, सोड, सोड आतां जानकी मला.' —उत्तररामचरित्र.

## धातुसाधितें.

५६५. आतांपर्यंत सांगितलेले सर्व अर्थ दाखविण्याकरितां बहुतेक धातुसाधितांची द्विरुक्ति करितात. पुढील उदाहरणांवरून निरनिराळे अर्थ ध्यानांत येतील:–'हंसणें हंसणें तरी किती?' 'बोलण्यांत बोलण्यांत किंवा बोलण्या–बोलण्यांत अंतर असतें.' 'तो लागत लागत बोलतो.' 'मी बसत बसत आलों.' 'तें पोर खात खात रस्त्यानें जातें.' 'तो फिरत फिरत आमचे घरीं आला.' 'चालतां चालतां त्यास घेरी आली.' 'तो बोलतां बोलतां किंवा बोलून बोलून थकला.' 'ही दोरी इतकी चिवट आहे कीं ती तुटतां तुटतां तुटत नाहीं.' 'कायहो, अगदीं बोलतां बोलतां दिवस खालीं गेला!' 'मी त्यास पढवून पढवून पाहिलें, पण तो दगडच.' 'त्या पोराला मीं वळवून वळवून वाटेवर आणिलें.' 'त्यास शिकवूं शिकवूं तरी किती?'

'रात्र सरली बोलतां बोलतां तें.' —उत्तररामचरित्र.

'पाहतां पाहतां धर्म बुडाला.' —महीपति.

५६६. केव्हां मूळ धातूची द्विरुक्ति होते. तेव्हां सातत्याचा किंवा आधिक्याचा बोध होतो. उदा०–'मला उगीच जा-जा आणि ये-ये झाली.' 'कर-कर काम करून धडपणें कोरडी भाकरही मिळत नाहीं.' 'तुझी दे-दे आतां पुरे.' इ०.

**टीप**—खरें पाहिलें असतां, यांतील बरींच रूपें नामें असल्यामुळें हीं द्विरुक्त नामांचीं उदाहरणें आहेत.

(अ) अशा अर्थी धातुसाधितांची द्विरुक्ति होत असतां प्रथमावयवाचा अंत्य स्वर पुष्कळदां दीर्घ होतो. उदा०—मारामार, ओरडाओरड, खेंचाखेंच,

लावालाव, हिसकाहिसक, धावाधाव, पळापळ, पाडापाड, रडारड, मोडामोड, तोडातोड, झोडाझोड, इ.०

## अव्ययें.

५६७. बहुतेक अव्ययांची द्विरुक्ति होते व ती झाली असतां इतर द्विरुक्त शब्दांचे जसे अर्थ होतात, तसेच अर्थ त्यांनाही प्राप्त होतात. उदा०:— हळूहळू, पुनः पुनः, वरवर, खालीं-खालीं, जवळ-जवळ, दूरदूर, दुरून-दुरून, झटझट, झपझप, पुढेंपुढें, मागेंमागें, फिरून-फिरून, जेव्हां-जेव्हां, जेथंजेथं, कोटेंकोटें, कधींकधीं, हायहाय, शाबासशाबास, इ०.

( अ ) इतर शब्दांप्रमाणें पुष्कळदां द्विरुक्त अव्ययांतील प्रथमावयवामध्यें त्याला ऱ्हस्वत्व किंवा दीर्घत्व येऊन फेरफार होतो. उदा०-भडभडां, थरथरां, कडकडां, लागोलाग, मागोमाग, भराभर, सरासर, इ०.

## द्विरुक्त शब्दांविषयीं सामान्य विचार.

५६८. हे द्विरुक्त शब्द साधतांना होणारे फेरफार जेथच्या तेथें थोडे सांगितलेच आहेत. पण त्याशिवाय आणखीही कित्येक फेरफार होतात, तेही सांगितलेच पाहिजेत. ते असेः–( १ ) क्वचित् प्रथमावयवाचें अंत्याक्षर नाहींसें होतें. उदा०-आपआपला, वेगवेगळा निरनिराळा, भलभलतें, इ०. (२) केव्हां पहिल्या अवयवास च-प्रत्यय लिंगसूचक फेरफारानें किंवा सामान्यरूप करून लावितात. उदा०-कोराच्याकोरा, कधींचेकधीं, हातचेहातीं, हवेल्यांच्या हवेल्या, घरच्याघरें, इ०. ( ३ ) केव्हां दोन अवयवांमध्यें 'ना,' 'कां,' 'कीं,' 'च,' 'न,' इत्यादि अव्यय येतात. उदा०-एकनाएक, थोरकांथोर, घरकींघर, घरचघर, घरनाघर, इ०.

५६९. द्विरुक्त शब्दास विभक्ति लागतांना त्यांना विकार होण्याचे तीन प्रकार आहेत. ते असेः—

( १ ) केव्हां दोन्ही अवयवांना विभक्तिप्रत्यय किंवा शब्दयोगी अव्ययें लागतात. उदा०—'ब्राह्मणाला ब्राह्मणाला निवडून दक्षिणा द्या.' 'पोरींनीं पोरींनीं मिळून सर्व काम केलें.' 'तोंडापुढें तोंडापुढें बोलणारे फार.' अशा ठिकाणीं प्रथमावयवाचें नुसतें सामान्यरूपही करितात. उदा०-पोरींपोरींनीं, ब्राह्मणाब्राह्मणाला,' इ०.

( २ ) द्विरुक्त व्हावयाचा शब्द द्व्यक्षरी असतां विभक्तिप्रत्यय दुसऱ्या अवयवास लागतात, व प्रथमावयवास प्रत्यय लागतात, किंवा त्याचें नुसतें सामान्यरूप होतें. उदा०—काटी-काटीनें, मती मतींत थोरां-थोरांशीं, साडू-साडूनें, इ०. परंतु घोड्या-घोड्यानें, किंवा घोड्यानें-घोड्यानें, पागां-पागांनीं, मोत्या-मोत्यांशीं, दह्या-दह्यांत किंवा दह्यांत-दह्यांत, सास्वे-सास्वेनें, भिंतीं-भिंतींचा, जिभे-जिभेनें, वेळे-वेळेस, इ०.

( ३ ) दोन अक्षरांहून अधिक अक्षरांचीं नामें, अकारान्त तिन्हीलिंगी नामें, व पुल्लिंगी व नपुंसकलिंगी ईकारान्त नामें, यांच्या पहिल्या अवयवास सामान्यरूप होतें. उदा०—घोड्या घोड्याचें, शाळ्या-शाळ्याला, भांड्या-भांड्यांत, माणसा-माणसास, तागडा-तागडींत, परभा-परभाचा, इ०.

## ( २ ) अनुकरणवाचक शब्द.

५७०. एका शब्दापुढें त्याचाच ध्वन्यर्थक शब्द कल्पून घालितात, व अशा प्रकारें अनेक प्रकारचे अनुकरणवाचक शब्द भाषेंत वनावितात. असले शब्द क्रियावाचक शब्दावरून फार करितात. असे शब्द होताना केव्हां प्रथमावयवाची केवळ द्विरुक्ति होते; केव्हां एका शब्दापुढें त्याच शब्दापासून थोड्या फरकानें वनविलेला व अर्थविरहित पण उच्चारानें सारखा शब्द घालितात. क्वचित् प्रथमावयवाच्या अंत्याक्षरांत फेरफार होतो. उदा०—भाकरी विकरी, दगडविगड, लहानसहान, पोरसोर, पेटीविटी, लेखणीविखणी, फडफड, चटचट, चटाचट, लटपट, पुटपुट, इ०.

५७१. या अनुकरणवाचक शब्दांपैकीं कित्येक असे आहेत कीं, त्यांच्या प्रथमावयवाला भाषेत स्वतंत्र अर्थ नाहीं. दोन्ही अवयव मिळून बनलेला द्विरुक्त शब्द योजावा तेव्हां त्यास अर्थ उत्पन्न होतो. उदा०—तडफड, बडबड, खटपट, लटपट, चटपट, तगमग, कळकळ, हळहळ, जळजळ, मळमळ, इ०.

टीप—हे अनुकरणवाचक शब्द अर्थाप्रमाणें नामें, विशेषणें, क्रियापदें, किंवा अव्ययें असतात. यांतल्या कित्येकांच्या शेवटच्या अवयवांचा स्वतंत्र उपयोग होत नाहीं; म्हणून त्या द्वितीयावयवांना प्रत्यय मानावे. अशा रितीनें

ते प्रत्ययांत घातले, म्हणजे ते लागून होणारे शब्द अर्थात् साधित शब्द किंवा समास होतात.

## ( ३ ) व्याकरणान्तर.

५७२. व्याकरणान्तर म्हणजे एखाद्या पदाचा व्याकरणाचे दृष्टीनें जो कांहीं वास्तविक अर्थ असावयाचा, तो भाषेच्या रूढीमध्यें फिरून जाऊन निराळाच अर्थ होणें.

**टीप**—संस्कृत भाषेंतील व्याकरणरूपांचीं मराठी व्याकरणरूपें बनतांना असले फेरफार किंवा व्याकरणान्तरें फार झालीं आहेत. त्या सर्वांचा विचार येथें कर्तव्य नाहीं; परंतु त्यांतलीं कित्येक ठळक-ठळक व्याकरणान्तरें व केवळ मराठींतलीं कांहीं व्याकरणान्तरें येथें सांगतों. यांपासून व्याकरणान्तराची माहिती होऊन अनेक मराठी शब्दांचें मूळ समजण्यास व मराठी भाषेंतील अनेक रूपांची माहिती होण्यास फार उपयोग होईल.

५७३. ( अ ) मराठी आख्यात–विभक्तींपैकीं चालू वर्तमान, ल-प्रत्ययान्त भूतकाळ, व विध्यर्थ, यांचीं रूपें मूळ विशेषणांपासून झालेलीं आहेत. म्हणजे मूळच्या विशेषणांना आतां क्रियापदाचा अर्थ आला. हीं व्याकरणान्तरेंच होत.

( आ ) संकेतार्थ या आख्यात-विभक्तीचीं रूपें चालू वर्तमानकाळाचे रूपांत किंचित् फरक होऊन होतात; हें व्याकरणान्तराचेंच उदाहरण आहे.

५७४. जुन्या वर्तमानकाळच्या रूपांत किंचित् फेरफार होऊन रीतिभूतकाळाचीं रूपें झालीं. या दोन काळांच्या रूपांत जरी फारसा भेद नाहीं, तरी अर्थामध्यें फार भेद आहे जुन्या वर्तमानकाळाचा पहिल्यानें भूतकाळाचे जागीं उपयोग करीत, व पुढें अर्थ फिरून त्याचा रीतिभूत बनला. हें एक लक्षांत घेण्यासारखें व्याकरणान्तर आहे.

५७५. आतां आणखी कित्येक व्याकरणान्तरें सांगतों:—

( १ ) 'हो' धातूच्या संकेतार्थक रूपांना भूतकाळाचा अर्थ येऊन त्यांस आपण भूतकाळचीं रूपें मानूं लागलों; त्याचप्रमाणें 'अस' धातूचीं भूतकाळाचीं रूपें संकेतार्थी उपयोगांत येऊं लागलीं, व 'अस' धातूच्या

भूतकाळाचा मुळींच लोप झाला. 'हो' आणि 'अस' या धातूंच्या रूपांचें असें हें व्याकरणान्तर झालें, तसेंच 'नहो' व 'नस' या धातूंच्या रूपांसंबंधानेंही झालें आहे.

(२) 'म्हणजे' [मूळचें 'म्हणिजे'] हें मूळ 'म्हण' या धातूचें कर्मणि रूप असून तें आतां अव्यय झालें आहे; व 'पाहिजे' हें 'पाह' या धातूचें कर्मणि रूप असून पहिल्यानें त्याचा विशेषणासारखा उपयोग होत असे, पण आतां याचा क्रियापदासारखाही उपयोग करितात.

(३) 'आहे' व 'नाहीं' हे शब्द सांप्रत मराठी भाषेंत स्वतंत्र धातुच बनले आहेत; परंतु प्राकृत भाषेंतील 'अत्थि' व 'न-अत्थि' या तृतीय-पुरुषाच्या रूपांवरून मराठींत ते आले आहेत.

(४) 'न-लगे' व 'न-ये' यांबद्दल मागें सांगितलेंच आहे. [कलम २२४ (१४—१५) पाहा.] तसेंच 'नको' हा धातू 'न-खलु' या अव्ययापासून झाला [कलम २२४ (१०) पाहा]. याचा उपयोग विशेषणा-प्रमाणेंही होतो.

(५) 'करून चुकणें'—एखादी गोष्ट करून चुकणें म्हणजे ती एकदां होऊन गेल्यामुळें परत फिरवितां न येणें. उदा०—'मी त्याच्याकडचें आमंत्रण घेऊन चुकलों; आतां तुझ्या घरीं कसा येऊं?' इ०. अशा प्रकारच्या रूपांत प्रथमतः व्याकरणान्तर होऊन मग अर्थान्तरही झालें आहे. 'करून चुकणें,' याचें मूळचें स्वरूप 'करूं न चुकणें,' [करण्यास मागेंपुढें न पाहणें, खात्री-पूर्वक करणें] असें आहे. उदा०—

'दया त्या कैंची, जो स्वजननिहि खाऊं न चुकला.' —कृष्णशास्त्री.

(६) 'हवेलंडी'— मराठींत हल्लीं जरी हा एकच शब्द झाला आहे; तरी मूळचे हिंदुस्थानांतील ते, 'हा बे-लंडी,' असे तीन शब्द असून त्यांचा अर्थ 'अरे गुलामा!' असा आहे. मराठींत आतां तें नाम झालें असून त्याचा अर्थ गाळण असा आहे.

(७) 'हांजी-हांजी'—'हां! जी!' या दोन मूळच्या निरनिराळ्या हिंदु-स्थानी अव्ययांचा एक शब्द होऊन, व पुन्हां तो द्विरुक्त होऊन मराठींत हें स्त्रीलिंगी नाम बनलें आहे.

( ८ ) 'करमणें'—हें हल्लीं 'मळमळणें,' 'सांजविणें,' इत्यादि क्रियापदां-प्रमाणें 'अकर्तृक क्रियापद' बनलें आहे. मूळचें तें 'क्रमणें' या सकर्मक धातूवरून झालें आहे.

( ९ ) 'पुरे'—हें सध्यां विशेषण किंवा अव्यय झालें आहे; पण हें मूळचें क्रियापद आहे. हें 'पूर' या धातूचें जुन्या वर्तमानकाळाचें तृतीयपुरुषी एकवचनी रूप आहे. याचे जागीं 'पुरतें' असें रूप घातलें असता मूळचा अर्थ लक्षांत येईल. उदा०—'एवढें मला पुरे.' म्हणजे 'एवढें पुरतें, आणखी नको,' असा अर्थ. 'पुरे तुझें बोलणें,' म्हणजे 'तुझें बोलणें हवें तितकें झालें, आतां ज्यास्त बोलूं नको.' इ०.

( १० ) 'वाहवा'—हा शब्द स्त्रीलिंगी नाम म्हणून रूढ झाला आहे. उदा०—'तो जेथें जातो तेथें त्याची वाहवा होते.' पण मूळ पाहिलें तर हा शब्द 'वाः' या संस्कृतभाषेंतील उद्गारवाची अव्ययाची द्विरुक्ति होऊन झाला आहे. म्हणजे 'वाः+वाः' मिळून हा बनला आहे.

( ११ ) 'कामा नये' याचा मूळचा अर्थ 'कामास येणार नाहीं,' म्हणजे 'उपयोगीं पडणार नाहीं,' असा आहे. जसें,—

'मना वासना दुष्ट कामा न ये रे.' —रामदास.

'दुष्ट वासना कामा नये,' म्हणजे दुष्ट वासना उपयोगीं पडणार नाहीं, तिच्यापासून फायदा-कल्याण-होणार नाहीं. पण सध्या त्याचा अर्थ 'कामाचें नाहीं,' 'चालावयाचें नाहीं.' 'खपणार नाहीं,' असा झाला आहे.

( १२ ) 'चिरं-जीव'—याचा मूळचा अर्थ 'पुष्कळ दिवस जग,' असा आहे. म्हणजे हें आशीर्वादार्थक वाक्य आहे. पण सांप्रत तें एकशब्दात्मक नाम झालें असून त्याचा अर्थ, 'ज्याला आशीर्वाद द्यावयाचा तो' म्हणजे 'मुलगा'—'पुत्र,' असा झाला आहे.

( १३ ) 'भिक्षांदेई'—हा शब्द 'भिक्षांदेहि' [ भिक्षा द्या-घाला ] या संस्कृत वाक्याचा अपभ्रंश आहे, हें स्पष्टच आहे. आतां तें एक स्त्रीलिंगी नाम बनलें आहे. त्याचा अर्थ 'भिक्षा, भीक,' असा रूढ आहे.

( १४ ) 'कोरड्यास'—हा शब्द मूळचा 'कोरडें' या शब्दाची चतुर्थी आहे. त्याचा अर्थ 'कोरडी जी भाकर तिजसाठीं,' असा आहे. पण आतां

तो शब्द स्वतंत्र नाम झाला असून त्याचा अर्थ 'कोरडी अशी जी भाकर तिला आलावा आणण्याकरितां तिजबरोबर खाण्याचा पातळ पदार्थ,' असा रूढ झाला आहे.

(१५) 'किंतू'--हा शब्द 'किं+तु' या दोन संस्कृत अव्ययांच्या एकीकरणानें बनला आहे. त्या अव्ययांचा मूळ अर्थ 'परंतु' असा असून आतां त्याचा रूढार्थ 'विकल्प,' 'शंका,' असा नामवाचक झाला आहे.

(१६) 'वानवा'-हा शब्द संस्कृतांतील 'वा + न +वा' या अव्ययांच्या जुळणीनें बनला आहे. त्या अव्ययाचा मूळ अर्थ 'होय किंवा नाहीं' असा सामान्यपणें असून सध्यां त्याचा रूढार्थ 'संशय,' 'शंका,' असा आहे.

टीप—व्याकरणान्तराचीं अशीं आणखी पुष्कळ उदाहरणें देतां येतील; परंतु सध्यां ज्यास्त पाल्हाळ करण्याचा विचार नाहीं. भाषा शिकणारांचें अशा दृष्टीनें मराठी भाषेच्या अभ्यासाकडे लक्ष लागावें, याच हेतूनें येथें त्यांचें थोडक्यांत नुसतें दिग्दर्शन केलें आहे.

---

समाप्त.

# सूचिपत्र.



**टीप**—यांतील आंकडे कलमांचे आहेत. कोठें पृष्ठांचे आंकडे घातले आहेत त्यांचे पूर्वी 'पृ०' असें अक्षर घातलें आहे.